# वेदांतील राष्ट्रदर्शन

दि. १ एप्रिल १९५५ ते १७ एप्रिल १९५५
या कालावधींत पुण्यास साहित्याचार्य
श्री. बाळशास्त्री हरदास यांचीं
झालेलीं व्याख्यानें

मूल्य ८ रुपये

# दोन शब्द

साहित्याचार्य श्री. बाळशास्त्री हरदास यांनीं यंदा पुण्यास 'वेदांतील राष्ट्रदर्शन' या विषयावर पंधरा व्याख्यानें दिलीं. तीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत येत आहेत. हीं व्याख्यानें दि. १ एप्रिल ते १७ एप्रिलपर्यंत झालीं. या व्याख्यानांचें पुस्तक जूनअखेरच्या सुमारास प्रसिद्ध करण्याचा पहिला विचार होता; परंतु मध्यंतरीं आलेल्या आकस्मिक व अनपेक्षित अडचणीं-मुळें प्रसिद्धीकरणाचा दिवस आजपर्यंत लांबला. त्याबद्दल वाचक क्षमा करतील अशी अपेक्षा आहे. यापूर्वी श्री. बाळशास्त्री हरदास यांनीं रामायण, महाभारत व भगवान् श्रीकृष्ण या तीन विषयांवर पुण्यास तीन व्याख्यान-माला दिल्या; व यंदा 'वेदांतील राष्ट्रदर्शन' या विषयावर चौथी दिली. त्यांनीं पुण्यांतील लोकांना हें नवीनच दर्शन घडविलें असून या ग्रंथाच्या रूपानें त्याचा भारतांतील जनतेस परिचय होऊं शकेल यांत शंका नाहीं. वेदांतील राष्ट्रीयतेचें विशेष दर्शन त्यांनीं या व्याख्यानमालेंत प्रदर्शित केलें असून पुढील वर्षी होणाऱ्या व्याख्यानमालेंत त्याचें सम्यक् दर्शन ते घडवितील अशी अपेक्षा आहे.

या ग्रंथास लोकनायक श्री. माधव श्रीहरि ऊर्फ बापूजी अणे यांनीं प्रस्तावना लिहिली याबद्दल त्यांचे आभार मानणें अवश्य आहे.

दि. ६।१०।१९५५ प्रकाशक

# अनुक्रमणिका



---

# प्रस्तावना

श्री. बाळशास्त्री हरदास हे महाराष्ट्र व मध्यप्रदेश या दोन्ही राज्यांतील आबालवृद्धांच्या परिचयाचे आहेत. ते जाडे पण्डित आहेत, कसलेले लेखक आहेत व प्रभावशाली वक्ते आहेत. सार्वजनिक सेवा त्यांनीं आजपर्यंत हौसेनें व त्यागपूर्वक केलेली आहे. त्यांचा भारतीय संस्कृतीसंबंधानें एक विशिष्ट दृष्टिकोन आहे, व तो सखोल अभ्यास करून जनतेसमोर व्याख्यानरूपानें व ग्रंथरूपानें ते ठेवीत असतात. त्यांनीं परिश्रमपूर्वक अभ्यास करून रामायण, महाभारत, व श्रीमद्‌भागवतांतील श्रीकृष्णचरितामृत या तीन विषयांवर गेल्या चारपांच वर्षांत दिलेलीं व्याख्यानें पुण्यांतील श्रोत्यांच्या कानांत अजून घुमत आहेत. त्यांनीं आपल्या विद्वत्तेची छाप मध्यप्रदेश व महाराष्ट्र यांतील सुशिक्षित व बहुश्रुत लोकांवर पाडली आहे आणि आपल्या तुफानी वक्तृत्वानें श्रोत्यांस भारून टाकलें आहे. त्यामुळेंच पुण्यांतील समंजस श्रोतृवर्ग शास्त्रीबोवा पुढील वर्षी व्याख्यानाकरितां कोणता विषय घेणार व व्याख्यानाला केव्हा येणार याची चौकशी करीत असतात. शास्त्रीबोवा व्याख्यानांतून प्रकट केलेल्या विचारांना हवेंत विलीन होऊं देत नाहींत. त्यांना ग्रंथरूपानें संकलित करून, सभांना उपस्थित नसलेल्या आपल्या लाखो देशबंधूंना व धर्मबंधूंना ते उपलब्ध होण्याची व्यवस्था करतात. आतांपर्यंत त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या तीन विषयांवरील व्याख्यानमालांचीं पुस्तकें अत्यंत लोकप्रिय झालेलीं आहेत. कारण त्यांच्या ग्रंथामुळें रामायण, महाभारत व भागवत अशा समाजाला पूज्य पण दुर्बोध वाटणाऱ्या ग्रंथांचें रहस्य कळण्यास त्यांना फार साह्य होतें व त्या मूळ ग्रंथांचें परिशीलन करण्याची तीव्र उत्सुकता त्यांच्यांत निर्माण होते.

२. शास्त्रीबोवांच्या यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या रामायण, महाभारत व भगवान् श्रीकृष्ण या व्याख्यानमालांमुळें वैदिक संस्कृतीच्या विस्तीर्ण व पवित्र भूमींतील त्रिस्थळी यात्रा करण्याचें साधन उपासकास उपलब्ध झालें आहे. पण या सर्व तीर्थांच्या उगमस्थानीं असलेल्या चार वेदरूपी चार धामांची यात्रा करण्याचें साधन निष्ठावंत उपासकांस मराठी भाषेंतून उपलब्ध नव्हतें. शास्त्रीबोवांनीं या वर्षी 'वेदांतील राष्ट्रदर्शन' या विषयावर

पंधरा व्याख्यानें देऊन ती उणीव बऱ्याच अंशीं भरून काढली आहे. तीं व्याख्यानें प्रस्तुत ग्रंथाच्या रूपानें प्रसिद्ध करून जिज्ञासू उपासकांची त्यांनीं मोठी सोय केली आहे. वैदिक संस्कृतिरूप हिमालयांतील वेदचतुष्टयरूपी उत्तुंग शिखरावर असलेल्या तीर्थाचें दर्शन घेऊं इच्छिणाऱ्या यात्रेकरूंस या व्याख्यानमालाग्रंथाचा उपयोग एकाद्या उत्कृष्ट वाटाड्याप्रमाणें होईल.

वेदवाणींतील प्रत्येक अक्षरांत पावित्र्य व सामर्थ्य खचून भरलेलें आहे अशी वैदिक धर्माभिमान्यांची श्रद्धा असल्यामुळें तींत अमूक स्थळ अधिक पवित्र व अमुक स्थळ कमी पवित्र असा भेदाभेद करतां येणें शक्य नाहीं. तथापि पृथ्वीपर्यटनास निघालेल्या व्यक्तीस ज्याप्रमाणें पृथ्वीवरील यच्च-यावत् स्थळांचें व वस्तुमात्राचें दर्शन घेणें अशक्य असल्यामुळें कांहीं प्रातिनिधिक स्थळें पाहूनच आपल्या पृथ्वीप्रदक्षिणायात्रेची पूर्तता करावी लागते तद्वतच वेदवाणींत अवगाहन करूं इच्छिणाऱ्या उपासकांना प्रचण्ड वेदौघाच्या कांहीं घाटांवर जाऊनच स्नान व तीर्थविधि करून आपली यात्रा पूर्ण करणें अवश्य असतें. ते घाट कोणते व तीं स्थळें कोणतीं कीं जेथून दृष्टिक्षेप केला असतां सर्व वेदगंगेचा बाणाकार प्रवाह एकदम दृष्टीस पडून वेदगंगेचें संपूर्ण दर्शन झाल्याचें व सर्व गंगेंत स्नान केल्याचें फल प्राप्त होईल हें सांगण्यास एकाद्या तीर्थोपाध्यायाची आवश्यकता असते. शास्त्रीबोवांच्या या ग्रंथानें हें मार्गदर्शकाचें कार्य उत्तम प्रकारें होईल असें मला वाटतें.

३. वेदांतील राष्ट्रदर्शन वाचकास करून देण्यापूर्वीं शास्त्रीबोवांनीं तदंग-भूत बहिरंगपरीक्षण स्वरूपाच्या अनेक महत्त्वाच्या प्रश्नांचीं सविस्तर व मार्मिक चर्चा केली आहे. वेदासंबंधानें भारतीयांची श्रद्धा, पाश्चात्य विद्वा-नांची वेदाभ्यासपद्धति, वेदाचा काल, आर्यांचें मूलस्थान, आर्यशब्दाचा अर्थ व त्याचा आणि दस्यू शब्दाचा संबंध, वेदांचें कर्तृत्व अथवा पौरुषेयत्ववाद या प्रश्नांचा या ग्रंथांतील व्याख्यानांतून ऊहापोह करण्यांत आलेला आहे. हे सर्वच प्रश्न वादग्रस्त आहेत व कदाचित् ते सदैव वादग्रस्तच राहतीलही. त्यावर निरुत्तर करणारें निर्णयात्मक मत कोणास केव्हांतरी देतां येईल कीं नाहीं याची मला तरी जबरदस्त शंकाच वाटते. तथापि शास्त्रीबोवांनीं या संबंधानें आपले विचार ज्या विद्वत्तेनें व निर्भयतेनें प्रतिपादन केले आहेत त्याबद्दल त्यांचें कौतुक केल्याशिवाय राहवत नाहीं.

४. पाश्चात्य वेदाभ्यासी संशोधकांनीं उत्पन्न केलेल्या विचाराच्या चाकोरींतूनच भारतीय नवीन संशोधकही जातात. त्यांनीं घालून दिलेल्या संकेतानुरूपच ते आपलें संशोधन चालू करतात. यामुळें वेद व वैदिक आर्य याविषयीं अनेक अपसमज निर्माण झाले आहेत. या त्यांच्या तक्रारींत पुष्कळ तथ्य आहे. अगाध पांडित्याबद्दल, खोल अभ्यासाबद्दल व स्वतंत्र प्रज्ञा आणि प्रतिपादनशैलीबद्दल ज्यांचा जगभर यथार्थ लौकिक आहे असे लो. टिळक, डॉ. राधाकृष्णन्, प्रो. रानडे, डॉ. केतकर व शास्त्रीबोवांना गुरुस्थानीं असलेले म. म. कृष्णशास्त्री घुले हे देखील या दोषापासून सर्वथैव अलिप्त राहूं शकले नाहींत असें त्यांनीं या ग्रंथांत, त्यांच्याहून आपल्या मताची भिन्नता व्यक्त करतांना, दाखवून दिलें आहे. शास्त्रीबोवांच्या विचारसरणींतील मुख्य प्रमेय असें दिसतें कीं, या सर्व नवीन संशोधनाचे आधारस्तंभ असलेले विज्ञानशास्त्रनिर्णय हेच मुळीं प्रमाण म्हणून गृहीत धरण्याच्या योग्यतेचे नाहींत; ज्योतिष, भूगर्भ, भाषाशास्त्र, इत्यादि ज्ञानशाखा अजून अपरिपक्वच आहेत; त्यांतील पंडितांत किंवा तज्ज्ञांत क्वचितच एकवाक्यता असते; तेव्हां ते सिद्धांत प्रमाण मानून वेद व वैदिक आर्य यासंबंधानें केलेलीं विधानें हीं निश्चित स्वरूपाचीं असूं शकत नाहींत.

कित्येकांना हें विधान एकान्तिक स्वरूपाचें आहे असें वाटेल. पण आजच्या विज्ञानाच्या स्थितींत ज्या सिद्धान्तांवर तज्ज्ञांचीच एकवाक्यता होऊं शकत नाहीं, ते निदान वेदाचा काल व स्थल याचे अंतिम निर्णय करण्यास पूर्णपणें उपयोगी पडूं शकत नाहींत एवढें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. परंतु त्याचबरोबर हेंही कबूल करावयास पाहिजे कीं, नवीन शास्त्रीय ज्ञानाच्या प्रगतीमुळें जगाच्या प्राथमिक व प्राचीन स्थितीवर जितका जितका अधिक प्रकाश पडेल तितका तितका वेदार्थ स्पष्ट होण्यास व तदंतर्गत प्रतिपादित विषयाचा बोध होण्यास अधिकाधिक साहृय होईल. कारण वेद हेंच जगांतील प्राचीनतम वाङमय असल्यानें त्याच्या यथार्थ ज्ञानास जगाच्या प्राचीन अवस्थेच्या शास्त्रशुद्ध ज्ञानाची आवश्यकता आहे. कारण कोणत्याही वाङमयांत तें ज्या काळांत झालें असेल त्या काळांतील परिस्थितीचें प्रतिबिंब कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत व्यक्त झाल्याशिवाय राहात नाहीं.

वेदाकडे ऐतिहासिक दृष्टीनें पाहणाऱ्यांचा वर्ग पाश्चात्य संशोधनामुळें प्रथमच उत्पन्न झाला असें नाहीं. यास्काचार्यांनीं निरुक्तांत 'ऐतिहासिकाः' म्हणून वेदार्थ करणाऱ्यांमध्यें एक पक्ष आहे हें स्पष्टपणें नमूद केलें आहे; व इंद्र व वृत्र यांच्यामधील वेदांत वारंवार येणाऱ्या युद्धाचा उल्लेख करून निरनिराळ्या मतांचे लोक त्याचा कसा निरनिराळा अर्थ करतात याचेंही वर्णन केलें आहे. हें सर्व वेदाभ्यासी लोकांस विदित आहे. वेद हे प्राथमिक स्फोट स्थितींतून नादब्रह्म स्थितींत आल्यावर त्यांचे मानवाच्या उद्धारार्थ मंत्रद्रष्ट्यांनीं शब्दरूपांत प्रकटीकरण केलें हा काल कितीही जुना असला तरी तो होता व त्यावेळीं मंत्रद्रष्टे ऋषि एवढीच मनुष्यवस्ती या जगांत नसून ती बरीच मोठी व जगतांत विस्तृत पसरलेली होती असें मानलें म्हणजे वेद ध्वनिरूपांतून शब्दरूपांत बदलत असतांना जो ज्ञानप्रवाह सतत वाहात होता त्यांत तो ज्या स्थलांतून वाहात होता व ज्या जनांतून वाहात होता त्या सर्वांची स्पष्ट किंवा पुसट अशीं प्रतिबिंबें पडलीं असलींच पाहिजेत व आजच्या संशोधकाला त्याचा थोडा ना थोडा तरी शोध कसोशीनें व निर्विकार आणि पूर्वग्रहशून्य परिश्रम केल्यास लागतो व लागत राहील अशी माझी मनोधारणा आहे. मनुष्य शास्त्रबलानें अज्ञात जगांतील ज्ञानही आपल्या बुद्धिकक्षेच्या आंत आणण्याचा प्रयत्न करीत आहे व त्यांत त्याला यशही मिळत आहे हें आपण पाहतों. मंगळ, चंद्र इत्यादि ग्रहांवर वसति आहे कीं नाहीं, त्यांची स्थूलदृष्ट्या भौगोलिक रचना कशी आहे यासंबंधानें स्पेक्ट्रोस्कोप रंगपटयंत्राच्या साहाय्यानें अभ्यास करून ज्योतिषशास्त्रवेत्त्यांनीं मानवी ज्ञानांत बहुमोलाची भर घातली आहे. तसेंच पुरातत्त्ववेत्यांनीं उत्खननादी साधनांनीं भूगर्भांत दडून बसलेल्या मानवी संस्कृतीचे अवशेष बाहेर आणून व त्यांचें पद्धतशीर परीक्षण करून प्राचीन इतिहासज्ञान विसृत करण्याचें बहुमोल कार्य करून ठेविलें आहे. आज हीं साधनें व हीं परीक्षणें परिपक्वदशेस पोचलीं नसल्यामुळें त्यांच्या निर्णयाचा स्वीकार करतांना सावधगिरी ठेवणें अवश्य आहे. एकाद्या पुरातत्त्ववेत्यानें एकादा सिद्धांत मांडल्याबरोबर त्याची नीट शहानिशा न करतां त्याचाच 'ढोल' वाजवीत पुरस्कार करून आपल्या देशाच्या इतिहासाचें चित्रण तदनुसार करणें हें बरोबर नाहीं हेंही मान्य केलें पाहिजे. शास्त्रीबोवांनीं मोहेंजोदारो व

सुमेरियन संस्कृति व द्रविड संस्कृति यांचें केलेलें विवेचन अभ्यासूंनीं मनन करण्यासारखे आहे यांत शंका नाहीं. तथापि प्राचीन इतिहासासंबंधानें ज्ञानप्राप्ति करून घेण्याच्या बाबतींत या नवीन संशोधनप्रयत्नास महत्त्वाचें स्थान द्यावयास पाहिजे असें मला वाटतें.

५. ऋग्वेदकालीन आर्यसंस्कृतीसंबंधानें जे अनेक अपसमज आहेत त्यांपैकीं एक हा कीं, वैदिक लोकांत अध्यात्मप्रवृत्तीचा व अध्यात्मज्ञानाचा व नीतीचा उदय व विकास झाला नव्हता; ते स्वार्थी, द्रव्यलोभी होते. हें विधान करणाऱ्यांत केवळ पाश्चात्य संशोधकच नाहींत तर भारतीय प्रथितयश लेखकही आहेत. या मताचें खंडन योगी अरविंद घोष यांनीं अनेक वैदिक मंत्रांचा आध्यात्मिक अर्थ लावून केलें आहे. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं आपल्या धर्मकोशांतील उपनिषद् खंडांत चारी वेदांतील व ब्राह्मणांतील आध्यात्मिक व नैतिक तत्त्वाचा बोध करणाऱ्या वचनांचा संग्रह प्रसिद्ध करून व त्या खंडाला इंग्रजी व संस्कृत प्रस्तावना लिहून या विधानाचा फोलपणा उघडकीस आणला आहे. लोकमान्यांनीं गीतारहस्यांत नासदीय सूक्ताचें विस्तृत विवेचन करून प्राचीन मन्त्रद्रष्ट्या ऋषींनीं अध्यात्म विद्याकाशांत केवढी उंच भरारी मारली होती हें दाखवून दिलें होतें. बाळशास्त्र्यांनीं प्रस्तुत ग्रंथांतील 'वैदिक राष्ट्राचें आध्यात्मिक अंतरंग' व 'वैदिक राष्ट्राची परमार्थविषयक धारणा' या दोन व्याख्यानांत या विषयाचें सविस्तर विवेचन करून उपनिषत्कालाचे पूर्वींच वैदिक आर्यांची आध्यात्मिक व पारमार्थिक विचारप्रणालि अत्यंत उच्चध्येयानुगामिनी होती हें स्पष्ट केलें आहे.

६. या संबंधांत शास्त्रीबोवांनीं 'अनुभूतिवाद व भावजीवन' यावर जें व्याख्यानमालेंतील १४ वें व्याख्यान दिलें आहे तें अत्यंत मननीय आहे. तें भारतीय संस्कृतींतील तत्त्वज्ञानी व जगांतील इतर सुसंस्कृत राष्ट्रांतील तत्त्वज्ञानी यांतील भेद स्पष्ट करून दाखविणारें आहे. तत्त्वज्ञान हा केवळ बुद्धीचा तर्कशास्त्राधारें करावयाचा विलास नव्हे तर तो अनुभूतीचा व जीवनपरिवर्तन करणारा विषय आहे. तत्त्वज्ञान झालेला मनुष्य 'सिद्धपुरुष' होतो. तो युरोपांतील 'प्रोफेसरा'सारखा असत नाहीं व दिसत नाहीं. रामकृष्ण परमहंस, महर्षि रमण, विवेकानंद, योगी अरविंद अथवा प. पूज्य अण्णासाहेब पटवर्धन या व्यक्तींना तत्त्वज्ञान नुसतें येत नव्हतें तर तें त्यांच्या

रोमरोमीं मुरलेलें होतें. त्यामुळें त्यांच्या आंतरजीवनाचा कायापालटच झालेला होता. असल्या ज्ञान्यांच्या अस्तित्वाचा राष्ट्राच्या नैतिक व आध्यात्मिक धारणेंत केवढा मोठा आधार असतो हें भारतीयांच्या हजारो वर्षांच्या अखंड व अप्रतिहत अस्तित्वानेंच सिद्ध होत आहे. हजारो वर्षांतील आपत्तींना तोंड देत वैदिक राष्ट्रपुरुष आपलें अस्तित्व कसें कायम ठेवूं शकला याचें इतिहासज्ञांना वाटणारें कोडें हें या अनुभूतिसिद्ध ज्ञानी लोकांच्या संतत सान्निध्याच्यामुळें जनतेंत उत्पन्न झालेल्या पारमार्थिक धारणेंत व नैतिक निष्ठेंत आहे. भारतीय संस्कृतींतील 'अनुभूतिवाद' हा एक परिस आहे. त्याच्या स्पर्शानें भारतीय राष्ट्रावर चढलेल्या लोहमय प्रवृत्ती सुवर्णमय होऊन तें राष्ट्र स्वतेजानें व प्रभावानें पुन्हा तळपावयास लागतें. या सिद्ध पुरुषांत व सामान्य पुढाऱ्यांत एक मोठा फरक आहे. तो हा कीं, हे सामान्य पुढारी व त्यांचे अनुयायी माझ्यामुळें किंवा आमच्यामुळें अमुक अमुक शतकृत्य झालें याचा डांगोरा पिटीत असतात; पण वस्तुत: ज्या सिद्ध पुरुषाच्या पुण्यप्रभावानें देशांतील दीनदुर्बलांत देखील उच्च ध्येयप्राप्तीचा अल्पकाळ कां होईना, संचार होऊन ते अचाट कृत्यें करण्यास प्रवृत्त होतात, ते लोकांना प्रत्यक्ष कांहीं करतांना दिसत नसल्यामुळें व त्यांच्या ठिकाणीं अहंप्रवृत्तीचा पूर्ण लोप झाला असल्याकारणानें लोकांना त्यांच्या अस्तित्वाची देखील जाणीव नसते. मग त्यांच्या मूक प्रभावी कर्तृत्वाचें सम्यक् ज्ञान असणें दूरच राहिलें. ही भारताची मूल्यवान ठेव असून भारत जर या जगताच्या उद्धाराचें कांहीं महत् कार्य भावी काळांत करणार असेल तर तें याच सिद्ध पुरुषांच्या अनुग्रहानें व कृपेनें होईल.

७. प्रस्तुत ग्रंथांतील वेदकालीन स्त्रिया व शिक्षणपद्धति आणि गुरुशिष्य संबंध व त्यांना अनुलक्षून विवाह व उपनयन या संस्कारांविषयीं केलेलें प्रतिपादन वाचून आपल्या संस्कृतीच्या उन्नत व श्रेष्ठ प्राचीनत्वाविषयीं वाचकांना योग्य अभिमान वाटेल व बदललेल्या परिस्थितींत मूलभूत तत्त्वांचा आश्रय न सोडतां आपल्या राष्ट्रास प्रगतीचा मार्ग आखावयाचा आहे येवढी जाणीव, जिचा ग्रंथकारानें 'अस्मिता' या उद्बोधक शब्दानें उल्लेख केला आहे ती थोडया अंशानें जरी वाचकांत निर्माण झाली तरी शास्त्रीबोवांना केलेल्या श्रमांचें सार्थक झालें असें वाटेल.

८. बाळशास्त्री हरदास ही व्यक्ति म्हणजे चालतें बोलतें विद्यापीठचा आहे. त्या विद्यापीठाचे ते कुलगुरु—व्हाइस चॅन्सेलर आहेत—व त्यांचे प्रेरक त्यांच्या गुरुस्थानीं असलेले अप्रबुद्ध हे आहेत. या व्याख्यानांत त्यांनीं अनेक ठिकाणीं त्यांच्या म्हणजे अप्रबुद्ध यांच्या मौलिक मतांचा निर्देश मोठ्या आदरानें केलेला आहे. 'अप्रबुद्ध' हे अत्यंत प्रबुद्ध आहेत. त्यांच्यावर ब्रह्मीभूत अण्णासाहेब पटवर्धन यांची पूर्ण कृपा होती. शास्त्रीबोवांची ही भारतीय ज्ञानप्रसारक व्याख्यानमाला ही परंपरेनें पूज्य अण्णासाहेब पटवर्धन यांच्या स्फूर्तीमुळें लाभलेला ज्ञानदीपाचा प्रकाश सर्व महाराष्ट्रभर प्रसृत करण्याचेंच कार्य करीत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

९. प्रस्तावनालेखाला कांहीं तरी मर्यादा आहेच. ती मर्यादा मी ओलांडली कीं नाहीं हें ठरविण्याचें मी वाचकांवर व ग्रंथकर्त्यावरच सोपवितों. मला या ग्रंथास प्रस्तावना लिहिण्याची सूचना करण्यांत माझा मोठा गौरव झाला असें मला वाटतें. बाळशास्त्रींचा व माझा पूर्वापार घरोबा व अगदीं अलीकडे झालेला जवळचा नातेसंबंध लक्षांत घेतां मी त्याबद्दल आभार मानतो अशी औपचारिक भाषा वापरणें मलाही आवडत नाहीं व त्यांनाही ती प्रशस्त वाटणार नाहीं असा माझा विश्वास आहे. म्हणून त्यांच्या विषयीं वाटणारा आदर मी येथें व्यक्त न करतां त्यांच्या अंगीकृत कार्यांत व त्यांच्या अभीप्सित राष्ट्रोद्योगांत अल्पकाळांत अपरिमित यश येवो अशी सदिच्छा व्यक्त करून मी लेखणीस विश्रांति देण्यांकरितां खालीं ठेवतो.

यस्य निःश्वसितं वेदा यो वेदोभ्योऽखिलं जगत् ।
निर्ममे तमहं वन्दे विद्यातीर्थमहेश्वरम् ।

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।

३४२, सदाशिव पेठ,
पुणें, दि. ४।१०।५५.

**माधव श्रीहरि अणे**

# वेदांतील राष्ट्रदर्शन

## व्याख्यान पहिलें

## विषयप्रवेश

गेल्या दीडशें वर्षांच्या पारतंत्र्यांतून सुटका होऊन भारत स्वतंत्र झाल्यानंतर सर्वांत महत्त्वाचा व इतर अनेक समस्यांचा स्वतांत समावेश करून घेण्याइतका सर्वंकष स्वरूपाचा जो प्रश्न उत्पन्न झालेला आहे तो हा कीं, स्वतंत्र भारतांतील नवीन राष्ट्रीय जीवन कोणत्या मूलभूत तत्त्वांच्या आधारशिलेवर उभारावें. जगापासून आपणांस पुष्कळ शिकण्यासारखें आहे हें खरें असलें तरी आपल्या वैभवसंपन्न भूतकालांतून आपल्या अस्मितेचें स्वरूप समजावून घेणें व स्वतःच्या जीवनमंदिराची आधारशिला निश्चित करणें हें त्याहूनहि अधिक महत्त्वाचें आहे.

भारतीय राष्ट्रीयत्वाचा विचार करूं लागलें असतां जगांतील राष्ट्रांच्या इतिहासांत त्याचें वेगळेपणानें उमटून दिसणारें स्वरूप ध्यानांत आल्याविना राहात नाहीं. जगांतील सर्व राष्ट्रांना जन्ममरणाच्या चक्रांत सांपडावें लागलें आहे. उत्पत्ति, विकास व विनाश या त्रयीच्या चक्रांतून जशी व्यक्तीची सुटका होत नाहीं तशीच जगांतील राष्ट्रांचीहि सुटका या चक्रांतून झालेली नाहीं असें जगाचा इतिहास सिद्ध करतो; पण जन्म, विकास व मृत्यूच्या चक्रांतून पूर्णपणें सुटलेलें असें भारत हें एकच राष्ट्र आढळतें. या राष्ट्राचा आदि काय आहे याचा शोध घेण्याचा प्रयत्न करूनहि संशोधकांनीं व त्यांच्या साधनांनीं आपली असमर्थता वारंवार व्यक्त केलेली आहे. हिमाचलाच्या सर्वोच्च शिखरावर उभे राहून आमच्यापेक्षां वयानें वडील असणारा कोणी आमचा बंधु आहे का, म्हणून भारतीय राष्ट्रानें मागोवा

घेण्याचा प्रयत्न केला तर त्याला त्यासंबंधीं निराश व्हावें लागेल. ज्ञात जगांतील देवी शारदेचा पहिला वीणाझंकार म्हणजे भारतीयांचा ऋग्वेद होय, हें सर्व इतिहाससंशोधकांनीं आतां मान्य केलेलेंच आहे. या ऋग्वेदांतच भारतीय राष्ट्राच्या अस्मितेचें सिद्ध स्वरूप दृष्टोत्पत्तीस येतें. जुन्या असुर राष्ट्राचा अथवा आजच्या पारशांचा धर्मग्रंथ जो अवेस्ता तोसुद्धां ऋग्वेदाहून अर्वाचीन आहे. सुमेरियन, खाल्डियन, या संस्कृतीहि भारतीय संस्कृतीहून प्राचीन ठरत नाहींत व सिंधुसंस्कृति तर वस्तुतः हिंदु संस्कृतीच होय हें आतां सिद्धच झालेलें आहे. तेथील कितीतरी चिन्हांचा उलगडा भारतीयांच्या सांस्कृतिक वर्णनावरून लागतो. इतर कांहीं संस्कृतींशीं असलेल्या साम्यावरून भारतीय संस्कृतीनें त्यांची उसनवारी केली असें म्हणणाऱ्या लोकांनाहि सादृश्यतेचा पुरावा दुतोंडी असतो येवढें सांगितलें म्हणजे पुरें आहे.

मोहेंजोदारो येथील एका चित्रांत एका झाडाच्या फांद्यांतून दोन तोंडें निघालीं आहेत असें एक व ज्यांतून सहा निघालीं आहेत असें एक अशीं चित्रें आहेत. त्यावरून तीं वृक्षांत राहणारीं भुतें असावींत अशी कांहीं संशोधकांनीं कल्पना केलेली आहे. पण एका उच्च संस्कृतीच्या अवशेषांत हीं चित्रें सांपडलीं असल्यानें ऋग्वेदाच्या 'अस्यवामस्य' सूक्तांतील एकाच वृक्षावरील फळें खाणाऱ्या व न खाणाऱ्या दोन सुपर्णांचा व सहा भुवनांना सांभाळणाऱ्या एका अजाचा जो निर्देश आहे तोच या चित्रांमधून स्पष्ट होत असला पाहिजे असें म्हणण्यास पुष्कळ जागा आहे.

जगांतील भिन्नभिन्न प्राचीन संस्कृतींतील अनेक गूढांचा उलगडा जर याप्रमाणें भारतीय राष्ट्राच्या साहित्यांतील संकेतावरून होतो, तर सादृश्यवादाच्या पुराव्याचा खरा अर्थ काय होतो हें स्पष्ट सांगावयाचीच आवश्यकता नाहीं. तात्पर्य, भारतीय राष्ट्राहून प्राचीन असें राष्ट्र जगांत दुसरें नाहीं. वडील बंधूंच्या संबंधांत असणारी ही वस्तुस्थिति

ध्यानांत घेतल्यानंतर आमचे कोणी धाकटे बंधू आहेत काय म्हणून आम्ही जर शोधूं लागलों तर आमचे सर्वच्या सर्व धाकटे बंधू कांहीं काळ इतिहासाच्या क्षेत्रांत विजेप्रमाणें तळपून गेले असले तरी ते अल्पायुषी ठरले असेंच इतिहासाचा संकेत सिद्ध करतो. युरोपला तत्त्वज्ञानाची दीक्षा देणारे व 'आम्हीच काय ते जगांत राज्य करावयासाठीं जन्मास आलों असून इतर मानव समाजांनीं आमचें दास्य पत्करणें हेंच नैसर्गिक आहे' अशी उन्मत्त गर्जना करणारे ॲरिस्टॉटल व प्लेटो यांचें व फिलिप आणि अलेक्झांडर यांचें तें ग्रीक राष्ट्र आज कोठें आहे ? साऱ्या युरोपला आत्माभिमान व विधिनियम ( Law ) यांची देणगी देणारें सीझरचें तें रोमन राष्ट्र आज कोठें आहे? जगाच्या तारणासाठीं अहिंसेच्या नांवावर मानवी रक्ताचा सडा साऱ्या पृथ्वीवर शिंपडणारीं तीं जुनीं ख्रिश्चन राष्ट्रें आतां कोठें आहेत ? जडवादावर अधिष्ठित असलेलीं नवीं भांडवलवादी व साम्यवादी राष्ट्रें तेथें निर्माण झालीं आहेत. झारचा रशिया संपला असून तेथें नवें राष्ट्र जन्म पावलें आहे. आमच्या इतकाच दीर्घकाळ जीवन जगलेला चीन, तो परवापर्यन्त बौद्धधर्मी होता; त्या चीनची अस्मिता आम्हींच सिद्ध केलेली होती, पण विरोधविकासी साम्यवादाचा अंगीकार करून, चीननेंहि आतां नवा जन्म घेतला आहे. तेथें नवें राष्ट्र उत्पन्न झालें हें जितकें खरें, तितकेंच जुनें राष्ट्र मेलें हेंहि खरें आहे. म्हणूनच मी म्हणतों कीं, जगांतील राष्ट्रांच्या इतिहासांत मृत्यु-वर विजय संपादन करणारें भारत हें एकच राष्ट्र आहे.

## राष्ट्रांचें जन्ममरण

राष्ट्रांचीं जन्म-मरणें या शब्दांचा वास्तविक अर्थ काय असा प्रश्न सहजच उत्पन्न होईल. कारण जीं जीं राष्ट्रें संपलीं म्हणून आपण म्हणतों त्यांचे त्यांचे भूप्रदेश आजहि अस्तित्वांत आहेत व तेथील प्राचीन लोकांचें रक्त आजहि त्यांच्या वंशजांच्या शरीरांत खेळत आहे. मग राष्ट्र मेलें अथवा नवें राष्ट्र जन्माला आलें याचा अर्थ तरी काय ? व्यक्तीची जशी अस्मिता, तशीच राष्ट्राचीही

अस्मिता असते. अस्मिता म्हणजे इतर पदार्थांहून ज्या विशेषांनीं आपलें वेगळेंपण उमटून दिसतें त्या विशेषांसहित असणारा व त्यांनीं सिद्ध होणारा आपला अस्तित्वाचा भाव होय. इतर सर्व राष्ट्रांहून वेगळा असणारा व एका विशिष्ट समाजांत सर्वत्र अनुस्यूत असणारा जो त्या विशिष्ट राष्ट्राचा आत्मा त्याला राष्ट्राची अस्मिता असें म्हणतात. हा आत्मा ज्या कांहीं विशेषांनीं आपलें स्वतंत्र अस्तित्व व वेगळेंपण सिद्ध करतो त्यांच्याच भरंवशावर त्या राष्ट्राचें अस्तित्व व राष्ट्र या नात्याचें त्याचें जीवित अवलंबून असतें. एकात्म भावजीवन असलेला समाज म्हणजे राष्ट्र होय. या भावजीवनाचा अथवा अस्मितेच्या विशेषांचा एखादें राष्ट्र जेव्हां पूर्णपणें परित्याग करतें, तेव्हां तें राष्ट्र नष्ट झालें असें म्हणतात. त्याच समाजानें अगदीं वेगळ्या स्वरूपाच्या भावजीवनाचा स्वीकार केला म्हणजे नवें राष्ट्र त्या जागीं जन्माला आलें असें म्हटलें पाहिजे. जन्माला येणारें हें नवें राष्ट्र जुन्या राष्ट्रापेक्षां अधिक तेजस्वी व विकसितहि असेल, पण त्यामुळें जुनें राष्ट्र मेलें, नष्ट झालें हें सत्य कांहीं नाकारतां येत नाहीं. ग्रीक राष्ट्रापासून तों झारच्या रशियापर्यंतचीं राष्ट्रें मेलीं याचा खरा अर्थ हाच आहे, व भारतीय राष्ट्रानें मृत्यूवर विजय मिळविला याचाहि अर्थ यावरून स्पष्ट होईल. आजच्या भारतीय समाजाचेंजें भावजीवन आहे तें सहस्रावधि वर्षांपासून जसेंच्या तसेंच असून आजहि त्याच भावजगतांत भारतीय समाज नांदत आहे असें कोणत्याहि निःपक्ष-पाती निरीक्षकाला मान्य करणें भागच पडतें. अथर्ववेद व महा-भारत यांत व्यक्त होणारी गाईविषयींची मातृत्वाची जिवन्त भावना आजचे भारताचे राष्ट्रपति डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या अंतःकरणांतहि जशीच्या तशीच दृष्टोत्पत्तीस येईल. श्रीराम व श्रीकृष्ण ज्या भावनेनें गंगेच्या प्रवाहाकडे पाहात त्याच भावनेनें आजचाहि हिंदु त्या प्रवाहाकडे पाहतो. त्यामुळें इतर समाजांतील त्यांच्या प्राचीन इतिहासाचे अवशेष आज त्यांच्या दृष्टीनें ऐतिहासिक पदार्थसंग्रहालयांतील एक प्रदर्शनीय वस्तु ठरत

असले तर भारतीय राष्ट्रांत मात्र आजचाहि समाज त्याच जुन्या भावजगताशीं तितक्याच उत्कट संवेदनेनें एकात्म असलेला आढळून येईल. भारतीय राष्ट्राचें भावजीवन हें प्रागैतिहासिक कालापासून आजपर्यंत अपरिवर्तनीय स्थितींत दृष्टोत्पत्तीस येतें ही गोष्ट ना. मुनशींसारख्या प्रादेशिक राष्ट्र-वाद्यालाहि मान्य करावीच लागली. भारतीय इतिहाससमितीच्या वतीनें भारताचा जो इतिहास प्रसिद्ध होत आहे, त्याच्या पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत श्री. कन्हैयालाल मुनशी यांनीं ही गोष्ट जगांतील एक महान् आश्चर्य म्हणून उल्लेखिली आहे. अतीतांतून आम्ही भविष्याचा पाया जो सिद्ध करूं शकतों तो याचमुळें होय. किंबहुना आमच्या या भावजीवनाविषयीं आमच्या द्रष्टयांचा असा दृढ विश्वास आढळून येतो कीं, परमेश्वरानेंच मानवजातीच्या उद्धारासाठीं या भावजीवनाचा वारसा आम्हां-कडे सोंपविलेला असून या भूमीच्या प्रत्येक रजःकणाशीं त्याचा निकटचा संबंध आहे. हें भावजीवन म्हणजेच आमचें राष्ट्रीयत्व होय. ‘ कृण्वन्तो विश्वमार्यम् ’ यांतील आर्य शब्दानें या भाव-जीवनाचें जें महत्त्व वेदमंत्रांच्या प्राचीन द्रष्टयांनीं सांगितलें तेंच आजच्या युगांतील महान् योगिवर्य श्री. अरविंद घोष यांनींहि मांडून दाखविलें आहे.

## अरविंदांची राष्ट्रमीमांसा

अलिपूरच्या बाँब केसमधून सुटका झाल्यानंतर कलकत्त्याच्या उत्तरपारा येथील विभागांत श्री. अरविंद घोष यांचा सत्कार करण्यांत आला. त्या प्रसंगीं त्यांनीं केलेलें भाषण प्रसिद्ध आहे. त्या भाषणांत श्री. अरविंद घोष म्हणतात :—

Now that I have come out, even in these few minutes, a word has been suggested to me which I had no wish to speak. The thing I had in my mind, He has thrown from it; and what I speak is under an impulse and a compulsion.

....When you go forth, speak to your nation always this word, that it is for the Sanatana Dharma that they arise, it is for the world and not for themselves that they arise. I am giving them freedom for the service of the world. When therefore it is said that India shall rise, it is the Sanatana Dharma that shall rise. When it is said that India shall be great, it is the Sanatana Dharma that shall be great. When it is said that India shall expand, and extend herself, it is the Sanatana Dharma that shall expand and extend itself over the world. It is for the Dharma and by the Dharma that India exists. To magnify the religion, means to magnify the country.

....It is the Hindu religion only because the Hindu nation has kept it, because in this peninsula, it grew up in the seclusion of the Seas and the Himalayas, because in this sacred and ancient land, it was given as a charge to the Aryan race to preserve through the ages.

....I spoke once before with this force in me and I said then that this movement is not a political movement and that nationalism is not politics but a religion, a creed, a faith. I say it again to-day, but I put it in another way. I say no longer that Nationalism is a creed, a religion, a faith; I say that it is the Sanatana Dharma which for us is Nationalism. This Hindu nation was born with the Sanatana Dharma. With it, it moves and with it, it grows. When the Sanatana Dharma declines, then the Nation declines; and if the Sanatana Dharma were capable of perishing, with the Sanatana Dharma it would perish. The Sanatana Dharma, that is nationalism. This is the message that I have to speak to you."

( आतां मी बाहेर आल्यानंतर या कांहीं क्षणांतच एका संदेशाची मला प्रेरणा देण्यांत आली. वस्तुतः तो सांगण्याची व उच्चारण्याची मला इच्छा नव्हती. पण त्यानेंच ही प्रेरणा माझ्या मनांत निर्माण केली व या प्रेरणेचा प्रभाव व नियंत्रण यामुळें मला तें सांगणेंच भाग आहे. ईश्वरानें मला असें सांगितलें कीं, तूं बाहेर गेल्यावर आपल्या राष्ट्राला असें नेहमीं सांग कीं, सनातन धर्मासाठींच त्याचें अस्तित्व आहे. त्याचें पुनरुत्थान त्याच्यासाठीं नव्हे तर विश्वाच्या कल्याणासाठीं आहे. म्हणून भारताचें पुनरुत्थान होईल असें जेव्हां म्हणण्यांत येतें, तेव्हां त्याचा खरा अर्थ सनातन धर्माचें पुनरुत्थान होईल असाच असतो. जेव्हां हिंदुस्थान थोर पदवीला चढेल असें म्हणण्यांत येतें, तेव्हां त्याचा खरा अर्थ सनातन धर्म श्रेष्ठ पदवीला चढेल असाच असतो. जेव्हां हिंदुस्थान वाढेल व पूर्ण विकसित होईल असें म्हणण्यांत येतें, तेव्हां त्याचा खरा अर्थ, सनातन धर्म वाढेल व जगांत प्रसरण पावेल असाच वस्तुतः असतो. धर्मासाठीं आणि धर्मामुळेंच हिंदुस्थानचें अस्तित्व आहे. धर्मांत चैतन्य उत्पन्न करणें म्हणजे वस्तुतः भारत देशांत चैतन्य उत्पन्न करणें आहे. वस्तुतः हा कल्याणकारी विश्वधर्म होय. याला हिंदुधर्म असें म्हणतात. याचें खरें कारण हिंदुराष्ट्रानें याचें संरक्षण केलें व तो टिकवून धरला हेंच आहे. सागर आणि हिमालय यांच्या मध्यभागीं असलेल्या या पवित्रभूमींत या धर्माचें संवर्धन झालें व या प्राचीनतम व पवित्रतम भूमींत एक पवित्र कर्तव्य म्हणून आर्य लोकांवर त्याच्या संरक्षणाचें कार्य प्रागैतिहासिक कालापासून सोंपविण्यांत आलें. म्हणूनच याला हिंदुधर्म असें म्हणतात. याच ईश्वरी प्रेरणेच्या बळावर मीं पूर्वीं एकदां आपणांस असें सांगितलें होतें कीं, हें राष्ट्रीय आंदोलन म्हणजे एक राजकीय चळवळ नव्हे; राष्ट्रीयत्व म्हणजे एक राजकीय प्रक्रिया नाहीं, तर धर्म, कर्तव्यकर्म व एक महान् श्रद्धासंपन्न ध्येयवाद आहे, एक जीवननिष्ठा आहे. आज तीच गोष्ट मी पुन्हां सांगतों, पण अगदीं वेगळ्या पद्धतीनें सांगतों. यापुढें मी राष्ट्रीयत्व म्हणजे एक ध्येय-

वाद, एक धर्म व एक जीवननिष्ठा आहे असें कधींच म्हणणार नाहीं. मला असें म्हणावयाचें आहे कीं, आम्हां भारतीयांसाठीं 'सनातन धर्म' म्हणजेच 'राष्ट्रवाद' होय. या हिंदुराष्ट्राचा जन्म सनातन धर्माबरोबर झाला. धर्माबरोबरच या राष्ट्राला गति उत्पन्न होते व धर्माच्या विकसनांतच या राष्ट्राचें विकसन घडून येतें. ज्या वेळीं सनातन धर्माचा मावळता काळ येतो, तेव्हां या राष्ट्रालाहि ग्लानि येते व जर सनातन धर्म नष्ट होण्याच्या योग्यतेचा असेल तर त्या धर्माबरोबरच हें राष्ट्रहि नष्ट होईल. सनातन धर्म हेंच आमचें राष्ट्रीयत्व होय. ईश्वरानें तुम्हांला सांगण्यासाठीं म्हणून मला जो संदेश सांगितला तो हाच होय. )

श्री. अरविंदांच्या या संकेतानुसार एकात्म भावजीवनाचा सूक्ष्म विचार करून भारताच्या राष्ट्रीयत्वाचें खरें नामकरण करण्याचा जर कोणीं प्रयत्न केला तर भारतीय राष्ट्र, हिंदुराष्ट्र इ. त्याचीं त्या त्या कालखंडानुसार वेगवेगळीं नांवें प्रचारांत आलीं असलीं तरी या राष्ट्राचें खरें नांव वैदिक राष्ट्र हेंच आहे हें कोणासहि पटेल. जो पवित्र संदेश मानवतेंत पसरविण्यासाठीं म्हणून आर्य लोकसंघाला ईश्वरानें दिला असें श्री. अरविंद घोष म्हणतात तो वेदांच्या रूपानेंच जगांत पहिल्या प्रथम अवतीर्ण झालेला आहे, व या अर्थानेंच वेद हेच धर्माचें मूळ होय. ( 'वेदोऽखिलो धर्ममूलम्' असें स्मृतिकारांनीं म्हणून ठेवलेलें आहे. )

आजच्या नवनिर्मितीच्या प्रश्नाच्या दृष्टीनें आजपर्यंत चालत आलेलें व मृत्यूवर विजय संपादन केलेलें भारतीय भावजीवन चीन-प्रमाणें नष्ट करून आत्महत्या करावयाची, कीं त्या भावजीवनाच्याच आधारशिलेवर नव्या जीवनमंदिराची उभारणी करावयाची व आपली मृत्युंजय परंपरा अक्षुण्ण राखावयाची हा खरा महत्त्वाचा प्रश्न आहे. तें मरणाच्या योग्यतेचें असतें तर केव्हांच मेलें असतें. पण ज्याअर्थी तें जगलें त्याअर्थी तें त्या योग्यतेचेंच होतें व आहे ही गोष्ट स्पष्ट आहे. ही आधारशिला जीवनमंदिराच्या उभारणीसाठीं घ्यावयाची असें म्हटलें कीं तिचें स्वरूप पाहणें

आवश्यक ठरतें, व वेदांच्या अभ्यासावांचून हें स्वरूप ध्यानांत येण्याची शक्यताहि नाहीं. कारण भारतीयांचा धर्म, त्यांची नीति व त्यांची जीवनदृष्टि यांचें सम्यक् ज्ञान वेदांवांचून होण्याची शक्यता नाहीं. आपण जसेंच्या तसें त्यांचें ज्ञान करून घेणें आपल्याच नव्हे तर मानवतेच्याहि इतिहासाच्या दृष्टीनें आवश्यक आहे. डॉ. केतकरांसारख्या व्यक्तीनेंहि वेदांच्या संबंधांत जे उद्गार काढले आहेत ते या दृष्टीनें अतिशय मोलाचे आहेत. डॉ. केतकर म्हणतात :—

“ सर्व विद्यांचा उगम वेद होत. हें विधान इतकें खरें व सर्वमान्य आहे कीं, त्यावर अधिक लिहिणें नकोच. आपल्या आणि त्याचप्रमाणें बऱ्याच युरोपीयांच्या सामान्य पूर्वजांचे प्राचीनतम स्थितिबोधक वाङ्मयांतर्गत अवशेष या नात्यानें वेदांना जगाच्या वाङ्मयीन इतिहासांत अग्रस्थान देणें जरूर आहे, ही गोष्ट युरोपीय पंडितांनींहि कबूल केली आहे. आपणा हिंदूंचें ज्ञान, विचार व भावना यांस वेदांमुळेंच निश्चित स्वरूप आलें आहे. आज कित्येक हजार वर्षें कोटयवधि भारतीय वेदाक्षराला ईश्वरी वाणी मानीत आले आहेत. ‘वेदवाक्य’ याचा अर्थ काय होतो हें महाराष्ट्रीयांस तरी सांगावयास नको. वेद हे भारतीय वाङ्मयांत प्राचीनतम असल्याकारणानें भारतीयांचा आध्यात्मिक जीवनक्रम व संस्कृति यासंबंधींचें यथार्थ ज्ञान वैदिक वाङ्मयांत गति करून घेतल्याशिवाय मिळणार नाहीं. तसेंच वेदकालीन परिस्थिति लक्षांत आल्याशिवाय व पूर्वस्थितिबोधक वाङ्मयांतर्गत अवशेष समजून घेतल्याशिवाय आपल्या वाडवडिलांची माहिती आपणांस होणार नाहीं हें जाणून वेदाविषयीं पूज्य बुद्धि बाळगणें हें आपलें कर्तव्य आहे ही गोष्ट सुशिक्षित युरोपीयहि ओळखूं लागले आहेत. चीन व जपान येथील पंडितांसहि वेदाभ्यास आवश्यक आहे. कां कीं, बौद्ध संप्रदायाची जन्मभूमि हिंदुस्थानच असल्यानें वेदांच्या माहितीच्या अभावीं त्याहि संप्रदायाचें रहस्य म्हणज इतिहाससहित ज्ञान

यथार्थपणें कळणें अशक्य होईल. नव्यास जुनें कळलें पाहिजे. पश्चिमेकडे ख्रिस्ती लोकांस 'जुना करार' समजल्याशिवाय 'नवा करार' समजणार नाहीं. त्याप्रमाणें वेदकालीन धर्म व वेदांत सांगितलेलीं तत्त्वें समजून घेतल्याखेरीज कोणत्या परि-स्थितींतून या नवीन मताचा व धर्माचा उदय झाला हें समजणें अशक्य आहे."

मॅक्समुल्लरनें तर मानवतेच्या इतिहासाचें आदिमूळ केवळ वेदांतच आढळून येत असल्यामुळें मानवेतिहासाच्या अभ्यासकांना वेदांच्या अभ्यासाची आवश्यकता असल्याचें प्रतिपादन केलें आहे. या व्याख्यानमालेंत मला हें प्रमेय मांडावयाचें आहे कीं, भारताच्या राष्ट्रीय अस्मितेचें नुसतें मूळच वेदांत सांपडत नसून पूर्ण परिणत स्वरूप तेथें दृष्टोपत्तीस येतें व पुढें सागरासारख्या विशाल दिसणाऱ्या भारतीय संस्कृतीच्या विशाल स्वरूपांत तीच अस्मिता प्रत्ययास येते. आपली ही राष्ट्रीय अस्मिता समजावून घेण्यासाठीं वेदांकडे वळलें कीं, भारतवर्षाच्या राष्ट्रीय परंपरेंत त्यांचें असणारें विशिष्ट स्थान व त्यांविषयींची भारतीयांची विशिष्ट धारणा ध्यानांत आल्याविना राहात नाहीं.

**वेदांचें महत्त्व व त्यांविषयींची भारतीय धारणा**

भारतीय राष्ट्रजीवनांत वेदांना जें महत्त्व प्राप्त झालें तें दुसऱ्या कोणत्याहि साहित्याला प्राप्त झालेलें नाहीं. किंबहुना वेदनिष्ठा भारतीयांच्या राष्ट्रघटकत्वाचाच एक महत्त्वाचा विशेष होता. राजा प्रतीपाच्या मुलांपैकीं सर्वांत वडील देवापीनें वेदांची अवहेलना केल्यामुळेंच त्याचा राजसिंहासनावरील हक्क गेला असें श्रीमत् भागवतांत सांगितलें आहे. वेदांविषयींची पूज्य बुद्धि वेदांनंतर उत्पन्न झालेल्या साहित्यांतच दृष्टोपत्तीस येते असें नसून ते अपौरुषेय असल्याची धारणा व ईश्वराशीं तुल्यबल असणारें त्यांचें महत्त्व खास वेदांतहि गाइलेलें दृष्टोत्पत्तीस येतें. त्यावरून हल्लीं ज्या ऋग्वेदादि संहिता आहेत त्यांच्याहि पूर्वींच्या काळापासून वेदांस अतोनात महत्त्व प्राप्त झाल्याचें दृष्टोपत्तीस

येऊन आजच्या वेदसंहितांच्या पूर्वीपासूनच वेदपठनाची परंपरा या देशांत चालू असल्याचें अनुमान निघतें. भारतादि ग्रंथ कितीहि श्रेष्ठ असले आणि ईश्वरावतार मानण्यांत आलेल्या व्यासादिकांच्याकडे त्यांचें कर्तृत्व असलें तरी ते कोणींतरी केलेले आहेत आणि त्यामुळें त्यांना वेदांचें महत्त्व येत नाहीं. खास वेदांच्या आजच्या संहितांतूनहि अशी उत्कट श्रद्धा दृष्टोपत्तीस येते कीं, वेद हे कोणींच केलेले नसून ईश्वरापासून ते केवळ प्रादुर्भूत झाले व ते अनंत असून अंशतः त्यांचें प्रकटीकरण मधून मधून होत असतें. ईश्वर आणि वेद हे एकरूपच आहेत. ईश्वर जितका, नित्य, अनादि, अनंत, स्वयंभू व प्रभावशाली आहे िततकेच वेदहि अनादि अनंत,स्वयंभू व प्रभावशाली आहेत. खास ऋग्वेदापासून तों श्रीतुकारामांच्या काळापर्यंत वेदांविषयींची ही दृढ श्रद्धा चालत आलेली आढळून येते. ऋग्वेदापासून असलेल्या या अत्युत्कट धारणेचे प्रत्येक कालखंडांतील प्रतिनिधीभूत असे कांहीं उद्गारच मी येथें उद्धृत करतों. म्हणजे त्यांवरून या उत्कट निष्ठेची परंपरा कशी अक्षुण्ण आहे हें ध्यानीं येईल.

## वेदांतील वेदांचें महत्त्व

१ तस्माद्यज्ञात्सर्वहुतः ऋचः सामानि जज्ञिरे ।
छंदांसि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ।

२ स ( इंद्र ) वा ऋग्भ्योऽजायत तस्मादृचोऽजायन्त ।

३ तेभ्यस्त्रयेभ्यस्त्रयो वेदो अजायन्त ।
अग्नेर्ऋग्वेदो वायोर्यजुर्वेदः सूर्यात्सामवेदः ।

४ अरेऽस्य महतो भूतस्य निश्वसितमतेद्यदृग्वेदो–
यजुर्वेदः सामवेदोऽथर्वांगिरस इतिहासपुराणम् ।

५ तँ ह त्रीन् गिरिरूपानविज्ञातानिव दर्शयांचकार ।
तेषाँ हैकैकस्मान्मुष्टिमाददे । स होवाच ।
भरद्वाजेत्याऽमंत्र्य वेदा वा एते अनंता वै वेदाः ।

१ "सर्वात्मक अशा विराट् पुरुषास पशू करून त्याचा देवांनीं जो यज्ञ केला त्यापासून ऋचा, साम, छंद व यजु उत्पन्न झाले." —ऋग्वेद पुरुषसूक्त

२ "तो इंद्र ऋचांच्यापासून झाला व ऋचा त्याच्यापासून झाल्या." —अथर्ववेद.

३ "प्रजापतीपासून अग्नि, वायु व सूर्य हे उत्पन्न झाले व या त्रिविध तळपणाऱ्या प्रकाशापासून तीन वेद उत्पन्न झाले. अग्नीपासून ऋग्वेद, वायूपासून यजुर्वेद व सूर्या-पासून सामवेद." — शतपथ ब्राह्मण.

४ "हे मैत्रेयी, महद्भूत अशा परमात्म्याचे श्वास हेच ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद होत." — बृहदारण्यकोऽपनिषद्

५ "ब्रह्मदेवानें भरद्वाजाला पर्वतप्राय असे तीन वेद दाख-विले व त्या वेदांच्या तीन पर्वततुल्य राशींतून एकेक मूठ वेद हातांत घेऊन तो म्हणाला, 'हे भरद्वाजा, हे तीन पर्वत दिसत आहेत, हे वेदांचे राशि आहेत. त्यांच्यां-तील एकेक कण म्हणजे एकेक स्वतंत्र वेदच आहे असें समज. वेद अनंत आहेत व त्यांचा अंत लागणें अशक्य आहे.[१]" — तैत्तिरीय ब्राह्मण

ऋग्वेदांत तर यापेक्षांहि अधिक विलक्षण अशी भावना पुढील-प्रमाणें व्यक्त केलेली आहे :—

ऋचो अक्षरे परमे व्योमन् यस्मिन्देवा अधिविश्वे निषेदुः ।
यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत तद्विदुस्त
इमे समासते । — ऋग्वेद १–१६४–३९

या ऋचेंत तर 'हें जड विश्वच काय, पण तें चालविणाऱ्या आणि त्याला कारणीभूत असलेल्या दिव्य शक्तिहि ऋचांमध्यें वास करतात. त्या त्यांत कशा वास करतात हें ज्याला समजेल तोच त्या प्रकट करूं शकेल. हें गूढ ज्याला कळत नाहीं त्याला नसती ऋचा काय करणार' असें स्पष्ट म्हटलें आहे.

## स्मृतिवाङ्मयांतील वेदविषयक भावना

प्रत्यक्ष वेदांतील हे जे उद्गार उल्लेखिले आहेत त्यांचाच अनुवाद स्मृतिवाङ्मयांतूनहि करण्यांत आलेला आहे. येथें केवळ सर्व आस्तिक स्मृतींची प्रतिनिधीभूत असलेली जी मनुस्मृति तिचा उल्लेख करतों. म्हणजे त्यावरून थोडयाफार फरकानें इतर स्मृतींतूनहि हेंच सांगितलेलें आहे हें ध्यानांत येईल.

मनुस्मृतींत म्हटलें आहे--

अग्निवायुरविभ्यस्तु त्रयं ब्रह्म सनातनं ।
दुदोह यज्ञसिद्ध्यर्थमृग्यजु:सामलक्षणम् ।। १-२३
सर्वं तु समवेक्ष्येदं निखिलं ज्ञानचक्षुषा ।
श्रुतिप्रामाण्यतो विद्वान् स्वधर्मे निविशेत वै ।। २-८
श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः ।
ते सर्वार्थेष्वमीमांस्ये ताभ्यां धर्मो हि निर्बभौ ।। २-१०
योऽवमन्येत ते मूले हेतुशास्त्राश्रयाद् द्विजः ।
स साधुभिर्बहिष्कार्यो नास्तिको वेदनिंदकः ।। २-११
धर्मं जिज्ञासमानानां प्रमाणं परमं श्रुतिः ।। २-१३
पितृदेवमनुष्याणां वेदश्चक्षुः सनातनम् ।
अशक्यं चाप्रमेयं च वेदशास्त्रमिति स्थितिः ।। १२-९४
सैनापत्यं च राज्यं च दंडनेतृत्वमेव च ।
सर्वलोकाधिपत्यं च वेदशास्त्रविदर्हति ।। १२-१००
वेदशास्त्रार्थतत्त्वज्ञो यत्र तत्राश्रमे वसन् ।
इहैव लोके तिष्ठन्स ब्रह्मभूयाय कल्पते ।।१२-१०२
हत्वा लोकानपीमांस्त्रीनश्नन्नपि यतस्ततः ।
ऋग्वेदं धारयन्विप्रो नैनः प्राप्नोति किंचन ।।११-२६१

" नंतर ब्रह्मदेवानें यज्ञाची सिद्धि व्हावी म्हणून अग्नि, वायु व सूर्य यांपासून ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद उत्पन्न केले. "

" विद्वान् पुरुषानें ज्ञानदृष्टीनें सर्व गोष्टी समजावून घेऊन वेदानें जे जे धर्म आचरावयास सांगितले असतील ते जाणावे व धर्मप्रमाणें वागावें."

" श्रुति म्हणजे वेद व मनु इत्यादिकांचें जें शास्त्र त्याला स्मृति असें म्हणतात. त्या दोहोंना विरोधी होईल असा तर्काचा अथवा बुद्धिवादाचा वापर करूं नये. कारण त्यांच्यापासूनच धर्म प्रकट झाला आहे. ज्यांना धर्माचें ज्ञान करून घ्यावयाचें असेल त्यांनीं वेद हे सर्वश्रेष्ठ प्रमाण होय हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. "

" इतर देव, मनुष्य यांचा वेद हाच नित्य डोळा असून वेद व शास्त्र यांचा अंत तरल प्रतिभेनेंहि कोणी लावूं शकत नाहीं. सेनापतिपद, राज्य, दंडनेतृत्व आणि सर्व लोकांचें आधिपत्य यांच्यावर वेद व शास्त्र जाणणाऱ्याचाच खरा अधिकार आहे. वेद व शास्त्र यांचें ज्ञान संपादन करून जो आश्रमधर्मानुसार वागतो तो इह लोकींच मुक्त होतो. त्रैलोक्याची हत्या करून व हवें त्याचें अन्न भक्षण करूनहि ऋग्वेद तोंडांत असलेला मनुष्य निष्पाप व निष्कलंकच असतो. "

## इतिहास, पुराणें व दर्शनें

प्रत्यक्ष वेद व मनुस्मृति यांच्यांत वेदांविषयीं जो पूज्यभाव आढळतो तोच भारताचे प्राचीन सांस्कृतिक इतिहासाचे ग्रंथ रामायण व महाभारत यांतहि आढळतो. रामायणामध्यें महर्षि वाल्मीकींनीं लवकुशांना जें रामायण शिकविलें तें ' वेदोपबृंहणार्थाय ' असे स्पष्ट शब्द असून रामायणाची वेदांशीं तुलना करून त्यांचें महत्त्व सांगण्याचा प्रयत्न केलेला आहे. रामायणाच्या उत्तर कांडाच्या १११ व्या सर्गांत त्याचें महत्त्व विशद करताना 'रामायणं वेदसमं' असे स्पष्ट शब्द आलेले आहेत. रामायण व महाभारत या दोन्ही ग्रंथांत आदर्श पुरुषाचें वर्णन करतांना ते वेदवेत्ते असल्याचें प्रामुख्यानें सांगण्यांत येतें. महाभारतांतील वेदांविषयींचे कांहीं उल्लेख पुढीलप्रमाणें दाखविता येतील:—

सरस्वतीं च वेदांश्च मनसः ससृजेऽच्युतः।
वेदानां मातरं पश्य मत्स्थां देवीं सरस्वतीम्।

"अच्युतानें आपल्या मनापासून सरस्वती व वेद निर्माण केले व तो म्हणाला, माझ्याच ठिकाणीं स्थित असणाऱ्या वेदमाता सरस्वतीला पाहा."

महाभारताचें खिलपर्व जें हरिवंश त्यांत वेदांविषयींचें वर्णन पुढीलप्रमाणें आढळतें:—

ततोऽसृजद्वै त्रिपदां गायत्रीं वेदमातरम् । ११.५
अकरोच्चैव चतुरो वेदान्गायत्रिसंभवान् ।। ११.६
ऋचो यजूंषि सामानि निर्ममे यज्ञसिद्धये ।१०.४७

"ब्रह्मदेवानें नंतर वेदमाता गायत्री निर्माण केली व गायत्रीपासून चार वेद निर्माण केले. ऋक्, यजु व साम यज्ञाची सिद्धि करण्यासाठीं निर्माण केले."

पुराण वाङमयांतहि याच पद्धतीचें वर्णन आढळतें. भागवत पुराणांत ( स्कंध १२ ) असें सांगितलें आहे कीं,

तेनासौ चतुरो वेदांश्चतुर्भिर्वदनैः प्रभुः ।
ऋग्यजुःसामाऽथर्वाख्यान्वेदान्पूर्वादिभिर्मुखैः ।।

त्या प्रजापतीनें आपल्या चार मुखांपासून चार वेद ॐकार व व्याहृतिसहित उत्पन्न केले. एकदां प्रजापति ध्यानस्थ असतांना त्याच्या पूर्वादि चारी दिशांकडील मुखांपासून ऋक्, यजु, साम व अथर्व हे चार वेद निर्माण झाले.

मार्कण्डेयपुराण, विष्णुपुराण, वायुपुराण इत्यादि अनेक पुराण ग्रंथांतून हीच माहिती दिलेली आहे. इतर पुराणांतून वेदांचें वेगवेगळें वर्णन आढळतें तर भागवतकार एकाच ॐकाराचे निरनिराळे प्रस्तार म्हणजे वेद होत असें सांगतात. श्रीमत् भागवताच्या नवम स्कंधांत असें वर्णन आलें आहे कीं,

एक एव पुरा वेदः प्रणवः सर्ववाङमयः ।
देवो नारायणो नान्य एकोग्निर्वर्ण एव च ।।
पुरूरवस एवासीत् त्रयी त्रेतामुखे नृप ।
अग्निना प्रजया राजा लोकं गन्धर्वमेयिवान् ।।

" पूर्वी ॐकार हा एकच वेद होता, व नारायण हा एकच देव आणि लौकिकाग्नि हा एकच अग्नि व वर्णहि एकच असे. त्रेतायुगाच्या आरंभीं पुरूरव्यापासून तीन वेद झाले. अग्नि व प्रजा यांच्या योगानें धन्य होऊन तो गंधर्व लोकाला गेला. "

पुराणकारांप्रमाणेंच वेदांवरील भाष्यकार सायणाचार्य यांनीं-

यस्य निःश्वसितं वेदा यो वेदेभ्योऽखिलं जगत् ।
निर्ममे तमहं वंदे विद्यातीर्थमहेश्वरम् ॥

' वेद हे ज्याचे श्वास आहेत व ज्यानें वेदांपासूनच हें अखिल विश्व निर्माण केलें ' या शब्दांनीं ऋग्वेद संहितेवरील भाष्यांत आपली हीच भावना व्यक्त केली असून सर्व दर्शनकारहि वेदां-संबंधींची पूज्य बुद्धि याच स्वरूपांत बाळगतांना आढळतात.

" वैदिकं ईश्वरोक्तत्वात् सर्वमेव प्रमाणम् " । या शब्दांनीं न्याय व वैशेषिक दर्शनांनीं वेदांविषयींची आपली निष्ठा व्यक्त केलेली असून वेद हे स्वतःसिद्ध व स्वयंभू आहेत असें सांख्यदर्शन-कार कपिल, व मीमांसादर्शनकार जैमिनी यांचेंहि मत असून योग-दर्शनांतहि हीच निष्ठा आढळते. ' शास्त्रयोनित्वात् ' या सूत्रानें व 'अतएव च नित्यत्वं' या सूत्रानें ब्रह्मसूत्रकार बादरायणांनीं वेदां-विषयींची हीच भावना व्यक्त केलेली असून अद्वैत वेदान्ताचे युगप्रवर्तक आचार्य भगवत् पूज्यपाद श्रीमत् शंकर यांनीं आपल्या शारीरक भाष्यांत वेदांविषयींची पूज्य भावना व्यक्त करतांना म्हटलें आहे--

महतः ऋग्वेदादेः शास्त्रस्य अनेकविद्यास्थानोपबृंहितस्य, प्रदीपवत्सर्वार्थावद्योतिनः सर्वज्ञकल्पस्य योनिः कारणं ब्रह्म । न हीदृशस्य शास्त्रस्य ऋग्वेदादिलक्षणस्य, सर्वज्ञगुणान्वितस्य सर्वज्ञा-दन्यतः संभवोऽस्ति।यद्यद्विस्तरार्थं शास्त्रं यस्मात्पुरुषविशेषात्संभवति, यथा व्याकरणादि पाणिन्यादेर्ज्ञेयैकदेशार्थमपि, स ततोऽप्यधिकतर विज्ञान इति प्रसिद्धं लोके । किमु वक्तव्यमनेकशाखाभेदभिन्नस्य देवतिर्यङ्मनष्यवर्णाश्रमादिप्रविभागहेतोर्ऋग्वेदाख्यस्य सर्वज्ञाना-

करस्य अप्रयत्नेनैव लीलान्यायेन पुरुषः निःश्वासवत् अस्मान्महतो भूताद्योनेः संभवः ।

"अनेक विद्यांचें स्थान असलेल्या, दीपस्तंभाप्रमाणें सर्व अर्थांचें प्रकाशन करणाऱ्या व सर्वज्ञ शब्दानेंच ज्याचें वर्णन करतां येईल अशा ऋवेदासारख्या सर्वश्रेष्ठ शास्त्राचें ब्रह्म हेंच कारण आहे. अशा तऱ्हेच्या ऋग्वेदासारख्या सर्वज्ञ गुणांनीं युक्त अशा शास्त्राची निर्मिति सर्वज्ञावांचून कोण करूं शकेल ? जें जें श्रेष्ठ शास्त्र जो पुरुष निर्माण करतो तो शास्त्रकार त्यापेक्षां अधिक विद्वान् असतो. जसें, व्याकरणशास्त्र म्हणजे पाणिनीच्या विशाल-ज्ञानाचा केवळ एक छोटासा भाग होय. अनेक शाखाभेदांनीं विभागलेल्या, देव, पशु, पक्षी, मनुष्य, वर्ण, आश्रम इत्यादि विविध विभागांचा हेतु असलेल्या ऋग्वेद 'नांवाच्या ज्ञानाच्या खाणीची निर्मिति केवळ लीला म्हणून मनुष्याच्या श्वासोच्छ्वासा-प्रमाणें सहज रीतीनें ज्यापासून झाली त्या परमेश्वराच्या श्रेष्ठ ज्ञान-संपन्नतेचें काय वर्णन करावें? 'अत एवच नित्यत्वं' या सूत्रावरील भाष्यांत श्रीशंकराचार्यांनीं वेदांचें नित्यत्व म्हणून जें उल्लेखिलें आहे तेंहि पतंजलि ( नित्या शब्दाः ), जैमिनी ( नित्यस्तु स्यात् दर्शनस्य परार्थत्वात् ), कणाद (तद्वचनादाम्नायस्य प्रामाण्यम्), योगशास्त्र ( गृणाति वेदद्वारा उपदिशति सत्यानर्थान् स गुरुः) व सांख्य ( निजशक्त्यभिव्यक्तेः स्वतः प्रामाण्यम् ) या शास्त्र-कारांच्या परंपरेचा निष्कर्ष म्हणूनच होय.

श्रीमान् शंकराचार्यांनंतरच्या रामानुज, माध्व, वल्लभ इत्यादि संप्रदायप्रवर्तक आचार्यांनींहि वेदाविषयींची आपली हीच निष्ठा व्यक्त केलेली आहे. किंबहुना वेदांना शंकराचार्य अध्यास-वादाच्या दृष्टीनें कमी लेखीत असल्यामुळें ते प्रच्छन्न बौद्ध आहेत असेंहि या आचार्यांपैकीं कित्येकांनीं म्हणावयास कमी केलें नाहीं.

मीमांसक कुमारिलभट्ट वेदांचें महत्त्व सांगतांना अशी श्रद्धा प्रकट करतात कीं,

प्रत्यक्षेणानुमानेन यस्तूपायो न बुध्यते ।
एनं विदन्ति वेदेन तस्माद्वेदस्य वेदता ।
तस्मात्सिद्धेऽपि सामान्ये विशेषो नागमादृते ।।

"प्रत्यक्ष व अनुमान या प्रमाणांनीं आत्मकल्याणाचें जें साधन कळूं शकत नाहीं तें केवळ वेदानें कळूं शकत असल्यानें वेदांचें अलौकिक महत्त्व असून सर्वसामान्यपणें इतर प्रमाणांनीं कोणतेंहि ज्ञान झालें तरी विशेषज्ञान वेदांवांचून होऊं शकत नाहीं." वेदांवरील जाज्वल्य निष्ठेची ही परंपरा भारतीय राष्ट्रांत अव्याहत दिसून येते. आजचा आपला धर्म श्रुतिस्मृति-पुराणोक्त असला तरी त्यांतील उच्चवर्णीयांचे गर्भाधानापासून स्मशानापर्यंतचे सर्व संस्कार वेदमंत्रघटित आहेत. आजच्या दैनंदिन पूजापाठादि धार्मिक क्रियांच्या आलंबन असलेल्या देवमूर्ती जरी पौराणिक असल्या तरी त्यांच्या पूजेंत वेदमंत्रांचेच विनियोग आढळतात. आज केवळ प्रदर्शनाचें स्वरूप असलेल्या उपनयन संस्कारांत गायत्रीचाच उपदेश करण्यांत येतो. पौराणिक शिव व गणपति यांच्या पूजेच्या वेळीं वैदिक ब्रह्मणस्पतीचे व रुद्र देवतेचेच मंत्र उपयोगांत आणतात. अितकेंच नव्हे तर पुरुष-सूक्तादि सूक्तांचाही धार्मिक जीवनांत प्रभाव असलेला दिसून येतो. केवळ नामस्मरणानें मुक्तीचा मार्ग सर्वसामान्य लोकांस उपलब्ध करून देणाऱ्या व 'यारे यारे लहान थोर' म्हणून सगळ्यांस पाचारण करून 'मुखीं नाम हातीं मोक्ष। ऐसी साक्ष बहुतांची ।।' असें सांगणाऱ्या वारकरी संप्रदायाची पायाभरणी करणारे प्रवर्तक श्रीज्ञानेश्वर महाराज वेदांविषयींची आपली निष्ठा व्यक्त करतांना ती ज्या शब्दांत व्यक्त करतात तें पाहण्याजोगें आहे. भावार्थदीपिकेंत ते म्हणतातः—

जो जगीं समान सकृपु। हिताहित दाविता दीपु ।
तो अमान्य केला बापु। वेदू जेणें ।।
एवं परत्र ना स्वर्गु । ना ऐहिकही विषय भोगु ।
तेथ केडता प्रसंगु । मोक्षाचा तो ।।

या कारणें पैं बापा । जया आथी आपुली कृपा ।
तेणें वेदांचिया निरोपा । आन न कीजे ।।
पतीचिया मता । अनुसरोनि पतिव्रता ।
अनायासे आत्महिता । भेटेचि ते ।।
तैसा अशेषांही पुरुषार्थां । जो गोसावी हो म्हणे पार्था ।
तेणें श्रुतिस्मृति माथा । बैसणें धापे ।।
शास्त्र म्हणेल जे सांडावे । तें राज्यही ऋण मानावें ।
जें घेववी तें न म्हणावें । विषयही विरूं ।।
ऐसिया वेदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा ।
तरिकें आहे अनिष्टा । भेटणें गा ।।
पैं अहितापासूनि काढिती । हित देऊनी वाढविती ।
नाहीं गा श्रुती परौती । माऊली जगा ।।
म्हणौनि ब्रह्मेसी मेळवी । तंव हे कोणे न सांडावी ।
अगा तुवांही ऐसीचि भजावी । विशेषेंसी ।।

श्रीज्ञानेश्वर महाराजांचा नामभक्तीचा संदेश जगांत प्रतिष्ठापित करीत असतां तो वैदिक कर्मकांडाच्या विरोधी आहे अशा कल्पनेनें त्याला नांवें ठेवावयास पुढें सरसावणाऱ्या कर्मठांसाठीं श्रीतुकाराम महाराजांनीं काढलेले उद्गार ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत. ते म्हणतातः—

वेदांचा तो अर्थ आम्हासीच ठावा ।
येरानी वहावा भार माथा ।।

या उद्गारांतून त्यांचा आत्मविश्वास जसा व्यक्त होतो तशीच त्यांच्याभोंवतींच्या समाजांतील उत्कट वेदनिष्ठाहि व्यक्त होते. त्यांची शिष्या बहिणाबाई हिनें तर स्पष्ट शब्दांत सांगून टाकलें आहे कीं,

वेदासीविरुद्ध नव्हे आत्मज्ञानी । पडला तो पतनीं रौरवाचें ।
ऐसे ते चांडाळ न पडावे दृष्टी । ज्यानें हे कष्टी उभय कूळ ।।
वेदासि विरुद्ध असता सर्वथा । अनर्थ परमार्थां हाचि एक ।
बहेणी म्हणे त्याचें जळो आत्मज्ञान । जेणें नारायण कष्टी केला ।।

सश्रद्ध अंतःकरणांत ऋग्वेदापासून श्रीतुकाराम महाराजांच्या कालखंडापर्यंत वेदांविषयींची ही जी अव्याहत व एकसूत्र धारणा आढळून येते ती अत्यंत आश्चर्यजनक आहे. वेदांतून खरें आत्मकल्याण निघणार नाहीं असें सुचविणारा बुद्ध देखील वेद खोटे आहेत असें म्हणत नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. जैन सांप्रदायिक आपला धर्म वेगळा असें म्हणत असले तरी त्यांच्या ग्रंथांतूनहि खरे वेद लुप्त झाले आहेत, ते इतरांस समजत नसून केवळ आम्हांसच समजतात इत्यादि जीं परस्परविरुद्ध विधानें आढळतात त्यावरून वेदानें या नास्तिक दर्शनकारांच्या अंतःकरणावरहि केवढा प्रभाव गाजविला होता याची कल्पना आल्याविना राहात नाहीं. वेदनिष्ठा हें जणूं या राष्ट्राच्या घटकत्वाचेंच लक्षण होऊन राहिलें असल्यामुळें नवभारताचे श्रेष्ठ मंत्रद्रष्टे लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांनीं हिंदूची पुढीलप्रमाणें यथार्थ व्याख्या केली आहे.

प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता ।
उपास्यानामनियम एतद्धर्मस्य लक्षणम् ।।
धर्ममेनं समालम्ब्य विधिभिः संस्कृतस्तु यः ।
श्रुतिस्मृतिपुराणोक्तैः क्रमप्राप्तेरथापि वा ।।
स्वे स्वे कर्मण्यभिरतः श्रद्धाभक्तिसमन्वितः ।
शास्त्रोक्ताचारशीलश्च स वै हिन्दुः सनातनः ।।

( १ ) वेदप्रामाण्य ( २ ) साधनांचें अनेकत्व (मोक्षप्राप्तीचें ज्ञान, कर्म, भक्ति इत्यादि मार्ग मानणें ), ( ३ ) उपास्यांविषयींचें स्वातंत्र्य हें हिंदु धर्माचें लक्षण आहे. या धर्मास अनुसरून श्रुतिस्मृतिपुराणोक्त किंवा परंपराप्राप्त अशा विधीनें संस्कार पावलेला, श्रद्धाळू, स्वकर्मतत्पर व शास्त्रांत सांगितलेले आचार पाळणारा त्यास हिंदु असें म्हणतात.

राष्ट्रजीवनाच्या मंदिराची नव्यानें उभारणी करतांना त्याच्या या आधारशिलेचें स्वरूप समजावून घेणें किती आवश्यक आहे हें यावरूनच सिद्ध होतें.

## व्याख्यान दुसरें

# वेदाभ्यासाची आधुनिक पद्धति

प्रागैतिहासिक काळापासून आजपर्यंत चालत आलेला वेदनिष्ठेचा हा जो विलक्षण एकात्म प्रवाह इतिहासांत दृष्टोत्पत्तीस येतो तो खरोखरी आश्चर्यजनक आहे. धार्मिक सहिष्णुतेची परमावधि गांठलेल्या या देशांत तरवारीच्या बळावर श्रद्धा व निष्ठा राखण्याचे कधींहि प्रयत्न झाले नाहींत. पृथ्वी गोल आहे या मताबद्दल यातनामय शिक्षा देणें, आपल्या धर्मग्रंथांचें महत्त्व कमी होईल म्हणून ग्रंथालय जाळून टाकणें, शांतता प्रस्थापित करण्याच्या नांवावर सहस्त्रावधि लोकांना कंठस्नान घालणें, व धगधगणाऱ्या अग्नींत फेकून देणें आणि धर्माच्या नांवाखालीं मानवी मस्तकांचे बुरूज रचून त्यांच्या रक्तनद्या वाहविणें हे सारे प्रकार मुसलमानी, ख्रिश्चन व इतर सर्व धर्मांच्या इतिहासांत आढळून येतात. सर्व जगांतील धर्मांत हिंदु धर्म असा आहे कीं, ज्यानें सर्वांना मतस्वातंत्र्य समर्पण केलेलें असून केवळ मतभिन्नतेसाठीं म्हणून कोणाला येथें वाळींत टाकलेलें नाहीं किंवा त्याचा प्राण घेण्यासाठीं प्रयत्न झालेला आढळून येणार नाहीं. "त्रयो वेदस्य कर्तारो भण्डधूर्तनिशाचराः ।" म्हणजे लबाड, धूर्त व राक्षसी प्रवृत्तीच्या लोकांनीं वेद केलेले आहेत असें म्हणणाऱ्या चार्वाकालाहि या भरतभूमींत माधवाचार्यांसारख्या श्रेष्ठ पुरुषांनीं आपल्या सर्वदर्शनसंग्रहासारख्या ग्रंथांतून दर्शनकार म्हणून स्थान दिलेलें आहे ही गोष्ट जगाच्या धार्मिक इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यासारखी आहे. अशा या मतस्वातंत्र्यवादी राष्ट्रांत वेदांविषयींची ही सहस्त्रावधि वर्षांपासून निष्ठा ज्यांनीं बाळगली ते कोणी निर्बुद्ध लोक होते असेंहि समजण्याचें कारण नाहीं. डॉ. मूरसारख्या

( Dr. Muir ) पाश्चात्य लेखकांनीं व लोकमान्य टिळकांसारख्या प्रज्ञावंतांनीं ज्यांच्या बुद्धिमत्तेसंबंधीं असे उद्‌गार काढले आहेत कीं—

One who reads the discussions of these writers cannot fail to be struck " with the acuteness of their reasoning, the logical precision with which their arguments are presented, and the occasional liveliness and ingenuity of their illustrations. "

—The Arctic Home PP. 449

( जो कोणी हें वाङ्मय वाचतो त्याला हे षड्‌दर्शनकार म्हणजे कोणी सामान्य व्यक्ति नसून त्यांचें अचाट बुद्धिवैभव, तर्क-कर्कश विवेचनपद्धति व उदाहरणें देण्याची योजकता, व सूक्ष्मबुद्धि आणि प्रासंगिक चमक यांचा प्रत्यय आल्याविना राहात नाहीं. )

त्या लोकांची ही जाज्वल्य निष्ठा केवळ अंध धर्मश्रद्धा व अज्ञान यांतून उत्पन्न झालेली नाहीं हें स्पष्ट आहे. बुद्ध, महावीर, चक्रधर इत्यादि पाखंडी समजण्यांत येणाऱ्या व चार्वाकादि व्यक्तिसुखवादी प्रवृत्तीच्या लोकांनाही, कोणाला अवतार तर कोणाला दर्शनकार म्हणून ज्यांनीं उदार सहिष्णुतेनें आपल्या राष्ट्रजीवनांत स्थान दिलें त्या या मतस्वातंत्र्यवादी राष्ट्रांत राजर्षि मनु, महामुनि पंतजलि, भगवान् शबरस्वामी, जैमिनी, बादरायण, याज्ञवल्क्य, श्रीमत् आद्य शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्व व वल्लभ, माधवाचार्य, यांच्या-पासून तर महर्षि अण्णासाहेब पटवर्धन, लोकमान्य टिळक, योगींद्र श्रीअरविंद घोष, यांच्यापर्यंतच्या तरल प्रतिभेच्या प्रज्ञावंतांच्या सहस्रावधि वर्षांच्या अक्षुण्ण परंपरेनें अपौरुषेय व देववाणी म्हणून ज्यांना श्रद्धेची उत्कट अर्घ्यांजलि वाहिली त्या वेदांचा प्रभाव व महत्ता वादातीत आहे यांत शंकाच नको.

### वेद एक कीं अनेक ?

अलीकडच्या ऐतिहासिक पद्धतीप्रमाणें वेद एक आहे कीं अनेक आहेत हा विवाद्य प्रश्न होऊन राहिलेला आहे. वेद हे

ऋग्वेद, यजुर्वेद सामवेद व अर्थववेद या क्रमानें एकानंतर एक उत्पन्न झालेले आहेत व त्यांतील ऋग्वेद हा सर्वांत प्राचीन असून इतर त्या मानानें अर्वाचीन आहेत, इतकेंच नव्हे तर ऋग्वेदांतीलहि पहिलें मंडल व १० वें मंडल हें अर्वाचीन असून इतर ऋग्वेद हा प्राचीन आहे अशा रीतीची पाश्चात्य संशोधकांची कल्पना रूढ झालेली आहे. पण प्राचीन भारतीय संकेतानुसार मात्र वेद एकच आहे. महर्षि वेदव्यासांनीं कांहीं विशेष कारणास्तव त्या एकाच वेदाचे चार भाग केले असें पुराणादि ग्रंथांतून वर्णन आढळतें. शुक्ल यजुर्वेद संहितेच्या भाष्यकारांनीं वेदांविषयीं पुढीलप्रमाणें विधान केलें आहे :–

तत्रादौ ब्रह्मपरंपरया प्राप्तं वेदं वेदव्यासो मन्दमतीन् मनुष्यान्विचिन्त्य तत्कृपया चतुर्धा व्यस्य ऋग्यजुःसामाथर्वाख्यांश्चतुरो वेदान् पैलवैशम्पायनजैमिनिसुमन्तुभ्यः क्रमादुपदिदेश ।

ब्रह्मपरंपरेनें प्राप्त झालेल्या वेदांचें, मनुष्य मंदमति होत चाललेला पाहून, त्या ब्रह्माच्याच प्रेरणेनें वेदव्यासांनीं ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद असे चार विभाग करून ते अनुक्रमें पैल, वैशंपायन, जैमिनी व सुमंतु या चार शिष्यांना क्रमानें दिले, हें जें या भाष्यकारांनीं म्हटलें आहे त्याचाच अनुवाद अथवा त्याचेंच मूळ म्हणजे या तऱ्हेचे पुराणांतील विविध स्वरूपाचे उद्गार होत. भागवतादि पुराणांतून या तऱ्हेचेच उल्लेख आढळतात.

चातुर्होत्रं कर्म शुद्धं प्रजानां वीक्ष्य वैदिकम् ।
व्यदधाद्यज्ञसंतत्यै वेदमेकं चतुर्विधम् ।।

— श्रीमद्भागवत १-४, १४, १९, २०

व्यासांनीं एकाच वेदापासून यज्ञांतील व्यवस्थेसाठीं ऋग्वेद, यर्जुर्वेद, सामवेद व अथर्ववेद असे वेदांचे चार विभाग केलेले आहेत. मागच्या व्याख्यानांत एकाच ॐकारापासून वेगवेगळ्या वेदांची निर्मिति झाली असा जो एक उल्लेख केलेला आहे त्यावरून जुनी समजूत वेद एकच आहे अशी असल्याचें आढळून

येईल. अलीकड मात्र वेदांचें पौर्वापौर्व्य ठरवून हा पहिला व तो नंतरचा या ज्या कल्पना मांडण्यांत येतात त्यामुळें खास वैदिकांतहि श्रेष्ठ व कनिष्ठतेच्या कल्पना नांदतांना आढळतात. पण भारतीय संकेत लक्षांत घेतला तर तो असाच आहे कीं, एकाच प्रणवरूपी बीजांतून वेद निघालेला असून वेदव्यासांनीं कांहीं शास्त्रीय तत्त्वांस अनुसरून त्याचे चार भाग केलेले आहेत. ऋग्वेदाची क्रियाशक्ति, यजुर्वेदाची इच्छाशक्ति, सामवेदाची ज्ञानशक्ति व अथर्ववेदाचें क्षुद्रकर्म असें जें वर्णन करण्यांत येतें, त्यांतील या चारहि शक्ती एकाच मनुष्यजीवास उपयुक्त आहेत हें तत्त्व ध्यानांत घेतलें तर कोणत्याहि एका वेदाला दुसऱ्यापासून पूर्णपणें वेगळें काढतां येत नाहीं. वेदवाङमयाचा आधुनिक पद्धतीनें अभ्यास करतों म्हटलें तर वेद हे अनेक आहेत या कल्पनेऐवजीं ते एक आहेत ही जाणीव ठेवूनच त्यांचा अभ्यास करणें आवश्यक ठरतें. डॉ. केतकर यांच्यासारख्या वेदाचा आधुनिक पद्धतीनें अभ्यास करणाऱ्या व त्यावरून इतिहास लिहिणाऱ्या व्यक्तीनेंहि असेंच मत प्रतिपादन केलें आहे. ते म्हणतात कीं–

"वेदांचा अभ्यास करतांना सूक्तांच्या कालभेदांकडे दुर्लक्ष करून सर्व वेद म्हणजे एकच ग्रंथ धरून आपणांस ऐतिहासिक अभ्यास कांहींसा करतां येईल. जेथें वेदांतर्गत कालामध्येंच पौर्वापौर्व्य पाहावयाचें नाहीं तेथें वेदांतील सूक्तांचा काल अनिश्चित आहे ही गोष्ट आडवी येणार नाहीं. मंत्रभागाचें संहितीकरण झाल्यावर ब्राह्मण भागाचा जन्म झाला असेल असें संशोधकांचें मत असल्यास तें आम्हांस मान्य नाहीं. ब्राह्मणरचना व संहितीकरण या दोन्हीहि क्रिया समकालीन व अन्योन्याश्रयी आहेत असें आम्ही म्हणतों. तैत्तिरीय, कठ इत्यादि संहिता मंत्रब्राह्मणमिश्रित आहेत, येवढेंच नव्हे, तर तैत्तिरीय ब्राह्मणहि मंत्रमिश्रित आहे. संहिता बनविण्याचें प्रयोजन लक्षांत घेतलें म्हणजे संहितेचीं व ब्राह्मणांचीं जुडगीं जवळजवळ एकाच काळांत तयार झालीं असें भासूं लागेल.

पुष्कळ मंत्र ब्राह्मणकालीनहि असतील. मंत्र व ब्राह्मणें भिन्नकालीन आहेत हें सिद्ध करण्यास भाषा हें प्रमाण देखील सांगतां येणार नाहीं. उत्तरकालीं देखील प्राचीन भाषेंत काव्य करतां येतें आणि जेव्हां उत्तरकालीन काव्यांत प्राचीन काळांतील काव्यांतील शब्द पुनरुक्त होतात तेव्हां तर भाषेचें प्रमाण दुर्बल ठरतें. आध्वर्यवास पोषक असा जेव्हां मंत्र असेल तेव्हां तो जुन्या भाषेंत मुद्दाम लिहिला जाण्याचा संभव असतो."

आज चारहि वेदांच्या संहिता वेगवेगळ्या आढळतात व त्यामुळें ते परस्परांपासून वेगळे आहेत अशी वेदांचा पद्धतशीर रीतीनें अभ्यास न करणाऱ्या लोकांची स्वाभाविकपणेंच समजूत होते. पण या चारहि वेदसंहिता परस्परसापेक्ष असून एकाच क्रियेसाठीं या चारहि संहितांचा उपयोग होतो. परस्परसापेक्ष व परस्परांच्यावर अवलंबून असलेल्या या संहितांना एकमेकांपासून अजिबात विलग समजण्याची चूक होण्यास त्या संहितांचें प्रयोजन काय हें न समजणें व समजावून घेण्याचा प्रयत्नहि न करणें हीच गोष्ट मुख्यतः कारण आहे. वेदांच्या चारहि संहिता यज्ञक्रियेसाठीं तयार करण्यांत आल्या आहेत. त्यांतील ऋग्वेद ज्याला म्हणतात तो देवतांच्या स्तुतिपर सूक्तांचा संग्रह यज्ञांत काम करणाऱ्या एका विशिष्ट ऋत्विजासाठीं वेगळा काढण्यांत आलेला आहे व यजुर्वेद, सामवेद इत्यादि नांवाचे वेगळे संग्रहहि असेच वेगवेगळ्या ऋत्विजांच्या उपयोगासाठीं वेगळे करण्यांत आले आहेत. वेद हे यज्ञासाठीं आहेत ही गोष्ट वेदांवर लिहिणाऱ्या व त्यांचें महत्त्व वर्णन करणाऱ्या सर्व भारतीय पुराणकारांनीं व स्मृतिकारांनीं कंठरवानें सांगितली आहे व ऐतिहासिक पद्धतीनें त्यांचा अर्थ करतों म्हटलें तरी यज्ञ नांवाच्या क्रियेसाठीं वेदांचें संहितीकरण झालें हें सत्य स्पष्टच होतें. एरव्ही ऋग्वेदांतलेच मंत्र गाण्याच्या पद्धतीवर म्हणावयाचे एवढाच संकेत ठरवून सामवेद संहितेची स्वतंत्र रचना करण्याचें कांहीं एक कारण नव्हतें. यज्ञसंस्थेचें स्वरूप लक्षांत घेतल्यावांचून एका वेदाचे चार वेद कसे

होतात, त्यांचे परस्परसंबंध एकमेकांत कसे गुंतून पडलेले आहेत व एकमेकांच्याविना त्यांना पूर्ण सलगपणें वेगळें समजणें कसें चुकीचें ठरतें याची नीट कल्पना येत नाहीं. यज्ञ व वेद यांना वेगळे समजण्यांत, विशेषतः यज्ञसंस्थेकडे पूर्ण दुर्लक्ष करून वेद संहिते-संबंधीं विवेचन करण्यांत, पाश्चात्य व त्यांच्या पावलावर पाऊल टाकणारे अर्वाचीन भारतीय संशोधक यांची कशी चूक झालेली आहे हें डॉ. केतकरांनीं मोठ्या मार्मिकपणें दाखविलें आहे. तें म्हणतात--

"वेदकालीन स्थिति समजावयास यज्ञसंस्थेचें ज्ञान आवश्यक आहे ही गोष्ट संस्कृत ग्रंथकारांनीं वारंवार पुढें मांडली आहे. तथापि यज्ञाभ्यासपूर्वक वेदाभ्यासाकडे लोकांचें लक्ष जावें तितकें अजून गेलें नाहीं. पाश्चात्य पंडितांस यज्ञविषयक वाङ्मय वाचून एक प्रकारची जुगुप्सा उत्पन्न झाली आहे आणि त्यांतील बुद्धीस न पटणाऱ्या गोष्टी पाहून ते चिडून गेले आहेत. आपल्याकडील पंडितांचें पांडित्य बरेंचसें पाश्चात्य विचारसंप्रदायाच्या धोरणानेंच चालत असल्यामुळें आणि यज्ञसंस्थेच्या अभ्यासकाठिण्यामुळें आपल्या लोकांनीं देखील याचा चांगला विचार केला नाहीं. ब्राह्मणांनीं यज्ञसंस्था वाढविली ती केवळ आपल्या महत्त्वासाठीं वाढवावयाची म्हणून वाढविली असें नाहीं. जे धर्म सर्वसामान्य असतील त्यांत ब्राह्मणांनीं स्वच्छेनें हवे तसे फेरफार करणें शक्य नव्हतें. यज्ञसंस्था त्रैवर्णिकांची होती. सर्व वर्ण अत्यंत प्राचीन काळापासून यज्ञ करीत होतेच. उपासनेंत ब्राह्मणांनीं केवळ लोभमूलक फेरफार केले असते तर ह्या इतर वर्णांनीं तसें चालूं दिलें नसतें. जुन्या उपासनेंत ब्राह्मणांनीं केवळ आपल्या पदरच्या गोष्टी केवळ स्वार्थासाठीं घातल्या असत्या तर त्यास जनतेची फारशी सहानुभूति लाभली नसती. ब्राह्मणांनीं ही यज्ञसंस्था इतर लोकांस बनविण्यासाठींच वाढविली असती तर ते स्वतः बनले गेले नसते. प्रकार पाहावा तर उलट आहे. यज्ञ करणारी मंडळी म्हणजे यज्ञांतील यजमान अब्राह्मणच पुष्कळ

असत. ते आपल्या गळ्याभोवतीं पुरोहित वर्गानें तयार केलेलें 'लिगाड' कशासाठीं अडकावून घेते? क्षत्रियांनीं यज्ञास विरोध करावयाच्या ऐवजीं यज्ञ करण्यामध्यें चुरस दाखविली आहे. या प्रकारच्या परिस्थितीमुळें आपणांस यज्ञसंस्था जर समजावून घ्यावयाची असेल तर ब्राह्मणांनीं केवळ स्वार्थासाठीं ही संस्था वाढविली या प्रकारच्या मतांनीं बुद्धीस विकृति न होऊं देतां तिचा अभ्यास केला पाहिजे. यज्ञसंस्थेच्या इतिहासाकडे दुर्लक्ष केल्यामुळें जे दोन इतिहास पाश्चात्यांस मुळींच समजले नाहींत त्यांपैकीं एक इतिहास म्हटला म्हणजे सामाजिक होय व दुसरा न समजलेला इतिहास संहितीकरणाचा होय."

डॉ. केतकरांच्या या उद्गारांना कोणतीहि पुस्ती जोडण्याचें कांहीं कारण नाहीं. ऋत्विजांना स्वतःचे अभ्यासग्रंथ स्वतंत्र हवे असल्यामुळें व यज्ञ ही राष्ट्रीय महत्त्वाची बाब झाल्यामुळें या ऋत्विजांचें राष्ट्रजीवनांत एक स्थान असल्याकारणानें संहितीकरण झालें आहे. हें स्थूल कारण जरी ध्यानांत घेतलें तरी वेदांतील संस्कृतीचें व राष्ट्राचें दर्शन घेतांना वेद हा एकच आहे ही भावना ध्यानांत घेऊन सर्व वेदवाङमयावरूनच तें घेतलें पाहिजे हें स्पष्ट होतें व म्हणूनच "वेदांतील राष्ट्रदर्शन" असा व्याख्यानमालेचा विषय सहेतुकपणें ठरविण्यांत आला आहे.

भारतीय राष्ट्राच्या अस्मितेचें मूळ व सिद्धस्वरूप वेदांतून दृष्टोत्पत्तीस येत असल्यामुळें आपल्या राष्ट्रीय आत्म्याचें दर्शन घेण्यासाठीं व नव्या परिस्थितींत जीवनमंदिराची उभारणी करण्यासाठीं आधारशिला म्हणून वेदवाङमयाकडे पाहणें आवश्यक आहे हें मागें सांगितलेंच आहे. पण वेदांतून आपणांस ज्या राष्ट्रजीवनाचें दर्शन होतें तें किती प्राचीन आहे हें पहाणेंही आपल्या राष्ट्राच्या परंपरेचें मूळ कोणत्या कालखंडापर्यन्त जाऊन भिडतें हें ठरविण्याच्या दृष्टीनें आवश्यक आहे. वेदांचा जो काल ठरेल त्यापूर्वींच्या काळांत या राष्ट्रीय अस्मितेचें मूळ दडलेलें आहे असें म्हणतां येईल. पण वेदांचा काळ निश्चित ठरविण्याची

शक्यता आहे काय ? वेदांचा कालनिर्णय ठरविण्याचा प्रयत्न प्राचीन काळीं कधींच झाला नाहीं. पण अर्वाचीन काळीं वेबर, मॅक्समुल्लर, लोकमान्य टिळक, डॉ. विंटरनिट्झ, अविनाशचंद्र दास, श्री. पावगी, अप्रबुद्ध, प्रभृति अनेक प्रथमश्रेणीच्या विद्वानांनीं या दृष्टीनें भिन्न भिन्न शास्त्रांच्या आधारें अतिशय मूलगामी दृष्टीचे प्रयत्न केले आहेत. पण हे पंडित तरी वेदांचा काळ निश्चित करूं शकले काय ?

### वेदकालनिर्णय

भारतीयांच्या प्राचीन समजुतीप्रमाणें वेद हे अनंत आणि अनादि असल्यामुळें आणि सृष्टीच्या प्रारंभींच त्यांची उत्पत्ति होऊन त्यांच्यापासून एकंदर सृष्टीची निर्मिति झाली असल्या-कारणानें त्यांच्या कालनिर्णयाचा प्रयत्न करणें त्यांच्या दृष्टीनें निव्वळ वेडगळपणाचें आहे. मागच्या व्याख्यानांत वेदांचें महत्त्व सांगणारे प्राचीन ग्रंथकारांचे जे अनेक उतारे दिले आहेत त्यावरून त्यांचें या बाबतींतील म्हणणें स्पष्ट लक्षांत येण्यासारखें आहे. परमेश्वराप्रमाणेंच सृष्टीचे घटकद्रव्य वेद होत हें एकदां गृहीत धरल्यावर सूर्यमालेचा अथवा इलेक्ट्रॉन्सचा कालनिर्णय करण्या-सारखेंच त्यांच्या मतें वेदांचा कालनिर्णय करणेंहि हास्यास्पद ठरतें. यावर कोणी जर वेद हीं अक्षरें आहेत व म्हणून तीं केव्हां तरी उत्पन्न झालेलीं होतीं व वेदांत ऋषींचीं नांवें आहेत म्हणून त्यांच्याकडे वेदांचें कर्तृत्व द्यावें असें म्हटलें तर त्याचें उत्तरहि प्राचीन लोकांनीं देऊन ठेविलें आहे. महाभारतकार म्हणतात :—

युगान्तेऽन्तर्हितान् वेदान् सेतिहासान् महर्षयः ।
लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाताः स्वयंभुवा ॥

"युगप्रलयाच्या वेळीं इतिहाससहित गुप्त झालेले वेद तपश्चर्येनें व ब्रह्मदेवाच्या कृपेनें पुन्हां ऋषींना मिळाले." महा-भारतकारांची ही धारणा दर्शनादि शास्त्रीय वाङमयांत तर दृष्टोत्पत्तीस येतेच, पण भवभूतीसारख्या नाटककारांच्या ललित कृतींतूनहि तिचा आविष्कार झाला आहे हें ध्यानांत घेतलें म्हणजे

ती कशी सर्वसाधारण आहे याची नीट कल्पना येते. भवभूति उत्तररामचरितांत म्हणतो:–

ब्रह्मर्षयो ब्रह्महिताय तप्त्वा परः सहस्राः शरदस्त्रपांसि ।
एनान्यपश्यन् गुरवः पुराणाः स्वान्येव तेजांसि तपोमयानि ।।

" ब्रह्मर्षींनीं ब्रह्महितासाठीं सहस्रावधि वर्षें तपश्यर्या करून आपल्या तपश्चर्येचें हें वेदरूपी तेज पाहिलें. "

पण ही प्राचीन समजूत कांहींहि असली तरी अर्वाचीन लोकांनीं वेदकालनिर्णय करण्याचा प्रयत्न केला आहे; व त्या प्रयत्नांची तपासणी करणें बरेंच मनोरंजक ठरणारें आहे.

**श्रीदयानंद सरस्वती**

अर्वाचीन भारतांत वेदांविषयीं निष्ठा उत्पन्न करण्याचें कार्य ज्या श्रेष्ठ पुरुषांनीं केलें, त्यांत महर्षि दयानंद सरस्वती हे अतिशय प्रभावी व अनन्यसामान्य व्यक्तिमत्त्वाचे पुरुष होते. त्यांनीं संपूर्ण पंजाब प्रांतांत व विशेषतः उत्तर भारतांत वेदांविषयीं विलक्षण निष्ठा उत्पन्न केलेली आहे. पण त्यांचा प्रयत्न इतिहास-संशोधनाच्या भूमिकेवर अधिष्ठित नाहीं. त्यांनीं आपल्या संकल्पांतील कालगणनेप्रमाणें १,९६,०८,५२,९७६ वर्षें हा वेदांचा कालनिर्णय म्हणून सांगितलेला असून ऐतिहासिक दृष्टीनें कालनिर्णय करणारांची 'धर्मभ्रष्ट' 'नास्तिक' या शब्दांत संभावना केलेली आहे. त्यांची गोष्ट एक श्रद्धाळू म्हणून सोडून दिली तर वेदकालनिर्णयाचा उल्लेखनीय प्रयत्न पाश्चात्यांनीं केला असून भारतीयांनीं त्यांच्यापासूनच स्फूर्ति घेऊन आपला प्रयत्न पुढें मांडला. भाषाशास्त्र, भूस्तरशास्त्र, इतिहासशास्त्र, पुराणवस्तु-संशोधनशास्त्र, नाणकशास्त्र, वंशशास्त्र इत्यादि अनेक शास्त्रांच्या साहाय्यानें संशोधकांनीं वेदकालनिर्णय व वेदासंबंधींचीं अनुमानें बांधण्याचा प्रयत्न केला. हा प्रयत्न करणाऱ्या व्यक्तींपैकीं भारतीय वाङमयावर लिहिणाऱ्या वेबर नांवाच्या लेखकानें 'वेदकाल ठरविणें अशक्य आहे' असें आपलें स्पष्ट मत व्यक्त केलें आहे.

कालनिर्णय करण्याचा पहिला उल्लेखनीय प्रयत्न भट्ट

मोक्षमुल्लर या नांवानें भारतांत लोकप्रिय झालेल्या मॅक्समुल्लर साहेबानें भाषाशास्त्राच्या आधारावर केलेला आहे. मॅक्समुल्लर साहेबाच्या मताप्रमाणें बुद्धसंप्रदाय ही ब्राह्मण धर्माविरुद्ध उत्पन्न झालेली चळवळ असून सूक्तें, ब्राह्मणें, आरण्यकें व उपनिषदें या संज्ञेनें प्रसिद्ध असलेलें वेदवाङमय बुद्धपूर्वकालीन म्हणजे ख्रिस्तपूर्व ५०० च्या पूर्वीं निर्माण झालें असलें पाहिजे. प्रत्येक टप्प्याला तो दोनशें वर्षें ही मर्यादा गृहीत धरतो. त्याचें म्हणणें असें कीं, ब्राह्मण वाङमयानें संहितावाङमय गृहीत धरलेलें आहे. त्याच्या रचनेला ख्रिस्तपूर्व हजार ते आठशें एवढा काळ लागला असावा. तेव्हां हा सूक्तांची संहिता बनण्याचा काळ असें म्हटल्यास हरकत नाहीं. परंतु या काळांत हीं सूक्तें आधींच पवित्र होऊन बसलेलीं दिसतात. त्यामुळें त्यांचा उदय ख्रिस्तपूर्व एक हजाराच्या दोनशें वर्षें पूर्वीं धरला पाहिजे. मात्र मंत्र अथवा सूक्तें यांचा उदयकाळ ख्रिस्तपूर्व १२०० वर्षें हा गृहीत धरण्यांत दोनशें वर्षें हें केवळ एक प्रयोग म्हणून गृहीत धरलें आहे. मॅक्समुल्लर स्वतःच असें म्हणतो कीं–

As an experiment, therefore, though as no more than an experiment, we propose to fix years six hundred to Twelve hundred B. C. as the limits of that age.

केवळ प्रयोग म्हणून त्यानें ख्रिस्तपूर्व १२०० हा जो आंकडा सांगितला तो खिस्तपूर्व ४००० वर्षें जगाची उत्पत्ति झाली या बायबलांतील सिद्धान्ताचा त्याच्यावर असलेला पगडा दाखवितो असें त्याच्या टीकाकारांचें म्हणणें आहे. गोल्डस्टकरनें त्याच्यावर केलेली टीका या ठिकाणीं पाहण्यासारखी आहे. तो म्हणतोः——

But is twelve hundred B. C. a primary age of the world, except in Biblical Geography ?

"बायबलांतील भूगोलाशिवाय ख्रिस्तपूर्व १२०० वर्षें हा जगाचा आरंभ कोणीं तरी गृहीत धरला आहे काय?"

मॅक्समुल्लरनें वैदिक वाङमयाचे निरनिराळे विभाग पाडून

त्यांना दिलेला दोनशें वर्षांचा काळ केवळ अनुमान धपक्याचा आहे पण केवळ मॅक्समुल्लरचें नांव पाहून, त्याची ती एक सहज कल्पना आहे असें तो वारंवार म्हणत असूनहि, त्याच्या मागून येणाऱ्या पुष्कळ संशोधकांनीं व इतिहासलेखकांनीं त्याच्या या केवळ कल्पनेला शास्त्रीय सत्याचें स्वरूप दिलें आहे. व्हिटने व डॉ. विंटर-निट्झ यांनीं त्याच्या या केवळ कल्पनेला शास्त्रीय स्वरूप देण्याच्या इतरांच्या बुद्धीच्या भोंगळपणाला नांवेंहि ठेवलेलीं असून त्यावर टीका केलेली आहे. कल्पनेला शास्त्रीय शोध व पुराव्यावांचून शास्त्रसिद्धान्ताचें स्वरूप कसें येतें याचें 'मॅक्समुल्लरनें वेदकाल सिद्ध केला' हें करण्यांत येणारें विधान एक मजेदार उदाहरण होय. डॉ. केतकर म्हणतात :—

"आतांपर्यंत 'शास्त्रीय सिद्धान्त' 'शास्त्रीय सिद्धान्त' म्हणून इतक्या काळजीनें पोटाशीं बाळगलेला आजपर्यंत चालत आलेला सिद्धान्त कसल्या शुष्क पायावर उभारलेला होता हें हे लोक अजीच विसरले ही आश्चर्याची गोष्ट होय."

मॅक्समुल्लरनें दोनशें वर्षें हा भाषेच्या परिवर्तनाचा जो निश्चित कालखंड मानला आहे त्याला कांहींहि प्रमाण नाहीं. यासंबंधीं काढण्यांत येणारीं अनुमानें परस्परभिन्न आहेत. भाषा-शास्त्रांतील या परिवर्तनाच्या सिद्धान्तावरून डॉ.हौनें प्रत्येक भागाला ५०० वर्षें देऊन वेदकालाचा आरंभ इ. स. पूर्व २४०० पासून २००० पर्यंत ठरविला आहे. भाषेची वाढ होण्याचा व तिचीं स्थित्यंतरें दोनशें वर्षांत होतात, पांचशें वर्षांत होतात, कीं एक हजार वर्षांत होतात हें ठरविण्याचा ज्यांनीं ज्यांनीं प्रयत्न केला त्यांत त्यांची स्वतःची आवड व कल्पनेची झेंप घेण्याचा आवांका याविना दुसरें कांहींहि दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. मॅक्समुल्लरच्या सिद्धान्तावर टीका करतांना डॉ. विंटरनिट्झनें एक हजार वर्षांनीं भाषेंत फेरफार होतो असें विधान केलें आहे, व ज्योतिर्गणिता-सारख्या महत्त्वाच्या व सबळ पुराव्यावरून वेदकालनिर्णय करणाऱ्या टिळकांवर टीका करतांना "वेद जर अनंत कालापूर्वींचे धरले

तर त्यांच्यांत व अभिजात संस्कृत वाङमयांत ब्राह्मणग्रंथाची भाषा एवढा एकच दुवा पुरेसा नाहीं" असें म्हटलें आहे. पण विंटर-निट्झपासून मॅक्समुल्लरपर्यन्त भाषाशास्त्राच्या आधारावर कालनिर्णय करणारे सर्वच लोक ऋग्वेदाची भाषा अथवा मंत्रांची भाषा ही रोजच्या व्यवहारांत बोलली जाणारी व स्थित्यंतरांना बळी पडणारी लौकिक व्यवहाराची भाषा आहे असें जें समजले तेंच वस्तुतः चुकीचें आहे. प्रांतभेदानें, अथवा ठराविक कालखंडानें भाषेंत परिवर्तन घडतें हा सिद्धान्त व्यवहाराच्या भाषेपुरता खरा असला तरी ग्रांथिक व शास्त्रीय भाषेच्या बाबतींत तो पूर्णपणें चुकीचा आहे. गेलीं २५०० वर्षे शास्त्र व अभिजात साहित्य यांची भाषा असलेल्या संस्कृत भाषेचा अपरिवर्तनशील इतिहास पाहिला तर हा सिद्धान्त आपोआपच चुकीचा ठरेल. एकाच काळां-तील दोन लेखकांच्या भाषेंतहि कसा फरक असतो व भाषेवरून कालनिर्णय करावयास धजलें तर किती विलक्षण विसंगति निर्माण होते याचें उत्तम उदाहरण म्हणजे महाराष्ट्रांतील श्रीज्ञानेश्वर महाराज व श्रीमुकुंदराज यांचें वाङमय सांगतां येईल. हे दोघेहि पुरुष एकाच कालखंडांतील असूनहि मुकुंदराजांचा काळ त्यांच्या ग्रंथांतील भाषेवरून नाथांच्या समकालीन ठरेल तर ज्ञानेश्वर-महाराज हे कितीतरी प्राचीन ठरवावे लागतील. म्हणून भाषेचें प्रमाण हें कालनिर्णय ठरविण्यास सदोष व अनिश्चित म्हणून त्याज्य समजलें पाहिजे. गुरुवर्य श्री. अप्रबुद्ध यांनीं भाषेच्या प्रमाणासंबंधीं "राष्ट्राच्या विकसित व भरभराटीच्या काळांत त्याच्या भाषेस निश्चित स्वरूप येऊन ग्रंथांची, शास्त्रांची व अभिजात व्यवहारांची भाषा ठरली जाते व ती संस्कृति आहे तोंवर त्या भाषेचें स्थान अढळ राहतें, तें अढळ राहूनहि व्यावहारिक भाषा पालटते व प्रांतिक भाषाहि एका मोठ्या संस्कृतीच्या पोटांत नांदू शकतात" असें जें प्रतिपादन केलें आहे तें सर्वस्वीं खरें आहे. ऋग्वेदाच्या भाषेला व्याकरण असून ती अभिजात साहित्याची भाषा आहे हें वैजनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं आपल्या

निरुक्तांत व्यवस्थितपणें सिद्ध केलें असून त्यांतच मंत्रमयता हें त्या भाषेचें स्वरूप मिसळलें म्हणजे तिची अपरिवर्तनीयता ध्यानांत येऊन भाषाशास्त्रावरून वेदकालनिर्णय ठरविणें कसें व कां अशक्य आहे हें ध्यानांत येतें. पाश्चात्य संशोधकांचा तर या भाषाशास्त्राच्या अस्थिर सिद्धान्तावर इतका भरंवसा कीं, त्यांनीं कालनिर्णयच तर काय, पण भाषासाम्याच्या पुराव्यावर वैदिक आर्यांचे मिश्रवंश व त्यांचीं अनार्यांवरील आक्रमणें यांच्याहि उपपत्ति बसवून त्या सिद्धान्तासारख्या खुशाल सांगून टाकलेल्या आहेत ! आतां त्या बाबतींत त्यांची स्वतःचीच अनिश्चिति झाली असल्याचें डॉ. कीथ यांच्या पुढील उद्गारांवरून ध्यानांत येईल :—

All the Indo-European languages have certain special points in which they agree with one or another of the group and to deduce racial mixture, migration from these facts is quite impossible.

( सर्वच इंडो-युरोपियन भाषांत कांहीं विशेष साम्यस्थळें एकमेकांशीं जुळणारीं आहेत, पण त्यावरून वंशांचें परस्परमिश्रण व आक्रमण सिद्ध करणें पूर्णपणें अशक्य आहे. )

ही जी भाषाशास्त्राच्या संबंधाची गोष्ट, तीच भूगर्भशास्त्र व इतिहासशास्त्र इत्यादि शास्त्रांचीहि आहे. हिमप्रलय इ. स. पूर्व दहा हजार वर्षें झाला कीं ऐंशी हजार वर्षें झाला हें ठरवावयास कांहींहि साधन नाहीं. हीं दोन्हीं मतें प्रतिपादन करणारे भूगर्भ-शास्त्रज्ञ सारखेच प्रामाणिक आहेत. त्यामुळें टिळक आपल्या 'आर्क्टिक होम' मध्यें वैदिक संस्कृतीचा काळ भूगर्भशास्त्राच्या जितक्या प्रामाण्यावरून इ. स. पूर्व दहा हजारपर्यंत ठरवितील, तितक्याच प्रामाण्यावरून दुसरा एखादा संशोधक वेदकाल आणखी सत्तर हजार वर्षें पूर्वींचाहि ठरवूं शकेल. लो. टिळकांनीं दहा हजार वर्षें हा काल ठरवितांना भूगर्भशास्त्रावरून सत्तर हजार वर्षें कां ठरवूं नये याला भूगर्भशास्त्रांतलें कोठलेंहि प्रमाण दिलेलें नाहीं. केवळ आपल्या कल्पनेस परवडत नाहीं येवढेंच त्यांना म्हणतां आलें. ते म्हणतात—

But according to some geologists, 20,000 or even 80,000 years have passed since the close of the last Glacial epoch; and as the oldest date assigned to the Vedic hymns does not go beyond 4500 B. C., it may be contended that the traditions of the Ice Age, or of the inter-Glacial home, cannot be supposed to have been accurately preserved by oral transmission for thousands of years that elapsed between the commencement of the post-Glacial era and the oldest date of the Vedic hymns. It is, therefore, neccesary to examine the point a little more closely in this place. In my **Orion** or **Researches into the Antiquity of the Vedas,** I have shown that while the Taittiriya Samhita and the Brahmanas begin the Nakshatras with the Krittikas or the Pleiades showing that the vernal equinox then coincided with the aforesaid asterism (2500 B. C.), the Vedic literature contains traces of Mriga or Orion being once the first of the Nakshatras and the hymns of the Rigveda, or at least many of them which are undoubtedly older than the Taittiriya Samhita, contain reference to this period, that is, about 4500 B. C. approximately. It is also pointed out that there are faint traces of the same equinox being once in the constellation of Punarvasu, presided over by Aditi, which was possible in about 6000 B. C. I have in my later researches tried to push back this limit by searching for the older zodiacal positions of the vernal equinox in the vedic literature but I have not found any evidence of the same. It will be seen that this estimate well agrees with the conclusions of American geologists, who from an examination of the erosion of the valleys and similar other well-ascertained facts, assign to the close of the last Glacial epoch a date not older than about 8000 B.C. We might even go further and say that ancient Vedic chronology and calender furnish an independent corroboration of the moderate

view of the American geologists; and when two independent lines of research unexpectedly lead us to the same result, we may very well reject, at least in the present state of our knowledge, the extravagant speculations of Croll and his followers and adopt the view that the last Glacial epoch closed and the post-Glacial period commenced at about 8000 B. C.

–*The Arctic Home in The Vedas pp.* 419

( आतां कांहीं भूस्तरशास्त्रज्ञांच्या मतें गेला हिमकाल संपल्याला वीस हजार किंबहुना ऐंशी हजार वर्षें झालीं असावींत, आणि वेदांचा प्राचीनतम काल तर इ. स. पूर्वीं ४५ शें वर्षांच्या पलीकडे जात नाहीं. यावरून कोणी असें म्हणतील कीं, हिमकालाचा शेवट व वैदिक सूक्तांचा रचनाकाल यांमध्यें जो हजारों वर्षांचा खंड पडला त्यांतून हिमांतरकालांतील ध्रुवस्थानाचें सत्य वृत्त वंशपरंपरा जसेंच्या तसें वैदिक ऋषींना मिळणें संभवनीय दिसत नाहीं. हा समज दूर करण्यासाठीं थोडें सूक्ष्म विवेचन करणें अवश्य आहे. वेदकालनिर्णय या पुस्तकांत आम्हीं असें दाखविलें आहे कीं, तैत्तिरीय संहिता आणि ब्राह्मणें यांत नक्षत्रांना कृत्तिकापासून आरंभ केला असून त्याचा अर्थ त्या वेळीं वसंत संपात त्या नक्षत्रांत होता असा होतो, व त्या अन्वयें या संहितेचा काळ इ. स. पूर्व २५०० वर्षांच्या सुमारास ठरतो. तसेंच यांच्यापेक्षां प्राचीन असा जो ऋग्वेद त्यांतील कित्येक वचनांवरून ऋक्सूक्तें मृग नक्षत्रांत वसंत संपात असतांना म्हणजे इ. स. पूर्व ४५०० वर्षांच्या सुमारास रचिलीं असावींत. आणखी त्यांत असेंहि दाखविलें आहे कीं, वसंत संपात पुनर्वसूंत असल्याच्याहि (शकपूर्व ६०००वर्षें) कांहीं खुणा त्यांत आहेत. अमेरिकन भूस्तर शास्त्रज्ञांनीं हा हिमकाल इ. स. पूर्वीं ८००० वर्षांच्याच सुमारास झाला असावा असें अनेक प्रकारावरून अनुमान केलें आहे; हिमकाल मृगशीर्षकालाच्या पूर्वीं किती हजार वर्षें होऊन गेला असें वैदिक कालगणनेविषयीं केलेल्या शोधावरून ठरवावयास कांहीं आधार मिळत नाहीं.

अमेरिकन शास्त्रज्ञांच्या अनुमानाला आमच्या स्वतंत्र रीतीनें काढलेल्या अनुमानावरून चांगली पुष्टि मिळत असल्यामुळें डॉ. क्रोलसारख्या शास्त्रज्ञांचे मदमुराद तर्क सोडून अमेरिकन शास्त्रज्ञांचें नेमस्त मत ग्रहण करणें हेंच आजच्या ज्ञानाच्या स्थितींत योग्य दिसतें.)

टिळकांनीं संशोधनाच्या शास्त्रांत नेमस्तपणाच्या नांवाखालीं अमेरिकन शास्त्रज्ञांचें हें जें मत स्वीकारलें आहे त्याचा अर्थच भूस्तरशास्त्र अथवा भूगर्भशास्त्र स्वतंत्र रीतीनें कालनिर्णयाच्या बाबतींत ठामपणें वापरतां येण्यासारखें नाहीं असा होतो. डॉ. क्रोल यांचें सर रॉबर्ट पॉल, प्रो. गीकी इत्यादि शास्त्रज्ञांनीं संमत केलेलें मत मनमुराद तर्क म्हणून निकालांत निघूं शकत नाहीं. तें चांगलें गणिताचा आधार घेऊन सिद्ध केलेलें आहे. केवळ हजारों वर्षांचा फरक पडतो म्हणून त्याला मनमुराद म्हणावयाचें असलें तर एखादा मॅक्समुल्लर बायबलच्या भूगोलां-तील बाराशें वर्षांच्या अनुमानावर अडून अमेरिकन शास्त्रज्ञांच्या अनुमानालाहि टिळकांइतक्याच आग्रहानें मनमुराद तर्क म्हणूं शकेल. ज्योतिर्गणितासारख्या इतर प्रमाणांनीं टिळकांनीं ठरवि-लेल्या काळाला जवळचा म्हणून अमेरिकन भूगर्भशास्त्रज्ञांचा हवाला घेतला आहे. समजा, उद्यां टिळकांची ओरायनची उप-पत्ति ज्योतिर्गणिताच्या आधारें दुसऱ्या एखाद्या संशोधकानें अपुरी ठरवून वेदकाल हजारों वर्षें मागें नेला तर अमेरिकन शास्त्रज्ञांचे तर्क भुईसपाट ठरून टिळकांच्या अनुमानपद्धतीच्या आधारावर तो डॉ. क्रोलचें म्हणणें साहाय्यासाठीं घेईल व तेंहि टिळकांच्या प्रतिपादनाइतकेंच शास्त्रीय ठरेल. मीं हें केवळ कल्पनेनें म्हणत नाहीं. लोकमान्यांच्या ओरायनचें परीक्षण करतांना श्री. दीक्षित यांनीं ' वेदकालीं महिने चांद्र होते तेव्हां वर्षारंभ चांद्रमासाच्या आरंभीं होत असे हें उघड आहे, तेव्हां वरील तैत्तिरीय ब्राह्मणां-तील 'उत्तरयोः फल्गुन्योः आदधीत' या वाक्यांतील पूर्वा फल्गुनी हें चांद्रमासाचें शेवटचें नक्षत्र आणि उत्तरा फल्गुनी हें पुढील

मासाचें आरंभींचें नक्षत्र आहे' असें म्हटलें आहे. त्यावर टीका करतांना ओरायनचे अनुवादक श्री. ओगले यांनीं असें म्हटलें आहे कीं, 'पौर्णिमेला चंद्र उत्तरा फल्गुनीवर असतांना जर वर्षारंभ गृहीत धरला तर त्या वेळीं सूर्य उत्तरा भाद्रपदाजवळ असणार व जर हा वर्षारंभ वसंतारंभींचा असेल तर वसंतसंपात उत्तरा भाद्रपदांत आला म्हणजे जवळजवळ आजची स्थिति, किंवा सुमारें २१००० वर्षांमागची स्थिति आली. पण प्रश्न असा आहे कीं, जर ज्योतिषांतील प्रमाणावरून २१००० वर्षें हा तैत्तिरीय संहितेचा खरोखरीच काल ठरत असेल तर तो केवळ प्राचीन आहे येवढ्याचसाठीं नाकारणें तर्कशास्त्रास धरून होत नाहीं, व तसा तो मान्य करणाऱ्यानें डॉ. क्रोल यांचे भूगर्भशास्त्रांतील निर्णय साहाय्यक म्हणून पुढें केले तर त्यांना मनमुराद म्हणण्याचेंहि कोणाला कारण उरणार नाहीं. **लोकमान्यांच्या ध्रुवसिद्धान्ताच्या विरोधी मी कांहीं म्हणतों असा अपसमज होऊं नये. त्यांचा ध्रुवसिद्धान्त मान्य करूनहि वेदकालनिर्णयाच्या बाबतींत भूगर्भशास्त्र स्वयंभू प्रमाण म्हणून अपुरें आहे एवढेंच मला म्हणावयाचें आहे**. जी गोष्ट भूगर्भशास्त्राची तीच वंशावळ्यांच्या इतिहासशास्त्रानें कालनिर्णय करण्याच्या प्रकाराचीहि आहे. भूगर्भशास्त्रावरून कांहीं लोक तर उत्तरध्रुवच हिंदुस्थानांत असल्याचेंहि प्रतिपादन करतात, पण त्यावरून काढण्यांत येणारीं अनुमानेंहि किती अनिश्चित असतात हें अविनाशचंद्र दास यांच्याच प्रतिपादनावरून दिसून येतें. श्री. दास यांनीं आपल्या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तींत राजपुतान्यांत साठ हजार वर्षांपूर्वीं समुद्र होता असें एकदां म्हटलें आहे तर पुस्तकाच्या दुसऱ्याच आवृत्तींत तो २७ हजार वर्षांपूर्वीं होता असें म्हटलें आहे. यावरून हें शास्त्र किती बेभरंवशाचें आहे याची कल्पना येऊं शकते.

पुराणांतील वंशावळ्या प्रमाण मानून त्यांच्या भरंवशावर कांहीं अनुमानें करण्याचा प्रयत्न डॉ. केतकर यांनीं केला आहे.

दाशराज्ञ युद्ध ही मध्यवर्ती कल्पना धरून त्याभोंवतीं त्यांनीं ऋग्वेदाच्या इतिहासाची गुंफण केली आहे. पण पुराणांतील वंशावळी म्हणजे इतिहासांतील व्यवस्थित वंशवेल ही त्यांची कल्पना चुकीची आहे. वेदांत शंतनु व देवापि आढळले म्हणजे ते एकमेकांचे भाऊच होते अथवा जनमेजयाचा उल्लेख आढळला म्हणजे तो धृतराष्ट्राचा पणतू होता कीं पूर्वज अथवा केतकरांना आवडणारा सुदास घेतला तरी तो रामाचा वंशज होता कीं पूर्वज हें ठरवावयास कांहींहि साधन नाहीं. इतकेंच नव्हे तर वेदांत सुदास हें व्यक्तिवाचक जसें, तसेंच गुणावाचकहि नाम असल्यामुळें या बाबतींत नक्की निर्णय घेणें अत्यंत घोटाळ्याचें होईल. अन्य प्रमाणांनीं वेदांचा काळ निश्चित करतां आला तर या वंशावळ्यांचाहि उपयोग होईल.

या सर्व प्रमाणांपेक्षां ज्योतिर्गणिताचें प्रमाण अधिक बल-वत्तर समजून लोकमान्यांनीं त्याच्या भरंवशावर कालनिर्णय केला व हिमप्रलयाच्या उपपत्तीनें तो २००० वर्षें आणखी पाठीमागें नेला. आकाशांतील ग्रहनक्षत्रांची स्थिति अधिक निश्चित असल्या-मुळें त्यावरून करण्यांत येणारा कालनिर्णय इतर कोणत्याहि प्रमाणापेक्षां अधिक सूक्ष्म स्वरूपाचा असतो, व त्यामुळें इतर कोणत्याहि पद्धतीपेक्षां ती पद्धति अधिक स्वीकरणीय आहे हें उघडच आहे. पण यावरून तरी कालनिर्णय होऊं शकला, कीं त्यांत भूगर्भ शास्त्राइतकेच कालखंडाचे फरक पडले हें पाहणें उद्बोधक ठरेल.

ही पद्धति प्रथम उपयोगांत आणण्याचें श्रेय लोकमान्यांनाच आहे. त्यांच्या प्रतिपादनाचा थोडक्यांत सारांश असा–

" वेदकालीं कालमापनाची व्यवस्था कशी होती हें पाहूं जातां चंद्राचे वृद्धिक्षय, ऋतूंचे बदल, सूर्याचीं दक्षिणोत्तर अयनें हीं त्यांचीं साधनें असावींत. सत्रें सूर्याच्या सांवत्सरिक गतीच्या अनुरोधानें बसविलीं असल्यामुळें सत्राचा अंत तोच संवत्सराचा अंत म्हणून सत्र किंवा यज्ञ आणि संवत्सर हे शब्द समानार्थी बनले होते. चांद्र

व सौर वर्षांचा मिलाफ करण्यासाठीं अधिक मास धरण्याची पद्धत ऋग्वेद कालापासूनची आहे. त्या वेळीं वर्षमान नाक्षत्र होतें व ऋतु-चक्राशीं मेळ ठेवण्यासाठीं सुमारें दर २००० वर्षांनीं वर्षारंभ बदलत असत. आतां वर्षारंभ केव्हां धरीत याविषयीं शोध लावतां असें दिसतें कीं, वैदिक काळीं वसंतसंपातीं वर्षारंभ होत असे; पण पुढील काळांत तो मकर संक्रमणीं होऊं लागला. तैत्तिरीय संहिता व ब्राह्मण यांत आढळणाऱ्या चार निरनिराळ्या वचनांवरून वसंत-संपात कृत्तिकांमध्यें होता हें स्पष्ट दाखवितां येतें. कृत्तिका नांवाचा तारकापुंज वर्षाचें आरंभस्थान धरून तैत्तिरीय संहितेचा काळ इ. स. पू. २३५० वर्षें इतका येतो. उदगयनारंभ जर फाल्गु-नांत झाला तर वसंतसंपातहि कृत्तिकांच्या पुढें दोन नक्षत्रें म्हणजे मृगशीर्षांत येईल. मृगशीर्षाचें दुसरें नांव अग्रहायणी. अग्रहायणी नक्षत्रांचें मुख होतें असें वैदिक ग्रंथांत म्हटलें आहे. तैत्तिरीय संहिता व ब्राह्मणें यांतील 'फाल्गुनी पूर्णमास वर्षाचें मुख होतें' या वचनाचा त्या दिवशीं उत्तरायण होतें असा अर्थ घेतल्यास व मृगशीर्षवाचक अग्रहायण शब्दाचा 'वर्षारंभ करणारें' असा खरा अर्थ घेतल्यास त्या नक्षत्रामध्यें एकदां वसंतसंपात होता हें उघड दिसतें. पितृपक्षाच्या काळावरूनहि असेंच दिसतें. ऋग्वेदांत पहिल्या मंडळांत (१-१६१,१३) एक ऋचा आहे. तींत 'एक श्वान ऋतूंना संवत्सराच्या शेवटीं जागें करी' असा मजकूर आहे. या ठिकाणीं ऋतु म्हणजे ऋतु व श्वान म्हणजे मृगपुंजाजवळील श्वानपुंज असा अर्थ घेतल्यास या तारकापुंजाशीं सूर्य आला म्हणजे ऋतु देवता जाग्या होऊन नव्या वर्षास सुरवात होते असा वरील ऋचेचा चांगला अर्थ निघतो. म्हणजे वसंतसंपात त्या वेळीं श्वानपुंजाजवळ होता. अर्थातच उत्तरायणारंभ फाल्गुनी पौर्णिमेस होत असे व मृगशीर्ष नक्षत्रमालेच्या आरंभीं असे. वसंतसंपात मृगांत होता, हें तैत्तिरीय संहिता व ब्राह्मण यांतील वचन सिद्ध करून दाखविण्यास ऋग्वेदांतील हें स्थान योग्य आहे. असेंच दुसरें स्थान म्हणजे वृषाकपीचें सूक्त (ऋ१०–८६). या ठिकाणीं वृषाकपीचा अर्थ

मृगशीर्षांत वसंतसंपात असतांना शरत्संपातीं असलेला सूर्य असा घेतला म्हणजे हें सूक्त चांगलें समजतें. या सूक्तांत मृगशीर्ष व श्वानपुंज यांचेंच केवळ वर्णन आहे असें नाहीं तर सूर्य ज्यावेळीं विषुववृत्ताच्या दक्षिणेस किंवा उत्तरेस येऊं लागतो तेव्हांची त्याची स्थितीहि स्पष्टपणें त्यांत वर्णिली आहे. या गोष्टींशीं ऋतूंची गोष्ट जोडली म्हणजे आपणांला या गोष्टी केव्हां रचल्या गेल्या तो काळ निश्चित करतां येतो.

"चित्रापूर्णमासीं वर्षारंभ होत असे असें तैतिरीय संहितेंत दुसरें एक स्पष्ट वचन आहे. फाल्गुनी पौर्णिमेला दक्षिणायन झाल्यास वसंतसंपात ज्याप्रमाणें मृगशीर्षांत येतो त्याचप्रमाणें चैत्री पौर्णिमेला जर दक्षिणायन झालें तर वसंतसंपात पुनर्वसूंत होईल. हा काळ फार प्राचीन आहे. यज्ञग्रंथांत पुनर्वसूंच्या प्राचीन स्थितीच्या कांहीं खुणा आहेत. अदिति ही पुनर्वसूंची अधिष्ठात्री देवता. यज्ञ देवांपासून निघून गेला असतांना तिनें यज्ञारंभ करून दिला याचा अर्थ असा दिसतो कीं, या काळापूर्वीं यज्ञ वाटेल तेव्हां करीत. परंतु तेव्हांपासून ते अदितीपासून करावे असें ठरलें. म्हणजे अदिति ही यज्ञाची ऊर्फ संवत्सराची आरंभक झाली. तिचें अधिष्ठान वसंतसंपातीं आहे. तेव्हां सूर्याचा वार्षिक क्रम अदितीपासून सुरू होत असे. यावरून पुनर्वसूंमध्यें वसंतसंपात असतांना वर्षारंभ मानणारें पंचांग होतें हें निश्चित ठरतें.

"आतांपर्यन्त तीन प्रकारच्या प्राचीन कालासंबंधीं विवेचन केलें. त्यांपैकीं अगदीं पहिला काल तो अदिति काल किंवा मृगशीर्षपूर्व-काल, त्याची मर्यादा अजमासें इ. पू. ६००० ते ४०००, या कालीं ऋचा पूर्ण झाल्या नव्हत्या. या कालाविषयींचें फक्त स्मारक भारती-यांत आढळतें. दुसरा मृगशीर्षकाल. त्याची मर्यादा इ. पू. ४००० ते २५०० पर्यंत. या कालांत ऋग्वेदाचीं बरींच सूक्तें झालीं व इतर गोष्टी रचल्या गेल्या. तिसरा काल कृत्तिकाकाल. याची मर्यादा इ. स.पूर्वीं २५०० ते १४०० पर्यन्त. हा तैत्तिरीय संहिता

व ब्राह्मणांचा काल होय. ऋक्सूक्तें या काळीं न समजण्याची परिस्थिति उत्पन्न झाली होती. ”

ओरायन अथवा वेदकालनिर्णय या ग्रंथाच्या निर्मितीनंतर लोकमान्यांना वेदांतून आर्यांच्या उत्तर ध्रुवावरील निवासाचे पुरावे मिळाले व भूगर्भशास्त्राच्या संशोधनावरून उत्तर ध्रुव हिमकालापूर्वी वसतिक्षम असल्याचेहि पुरावे उपलब्ध झाले. त्यावरून हा काळ आणखी मागें नेणें शक्य कोटींतलें वाटून त्यांनीं आपला निर्णय २००० वर्षे मागें नेला व वेदकालाला इ.स. ८००० च्या अलीकडे आणतां येत नाहीं असें निश्चित स्वरूप दिलें.

लोकमान्यांचा ध्रुवसिद्धान्त (म्हणजे उत्तर ध्रुवावर आर्य राहात होते) हा सर्वमान्य झाला आहे. पण त्यांचा काळ मात्र सर्वमान्य झाला नाहीं. त्यांच्या ज्योतिर्गणिताच्या पुराव्याच्या आधारेंच वेदकालनिर्णयासंबंधीं जे परस्परविरोधी सिद्धान्त मांडले गेले ते पाहिले म्हणजे ज्योतिषाच्या आधारावर भूगर्भशास्त्राचे सिद्धान्त प्रमाण मानणाऱ्यांना नांवें ठेवण्याचा या ज्योतिर्विद् संशोधकांचा प्रकार चुकीचा वाटूं लागतो. कारण त्यांतहि सहस्रावधि वर्षांचें अंतर पडलेलें आहे. कसें तें पुढच्या व्याख्यानांत दिग्दर्शित करीन.

## व्याख्यान तिसरें

# वेदांचा काल

कै. लोकमान्य टिळक यांनीं वेदकालनिर्णयाच्या बाबतींत केलेल्या कार्याचा आढावा मागच्या व्याख्यानांत घेतलाच आहे. टिळकांच्या समकालीन जर्मन प्रोफेसर हर्मन जाकोबी यांनींहि ज्योतिषाच्याच आधारें जवळ जवळ टिळकांचाच काळ एका वेगळ्या आधारावर सिद्ध करून दाखविलेला आहे. त्यांनीं 'अघासु हन्यन्ते गावः' हा एकच सुटसुटीत आधार घेऊन मघा नक्षत्रावर पावसाळ्याला सुरवात होई त्या काळीं उत्तर बिंदु होता, तसेंच गृह्यसूत्रांत विवाहप्रकरणांत वधूला वरानें ध्रुव दाखविण्याचा जो संकेत आहे तो असाच कालनिदर्शक आहे असें मत मांडलें, व एकंदर गणितावरून प्रस्तुतचा ध्रुवमत्स्यांतील शेपटीचा तारा ध्रुवस्थानीं नव्हता, तो आतां हजार बाराशें वर्षांत ध्रुवस्थानीं दिसूं लागला आहे, त्यापूर्वी ध्रुवस्थानीं असण्याची ज्याची शक्यता आहे अशी स्थिति असतांना सूत्रवाङमय निर्माण झालें असें त्यांचें म्हणणें आहे, तें नक्षत्र ध्रुवस्थानीं असण्याचा काळ इ. स. पूर्व ३००० वर्षांचा धरून त्यांनीं आपला कालनिर्णय सांगितला. टिळकांचे एक समकालीन रा. ब. दीक्षित यांनीं टिळकांच्या सिद्धान्ताला पुष्टि देणारें एक चांगलें प्रमाण शतपथ ब्राह्मणांतून काढून दिलें. हें प्रमाण म्हणजे कृत्तिकाबद्दल 'एताह वै प्राच्यै दिशो न च्यवन्ते।' हें वाक्य होय. रा. ब. दीक्षित हे भारतीय कीर्तीचे ज्योतिर्विद असून त्यांचा भारतीय ज्योतिषशास्त्र हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. श्री. दीक्षित यांनीं कृत्तिकेंत वसंतसंपात होता हें शतपथ ब्राह्मणांतील वरील वाक्यांतून अधिक स्पष्ट दाखवून दिलें हें जसें त्यांच्या सिद्धान्ताला फार मोठें

साह्य केलें, तसेंच टिळकांचें प्रतिपादन बरोबर नसल्याबद्दलहि विवेचन केलें आहे. दीक्षितांना टिळकांचा सिद्धान्त मान्य आहे; पण तो सिद्ध करावयास्तव त्यांनीं दिलेलीं प्रमाणें मात्र मुळींच मान्य नाहींत. ते लिहितात, "ऋक्संहिताकाळीं मृगांत संपात होता ही गोष्ट स्वतंत्रपणें सिद्ध होते. तिला फाल्गुनांत उदगयन असा अर्थ अनुवाकांत करून त्याचा आधार घेण्याचें कारण नाहीं. तसा अर्थ करण्यास अडचणी आहेत. उदगयनाबरोबर वर्षारंभ होत असे असें ज्ञापक कोठेंहि नाहीं. मार्गशीर्ष हा वर्षारंभाचा पहिला मास असे प्रत्यक्ष दाखले आहेत." याप्रमाणें प्रतिपादन ठिसूळ पण सिद्धान्त बरोबर असें सांगून दीक्षितांनीं टिळकांचा सिद्धान्त वेगळ्या पद्धतीनें मान्य केला. लोकमान्यांच्या सिद्धान्ताला एका वेगळ्या पद्धतीनें कै. व्यंकटेश बापूजी केतकर यांनींहि असाच भक्कम पाठिंबा दिला आहे. त्यांनीं "बृहस्पतिः प्रथमं जायमानः तिष्यं नक्षत्रमभिसंबभूव" (तैत्तिरीय ब्राह्मण ३११) या वाक्यावरून असें प्रतिपादन केलें आहे कीं, बृहस्पति जो प्रथम उत्पन्न झाला तो पुष्य नक्षत्राजवळ झाला. याचा अर्थ गुरु व पुष्य नक्षत्राची युति पहिल्यानें झाली असा घेतला पाहिजे, व त्यांतील अभि या उपसर्गाचा अर्थ बृहस्पति तिष्य नक्षत्रासमोर पहिल्यानें आला, अर्थात् त्याच्या अंगावरून बृहस्पति गेला असें निर्विवाद ठरतें. या वेळेपूर्वींहि गुरु पुष्याजवळून जात असे. पण त्या वेळीं त्याचा शर दक्षिण व पुष्याचा शर उत्तर असल्यामुळें भेदयुति होत नसे. पण ती झालेली जेव्हां तैत्तिरीय ब्राह्मणकालच्या ऋषींनीं प्रथम पाहिली त्यावेळीं त्यांस मोठें आश्चर्य वाटून वरील वाक्याची रचना झाली. गुरूचा परम शर १ अंश १९ कला आहे व पुष्याचा शर उत्तर ४ कला आहे. तेव्हा अगदीं पहिल्यानें युति होण्यास गुरु कक्षेचा ऊर्ध्व संपात तिष्य नक्षत्राच्या मागें पश्चिमेस तीन अंश या स्थानीं आला पाहिजे. वरील वाक्यरचनेपूर्वीं तो पात या बिंदूच्या पूर्वेस असल्यामुळें गुरु-पुष्याची भेदयुति अशक्य असे. या युतीवरून गुरुकक्षा पातांचें स्थान एक अंशाचे आंत ठर-

वितां येतें, व पातगति एक अंश होण्यास अडीचशे वर्षें लागतात. श्री. केतकर यांनीं गुरु पातगतीच्या बाबतींत फ्रेंच ज्योतिषी लिवेरियर यांचीं मतें प्रमाण मानून तैत्तिरीय ब्राह्मणांत सांगितलेला गुरुपुष्य भेदयोग इ. स. पूर्व ४६५० वर्षें झाला ही गोष्ट सिद्ध केली आहे, व त्यावरून ऋग्वेद सहजच ६००० वर्षांपूर्वी झाला असल्याचें सांगून ते लिहितात, "टिळकांना एक समग्र पुस्तक लिहून जी गोष्ट सिद्ध करावी लागली ती या एका वाक्यावरून एका त्रैराशिकानें एका ओळींतच सिद्ध होते." पण केतकरांनीं गुरुपुष्यभेदयोगाकडे जितकें लक्ष दिलें तितकें 'बभूव' या भूतकालवाचक क्रियापदाकडे दिलेलें नाहीं. 'संबभूव' या शब्दानें तैत्तिरीय ब्राह्मणकालीं गुरुपुष्यभेदयोगाची गोष्ट एक भूतकालीन गोष्ट म्हणून लोकांना माहीत होती एवढाच अर्थ निष्पन्न होतो.

## टिळकांचे टीकाकार

टिळकांचे अगदीं अलीकडचे टीकाकार श्री. भा. रं. कुलकर्णी यांनीं त्यांच्या ओरायनावर पुढीलप्रमाणें आक्षेप घेतले आहेत. ते म्हणतात, "ऋग्वेदांतील वृषा-कपि सूक्ताशिवाय दुसरें प्रमाण त्यांना (टिळकांना) दाखवितां व उपयोगांत आणतां आलें नाहीं. वृषा-कपि सूक्त हें बोलून चालून रूपक असल्यानें त्याचा ते म्हणतात तसाच ज्योतिषपर अर्थ घेण्याचा आग्रह सर्वांस मान्य होणें शक्य नाहीं. राहिलीं इतर प्रमाणें; त्यांत मुख्य महत्त्वाचें जें अग्रहायण तें वेदांतलें नाहीं. आणि टिळकांचा भर त्यावर इतका कीं, तें ग्रीक व भारतीय एकत्र नांदत त्या काळाचे अवशेष स्वरूप आहे असा त्यांचा दावा. तिसरें व त्यांच्या ग्रंथांत प्रथम आलेलें प्रमाण म्हणजे तैत्तिरीय ब्राह्मणांतील 'ऋतूनां मुखं यद् वसंतः' व 'कृत्तिका मुखं नक्षत्राणां' हीं दोन; व त्यांचा समन्वय करतांना गृहीत धरलेलीं त्यांच्या अन्योन्याश्रयाची कल्पना. श्री. कुलकर्णी यांनीं वेदांतून अनेक प्रमाणांनीं २६००० ते १६००० वर्षांपूर्वींच्या नक्षत्रस्थितीचीं वर्णनें आढळतात असें दाखवून

दिलें आहे. पण संहिताकाल इ. स. पूर्व ३००० हाच गृहीत धरून आपण टिळकांशीं सहमत असल्याचें दाखविलें आहे.

टिळकांचे याहून अधिक सूक्ष्म दृष्टीचे परीक्षक श्री. अप्रबुद्ध यांनीं एकंदर चौदा गृहीतकृत्यें दाखवून देऊन असें म्हटलें आहे कीं, "वृषा-कपि सूक्तांत, ऋग्वेदाच्या ज्या ऋचांवरून लोकमान्यांनीं तसा अर्थ काढला आहे त्यावरून तो तसा निघत नाहीं. वर्षारंभ व उदगयन यांची सांगड मानण्यास माझ्या मतानें दोनचार अडचणी येतात. तैत्तिरीय संहितेंतच संवत्सर सत्राचे तीन प्रारंभ सांगितले आहेत. यावरूनच सत्रारंभ वर्षारंभींच झाला पाहिजे असा संहितेचा कटाक्ष आहे हें लोकमान्यांचें म्हणणें बरोबर वाटत नाहीं. निदान तैत्तिरीय संहिताकालीं तरी तसा आग्रह राहिलेला नव्हता हें उघड आहे. तीन महिन्यांत केव्हांहि प्रारंभ करणें म्हणजे कांहीं आरंभीं नव्हे. वृषा-कपि सूक्तांत जर खरोखर मृगसंपात असला तर ते ध्रुवाखालील प्रदेशांतच कोठेंतरी रचलें जाणें शक्य आहे. त्या सूक्तांवर लिहितांना ग्रीकांच्या 'पक्वाना' ची म्हणजे व्याधाची आणि शरदत्संपातारंभीं सायंकाळीं उगवणाऱ्या मूळ नक्षत्राची जी कल्पना त्यांनीं सांगितली आहे, ती उत्तर ध्रुवावर संभवनीयच नाहीं. उत्तरध्रुवावर क्रांतिवृत्ताचा कांहीं भाग मुळींच दिसणें शक्य नाहीं; आणि तेथें प्रत्यक्ष सूर्यदर्शनापूर्वीं आणि नंतर महिना दीड महिना चांगला प्रकाश असतो. तेव्हां महिना दीड महिना आधीं न दिसणारा श्वान सूर्यास जागें करतो ही कल्पनाच अत्यंत दीर्घ आहे. खालील प्रदेशांत हें सूक्त तयार झालें म्हटलें तरी तीच अडचण येते. म्हणजे मृग नक्षत्रांतून सूर्य जाईपर्यंत आधीं कैक महिने श्वान संध्याकाळीं दिसत असतो. संध्याकाळीं अस्त झालेल्या ताऱ्याला तो सूर्याला उठवायला गेला असें म्हणणें कितपत ठीक आहे हें पाहावें. खरें म्हटलें तर श्वान सूर्यास जागें करतो ही कल्पना होण्यास श्वानाचा उदय थोडा सूर्योदयापूर्वींच झालेला असणें जास्त सयुक्तिक आहे. पक्षी सूर्याला जागें करतात अशा

प्रकारची कल्पना अगदीं सरळ आहे. संध्याकाळीं खोप्यांत गेलेले पक्षी सूर्याला जागे करावयास गेले अशी कल्पना कोणत्याहि वाङमयांत असेल काय ? आणि अशी दीर्घ कल्पना शक्य असली तर संध्याकाळीं उगवणारें मूळ नक्षत्रहि सकाळच्या दिवसेश्वराच्या आघाडीचा ध्वज म्हणून कल्पना करतां येईल. कवींचा हा विषय आहे. काव्यदृष्टच्या हें कितपत शक्य आहे हें कवींनींच ठरवावें. मताच्या सिद्धतेकरतां कांहीं गोष्टी गृहीत धरल्या आहेत, त्यांचा निर्देश करतों : (१) तैत्तिरीयाच्या काळीं विषुवानाचा खरा अर्थ लुप्त झाला होता. मृगशीर्ष काळीं तो ठाऊक होता असें गृहीत धरलें आहे. (२) ऋभु म्हणजे ऋतुदेव हा पाश्चात्य तर्क आहे. ऋग्वेदांत ते तपानें देवत्वास पोहोंचलेले मनुष्यजीव होत असें म्हटलें आहे. 'तेन देवत्वं ऋभवः समानश' असें ज्यानें म्हटलें आहे त्या ऋग्वेदाला ऋतूंचें आधिपत्य त्यांना मिळालें असें सांगण्यास काय लाज होती? (३) ऋभूंच्या निद्रेचे बारा दिवस म्हणजे चांद्रमासाचा सौर मासाशीं मेळ घालण्याकरितां सौर मानानें टाकून दिलेले बारा दिवस असें गृहीत धरलेलें आहे. दक्षिणायनांत का होईना, पण प्रत्यक्ष दिसत असलेला सूर्य आपल्या घरीं गेला म्हणजे नाहींसा झाला ही कल्पना गृहीत धरली आहे. (४) शरद् ऋतु हा वसंता-इतकाच रम्य असतां आणि खुद्द ऋग्वेदांतच रात्रीचीं सुंदर वर्णनें असतां त्याला भयंकर व वादळी म्हटलें आहे. (५) विश्व शब्दाचा उपयोग ऋग्वेदांत जग (Cosmos) या अर्थानें केलेला नसून सर्व या अर्थानें केलेला आहे. लोकमान्यांनीं त्याचा जग हा अर्थ गृहीत धरला आहे. (६) ऋग्वेद काळीं चांद्रसौर मानांचा मेळ घातला गेला नव्हता असें गृहीत धरलें आहे. (७) 'संवत्सरे इदमद्य' याचा अर्थ वर्षाच्या शेवटींशेवटीं केव्हांतरी असा सरळ असतां वर्ष संपल्यानंतर, नवीन वर्षाच्या आरंभीं असा गृहीत धरला आहे. (८) ऋभूंच्या निद्रेचा उल्लेख दोन ठिकाणीं आला आहे. दोन सूक्तें वेगवेगळ्या ऋषींचीं आहेत. आणि दोन्ही ठिकाणीं अश्विनांनीं विश्पलेचा पाय बरा केला अथवा भुज्यूला

समुद्रांतून काढलें इत्यादि वर्णनाप्रमाणें भूतकालाचा उपयोग आहे. इतरत्र कोठेंहि वारंवार येणाऱ्या इंद्र, मरुत्, अग्नि इत्यादिकांच्या पराक्रमाप्रमाणें नित्यत्वदर्शक उल्लेख नाहींत. असें असतां ऋभूंची निद्रा हें एक रीतिवर्तमान निदर्शक विधान मानलें आहे. (९) निद्रेच्या बारा दिवसांत शेतें सुपीक झालीं, निर्जल प्रदेशांत औषधी उगवल्या आणि सखल जागीं पाणी उत्पन्न झालें, ('सुक्षेत्रा कृण्वन्नयन्त सिधून्धन्वा तिष्ठन्नोषधिर्निम्नमापः'। ऋग्वेद ४,३३,७.) असें स्पष्ट वर्णन असतां हे बारा दिवस शिशिरामध्यें धरले आहेत. (१०) वृषा-कपि सूक्तांत वृषा-कपि म्हणजे संपातांतला सूर्य असें गृहीत धरलें आहे. (११) त्याप्रमाणेंच प्रसंग वृषाकपीला घरीं पोहोंचविण्याच्या वेळचा म्हणजे उत्तरायणाच्या शेवटल्या भागांतला असा गृहीत धरला आहे. (१२) दक्षिणायनांत सूर्यास्तकाळीं मृग नक्षत्र उगवूं लागतें. या घटनेवर वृषाकपीच्या मृगाचें रूपक आहे असें म्हटलें आहे. पण दक्षिणायनांत सूर्य आपल्या घरीं गेलेलाच असतो तेव्हां त्याच्या बरोबरचा मृग माजणारच कसा? (१३) उत्तरायणारंभीं मृगाचा अस्त असतो आणि त्यापूर्वी तो रात्रीं उगवतो. तेव्हां तो सूर्याचा मित्र आहे ही कल्पना सहज नाहीं, गृहीत धरलेली आहे. (१४) 'तुरीयेण ब्रह्मणा' याचा अर्थ तुरीय मंत्राच्या साहाय्यानें असा केला आहे. तुरीय म्हणजे चौथा अथवा शेवटचा असा आहे. पण तें विशेषनाम आहे. आणि ब्रह्म याचा अर्थ यंत्र असा आहे, असें अगदीं युरोपियन पंडितांवर ताण करून गृहीत धरलें आहे. अशा अनेक गंमती या छोटयाशा प्रबंधांत पाहावयास सांपडतात. अशा पुष्कळ गोष्टी गृहीत धरल्या तर हवें तें रूपक कल्पितां येईल. मंडल १, सूक्त १२३ यांत 'पृथु रथो दक्षिणायाः अयोजि आः एनं देवासो अमृतासो आस्थुः' म्हणजे 'उषेचा भव्य रथ जोडून तयार आहे, आणि त्याच्याभोंवतीं तेजःपुंज तारागण चमकत आहे असें म्हटलें आहे. येथें फक्त रथ म्हणजे रोहिणी शकट असें गृहीत धरलें तर तेथून दोन महिन्यांनीं उगवणारा सूर्य आश्लेषांत

येऊन ध्रुवावरील आश्लेषा संपातहि सिद्ध करतां येईल. अशा पद्धतीनें क्वचित् एखादी गोष्ट अनुकूल सिद्ध झाल्यासारखें वाटलें तरी एकंदरींत ही पद्धत वाईट आहे. माझ्या मतें पुत्र-प्राप्तीबद्दल स्त्रीच्या हृदयांत असलेली अनिवार लालसा न पुरल्यास हृदयाची होणारी तगमग आणि ती पुरणार या कल्पनेनें वाटणारी धन्यता यांचें हृदयंगम चित्र ह्या सूक्तांत मांडलें आहे. लोकविलक्षण अशी एकहि गोष्ट ह्यांत नाहीं कीं, जिच्याकरितां ह्याला रूपक मानावें. इंद्राचा पौष्टिक खुराक, इंद्राणीचा कोप, कामशास्त्राचें तत्त्व इत्यादि अनेक गोष्टींची संगति रूपकाप्रमाणें मुळींच लागत नाहीं; आणि रूपकच म्हटलें तर इंद्र आणि इंद्राणी म्हणजे कोणत्या सृष्ट घटना होत तेंहि दाखविण्याची जबाबदारी येते. हव्या तितक्या गोष्टी गृहीत धरून रूपक करावयाचें म्हटलें तर लोकमान्य टिळक आणि गोखले यांच्या सुरत येथील लढ्यावर देखील एखादें ज्योतिर्विषयक रूपक बसवून दाखवितां येईल ! या सूक्तांतून मृगशीर्षीच्या वसंतसंपाताचा अर्थ काढण्यास कांहींहि आधार नाहीं."

गुरुवर्य श्री. अप्रबुद्ध यांनीं टिळकांचीं प्रमाणें याप्रमाणें टिकण्यासारखीं नसल्याचें दाखवून देऊन स्वतःच्या मतें काल-निर्णयाचीं वेगळीं गमकें दाखविलीं आहेत. अनेक प्रकट व सूक्ष्म शंकांना उत्तरें देऊन त्यांनीं शतपथब्राह्मणांतील कृत्तिकांचा उल्लेख संपात सिद्ध करतो व तोहि कृत्तिकापुंज विषुवांत आल्याबरोबर म्हणजे प्रत्यक्ष संपात हल्लींच्या रोहिणी विभागाच्या प्रारंभीं असतांनाचा आहे असें दाखवून दिलें आहे. शतपथाचा काळ इ. स. पूर्व सुमारे ३००० वर्षें हें दाखवून बृहदारण्यकांतील पारी-क्षितांचा उल्लेख हा पांडवांच्या पूर्वजांचा नसून तो त्यांच्या वंशजांचाच कसा आहे हें त्यांनीं मांडून दाखविलें आहे, व त्यावरून वाजसनेयि संहितेचा काळ इ. स. पूर्व ३००० वर्षें ठरतो हें दाखवून देऊन ऋग्वेदाचा काळ इ. सन पू. ४००० वर्षें हा सांगितला आहे. श्री. अप्रबुद्धांनीं वेगळीं प्रमाणें घेऊन

कडक भाषेंत लोकमान्यांचें परीक्षण करूनहि त्यांनीं सांगितलेला काळच मान्य केला आहे हें यावरून स्पष्ट होतें. मात्र ऋग्वेदाचा काळ या लोकमान्यांच्या व अप्रबुद्धांच्या संज्ञेंत अर्थात् थोडा फरक आहे. तो फरक अप्रबुद्धांच्याच शब्दांत पुढीलप्रमाणें : " कांहीं झालें तरी ऋग्वेदाचा काळ इ. स. पू. ४०००च्या अलीकडे येऊं शकत नाहीं. लोकमान्यांच्या म्हणण्याप्रमाणेंहि जवळजवळ हाच काळ येतो. पण त्यांचें म्हणणें थोडें वेगळें आहे. तें असें कीं, ऋग्वेदसंस्कृति त्या पूर्वीं अनंत काल होती. परंतु तिचें वाङमय मात्र इ. स. पू. ४००० हून प्राचीन असणें शक्य नाहीं. तें वाङमय म्हणजे ऋग्वेदरचना इ. स. पू.४००० नंतर इ. स. पू.२५०० पर्यन्त केव्हांतरी झाली असावी. ऋग्वेदांत उत्तर ध्रुवाचे उल्लेख आहेत हें त्यांनीं उत्तम सिद्ध केलें आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें उत्तर ध्रुवाच्या स्मृति चार पांच हजार वर्षें नुसत्याच उराशीं बाळगून अर्धवट संस्कृतीच्या फिरत्या लोकांनीं नंतर त्यांचीं काव्यें बनविलीं, ही कल्पनाच इतकी विलक्षण आहे कीं तिच्यांतील दुराग्रहाची वेगळी फोड करण्याचें कारण नाहीं." लोकमान्य ऋग्वेदसंस्कृति प्राचीनतम पण ऋग्वेदरचनाकाळ इ. स. पू. ४००० ते ६००० वर्षें सांगतात, तर अप्रबुद्ध ऋग्वेदरचनाकाळ इ. स. पू. ४००० वर्षांच्या अलीकडे ओढतांच येत नाहीं व संस्कृतीच नव्हे तर प्रत्यक्ष ऋग्वेदरचनाहि तिच्या इतकीच प्राचीन मानतात, हा दोघांतील मुख्य फरक आहे. तात्पर्य, लोकमान्यांच्या ज्योतिषावरून काढलेल्या कालनिर्णयाच्या बाबतींत त्यांच्या प्रमाणांविषयीं त्यांच्या टीकाकारांचे मतभेद असले तरी उघड वा अप्रत्यक्षपणें त्यांचा निर्णय त्यांनींहि मान्य केलेला आहे. पण या ज्योतिषाचाच आधार घेऊन इतर अनेकांनीं काळाच्या बाबतींत जीं उड्डाणें साधलीं आहेत त्यांचा नुसता उल्लेख केला तरी हें प्रमाणहि कसें भूगर्भशास्त्रासारखेंच संदेह उत्पन्न करणारें आहे याची कल्पना येते. अलीकडच्या संशोधकांत डॉ. आर.

शामशास्त्री खेरीज करून इतर सर्वांनीं टिळकांच्या कालमर्यादे-पलीकडे उड्डाण साधलें आहे.

## मतामतांचा गलबला

कोंकणांतील राजापूरचे विख्यात पंडित श्री. पाटणकर ऊर्फ ' महाराष्ट्रीय ' यांनीं ' मार्गशीर्षांतील पौर्णिमेला ' अग्रहायणी ' ही संज्ञा मिळण्यापूर्वी ' मृगशीर्षाला ' ' अग्रहायण ' ही संज्ञा असली पाहिजे, वर्षाच्या आरंभीं तें येण्याची घटना या संज्ञेला जन्म देणारी जी ठरली ती मृगांत यापूर्वी जेव्हां उत्तर बिंदु होता ती म्हणजे संपातचलनाच्या एका वर्तुळाइतकी मागची होय ' असें सांगून वेदकाळ २१००० वर्षांइतका मागें नेला आहे. 'हरिवंशा' सारख्या या बाबतींत बेभरंवशाच्या असणाऱ्या वाङ्मयाचा आधार घेऊन पं. महाराष्ट्रीय यांनीं भौगोलिक परिस्थिति व ऋतुमानाची शक्यता या बाबतींत विलक्षण अपसमज गृहीत धरले आहेत. आपल्याला येथें त्यांचा सविस्तर परामर्श घ्यावयाचा नसून ज्योतिर्गणितावरून केलेल्या कालनिर्णयाच्या बाबतींतहि भूगर्भशास्त्रासारखीच सहस्रावधि वर्षांच्या मतभेदाची परिस्थिति कशी निर्माण होते एवढेंच दाखवावयाचें असल्यामुळें पाटणकरांच्या २१००० वर्षांचा केवळ उल्लेख त्या दृष्टीनें पुरेसा आहे. पाटणकरांच्याहि वर ताण करून श्री. लेले व पं. सुधाकर द्विवेदी यांनीं हा काळ अनुक्रमें ४०,००० वर्षें व ५४,००० वर्षें मागें नेला आहे. ज्योतिषाच्याच साहाय्यानें पं. कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं वेदकाळ १८,००० वर्षें मागें नेला आहे. ज्या प्रमाणांनीं टिळकांनीं वसंत-संपात सिद्ध केला आहे, त्याच प्रमाणांनीं शरत्संपात सिद्ध करून पं. कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं वेदकाळ त्यांच्याहून १२००० वर्षें मागें नेला आहे, व इतर कांहीं प्रमाणांनीं अलीकडे संशोधक या काळापर्यंत झेप घालीत असल्यामुळें त्याला पुष्टीहि मिळूं लागली आहे. वेदकाळ जास्तींत जास्त मागें नेण्याचा प्रयत्न पं. दीनानाथ-शास्त्री चुलेट यांनीं केला. त्यांनीं वेदकाळ दीड लाख वर्षें मागें नेला आहे. त्यासाठीं त्यांनीं जीं प्रमाणें घेतलीं तीं मात्र त्यांच्या-

वरच उलटलीं आहेत. अविनाशचंद्र दासांच्या भूस्तर शास्त्रावरील लेखनाच्या आधारें त्यांनीं ६०,००० वर्षें, भारतांतील भौगोलिक स्थितीच्या परिवर्तनासंबंधीं गृहीत धरलीं. पण श्री. दास यांनीं ६० हजार ऐवजीं २७ हजार वर्षें सांगतांच त्यांचा साठ हजार वर्षांचा आधार आपोआपच कोसळून पडला. श्री. चुलेट यांनीं एके काळीं रवीची परम कांती ६१ अंश असावी हा कांहीं संशोधकांचा कयास सिद्धान्त म्हणून मान्य करून टिळकांनीं 'आर्क्टिक होम इन् दि वेदाज्' मध्यें दीर्घ रात्रीचे जे चमत्कार वर्णन केले आहेत ते काश्मिरांतच घडण्यासारखी प्राचीनतम काळीं वस्तुस्थिति होती असें सांगून टिळकांचा ध्रुवनिवास व पावगींचा साम्राज्यविस्तार या दोन्ही कल्पना एकाच फटकाऱ्यांत निकालांत काढल्या. त्यांच्या गृहीत कृत्यांचा प्रकार फारच चमत्कारिक आहे. त्यांचे एक टीकाकार श्री. कुळकर्णी म्हणतात, " त्यांच्या विवेचनांत पोकळ गृहीत कृत्यें धरण्याचा प्रकार अधिक. जसें, भारत या नांवाच्या तारकापुंजांत वसंतसंपात होता. तेव्हांचें भारत हें नांव. याला आधार 'नक्षत्राणामहं शशी' म्हणजे मी शशी म्हणजे चंद्र नव्हे तर शशक नांवाची सहाव्या प्रतीची तारा, जी भरत नांवाच्या तारकापुंजाच्या जवळ आहे, म्हणजे या शशकाजवळ संपात असला पाहिजे, त्याखेरीज भगवंत त्याला आपली विभूति म्हणणार नाहींत. शशकाजवळ वसंतसंपात याचा अर्थ मृगशीर्षांत वसंतसंपात असतांना महाभारत झालें. अर्थातच वेद त्याच्या पूर्वींचे. पण या सगळ्या विवेचनांत शशक हें नक्षत्राचें नांव महाभारतकालीन नसून गेल्या शंभर वर्षांतलें आहे ही गोष्ट चुलेट विसरले! शशक, भरत इत्यादि तारकांना जांभेकर शास्त्री यांनीं दिलेलीं हीं नांवें इंग्रजी नांवाच्या तारकांचा मराठींत बोध व्हावा म्हणून दिलीं आहेत. ही प्राचीन परंपरागत तारकानामें नव्हेत. त्यांनीं यदृच्छया निवडलेलीं हीं नांवें मुद्दाम कांहीं पुराणांतील व्यक्तीवरून घेतलीं. पण त्यावरून जर पुराणांतील व वेदांतील घटनांचा

काळ ठरवण्याचा प्रयत्न झाला तर या कालविपर्यासाला संशोधनांत तोड सांपडणार नाहीं." अगदीं अलीकडे श्री. कुळकर्णी यांनीं शुल्ब सूत्रांतील 'चित्रास्वात्योर्यदन्तरं' या उल्लेखावरून १५००० वर्षांइतका प्राचीन काळ निघतो असें म्हटलें आहे. आणखीहि पुनर्वसू, जलाष, भेषज, रुद्र व मुख्यत: ब्रह्म म्हणजे अभिजित् नक्षत्र ध्रुवस्थानीं असण्याचा काळ इत्यादि प्रमाणावरून १८०००, १९००० व २०,००० वर्षांपूर्वी घडलेल्या नक्षत्रस्थितींच्या घटनांचे उल्लेख ऋग्वेदांत आहेत असें दाखविलें आहे. पण चुलेट शास्त्र्यांवर टीका करतांना स्वत: त्यांचीहि प्रमाणांच्या बाबतींत हीच अवस्था झाल्याचें निदर्शनास येतें. शुल्ब सूत्रांतील त्यांनीं उद्धृत केलेला श्लोक कालनिर्णयच करावयास बसलें तर किती प्रमाण मानावा असा मोठाच प्रश्न उत्पन्न होईल. स्वत: श्री. कुळकर्णी यांनाहि ही शंका आलेली आहे असें दिसतें. बाकीच्या त्यांच्या प्रमाणांच्या बाबतींत त्यांनीं केलेलें विवेचन अनुमानधबक्याचें आहे. उदाहरणार्थ, 'ब्रह्मायं वाच: परमं व्योम' या शब्दांतील परम या शब्दाचा अर्थ उंच असा करून व ब्रह्म या शब्दाचा यजुर्वेदांतील एका आधारानें तेज असा अर्थ करून ब्रह्म म्हणजे अभिजित् नक्षत्ररूपी तारा, परम म्हणजे ध्रुवाजवळ होता असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. पण त्यांनीं दिलेल्या ऋचांतून तसा अर्थ निघत नाहीं. कारण 'ब्रह्म हें वाचेचें परम स्थान होय' याचा सरळ अर्थ ऋग्वेदांतच उल्लेखिलेल्या सर्वश्रेष्ठ परावाणीकडे लावतां येईल, व ब्रह्माचा निर्देश त्या श्रेष्ठ वाणीचें स्थान म्हणून करणें वैदिक संकेताला पूर्णपणें धरून आहे. त्यांनीं उद्धृत केलेला श्लोक हा एका श्लोकांतील प्रश्नाचें उत्तर म्हणून आलेला आहे. तीं प्रश्नोत्तरें पुढीलप्रमाणें--

प्रश्न-- पृच्छामि त्वा परमन्तं पृथिव्या: पृच्छामि यत्र भुवनस्य नाभि: । पृच्छामि त्वा वृष्णो अश्वस्य रेत: पृच्छामि वाच: परमं व्योम ।।

उत्तर– इयं वेदिः परो अन्तो पृथिव्याः अयं यज्ञो भुवनस्य नाभिः। अयं सोमो वृष्णो अश्वस्य रेतो ब्रह्मायं वाचः परमं व्योम ॥

या ठिकाणीं 'परमन्तं' या शब्दाचा अर्थ 'सर्वश्रेष्ठ स्थान' असा सरळ आहे. पृच्छकानें पृथ्वीचें सर्वश्रेष्ठ स्थान कोणतें, जगाचा मध्य कोणता, अश्वाचें रेत कोणतें व वाणीचें सर्वश्रेष्ठ स्थान कोणतें असें विचारलें आहे. व वेदी, यज्ञ, वळू व ब्रह्म हीं या प्रश्नांचीं अनुक्रमें उत्तरें देण्यांत आलीं आहेत. येथें यज्ञक्रियेचें माहात्म्य वर्णन केलें असून वेदी इत्यादीसंबंधींच्या भावनेप्रमाणेंच वाचा अथवा वेदमंत्र ईश्वरप्रणीत असल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. त्यावरून "अभिजित् ऊर्फ ब्रह्म हें नक्षत्र ध्रुवाजवळ होतें, तेव्हां ध्रुववृत्ताजवळच्या लोकांस तो ब्रह्मतारा 'परमं व्योम' असा दिसेल, तसेंच तो 'भुवनस्य नाभिः' दिसेल, आणि त्यांच्यापासूनच सरस्वती अथवा वाचा अथवा आकाशगंगा खालीं क्षितिजाकडे येत आहे असें स्पष्ट दिसेल" इत्यादि अनुमानें केवळ कविकल्पनांप्रमाणें काढलेलीं आहेत. वेदी, यज्ञ इत्यादि शब्दांचे काय अर्थ करतां येतील ? ब्रह्म हा शब्द सगुण साकार-पर असला तरी तो तारकानामानें प्रथम रूढ होता याला कांहींहि आधार नाहीं. कोठेंहि तेज शब्द आला कीं, तेथें तारकेची कल्पना करणें हें नक्षत्रांचें वेड लागल्यासारखें होतें. यजुर्वेदांतील जो आधार श्री. कुळकर्णी यांनीं उद्धृत केला आहे व म. म. श्रीधरशास्त्री पाठक यांचा अर्थ चुकीचा ठरवून स्वतःचा नक्षत्रपर अर्थ जो त्यावर लादला आहे तो बरोबर नाहीं. यजुर्वेदांतील तीं प्रश्नोत्तरें पुढीलप्रमाणें –

प्रश्न– किंस्वित्सूर्यसमं ज्योतिः किं समुद्रसमं सरः ।
किंस्वित्पृथिव्यै वर्षीयः कस्य मात्रा न विद्यते ॥

उत्तर– ब्रह्म सूर्यसमं ज्योतिर्द्यौः समुद्रसमं सरः ।
इन्द्रः पृथिव्यै वर्षीयान् गोस्तु मात्रा न विद्यते ॥

येथें सूर्यमंडलासारखें तेज कोणतें ? समुद्रासारखें सरोवर कोणतें ? पृथ्वीपेक्षां मोठें काय आहे ? व कोणत्या वस्तूला

परिमाण नाहीं ? असें विचारलेलें असून त्यांचीं उत्तरें अनुक्रमें ब्रह्म, अंतरिक्ष, इंद्र आणि धेनु अशीं दिलीं आहेत. उत्तरांच्या प्रकाशांत ब्रह्म शब्दाचा नक्षत्र हा अर्थ निघत नाहीं. उलट म. म. श्रीधरशास्त्री पाठक म्हणतात त्याप्रमाणें त्याचा अर्थ वेद हाच योग्य ठरतो. गाईला परिमाण नाहीं असें जें म्हटलें आहे तें काय प्रत्यक्ष स्थूल वस्तूच्या भौतिक मोजमापाच्या पद्धतीनें ठरवावयाचें आहे ? इन्द्र पृथ्वीपेक्षां मोठा आहे याचा तरी अर्थ भौतिक मोजमापाच्या पद्धतीनें काढावयाचा आहे काय ? त्या त्या वस्तूविषयींची पूज्य बुद्धि येथें काव्यात्मक पद्धतीनें वर्णन करण्यांत आलेली आहे. ओढून ताणून ब्रह्माचा तेजाशींच संबंध आणावयाचा असला तरी वाच्यार्थानें कोणतेंहि नक्षत्र सूर्यासारखें कसें ठरणार? व मग धेनु आणि इंद्राची वाट काय ? तात्पर्य, हा सगळा प्रकार पाहिला म्हणजे श्री. अप्रबुद्धांच्या "एकंदरींत ही पद्धति वाईट आहे " या अभिप्रायाची यथार्थता मनाला पटते.

असो. इ. स. पूर्व ४००० पासून तर दीड लाख वर्षांपर्यंत कालखंडाचे होणारे हे आश्चर्यजनक परस्परविरोधी निर्णय, व त्याला देण्यांत येणारी जवळजवळ सारख्याच योग्यतेचीं आणि अनुमानधबक्याची मांडणी पाहिली म्हणजे ठामपणें निर्णय करण्याचें प्रमाण म्हणून ज्योतिषाकडेहि पाहणें संदिग्धच वाटण्याची परिस्थिति निर्माण होते. इतर अन्य प्रमाणांवरून हा कालनिर्णय करणाऱ्या लोकांतहि मॅक्समुल्लर यांच्या १२०० वर्षांच्या काळापासून तर श्री. विनोबा भावे, संपूर्णानंद प्रभृतींच्या २०००० वर्षांच्या काळांपर्यंत मतभेद दिसून येतात व सर्वसामान्य विचारकाची स्थिति, या बाबतींत 'नैको ऋषिर्यस्य वचः प्रमाणम्' अशी होते.

## वैदिक राष्ट्राच्या अस्मितेची अनादिता

आतांपर्यंत जे लाखों वर्षांचे कालनिर्णय उल्लेखिले ते कशाचे निदर्शक आहेत ? प्रत्यक्ष ऋग्वेदाची रचना केव्हां झाली या बाबतींतील हे सारे निर्णय होत हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. शक्य तितकें

वादातीत व सरळ विवेचन म्हणून अप्रबुद्धांचें सांगतां येईल. शतपथांतील कृत्तिकासंपात एकदां मान्य केला (व तो करावाच लागतो) म्हणजे शतपथाच्या ख्रिस्तपूर्व ३००० वर्षें या काळावरून त्यापूर्वी असलेली ऋग्वेदसंहिता ख्रिस्तपूर्व ४००० वर्षांच्या अलीकडे ओढतां येत नाहीं. हा त्यांचा कालनिर्णय ओढून ताणून अर्थ न काढतां व शब्दांच्या अर्थांना पीडा न देतां सरळ काढलेला असल्यामुळें त्या बाबतींत विवादाचें कारण उरत नाहीं. लोकमान्यांचेंहि हेंच मत असून बहुसंख्य विचारकांची या बाबतींत एकवाक्यता दिसून येते ही विशेष महत्त्वाची गोष्ट आहे. या पंडितांतील वाद हे घेतलेल्या प्रमाणांच्या युक्तापयुक्ततेसंबंधींचे आहेत, निर्णयासंबंधींचे नाहींत असें दिसून येईल. पण हा निर्णय वेदकाळ अलीकडे ओढतां येत नाहीं एवढ्याच स्वरूपाचा आहे. त्यापूर्वी तो किती प्राचीन हें कोणीहि सांगूं शकत नाहीं, व ऋग्वेद सूक्तांची रचना ख्रिस्तपूर्व ४००० ते ६००० वर्षें झालीं असें मान्य केलें तरी एवढी रचना करण्याइतकें संस्कृतीचें विकसन घडून यावयास किती काळ लोटला हें कोणासहि सांगतां यावयाचें नाहीं. वेदवाङमय हें सुद्धां हिमप्रलयानंतर आपल्या हातीं आलेलें व जीवघेऊ आपत्तींतून कसेंबसें वांचलेलें त्रुटित वाङमय आहे हें ध्यानांत घेतलें आणि त्यांतील 'नासदीय' सूक्त 'अस्य वामस्य' इत्यादि सर्वश्रेष्ठ तत्त्वज्ञानाचा आविष्कार करणारे संशयातीत उल्लेख पाहिले म्हणजे हिमप्रलयपूर्व वैदिक संस्कृति केवढ्या श्रेष्ठ योग्यतेची असली पाहिजे याची जाणीव होते, व त्या संस्कृतीचा प्रारंभ कोणीहि ठरवूं शकत नसल्यामुळें सहस्रावधि वर्षांपूर्वींची व जिचें मूळ अथवा आदि कोणासहि सांगतां येणें शक्य नाहीं अशा स्वरूपाची ही वैदिक राष्ट्राची संस्कृति अथवा अस्मिता आहे हें सरळच सिद्ध होतें. वेगवेगळ्या संशोधकांचे या बाबतींतील अभिप्राय याच स्वरूपाचे आहेत. वेबरचें या संबंधांत काय मत आहे याचा उल्लेख मागेंच केला आहे. वेदांचा विख्यात अभ्यासक व भारतीय वेदाभ्यासकांच्या मनावर अप्रतिहत प्रभुत्व गाजविणारा संशोधक

मॅक्समुल्लर यानें यासंबंधानें इ. स. १८९० सालीं भौतिक धर्मावर जीं व्याख्यानें दिलीं त्यांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, 'ऋग्वेदाच्या प्राचीनत्वाची कालमर्यादा निश्चित होण्याची आशाहि नको.' श्री. अप्रबुद्ध यांनीं ऋग्वेदाच्या कालनिर्णयासंबंधीं आपला निर्णय सांगतांना असे उद्गार काढले आहेत कीं, "कांहीं झालें तरी ऋग्वेदाचा काळ इ. सनपूर्व ४०००च्या अलीकडे येऊं शकत नाहीं. वैदिक लोक तर वेदांना अनादीच समजतात. त्यांचा आदि निश्चित करणें शक्य नाहीं या अर्थानें का होईना, अर्वाचीनहि तेंच म्हणतात; आणि ऐतिहासिक पद्धतीप्रमाणें पाहिलें तरी असें म्हणणें प्राप्त होतें कीं, ऋवेदाचा काळ इ. सनपूर्व ४००० च्या अलीकडे खास नाहीं एवढेंच म्हणतां येतें. त्यापूर्वीं किती प्राचीन काळीं त्याची रचना झाली हें आज तरी कुणी सांगूं शकत नाहीं. मनुष्यजातीची उत्पत्ति आणि संस्कृति यांच्या काळाविषयींची मिशनरी कोती कल्पना जाऊन अर्वाचीन पंडितांची दृष्टि प्राचीन काळांत जसजशी दूरवर जाईल तसतसा ऋग्वेदाचा हा ऐतिहासिक आदि देखील अनंत म्हणविण्याइतका दूरवर जाणें शक्य आहे."

## लोकमान्यांचें मत

ऋग्वेदाचा अर्वाचीन काळ अधिकांत अधिक मागें नेण्याचें क्रांतिकारक कार्य लोकमान्य टिळकांनीं आपल्या ध्रुव-सिद्धान्तानें केलें. पण त्याच्या प्राचीनत्वाच्या मर्यादेच्या बाबतींत अनादित्वाकडे बोट दाखवून त्यांनाहि वरील अर्थाचेच उद्गार काढावे लागले आहेत. आपल्या 'आर्क्टिक होम इन् दि वेदाज्' मध्यें प्राचीन भारतीय साहित्यांतील संकेत व अर्वाचीन संशोधन यांचा आढावा घेऊन वेगवेगळ्या अर्थांनीं दोघांनाहि अनादित्वाच्या मुद्द्यावर एक कसें व्हावें लागतें याचें त्यांनीं सरस वर्णन केलें आहे. लोकमान्य म्हणतात :—

We may therefore safely assert that the religion or the premitive Arctic Home was correctly preserved in the form of traditions by the disciplined memory of the

Rishis until it was incorporated, first into crude as contrasted with the polished hymns (Suktas) of the Rig-veda in the Orion period to be collected later on in Mandalas and finally into Samhitas; and that subject matter of these hymns in inter-glacial, though its ultimate origin is still lost in geological antiquity. Without mixing up the theological and historical views we may therefore now state the two in parallel columns as follows —

| **Theological view** | **Historical View** |
|---|---|
| 1. The Vedas are eternal ( Nitya ), beginning-less ( Anadi ), and not made by man ( Apaurusheya ) | 1. The Vedic or the Aryan religion can be proved to be inter-Glacial; but its ultimate origion is still lost in geological antiquity. |
| 2. The Vedas were destroyed in the deluge at the end of the last Kalpa. | 2. Aryan religion and culture were destroyed during the last glacial period that invaded the Arctic Aryan Home. |
| 3. At the beginning of the present Kalpa, the Rishis, through Tapas, reproduced in substance, if not in form, the anti-deluvian Vedas, which they carried in their memory by the favour of God. | 3. The Vedic Hymns were sung in post-glacial times by poets who had inherited the knowledge or contents thereof in an unbroken tradition from their anti-diluvian forefathers. |

On a comparison of the two columns, it will be found that the tradition about the destruction and the reproduction of the vedas, recorded by Vyasa in the Mahabharat verse referred to above, must be taken to have been founded substantially on a historical fact. It is true that according to Puranic chronology, the beginning of the

current kalpa is placed several thousands of years before the present time. But if according to the estimates of some modern geologists the post-Glacial period is, even now, said to have commenced some 80,000 years ago, if not earlier, we need not be much surprised at the Puranik estimate, especially when as stated above, it is found to disclose a real tradition of 10,000 years assigned to a cycle of the four yugas, the first of which began with the new Kalpa, or, in the language of geology, with the present post-Glacial period. We may, however, still assert that for all practical purposes, the Vedic religion can be shown to be beginning-less even on strict scientific grounds.

— *The Arctic Home in the Vedas pp.* 458

( अशा रीतीनें कमावलेल्या स्मरणशक्तीच्या साहाय्यानें वैदिक ऋषींनीं आपल्या मूलस्थानांतील धर्माचें स्वरूप आख्यायिकांच्या रूपानें होतें तसें ठेविलें, आणि पुढें त्यांना सूक्तांत स्थान मिळून कालान्तरानें त्यांचीं मंडलें व संहिता या रूपानें रचना झाली. ह्या सूक्तांचा तात्पर्यार्थ हिमांतरकालीन असून त्यांचें आदि मूल तर प्राचीन भूस्तरीय काळांत गडप झालेलें आहे असें ठाम सांगावयास आतां कांहीं हरकत नाहीं. आतां हीं दोन्ही प्रकारचीं म्हणजे ब्रह्मवाद्यांचें व ऐतिहासिक अशीं दोन्हीं मतें, भेसळ न करतां, समोरासमोर मांडून दाखवितों.:—

| **ब्रह्मवादी मत.** | **ऐतिहासिक मत** |
|---|---|
| १ वेद नित्य, अनादि आणि अपौरुषेय आहेत. | १ वेदान्तर्गत आर्यधर्म हिमान्तरकालीन आहे असें दाखवितां येतें; पण त्याचें आदिमूल मात्र प्राचीन भूस्तरीय कालांत गडप झालेलें आहे. |
| २ गतकल्पाच्या अखेरीस झालेल्या प्रलयांत वेद नष्ट झाले. | २ आर्यांचा धर्म आणि सुधारणा हीं त्यांच्या ध्रुवावरील स्थानांत बर्फाचा प्रलय झाला त्यांत नष्ट झालीं. |

| | |
|---|---|
| ३ प्रस्तुत कल्पाच्या आरंभीं ऋषींनीं तपश्चर्या करून ईश्वराच्या कृपेनें स्मरणांत राहिलेल्या वेदांचें शब्दशः नसलें तरी तात्पर्यतः पुनरुज्जीवन केलें. | ३ चालू हिमोत्तर कालांत ऋषींनीं आपल्या प्रलयपूर्वकालीन वाडवडिलांपासून परंपरागत आलेल्या धर्मतात्पर्यावरून वैदिक सूक्तांची रचना केली. |

या दोन्ही प्रकारच्या मतांची तुलना केल्यास असें दिसून येईल कीं, श्रीमन्महाभारतांत वेद युगान्तकाळीं नष्ट झाल्यावर व्यासांनीं त्यांचें पुनरुज्जीवन केलें अशी जी एक आख्यायिका सांगितली आहे ती ऐतिहासिक आधारवरच सांगितली आहे. पुराणांप्रमाणें पाहतां चालू कल्पाचा प्रारंभ कितीतरी हजार वर्षांपूर्वीं झालेला आहे हें खरें; पण आजहि जर कित्येक भूस्तरशास्त्रज्ञांच्या मतें गेल्या हिमकालाला ८०,००० वर्षें होऊन गेलेलीं आहेत, तर पुराणांतील अंदाजाबद्दल आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. शिवाय नवीन कल्पापासून किंवा भूस्तर शास्त्राच्या भाषेंत बोलावयाचें म्हटल्यास चालू हिमोत्तरकालापासून सुरू झालेल्या महायुगाचा अवधि योग्य तऱ्हेनें पाहिल्यास १०,००० वर्षांचा आहे असें दिसून येतें. वैदिकांचा धर्म आदि प्राचीन भूस्तरीय काळांत गडप झालेला आहे हें ध्यानांत घेतलें तर व्यावहारिक दृष्टीनें वेदान्तर्गत धर्म अनादीच आहे असें शुद्ध शास्त्रीय आधारावरूनहि म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. )

प्राचीन भाष्यकारांच्या प्रतिपादनाप्रमाणें व आजच्या शास्त्रीय दृष्टिकोनाप्रमाणेंहि ज्याचा आदि कोणीच सांगूं शकत नाहीं अशा वैदिक राष्ट्राचें मूलस्थान कोणतें असावें हा अर्वाचीन संशोधकांच्या मतें मोठा विवाद्य प्रश्न होऊन राहिलेला आहे. वैदिक वाङ्मयांत ज्यांच्या जीवनाचें प्रतिबिंब उमटलेलें आढळतें ते आर्यलोक बाहेरून हिंदुस्थानांत आलेले असून त्यांचें मूलस्थान मध्य आंशियांत कोठें तरी असावें असें युरोपियन संशोधकांचें मत असून तें मूलस्थान उत्तर ध्रुवप्रदेशांत असावें असें लोकमान्य

टिळकांनीं प्रतिपादन केलेलें आहे. उत्तर ध्रुवप्रदेशांत थंडी अतोनात असल्यानें तो प्रदेश आज वसतिक्षम नसला तरी हिमप्रलयापूर्वी तो वसतिक्षम असल्याचें सिद्ध करून लोकमान्य टिळकांनीं यासंबंधींच्या शंका निर्मूल केलेल्या आहेत. इ. स. १८२० मध्यें जे. जी. ऱ्होड यानें झेंद अवेस्ता या पारशांच्या धर्मग्रंथांतील वेंदीदाद या भागांत वर्णन केलेल्या भौगोलिक परिस्थितीवरून मध्य आशिया हें या आर्यांचें मूल वसतिस्थान असून तेथून ते जगभर पसरले असें विधान केलें. श्लेगेल, पॉट, लासेन, जेकब, ग्रिम, पिक्टेट प्रभृति अनेक पाश्चात्य पंडितांनीं या विधानाचा जोराचा पुरस्कार केला. डॉ. लॅदॅम यानें या सिद्धान्ताला खोडून काढून आर्यांचें मूलस्थान यूरोपमध्येंच शोधलें पाहिजे असा दृष्टिकोन पुढें मांडला व त्याला उचलून धरून उरल पर्वताच्या पश्चिमेला आणि फरान्स व जर्मनीच्या उत्तरेला असलेला यूरोपचा भाग हें तें मूलस्थान होय असें प्रो. क्यूनो या संशोधकानें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. अनेक संशोधकांनीं ही कल्पना उचलून धरली तर प्रो. गायगेरनें आपला मतभेद प्रदर्शित करून जर्मनी हेंच तें मूलस्थान असल्याचें प्रतिपादन केलें. पण येवढ्यावरच हे मतभेद संपले असें मानण्याचें कारण नाहीं. रशिया, तुर्कस्थान, युफ्राटिस नदीच्या कांठचा प्रदेश, स्कॅंडिनेव्हिया, आइसलॅंड, हंगेरीच्या आसपासचा प्रदेश इत्यादि अनेक स्थानें आर्यांचें मूलस्थान म्हणून दाखविण्यांत आलेलीं आहेत. डॉ. वॉरेन्नें आपल्या 'पॅराडाइज फाउंड' या ग्रंथांत प्रथमच उत्तर ध्रुवाजवळ मनुष्यवस्ती असावी असा सिद्धान्त मांडला, व तोच उचलून धरून ऋग्वेद व झेंदावेस्ता यांतील प्रमाणांनीं तो वैदिक आर्यांचा मूलप्रदेश होय हें लोकमान्य टिळकांनीं प्रतिपादन केलें. वैदिक आर्यांचें मूलस्थान हिंदुस्थानाबाहेर कोठें तरी असून त्या मूलप्रदेशांतून ते जगभर पसरले व त्यांतीलच एक टोळी हिंदुस्थानांत येऊन तिनें येथील मूळच्या रहिवाशांना जिंकून आपली अधिसत्ता हिंदुस्थानांत प्रस्थापित केली हें गृहीत कृत्य या मूलस्थानाच्या संशोधनाच्या मुळाशीं आहे.

वैदिक आर्यांचें मूलस्थान हिंदुस्थानाबाहेर शोधण्याचें मुख्य कारण वैदिक वाङमय ज्यांनीं निर्माण केलें ते लोक एका विशिष्ट मानव-वंशाचे होते हा युरोपियन संशोधकांचा तर्क हें होय. या तर्काचें कारणहि तौलनिक भाषाशास्त्राच्या काल्पनिक पुराव्यांत दडलेलें आहे. तौलनिक भाषाशास्त्र व तौलनिक मानववंशशास्त्र हीं भपकेदार नांवें देऊन ही वंशैक्याची कल्पना सजविण्यांत आलेली आहे. ग्रीक, लॅटिन, टयुटॉनिक, केल्टिक, स्लाव्होनिक आणि फारशी धर्मग्रंथांची झेंड ही भाषा यांच्यांतील परस्परसदृश प्रयोग व कांहीं शब्द यांच्या साम्यावरून या भाषांचा एक संबंधित समूह आहे अशी युरोपियन संशोधकांनीं कल्पना बसविली व त्या समूहाला 'इंडो-युरोपिअन' हें नांव दिलें. या समूहाची मूलभाषा अतिप्राचीन काळीं एक असावी अशी कल्पना करून ही मूल भाषा बोलणारे लोक कोणत्या तरी एका मूलस्थानींच राहात असले पाहिजेत असा त्यांनीं निष्कर्ष काढला. संस्कृत, ग्रीक, लॅटिन, झेंद, टयूटॉनिक, केल्टिक, स्लाव्होनिक इत्यादि भाषा बोलणाऱ्या लोकांचे पूर्वज ज्या अर्थीं मूलतः एक भाषा बोलणारे व एका मूलस्थानाचे रहिवासी असावेत त्या अर्थीं ते कोणत्या तरी एकाच मूळवंशाचे असले पाहिजेत ही गोष्ट ओघानेंच अनुमानांत बसली, व या केवळ जुजबी कल्पनांना (Tentative suggestions) लवकरच सिद्धान्ताचें स्वरूप प्राप्त झालें. मूल भाषेच्या कल्पनेचा पुरस्कार मॅक्समुल्लरनें केला व ही भाषा बोलणाऱ्या लोकांना 'आर्यन' हें आर्य शब्दाशीं सधर्म असणारें नांव त्यानेंच दिलें. या काल्पनिक आर्यन नांवाचा आर्यशब्दाशीं संबंध जोडून आर्य या नांवाचा अथवा आर्यन या नांवाचा एक मूळ वंश होता ही कल्पना बद्धमूल झाली. वस्तुतः या मूलभाषा एक असल्याच्या कल्पनेचा जनक प्रो. मॅक्समुल्लर याला भाषेचें एकत्व वंशैक्य सिद्ध करतें ही कल्पना मुळांत अमान्य आहे. मानववंशशास्त्रज्ञांनाहि (Anthropologists) ही कल्पना पूर्णपणें अमान्य आहे. एक भाषा असण्याचीं कारणें जित व जेतेपणाच्या संबंधांपासून घेऊन तर सांस्कृतिक श्रेष्ठ-

कनिष्ठतेपर्यंत अनेक असू शकतात. त्यामुळें वंशैक्य सिद्ध होऊं शकत नाहीं. स्वतः मॅक्समुल्लरच्यें आर्यन म्हणजे एकभाषाभाषी लोक येवढेंच म्हणणें असून त्यावरून वंशैक्य सिद्ध होतें असें तोहि म्हणत नाहीं. मॅक्समुल्लर म्हणतो :—

Aryans are those whe speak Aryan language, whatever their colour, whatever their blood. In calling them Aryans, we predicate nothing of them except that the grammar of their language is Aryan. I have declared again and again that if I say Aryans, I mean simply those who speak an Aryan language. When I speak of them, I commit myself to no anatomical characteristics. The blue-eyed and fair-haired Scandinavians may have been conquerers or conquered. They may have adopted the language of their darker lords or vice-versa. To me, an ethnologist who speaks of Aryan races, Aryan blood, Aryan eyes and hair is as great a sinner as a linguist who speaks of a dolicho-cephalic dictionary or a brachycephalic grammar (i. e. long-headed and short-headed). As a matter of cold fact, and despite many opinions on the subject, we know very little racially about the ancient Indo-Europeans. We do not know whether they were one race or a mixture of types.

—" *We Europeans* "

(जे आर्य भाषा बोलतात ते आर्यलोक होत. मग त्यांचा वर्ण व त्यांचें रक्त कोणतेंहि असो. त्यांना आर्य म्हणतांना त्यांच्या भाषेचें व्याकरण आर्य आहे असें म्हणण्यापलीकडे आमचें दुसरें कांहींहि म्हणणें नाहीं हें मीं वारंवार उद्घोषिलें आहे. मी जेव्हां आर्य शब्दाचा उच्चार करतों तेव्हां आर्य भाषा बोलणारे लोक एवढाच त्याचा वस्तुतः अर्थ असतो. ज्या वेळीं मी त्यांच्यासंबंधीं बोलतों त्या वेळीं त्यांच्या शरीररचना इत्यादि गोष्टींचा त्यांत मुळींच संबंध नसतो. निळ्या डोळ्यांचे आणि भुऱ्या केसांचे स्कँडिनेव्हियन

लोक जित असोत वा विजेते असोत, आपल्या कृष्णवर्णीय धन्यांची भाषा त्यांनीं आत्मसात् केलेली असो वा त्यांना आपली भाषा आत्मसात् करावयास भाग पाडलें असो, मला त्याच्याशीं कर्तव्य नाहीं. आर्यवंश, आर्यरक्त, आर्यांची विशिष्ट नेत्ररचना, त्यांच्या केसांचा विशिष्ट वर्ण इत्यादि गोष्टींविषयीं बोलणारा मानव-वंशशास्त्रज्ञ मला तितकाच ठग व अपराधी वाटतो कीं, जितका लंब शीर्षांचा शब्दकोश व ऱ्हस्व शीर्षांचें व्याकरण सांगणारा भाषा-शास्त्रज्ञ ठग व अपराधी असतो. या विषयावरील अनेकांचीं अनेक मतें पाहूनहि सत्य वस्तुस्थिति म्हणून असेंच म्हणणें भाग आहे कीं, प्राचीनतम इंडोयुरोपियनांच्या वंशाविषयीं आपणांस अत्यल्प माहिती आहे. ते मिश्रवंशाचे लोक होते कीं एकवंशाचे याची सुद्धां आपणांस कांहींहि कल्पना नाहीं.)

पण मॅक्समुल्लरच्या या आक्रोशाचा कांहीं एक परिणाम न होतां आर्यन हा एक वंशात्मक लोकसंघ होता ही कल्पना युरो-पियन व युरोपियनाळलेल्या संशोधकांच्या व इतिहास-लेखकांच्या डोक्यांत पक्की बसली. ज्यांना ही वंशैक्याची कल्पना असिद्ध वाटत होती त्या युरोयपिन पंडितांनीं ते एकभाषाभाषी लोक होते एवढाच निष्कर्ष काढला; पण त्यांचें मूलस्थान एक असलें पाहिजे असें त्यांचेंहि म्हणणें होतें. अशा लोकांनीं आर्यन या शब्दाऐवजीं 'इंडो-जर्मानिक, (क्लापरोथ् इ. स. १८३३) विरोस (Wiros) (प्रो. रॅपसन्) इंडोयुरोपियन (डॉ. थॉमस यंग) इत्यादि वेगळे शब्द या लोकांच्या बाबतींत उपयोगांत आणले.

हे आर्यनवंशाचे लोक व युरोपियन लोक एकाच वंशाचे अस-ल्यामुळें ते अर्थातच आजच्या युरोपियनांप्रमाणें श्वेतवर्णाचे, सरळ नीटस नाकांचे, निळसर डोळ्यांचे असले पाहिजेत असें प्रतिपादन सुरू झालें व टिळकांच्या सिद्धान्ताप्रमाणें मूळ ध्रुवप्रदेशांत राहाणाऱ्या या लोकांना आपलें ध्रुवस्थान हिमप्रलयामुळें सोडून जगाच्या इतर भागांत पसरावें लागलें. अर्थातच ज्या ज्या भागांत त्यांना जावें लागलें तेथील मूळ रहिवाशांना जिंकून त्यांनीं आपलें वर्चस्व व

संस्कृति त्या जित लोकांवर लादली. जर आर्यन हे श्वेतवर्णीय होते तर ज्यांना त्यांनीं जिंकलें ते कृष्णवर्णीय असलेच पाहिजेत हें उघडच झालें. कारण जगांत श्वेतवर्णीय हे धनी होण्यासाठीं व कृष्णवर्णीय हे दास होण्यासाठीं जन्माला आले आहेत ही कल्पना युरोपियन हृदयांत इतकी ठामपणानें बसली होती कीं, निःपक्षपाती संशोधनाच्या क्षेत्रांत तीच प्रभावी ठरून आर्यांचे शत्रू कृष्णवर्णीय ठरले, व त्यांना द्रविड, असुर, दस्यू इत्यादि नांवें देण्यांत आलीं. कृष्णवर्णीयांनीं व्यापिलेल्या भारतावर श्वेतवर्णीय आर्यांनीं आपली संस्कृति व आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें हें जणूं प्रत्यक्ष पाहिल्याप्रमाणें प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें.

डॉ. बागची, इलियट स्मिथ, डॉ काल्डवेल, सर हर्बर्ट सिस्ले इत्यादि लोकांनीं हिंदुस्थानांतील आर्यांच्याहून प्राचीन काळचे रहिवासी ऑस्ट्रिक व द्रवीडियन लोक होते असें सांगून ते वर्णानें काळे, लांबट डोक्याचे व रुंदट आणि बसक्या नाकाचे होते असें प्रतिपादन केलें. मात्र त्यांची संस्कृति उच्च होती व भाषा समृद्ध होती असें त्यांचें म्हणणें आहे. पुढें मोहेंजोदारोचें जें उत्खनन झालें त्यांत आढळलेली संस्कृति ही आर्यसंस्कृति नसून ती द्रवीडियन संस्कृति होती व तिच्यावरून द्रविडांची संस्कृति श्रेष्ठ होती असें प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें. हे द्रवीडियन व सुमेरियन लोक हे एकच होते असें लिपिशास्त्राच्या पुराव्यावरून ठरविण्यांत आलें. वास्तविक मोहेंजोदारो येथील नाण्यावर संस्कृत नांवें आढळत असल्यामुळें तेथील संस्कृति ही सरळच वैदिकांची ठरते. पण येथें दिसेल त्यावरून अनुमान काढावयाचें नसून आधीं सिद्धान्त ठरवून मग कल्पनांच्या भराऱ्या मारावयाच्या असल्यामुळें इतर अनेक गोष्टींत वज्रलेप मानण्यांत आलेला भाषाशास्त्राचा पुरावा डावलून कपालमिति शास्त्र इत्यादि बेभरंवशाच्या पुराव्यावरून ही संस्कृति वैदिकांची नव्हतीच हा आग्रह धरण्यांत आला. बडोद्याचे श्री. दाजी नागेश आपटे यांनीं धैर्यानें सुमेरियन व वैदिक संस्कृति एकच होत, इतकेंच नव्हे तर वंशदृष्टयाहि सुमेरियन लोक

आर्यच आहेत असें प्रतिपादन केलें. पण ज्योतिष शब्दसाम्य व धार्मिक आणि पौराणिक कल्पनासाम्य यांवर आधारलेलें त्यांचें मत मोहेंजोदारो उत्खननांतील संस्कृति आर्य नव्हती व हीच हिंदु संस्कृति आणि सुमेरियन संस्कृति एक आहे या मुद्द्यावर संशोधकांनीं असिद्ध मानलें आहे. असे हे आर्य हिंदुस्थानांत आले त्यावेळीं त्यांचीं शस्त्रास्त्रें येथील मूळच्या कृष्णवर्णीय रहिवाशांपेक्षां अधिक श्रेष्ठ असल्यामुळें त्यांनीं या रहिवाशांना जिंकलें. या वंशैक्याचा आर्यांच्या आक्रमणाचा, अनार्यांशीं त्यांच्या झालेल्या संघर्षाचा प्रचार इतक्या मोठ्या प्रमाणावर झालेला आहे कीं, लोकमान्य टिळकांसारखी स्वतंत्र प्रज्ञाशाली विभूतीसुद्धां या कल्पनांचेंपरीक्षण न करतां त्यांच्या आहारीं गेली. आपल्या 'आर्क्टिक होम इन् दि वेदाज' या विख्यात ग्रंथामध्यें लोकमान्यांनीं भाषासाम्यावरून गृहित धरलेलें वंशैक्य मान्य केलें आहे. स्वतंत्र प्रतिभा असूनहि त्यांनीं या गोष्टीचें स्वतंत्र परीक्षण केलें नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट होय. आधुनिक इतिहाससंशोधकांत केवळ ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांनीं मात्र या कल्पनांचें परीक्षण करण्याचें धैर्य दाखवून त्यांचें वैयर्थ्य चव्हाट्यावर मांडलें. डॉ. केतकर म्हणतात, "आर्य शब्दावर फिदा होऊन युरोपियनांनीं तो शब्द स्वतःस लावून घेतला आणि त्यामुळें त्या शब्दास अनेक अर्थांतरें उत्पन्न झालीं. तीं लक्षांत न घेतल्यामुळें गैरसावध पाश्चात्य व भारतीय लेखकांची 'आर्य' या संस्कृत शब्दाचें 'आर्यन्' हें केवळ रूपांतर आहे अशी समजूत झाली व वैदिक आर्य शब्दाचें ते आर्यन् किंवा इंग्रजी आर्यन् शब्दाचें ते आर्य असें भाषांतर करूं लागले. ही समजूत चुकीची आहे. आर्यन् असें भाषांतर करणें हें आर्य या शब्दाच्या भारतीय उपयोगापासून दूर जाणें आहे. तथापि वेदांतील आर्य या शब्दांत युरोपीयांच्या आर्यन् या शब्दाचा अर्थ घुसविण्याचा प्रयत्न होत आहे. युरोपीय लेखकांनीं कल्पनापरंपरा उत्पन्न करून दिली आहे ती अशी : "अत्यंत प्राचीन म्हणजे मंत्रांच्या काळीं कांहीं लोक हिंदुस्थानांत आले. ते गोरे होते. आपणांस ते आर्य म्हणवीत.

ज्यांशीं ते लढले ते लोक काळे होते. त्यांस ते दस्यु म्हणत. त्या दस्यूपासून आर्यांनीं देश जिंकला." या तऱ्हेचा इतिहास कसा असावा या संबंधाची मनोरम कल्पना तयार करून पाश्चात्य संशोधकांनीं इतिहास बराच सोपा केला आहे. आणि आर्यांनीं पराभूत केलेल्या मूळच्या म्हणजे द्राविडी लोकांस दस्यु इत्यादि विशेषणें लावलीं जात असावीं अशी कल्पना काढली गेली आहे. कातडीच्या रंगामुळें द्वेषबुद्धि अत्यंत स्वाभाविक आहे इत्यादि सिद्धान्त काढणाऱ्या आणि वर्णद्वेषाचें समर्थन करूं पाहणाऱ्या लोकांना वेदांचा अर्थ करतांना अर्थ करणाऱ्यांनीं जी पदरची कल्पनाशक्ति खर्च केली तिचा बराच उपयोग झाला आहे. आणि काळचा वर्णामुळें हिंदुस्थानांतील लोकांची गोऱ्या लोकांपुढें जी मानखंडना होते त्या खंडनेमुळें आपल्या जेतृत्वाला आधार जर कोठें सांपडेल तर पाहावा आणि आपण जेत्यांतच नव्हे तर गोऱ्यांतहि मोडूं असा आधार सांपडला तर बरा या भावनेनें हिंदुस्थानांतील सुशिक्षितांनीं आपले पूर्वज आर्य म्हणजे आर्यन् होते, युरोपियन लोकांशीं संबद्ध जे लोक ते आर्य आणि त्यांनीं देश्य काळ्या लोकांना जिंकलें आणि दस्यु म्हणजे तेच काळे लोक इत्यादि कल्पनांचें मोठ्या आनंदानें स्वागत केलें. युरोपीय कल्पना अशी कीं, (१) वैदिक वाङ्मय ज्यांनीं उत्पन्न केलें ते सर्व लोक एका विशिष्ट मानववंशाचे होते. (२) त्यांना आर्य हें सामुच्चयिक नांव होते. तें जातिवाचक नांव होतें. (३) दस्यु म्हणून जे लोक होते ते निराळ्या जातीचे होते. (४) ते काळे होते. (५) त्या काळ्यांच्या आणि गोऱ्या आर्य लोकांच्या संनिकर्षानें जातिभेद उत्पन्न झाला. (६) वर्ण आणि जाती म्हणजे एकच. (७) वर्ण याचा मूळचा अर्थ रंग. (८) रंगांत फरक हेंच जातिभेदाचें म्हणजे चातुर्वर्ण्याचें मूळ. या कल्पना फार पसरल्या आहेत. या कल्पना कितपत बरोबर आहेत याचा तपास करण्याची शुद्धि पाश्चात्य किंवा भारतीय संशोधक वर्गास मुळींच नाहीं. युरोपीय आणि भारतीय ब्राह्मणांचा वर्ग या दोघांचीहि वरील कल्पना खुशामत करतात, मग त्यावर

हल्ला तरी कोण व कशाला करतो? अशा तऱ्हेची मनोरचना सत्य संशोधनाच्या मार्गांत बरेंच विघ्न करीत आहे."

आर्यांचें मूलस्थान अथवा वैदिक वाङ्मयांत ज्यांचें जीवन प्रतिबिंबित झालें आहे त्या आमच्या पूर्वजांचें मूलस्थान कोणतें आहे हें ठरविण्याआधीं आर्य शब्दाचा खरा अर्थ, तो शब्द वंशवाचक आहे कीं नाहीं याची तपासणी व द्रविड, दस्यु, आक्रमणें इत्यादि कल्पनांचीहि सूक्ष्म तपासणी करणें अवश्य आहे. त्याकडे पुढील व्याख्यानांत वळून आपल्या पूर्वजांचें मूलस्थान पाहूं.

व्याख्यान ४ थें

# आर्य व अनार्य म्हणजे काय ?

वैदिक वाङ्मयांत 'आर्य' शब्द अनेकवार आला असला तरी वंशवाचक म्हणून वैदिक व भारतीय वाङ्मयांत एकदाहि आर्य शब्दाचा वापर केलेला कोणासहि दाखवून देतां येत नाहीं. त्यामुळें 'आर्यन्' वंशाची युरोपियन कल्पना थोतांड ठरते. निदान वेदवाङ्मयांत ज्यांच्या जीवनाचें प्रतिबिंब उमटलेलें आहे त्यांचा युरोपियन संशोधकांच्या कल्पनासाम्राज्यांतील "आर्यन वंशाशीं" कांहीं संबंध नाहीं. मॅक्समुल्लरसारखे भाषाशास्त्रज्ञ व मानववंश-शास्त्रज्ञ या दोहोंच्याहि मतें भाषेच्या एकतेवरून वंशैक्य सिद्ध होऊं शकत नाहीं व तसें मानणें निव्वळ फसवेगिरीचें व धूर्ततेचें कसें आहे याचा ऊहापोह मागच्या प्रकरणांत केलाच आहे. वंशैक्य सिद्ध करणारा भाषाशास्त्राचा पुरावा तें सिद्ध करूं शकत नाहीं हें ठरल्यावर इतर पुराव्याकडे वळण्याआधीं सर्वांत बलवत्तर जो वाङ्मयीन पुरावा त्याची तपासणी करणें उद्बोधक ठरेल. वाङ्म-यीन पुरावा म्हणजे प्रत्यक्ष वेदवाङ्मय होय. वेदवाङ्मयांत आर्य शब्द अनेकवार येतो. पण तो कोणत्या अर्थानें येतो?

### वेदवाङ्मयांतील 'आर्य'

आर्य व दस्यु हे दोन्ही शब्द ऋग्वेदांत आढळतात. पण दोन्ही वंशवाचक नाहींत. हे दोन स्वतंत्र मानववंश असून ते एकमेकांशीं अखंड युद्धयमान असत अशी वेदवाङ्मयाशीं परिचित नसणाऱ्या व्यक्तीची समजूत पटावी अशा पद्धतीनें आजचीं इतिहासाचीं पुस्तकें सजविण्यांत येतात. पण तें सर्व मिथ्या कल्पनाजाल आहे. आधीं ऋग्वेदांत फारशीं युद्धेंच नाहींत. जीं आहेत तीं देवतांचीं

आहेत. नांव घेण्यासारखें ऋग्वेदांतील युद्ध म्हणजे दाशराज्ञ युद्ध होय. पण तें युद्ध दस्यु व आर्य अशा दोन मानववंशांत झालेलें नाहीं. आर्यशब्द युरोपियन संशोधकांनीं वैदिक वाङमयांत पाहिला, व तो दास अथवा दस्यु यांच्या विरोधी म्हणून कांहीं ठिकाणीं त्यांना आढळला. केवळ पंजाबांतील कांहीं नद्यांच्या नामसादृश्यावरून सारी मंत्रसंहिता पंजाबांत रचली गेली अशी त्यांनीं आपली सोयीस्कर समजूत करून घेतली. ज्या अर्थीं आर्य ही एक मनुष्यजात आहे व ज्या अर्थीं पंजाबांत या जातीचें अस्तित्व आढळतें त्या अर्थीं ती जात देशप्रवेश करीत असावी असें अनुमान करून तिचे विरोधक दस्यु अथवा दास हे या नवप्रवेश करणाऱ्या जातीला स्वाभाविकपणें विरोध करणारे भारताचे मूळ रहिवासी असावेत असें त्यांनीं दुसरें अनुमान निश्चित केलें. पण जसें आर्य हे नवप्रवेश करणाऱ्या जातीचें नांव म्हणून वेदांवरून सिद्ध होऊं शकत नाहीं त्याचप्रमाणें दस्यु अथवा दास नांवाच्या कृष्णवर्ण जातीनें अथवा अशा स्वरूपाच्या कोणत्याहि आदिवासी जातीनें हिंदुस्थान वसला होता व त्या जातीला आर्यांनीं जिंकून हिंदुस्थान पादाक्रांत केला हेंहि वेदांवरून सिद्ध होत नाहीं. अलीकडे इतिहास म्हणून ही जी माहिती दिली जाते व मिटक्या मारीत ग्रहण केली जाते तो सारा आंधळ्याकोशिंबिरीचा खेळ आहे. आर्य व दस्यु या शब्दांचा वंशवाचक अर्थ काढण्यापूर्वीं डॉ. केतकर यांनीं कांहीं कसोट्या सुचविल्या आहेत, व त्या कोणासहि मान्य होतील. ते म्हणतात: " (१) आर्य व दस्यु या शब्दांचा पारमार्थिक अर्थ असलेले उतारे उपयोगाचे नाहींत. (२) आर्य या शब्दाचा समाजांतील शिष्टवर्ग हा अर्थ देणारे उतारे उपयोगाचे नाहींत. (३) जेथें आर्यांस वर्ण म्हटलें असेल व जेथें वर्ण या शब्दाचा वर्गवाचक अर्थ असण्याची शक्यता असेल अशा प्रकारचे उल्लेख उपयोगी नाहींत. (४) दस्यु शत्रूंचा संहार या प्रकारच्या विधानामध्यें रूपकांची भाषा असतां कामा नये."

ऋग्वेद व अथर्ववेद यांत येणाऱ्या आर्य शब्दांचे सर्व उल्लेख

तपासून पाहिले तर या निकषांप्रमाणें एकाहि ठिकाणीं वंशवाचक आर्य अथवा दस्यु वा दास शब्द आढळत नाहीं. उलट दस्यु हे आर्य वंशाचे शत्रू होते असें म्हणावें तर ऋग्वेद व अथर्ववेदामध्यें शत्रू म्हणून सूक्तकारांनीं आर्य व दस्यु या दोघांचाहि उल्लेख केलेला आहे व त्यांना जिंकण्याची इच्छा व्यक्त केली आहे.

ऋग्वेद व अथर्ववेदांतील हे दोन मंत्र पाहा:–

"यस्ते मन्योऽविधद् वज्रसायक सहः ओजः पुष्यति विश्वमानुषक् सह्याम दासमार्यं त्वया युजा (वयं) सहस्कृतेन सहसा सहस्वता" (ऋग्वेद १०-८३-१ अथर्व. ४-३२-१).

"जो कोणी, हे मन्यू, तुझी आराधना करितो, त्यास तूं सर्व विजयी शक्ति देतोस; तुझ्या साहाय्यानें आम्ही आर्य व दस्यु या दोघाहि आमच्या शत्रूंना जिंकूं." या ऋचेंत आर्यांनाहि शत्रू समजून जिंकण्याची इच्छा व्यक्त केलेली पाहिली म्हणजे भारत-प्रवेश करणाऱ्या व दस्यूविरुद्ध खड्ग घेऊन उठलेल्या आर्यवंशाची कल्पना टिकत नाहीं.

"आसमंतमिन्द्रणः स्वस्ति शत्रुतूर्याय बृहतीममृध्राम् ।
यया दासान्यार्याणि वृत्रा करो वज्रिन्सुतुकानाहुषाणि ।।

"हे इंद्रा! तूं आम्हांला शत्रुनाशाकरितां पुष्कळ व न संपणारी अशी शाश्वत संपत्ति दे, कीं जिच्या योगानें दास आर्य होतील व संबंधी शत्रू मारले जातील." जर आर्य शब्दाचा अर्थ विशिष्ट वंशाचे व विशिष्ट रक्ताचे लोक असा असेल तर दास या वंशाचे लोक आर्य या वंशांत येणें कसें शक्य आहे? ज्या अर्थी दासांचे आर्य होऊं शकतात त्या अर्थी आर्यशब्द हा ऋग्वेदांत गुणवाचकच आहे व वंशवाचक नाहीं हें स्पष्टच होतें व वंशाची कल्पना कपोल-कल्पित ठरते. तसेंच त्यांचे निळे डोळे, श्वेतवर्णीयत्व या सगळ्या कल्पनाहि चुकीच्या ठरतात. कारण शुक्ल यजुर्वेद्यांच्या एका शाखेचा प्रमुख आचार्य जो कण्व तो आर्य असूनहि वर्णानें काळा असल्याचें ऋग्वेदाच्या दशममंडलांतील एकतिसाव्या सूक्तांत वर्णन आहे. त्यामुळें आर्यसंस्कृतीचा मनुष्य काळा असू शकतो हें स्पष्टच

होतें. कण्वाला कांहीं दास वा द्रविड म्हणण्याची सोय नाहीं. ऋग्वेदामध्यें आर्य व दास या दोघांहि शत्रूंना जिंकण्याची इच्छा एकाच ठिकाणीं व्यक्त केलेली नसून ती अनेकवार व्यक्त केलेली आहे. उदाहरणार्थ पुढील ऋचा पाहा :-

यो नो दास आर्यो वा पुरुष्टुतादेव इंद्र युधये चिकेतति।
अस्माभिष्टे सुषहाः सन्तु शत्रवस्त्वया वयं तान्वनुयाम संगमे ।।
(ऋ. १०. ३८. ३.)

"हे बहुस्तुत इंद्रा! जे दास किंवा आर्य अधार्मिक आमच्याशीं युद्ध करतील ते आमचे शत्रू तुझ्या प्रसादानें जिंकण्यास सुलभ होवोत. तुझ्या साहाय्यानें युद्धांत त्यांना आम्ही मारूं."

"हतो वृत्राण्यार्याहतो दासानि सत्पती। हतो विश्वा अप द्विषः" (ऋ. ६. ६०. ६.) "हे सत्पालक इंद्राग्नी आम्हांला उपरोध करणाऱ्या आर्यांना व दासांना मारतात व आमच्या सर्व शत्रूंचा नाश करतात."

येथील "आर्यवृत्र" याचा आर्यरूपी शत्रु हा सायणांचा अर्थ ग्रिफिथलाहि मान्य आहे. पण ग्रिफिथला या शत्रूंचें स्वरूप, यज्ञसंस्कृतींतील विचारप्रणालीची असावी तशी कल्पना नसल्यामुळें माहीत नाहीं. सायणाचार्यांनीं या शब्दाची केलेली फोड शब्दाच्या अर्थावर पूर्ण प्रकाश पाडते. ते म्हणतात :-

"आर्या वृत्राणि आर्यैः कर्मानुष्ठातृभिः कृतानि उपद्रवजातानि" "आभिचारिक इत्यादि कर्मांच्या साहाय्यानें यजमानाला उपद्रव देणारे लोक." पुराणवाङ्मयांत या गोष्टीची कथांच्या रूपानें हवीं तितकीं वर्णनें आहेत, व या सर्व उल्लेखांचा विचार केला तर आर्य शब्द वंश व जातिवाचक नसून गुण व कर्मवाचक व 'शिष्ट' अथवा 'अभिजन' या अर्थाचा आहे हें स्पष्ट होतें. ऋग्वेदांत हा शब्द एकंदर ३३ ठिकाणीं आलेला आहे, व अथर्ववेदांत १६ ठिकाणीं आलेला असून त्यांपैकीं सात ठिकाणीं ऋग्वेदांतीलच मंत्र पुन्हां आलेला आहे. हल्लींच्या संशोधकांचें, ऋग्वेद हा सर्वांत प्राचीन हें गृहीतकृत्य असल्यामुळें, ऋग्वेदांतील उल्लेखांची तपासणी पुरेशी

होईल. ऋग्वेदांतील या शब्दाचे अर्थ स्वामी, देव, विद्वान्, स्तोता, उपासक, यजमान, शुभ (कृण्वन्तो विश्वमार्यम्), प्रेरक तेज (ज्योतिः आर्यम्), मित्र, कर्मशील लोक, अनुष्ठाते, इत्यादि असून अथर्ववेदांतहि यजमान इत्यादि अर्थांनीं हा शब्द वापरलेला आहे. डॉ. केतकर यांनीं दिलेले निकष वापरले व या शब्दाचे हे अर्थ पाहिले तर तो गुणवाचक शब्द आहे हें उघड उघड होतें. आर्य शब्दाचा अर्थ श्रेष्ठ असा असून मुळांत ते यजनशील वर्ग अथवा यज्ञ करणारे लोक यांचें नांव असून पुढें तें शिष्ट अथवा श्रेष्ठ या अर्थानें रूढ झालेलें दिसतें. डॉ. केतकरांनीं स्वतःचा निर्णय म्हणून असा दिला आहे कीं, आर्य अणि दस्यु हा भेद यजनविषयक होय. मंत्र म्हणणाऱ्या लोकांचे शत्रू यजनशील आणि यजनहीन असे दोघेहि होते. दस्यु या शब्दाचा जातिविषयक किंवा वंशविषयक अर्थ रूढ नसून पारमार्थिक अर्थ रूढ आहे असें दिसतें. आर्य म्हणजे विशिष्ट प्रकारानें यजन करणारे लोक एवढेंच. आर्यन् म्हणजे ते लोक नव्हेत. देशांत ज्या हालचाली दिसून येतात त्यांमध्यें आर्यहि आहेत. काळेहि आहेत व गोरेहि आहेत. बाहेरच्या आर्य लोकांनीं देशांतले लोक येऊन जिंकले, ते लोक काळे होते, या कल्पना ज्या पुराव्यावरून उत्पन्न झाल्या त्या पुराव्यामध्यें वर्ण शब्दाचा पुरावा आणतात. हा पुरावा ग्राह्य धरण्यास कारण चार समाजवर्गांना वर्ण असें म्हणतात आणि चार समाजवर्ग कातडीच्या रंगावरून पडले. पण ही गोष्ट ग्राह्य धरण्यास जी अडचण आहे ती अशी कीं, गोरे आणि काळे हेच जर वर्ग असते तर गोष्ट वेगळी होती. पण वर्ग चार आहेत व रंग दोनच आहेत. आर्य हें नांव केवळ यजनशील लोकांचेंच नसून यजनशील व शिवाय त्रेसष्ट किंवा चौसष्ट वर्णांची सिद्ध भाषा बोलणारे लोक असा त्याचा अर्थ आर्यांनीं आपल्या प्रतिपक्षीयांची ज्या कारणास्तव थट्टा केलेली आहे त्यावरून दिसतो. असुरांचें वर्णन करतांना त्यांना 'र' शब्दाचा उच्चार करतां येत नव्हता, (हेलयोऽहेलयः इति वदन्तः पराबभूवुः) ते व्यक्तिवादी व प्रेतपूजक होते इत्यादि शब्दांनीं जेव्हां त्यांचें वर्णन

करण्यांत येतें तेव्हां त्यांचा दुसरा विशिष्ट प्रकारच्या उच्च संस्कृतीचे व त्रेसष्ट किंवा चौसष्ट वर्णांची भाषा बोलणारे लोक म्हणजे आर्य हा अर्थ स्पष्टच होतो. ऋग्वेदीय लोकांना आपल्या भाषेचा विलक्षण अभिमान होता ही गोष्ट तर स्पष्टच आहे.

### दास, असुर व द्रविड

आर्य शब्दाचा हा अर्थ पाहिल्यावर दास, असुर व द्रविड हे जे आर्यांचे प्रतिपक्षी म्हणून सांगण्यांत येतें, ते तरी काय आहेत हें पाहणें अत्यंत आवश्यक आहे. द्रविड ही एक जात होती असें फार तर म्हणतां येईल. परंतु वेगळी अशी द्रविड संस्कृति कोणालाहि दाखवितां येण्याची शक्यता नाहीं. हिंदुस्थान सरकारच्या अर्किऑलॉजिकल डिपार्टमेंटचे सुपरिंटेंडंट रायबहादुर दयालाल सहानी यांनीं इ. स. १९२१ सालीं पंजाबमध्यें मॉंटगोमेरी जिल्ह्यांतील हरप्पा या गांवीं कांहीं जुन्या मुद्रा व रंगीत भांडीं शोधून काढलीं. त्यानंतर लवकरच पश्चिम विभागाचे ऑर्किऑलॉजिकल सुपरिंटेंडंट आर्.डी. बॅनर्जी यांना सिंध प्रांतांत लारखाना जिल्ह्यांतील मोहेंजोदारो या गांवांत बुद्ध स्तूपाचे कांहीं अवशेष आढळले. तेथें खणून पाहतां त्याच्याखालीं त्याच प्रकारचें बांधकाम आढळलें. त्यामुळें हिंदुस्थान सरकारचे ऑर्किऑलॉजिकल डायरेक्टर सर जॉन मार्शल यांच्या देखरेखीखालीं दोन्ही ठिकाणीं उत्खननाचें काम सुरू झालें. तें इ. स. १९२२ पासून २७ पर्यंत चालू होतें. या उत्खननानंतर 'Mohenjodaro and Indus Valley Civilization' या नांवाचा प्रचंड ग्रंथ सर जॉन मार्शल यांनीं तयार केला व तो इ. स. १९३१ मध्यें प्रसिद्ध झाला. या सिंधुनदीच्या खोऱ्यांतील संशोधनांत ज्या अनेक वस्तु सांपडल्या त्यांतील अनेक वस्तूंचे प्राचीन सुमेरियांतील कांहीं शहरांच्या अवशेषांतील वस्तूंशीं पूर्ण साम्य असल्याचें आढळून आलें व तेवढ्यावरून संशोधकांनीं एक प्रचंड ग्रंथ निर्माण केला. अवशेपावरून सिंधुखोऱ्यांतील लोकांना शहररचनेसंबंधीं पूर्ण माहिती होती. मोहेंजोदारो हें एक शहरच असून त्यांतील रस्ते अत्यंत रेखीव, प्रशस्त व

पूर्वाभिमुख आहेत. मोठमोठीं घरें, सार्वजनिक इमारती, स्वयंपाकगृहें, स्नानगृहें, उत्कृष्ट अशी पाणी आणण्याची व स्वच्छ करण्याची व्यवस्था असून बांधकाम भाजलेल्या विटांचें आहे व त्याला चुन्याचा गिलावा आहे. एवढेंच नव्हे तर तेथें सन् बाथचीहि व्यवस्था आहे. या लोकांची चित्रलिपी असावी असें दिसतें. पण त्याचबरोबर तेथें कांहीं अक्षरलेखहि आढळले. आणि ते संस्कृत भाषेंतील आहेत. त्यावरून प्रो. लँग्डन यांचें असें मत बनलें कीं, भारतांतील देवनागरी इत्यादि लिपी ज्या मूळ ब्राह्मी लिपीपासून निघाल्या ती लिपी ह्या सिंधु संस्कृतींतील लिपीपासून निघाली असावी. उत्खननांत पृथ्वीदेवतेचीं चित्रें, योगासन घातलेली शिवमूर्ति व वृक्षपूजा, लिंगपूजा इत्यादि आढळतात. लिपीवरून सुमेरियन लोकांशीं या लोकांचें साम्य संशोधकांनीं कल्पिलें आहे. हरप्पा येथील संस्कृति व ही संस्कृति एकच आहे. या संस्कृतीचें वैदिक संस्कृतीशीं साम्य नसून तें सुमेरियन संस्कृतीशीं आहे व कांहीं बाबतींत वर ती संस्कृति सुमेरियन संस्कृतीपेक्षांहि श्रेष्ठ होती. सिंधु खोऱ्यांतील ही संस्कृति द्रवीडियन आहे व द्रवीडियन आणि सुमेरियन लोक वंशानें एक होते असें मत श्री. काशीकर यांनीं व्यक्त केलें आहे. हें सगळें कशावरून असें विचारलें तर त्यासाठीं पुन्हां मानीव अनुमानांचीच सांखळी देण्यांत येते. आर्यांना द्रविड लोक भेटले. ते दस्यु लिंगोपासक होते (शिश्नदेवाः) असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. ( ? ) मोहेंजोदारोच्या वस्तींत लिंगमूर्ति सांपडतात त्याअर्थीं ही लिंगोपासक द्रविडांचीच संस्कृति असली पाहिजे व ज्याअर्थीं ती उच्च आढळते त्याअर्थीं द्रवीडियन लोक श्रेष्ठ संस्कृतिसंपन्न होते हें ओघानेंच आलें. आतां द्रवीडियन व सुमेरियन हे लोक तरी एक होते कशावरून ? दोन्ही लोकांची कपालमिति व शरीरयष्टि एकच आहे असें वंशशास्त्रज्ञांचें विधान आहे. शिवाय चित्रलिपींच्या साम्याचा उल्लेख केलाच आहे. पण ह्या सगळ्या कल्पनांचें परीक्षण केलें तर त्यांतील त्रुटी मोठ्या विलक्षण आढळतात. ऋग्वेदांतील ज्या 'शिश्नदेव' या शब्दावरून दस्यु हे लिंगपूजक होते, सिंधु संस्कृतींतील लोक

लिंगोपासक आहेत, व म्हणून ते द्रविड संस्कृतीचे होते असें म्हटलें जातें तो आधारच मुळांत कच्चा आहे. ऋग्वेदांतील शिश्नदेव शब्दाचा अर्थ लिंगोपासक असा नाहीं तर तो स्त्रैण असा आहे, हें लक्षांत घेतलें म्हणजे या अनुमानाचा पायाच कोलमडतो.

### ऋग्वेदांतील शिश्नदेव

ऋग्वेदांत दस्यूंचें जें वर्णन आढळतें ते 'अदेवयु:' 'अयज्वन्' 'अव्रत' 'अकर्मन्' 'अन्यव्रत' 'मुरदेव' 'अनास' 'पिशङ्गभृष्टि' 'मृध्रवाच' 'विवाच' 'द्रोघवाच' 'शिश्नदेव,' 'क्रव्याद' अशा शब्दांनीं आढळतें. यांपैकीं 'देव न मानणारे' 'यज्ञयाग न करणारे' 'दुसऱ्या देवतांची उपासना करणारे' इत्यादि अर्थांविषयीं मतभेद नसून 'मुरदेव' 'अनास' 'शिश्नदेव' या शब्दांवर मात्र हवे तसे तर्क बसविण्यांत आले आहेत. यांपैकीं 'मुरदेव' म्हणजे'ज्यांचे देव मूढ होते,' 'अनास' म्हणजे नाक नसलेले; पण नाक नसलेला मनुष्य उपलब्ध असण्याची शक्यताच नसल्यामुळें चपटया अथवा बसक्या नाकाचे व 'शिश्नदेवा:' याचा अर्थ 'लिंगपूजक' असा करून आधुनिक संशोधकांनीं द्रविड अथवा दस्यूंच्या उपासनापद्धतीचा शोध घेण्याचा व शरीररचना आणि वर्ण सांगण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांपैकीं 'पिशंगभृष्टि' वरून ते कृष्णवर्णीय होते या म्हणण्यांत फारसें तात्पर्य कसें नाहीं हें कण्व ऋषींच्या कृष्णवर्णाचा ऋग्वेदांतील निर्देश सांगून व आर्यहि काळे असत ही त्यावरून सरळ दिसणारी गोष्ट उल्लेखून स्पष्ट केलेंच आहे. या कृष्णवर्णावरून तर कृष्ण यजुर्वेद आणि शुक्ल यजुर्वेद यांच्यांतील वर्णाहून होणाऱ्या भांडणासंबंधीं हवे ते तर्क सांगून श्री. वि. का. राजवाडे यांनीं आपल्या राधामाधवविलासचंपूंत इतिहासाच्या नांवाखालीं एक कादंबरीच निर्माण केलेली आहे. पुष्कळदां शुक्ल व कृष्ण हे शब्द त्या लोकांच्या वर्णाचे द्योतक म्हणून येत नसून श्रेष्ठ व कनिष्ठ या अर्थानें अथवा विशिष्ट दोन पक्षांतील लोक या अर्थानेंहि येत असतात हें लक्षांत ठेवलें पाहिजे. काशगर प्रांतांत लढाई चालली असतां एकाच जातीच्या लोकांस त्यांच्या पक्षांवरून कृष्ण व श्वेत म्हणत असत.

Kuropatkin च्याKangaria या ग्रंथांत तार्तार लोकांसंबंधीं असें म्हटलें आहे कीं, The opposing Tarters of the same race were called the White and the Black mountaineers." त्याच वंशांतील दोन बाजूंच्या तार्तरांना श्वेत व कृष्ण या संज्ञा लागत असल्याचा हा ऐतिहासिक उल्लेख कृष्ण या शब्दावर कातडीचा रंग म्हणून विशेष जोर देण्यांत अर्थ नाहीं हेंच सुचवितो. कृष्ण यजुर्वेदीय लोकांना संकर संतति म्हणण्यांपर्यंत राजवाडे यांची आधारहीन अनुमानपद्धति लांबलेली आहे. गुरुवर्य अप्रबुद्ध यांनीं तिचें वैयर्थ्य दाखवितांना कटु भाषेचा उपयोग केला आहे हें खरें; पण त्याशिवाय या तर्कांतील पोकळपणा मनांत ठसणारहि नाहीं. श्री. अप्रबुद्ध म्हणतात, "पुण्यांत पूर्वी राजेश्री गोपाळराव जोशी यांच्या कुचाळीनें चहाचें प्रकरण उपस्थित होऊन पुण्यांतील ब्राह्मण मंडळींत श्वेत आणि कृष्ण असे दोन पक्ष उपस्थित झाले. या लोकांत पुष्कळसे लोक कोंकणस्थ होते. लोकमान्य टिळक त्यांतील कृष्ण पक्षांत होते हें प्रसिद्धच आहे. हा सारा वृत्तान्त परंपरेनें ग्रंथनिविष्ट होत असतां हजारों वर्षांनंतर ती इतका पूर्ण राहणार नाहीं हें उघडच आहे. (दृष्टान्त तितका एकदेशी हें वाचकांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे आणि हल्लींच्या अत्यंत सुधारलेल्या अशा मुद्रण-कलेचा आणि त्यामुळें वाङ्मयास मिळालेल्या सुव्यवस्थितपणाचा भाग वाचकांनीं या दृष्टान्तापुरता स्मरणांतून काढून टाकला पाहिजे. ज्या काळचें आपण परीक्षण करतों आहों त्यांत तो नव्हता हें तरी लक्षांत ठेविलें पाहिजे! ) अशा वेळीं एखाद्या संशोधकानें वस्तुतः हा वंशविषयक तंटा असून पांढऱ्या कातडीचे आणि अधू डोळ्यांचे कोंकणस्थ लोक देशावर आल्यावर सांवळ्या आणि काळ्या वर्णाच्या देशस्थांशीं त्यांचे संबंध होऊन मिश्र संतति उत्पन्न झाली, लोकमान्य टिळक हे कृष्णपक्षांतील होते आणि त्याला सबळ पुरावा म्हणजे त्यांचा वर्ण काळा असून आजन्म त्यांनीं कधींहि चष्मा वापरला नाहीं असें संशोधन केल्यास तें कितपत वस्तुस्थितीस धरून होईल?" जी गोष्ट कृष्णवर्णाची तीच

'अनास' या शब्दाचीहि आहे. चपटें व बसकें नाक असा त्याचा अर्थ करून त्यांतून द्रविडांच्या अथवा दस्यूंच्या स्वरूपाचें वर्णन कोणी काढतो म्हटलें तर आर्य व दस्यु यांच्या शरीरांत सारखेपणा असल्याची खूण ऋग्वेदांतच आढळते. ऋग्वेदांतील प्रथम मंडलांत 'विजानीत् ह्यार्यान्ये च दस्यवः' अशी इंद्राची विनवणी केलेली आहे. व 'अन्ये' आणि 'विजानीत्' या शब्दांवरून आर्य व दस्यु यांच्या शरीरांत सारखेपणा होता व वेगळेपणा काढण्यासारखी विशेष शरीररचना अशी कोणतीच नव्हती असें स्पष्ट दिसतें. त्यामुळें 'अनास' म्हणजे चपटें नाक व सारे द्रविड चपट्या नाकाचे हें अनुमान योग्य ठरत नाहीं. वैदिकांना आपल्या त्रेसष्ट किंवा चौसष्ट वर्णांच्या सिद्ध भाषेचा असलेला ज्वलंत अभिमान, असुरांना र म्हणतां येत नसल्याबद्दल म्हणजे या सर्व वर्णांच्या उच्चाराच्या त्यांच्या अपात्रतेबद्दल त्यांनीं व्यक्त केलेला तिटकारा व दस्यूंना उल्लेखून त्यांच्या याच अपात्रतेबद्दल त्यांनीं विवाच, द्रोघवाच हीं लावलेलीं विशेषणें यांच्या प्रकाशांत 'अनास' या शब्दाचा विचार केला पाहिजे. दस्यूंच्या व आर्यांच्या शरीररचनेंत उमटून दिसण्यासारखा फरक नव्हता व त्यामुळें बसक्या नाकाचा 'अनास' या शब्दाशीं संबंध दिसत नाहीं तर आर्यांच्या भाषाविषयक धारणेच्या प्रकाशांतच 'अनास' या शब्दाचाहि विचार केला पाहिजे. तो तसा केला तर 'अनास' म्हणजे 'ज्यांच्या भाषेंत अनुनासिकें नाहींत' हा अप्रबुद्धांनीं सुचविलेला अर्थच विचारवंतांना अधिक ग्राह्य वाटेल. जी गोष्ट 'अनास' या शब्दाची, तीच 'शिश्नदेव' या शब्दाचीहि आहे.

"शिश्नदेवाः" या विशेषणाचा लिंगपूजक असा अर्थ, आधीं दस्यु व द्रविड या वंशांचें व त्यांच्या स्वतंत्र संस्कृतींचें अस्तित्व मनांत पक्कें धरून नंतर अर्वाचीनांनीं केलेला आहे. त्याला पारंपारिक अर्थाचा मुळींच आधार नाहीं. यास्कासारख्या प्रमाणभूत निरुक्तकारानें 'अब्रह्मचर्याः, शिश्नेन दीव्यन्ति इति' म्हणजे 'कामी' व 'अनियंत्रित कामोपभोगाच्या मागें लागलेले व्यभिचारी

स्त्रैण' असा केला आहे. यास्काला यज्ञक्रियेचें पूर्ण ज्ञान असल्यामुळें त्यानें हा जो अर्थ दिला तो औचित्यपूर्ण आहे. याच्या उलट लिंगपूजक हा अर्थ मात्र ज्या प्रकरणांत हा शब्द आला आहे त्या प्रकरणाच्या दृष्टीनेंहि चुकीचा वाटतो. पाटणा येथें भरलेल्या सहाव्या प्राच्यविद्या परिषदेसमोर (१९३०) प्रिन्सिपॉल विधुशेखर भट्टाचार्य यांनीं वाचलेल्या निबंधांत "प्राचीन संस्कृतांत 'देव' हा शब्द दुसऱ्या शब्दाशीं जोडला असता त्याचा 'पूजक' असा अर्थ होत नाहीं, तर 'तत्पर,' 'परायण' असा अर्थ होतो; उदाहरणार्थ, मातृदेव, पितृदेव इत्यादि. पुराणवाङ्मयांत 'स्त्रीदेव' असाहि एक शब्द आढळतो व त्याचा अर्थ 'स्त्रीपरायण' असा आहे. 'शिश्नदेव' या शब्दाचाहि अर्थ 'शिस्नपरायण' असा केला पाहिजे" असें प्रतिपादन करून सायणांचा पारंपारिक अर्थ कसा बरोबर आहे हें उत्कृष्ट रीतीनें दाखवून दिलें आहे. त्यावर आक्षेप घेऊन 'शिश्नदेव' म्हणजे 'लिंगपूजक' या पाश्चात्य तर्काचें समर्थन करतांना श्री. काशीकर म्हणतात : "परंतु मातृदेव इत्यादि शब्दांतील देव शब्दाचा तत्पर असाच अर्थ केला पाहिजे, पूजक असा किंवा बहुव्रीहि समासानें प्राप्त होणारा अर्थ करतां कामा नये असा निबंध घालतां येत नाहीं. व दुसरी गोष्ट अशी कीं 'तत्पर' हा अर्थ, ज्या मंत्रांत 'शिश्नदेवाः' असा शब्द आला आहे त्या मंत्राच्या अर्थाशीं जुळत नाहीं. हा शब्द ऋग्वेदांत दोन ठिकाणीं आला आहे.

न यातव इंद्र जूजुकर्नो न वंदना शविष्ठ वेद्याभिः।
स शर्धदर्यो विषुणस्य जंतोर्माशिश्नदेवा अभिगुर्ऋतं नः ॥

या मंत्राच्या पहिल्या तीन पदांशीं 'शिश्नदेवाः' या शब्दाचा कांहीं संबंध नाहीं. शेवटच्या पादाचा अर्थ असा आहे कीं, 'लिंगपूजक आमच्या यज्ञांत न येवोत.' हा अर्थ न घेतां 'शिश्नपरायण किंवा कामुक लोक आमच्या यज्ञांत न येवोत' असा जर त्या वाक्याचा अर्थ केला तर त्यापासून काय बोध होतो? कामुक लोक यज्ञांत न येवोत या म्हणण्याचा अर्थ काय? तसेंच,

सवाजं याता पष्टुपदा यन्त्स्वर्षाता परिषदत्सनिष्यन् ।
अनर्वा यच्छतदुरस्य वेदोघ्नन्छिश्नदेवा अभिवर्पसाभूत् ।।
ऋ. १०–९९–३

(संग्रामांत जाणारा इंद्र शत्रूंचीं धनें लुटतो. शंभर द्वारें असलेल्या शत्रुपुरांतील लिंगपूजकांना ठार करीत अप्रतिहत असा इंद्र शत्रूंच्या नगरांतील धन बलात्कारानें जिंकतों.)

'शिश्नदेवाः' याचा अर्थ 'अब्रह्मचर्याः' असा करून अब्रह्मचारी लोकांना इंद्र ठार मारतो असा जर त्या वाक्याचा अर्थ केला तर त्यांतून काय निष्पन्न होतें? कामुक लोकांना इंद्र ठार करतो असें कोठें सांगितलें आहे? असें म्हणण्यांत तात्पर्य काय? शिवाय हे दोन्ही मंत्र इंद्र या राष्ट्रदेवतेला उद्देशून असलेल्या सूक्तांत आहेत ही विशेष गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी आहे. 'आचार्यदेव' इत्यादि शब्दांचा 'आचार्यपरायण' इत्यादि प्रकारचा अर्थ होतो म्हणून 'शिश्नदेवाः' या शब्दाचा अर्थ तसाच केला पाहिजे या मुद्द्यालाहि योग्य उत्तर देतां येईल. 'मुरदेवाः' असें एक दस्यूंचें विशेषण (ऋ. १०-८७-२) यांत आलें आहे. 'पितृदेव' इत्यादि उपनिषदांतील शब्दांपेक्षां 'मुरदेवाः' या ऋग्वेदांतील शब्दाच्या अर्थानुसार 'शिश्नदेवाः' या शब्दाचा अर्थ करणें हें केव्हांहि युक्ततर होय. 'मुरदेवाः' याचें 'मूढपरायण' असें भाषांतर केल्यानें अर्थप्राप्ति काय होते? त्याला कांहीं अर्थच नाहीं. 'ज्यांचे देव मूढ आहेत ते' असाच अर्थ करावयास पाहिजे. त्याचप्रमाणें 'शिश्नदेवाः' याचा अर्थ 'लिंग हा ज्यांचा देव आहे ते' असाच केला पाहिजे."

श्री. काशीकर हे आधीं सिंधुसंस्कृति ही द्रविडांची होय हें पक्कें धरून बसले आहेत. व नंतर साऱ्या शब्दांचे द्रविडपर अर्थ करावयाचा ते प्रयत्न करीत आहेत.

### काशीकरांचें म्हणणें

पण काशीकर यांनीं मातृदेव, पितृदेव इत्यादि शब्द टाकून खास 'मुरदेव' म्हणून जो ऋग्वेदांतील शब्द सांगितला त्याचाहि 'ज्यांचे देव मूढ आहेत' असा त्यांनीं सांगितलेला अर्थ चूक आहे.

केवळ युरोपियन पंडित करतात तो 'शिश्नदेवा'चा 'लिंगपूजक' हा अर्थ स्वीकारावयाचा एवढ्याचसाठीं त्यांनीं मुरदेव या शब्दाचा असा अर्थ केला आहे. आधीं कोणत्याहि परिस्थितींत देव आणि मूढ हे शब्द एकत्र येऊंच शकत नाहींत. शिवी द्यावयाची झाली तरीसुद्धां मूढ ज्यांचे देव आहेत अशी शिवी कधीं कुणी देतो काय? आपल्या वैऱ्याला मूर्ख म्हणणें बरोबर आहे. पण म्हणून त्याच्या देवाला मूर्ख म्हणणें सामान्य संस्कृतीच्या माणसालासुद्धां अशक्य आहे. आणि ऋग्वेदीय आर्य तर 'नासदीय' व 'अस्य वामस्य' यासारख्या सूक्तांचे जनक असणारे उच्च संस्कृतिसंपन्न आहेत. "जसा कोणी सातूचें पीठ चाळून चाळून त्यांतला कोंडा काढून तें स्वच्छ करतो, तसे अलौकिक बुद्धीचे लोक कल्पनेच्या साह्यानें कविता निर्माण करतात. अशा काळजीपूर्वक निर्माण केलेल्या काव्यकृती सहृदय लोकच ओळखतात" असें स्वतःच्या सूक्तरचने-संबंधीं अभिमानपूर्वक म्हणणारे व प्रत्येक शब्द तोलून वापरणारे लोक 'मूढ ज्यांचे देव आहेत' असा वाक्प्रयोग करतील असें मानणें कमालीचें धाष्टर्याचें आहे. काशीकर म्हणत, "दुसऱ्या कोणत्या भाषांतराला कांहीं अर्थच नाहीं." वस्तुतः त्यांच्या या वाक्प्रयोगालाच कांहीं अर्थ नाहीं. 'मुरदेव' या शब्दाचा अर्थ 'मूर्खपणानें हव्या त्या देवाची उपासना करणारे लोक' असा केला पाहिजे. एवढा एकच शब्द कांहीं ऋग्वेदांत नाहीं. काशीकरांच्या पद्धतीनें अर्थ करावयाचा तर पूर्वदेव, विश्वदेव, उग्रदेव इत्यादि शब्द ऋग्वेदांतच येतात. त्यांचा काय अर्थ करणार? मातृदेव नको म्हणून मुरदेवाचा अर्थ तुम्ही मूढ ज्यांचे देव असा करून त्याच्या प्रकाशांत शिश्नदेव उलगडणार व बलवत्तर प्रमाण म्हणून ऋग्वेदांतील शब्दासमोर उपनिषदांतील शब्दांची काय प्रतिष्ठा असें म्हणणार. पण ऋग्वेदांत दस्यूंनाच उद्देशून वापरलेल्या पूर्वदेव शब्दाचा काय अर्थ करणार? मूढ ज्यांचे देव या चालीवर पूर्व ज्यांची देव म्हणजे पूर्वदिशा ज्यांची देव असा अर्थ करणार काय? पण या अर्थाला सगळ्यांत मोठी अडचण ही आहे कीं, ऋग्वेदांत

दिशा या अर्थानें पूर्व शब्द येत नाहीं. विश्वदेव असाहि शब्द आला आहे. उग्रदेव व शूरदेव हेहि शब्द आहेत. व यांपैकीं विश्व ज्यांचा देव आहे, उग्र ज्यांचा देव आहे असे अर्थ नाहींत. त्या सर्व ठिकाणीं जर परायण हा अर्थ जुळतो तर शिश्नदेव ह्या ठिकाणींच तो न जुळावयास युरोपियन पंडितांना तसें वाटत नाहीं यापलीकडे दुसरें काय कारण आहे? श्री. काशीकर यांनीं शिश्नदेवाचा लिंगपूजक हा अर्थ करण्यासाठीं प्रमाण म्हणून जी ऋचा उल्लेखिली तिचा सुद्धां त्यांच्या पद्धतीप्रमाणें नीट अर्थ न लागतां स्त्रैण अथवा कामपरायण या अर्थानेंच तिचा जास्त चांगला उलगडा होतो. ‘मा शिश्नदेवा अभिगुर्ऋतं नः’ यांत ‘शिश्नदेव आमच्या यज्ञांत येऊं नयेत’ असें म्हटलें आहे; त्यांनीं आमच्या यज्ञांत विघ्न करूं नये’ असें म्हटलेलें नाहीं. व त्यामुळें लिंगपूजक जातिवाचक शत्रूचा त्यावरून ओढाताणीनें अर्थ काढण्याचें कांहीं कारण नाहीं. शिवाय युद्धप्रसंगांत आपल्या घरीं येणाऱ्या शत्रूला हाकून लावण्यासाठीं तेजस्वी आर्यांना इंद्राच्या प्रार्थनेकडे धाव घेण्याचें कांहीं कारण नाहीं. उलट यज्ञकर्मासारख्या अत्यंत पवित्र कर्मांत अपवित्र लोकांचा संबंध येऊन तीं कर्में भ्रष्ट होऊं नयेत असें नेहमीं ‘मां पाहि अंहसः।’ ‘मला पापापासून वांचव’ अशी देवाला सतत प्रार्थना करणाऱ्या लोकांच्या अंतःकरणांत भावना उत्पन्न होणें व त्यांनीं त्या दृष्टीनें परमेश्वराची प्रार्थना करणें अत्यंत स्वाभाविक आहे. बाह्य शत्रूंचा प्रतिकार करतां येईल, पण अमका मनुष्य स्त्रैण व अपवित्र आहे हें ठरविण्यास बाह्य कांहींच साधन नसल्यामुळें त्या बाबतींत परमेश्वराचें साह्य मागणें अत्यंत योग्य आहे. त्यामुळें काशीकर म्हणतात तशी आपत्ति या अर्थांत नसून हाच ऋचेचा खरा सरस अर्थ आहे. त्यांनीं उल्लेखिलेल्या दुसऱ्या ऋचेंतसुद्धां आकसानें द्रविड लिंगपूजकांचा संबंध आधींच गृहीत धरला असला तर गोष्ट वेगळी. एरवीं शिश्नदेव म्हणजे कामपरायण अथवा भोगविलासांत दंग झालेले अशा लोकांना ठार मारून इंद्र संपत्ति हरण करतो या सरळ व सरस अर्थांत चमत्कारिक वाटण्याचें कांहीं कारण नाहीं.

डॉ. राथ यांनींहि 'शिश्नदेव' शब्दाचा 'कामलंपट' हाच अर्थ केलेला असून डॉ. मूर यांनीं तर स्पष्ट असें म्हटलें आहे कीं, 'However interesting, therefore, it would be to find a proof of the existence of a phallic worship among the aboriginal tribes contemporary with the Vedic Rishis, it must be confessed that the word does not supply this evidence " "वैदिक आर्यांच्या समकालीन लोकांत लिंगपूजा होती कीं काय याचा शोध करणें कितीहि महत्त्वाचें वाटलें तरी हें मान्य केलेंच पाहिजे कीं वेदांतील 'शिश्नदेव' या शब्दावरून तो पुरावा उपलब्ध होत नाहीं."

शिश्नदेव म्हणजे लिंगपूजक असा अर्थ घेतला तरी लिंगपूजा ही अनार्यांची होती अथवा द्रविड संस्कृतीची स्वतंत्र होती हें ठरविण्याससुद्धां यज्ञप्रधान भारतीय संस्कृतीशीं मुळींच परिचित नसलेल्या पाश्चात्यांच्या लाडक्या कल्पनेशिवाय दुसरा कांहींहि आधार नाहीं. म. म. पंडितसम्राट् कृष्णशास्त्री घुले यांनीं लिंगपूजा अथवा शिवपूजा यज्ञीय अग्निपूजेपासूनच कशी निघाली आहे हें, यासंबंधींचीं सर्व मतें खोडून काढून इतक्या उत्कृष्ट रीतीनें सिद्ध केलें आहे व यासंबंधींचा त्यांचा 'महादेवाचें मूळ स्वरूप' हा संशोधनात्मक निबंध संशोधक जगतांत इतका सर्वमान्य झालेला आहे कीं, लिंगपूजकांचा स्वतंत्र वर्ग कल्पून त्यांची वेगळी संस्कृति मानण्याचें आतां कोणतेंहि कारण उरलेलें नाहीं. त्यामुळें शिश्न-देवावरून सिंधू खोऱ्यांतील संस्कृति द्रविडांची ठरत नसून वैदिक संस्कृतीचाच तो उलटा एक भाग ठरतो. शिवाय ज्यानें मुळांत या सिंधुसंस्कृतीवर प्रचंड ग्रंथ लिहिला त्या सर जान मार्शललाच सिंधुसंस्कृति व तथाकथित सुमेरी संस्कृति यांत इतरांना दिसते त्याप्रमाणें साम्य न दिसतां उलटें वैषम्य मात्र दिसत असल्याचें तोच स्पष्ट म्हणतो. टाइम्स ऑफ इंडिया इ. स. १९२९ जानेवारी २८ च्या अंकांत त्यानेंच असें म्हटलें आहे कीं, –

" Points of dlfference between these civilizations are more numerous than the points of similarity." या दोन

संस्कृतींत साम्यापेक्षां वैषम्यच अधिक आहे. शिवाय ही सिंधु खोऱ्यांतील संस्कृति सलगपूर्ण संस्कृति नसून एका मोठ्या संस्कृतीचा ती केवळ एक भाग ठरते. कारण या उत्खननांत इतर अनेक गोष्टींबरोबर जीं हत्यारें सांपडलीं त्यांत युद्धोपयोगी हत्यारांचा पूर्णपणें अभाव आहे. व याचें संशोधकांनाहि आश्चर्य वाटतें. एवढ्या मोठ्या पुढारलेल्या लोकांना युद्धकलेची माहिती नसेल व युद्धोपयोगी हत्यारांवांचून ते जीवन जगत असतील ही कल्पनाच खुळेपणाची आहे. यावरून एकच गोष्ट सिद्ध होते व ती ही कीं, एका मोठ्या विशाल संस्कृतीचा तो केवळ विद्यापीठ वगैरेसारखा विभाग असावा. त्यामुळेंच संस्कृतीचें हें एकांगी स्वरूप भूकंपादिकासारख्या विलक्षण आपत्तीनें जमिनींत गाडलें जाऊन आतां उत्खननादिकांच्या साहृयानें पुन्हा प्रकाशांत आलें असावें. या सिंधु संस्कृतींतील कांहीं चिन्हांचा उलगडा तर केवळ वैदिक संस्कृतीच्या साहृयानें जसा होऊं शकतो तसा इतर कोण-त्याहि पद्धतीनें होऊं शकत नसल्यामुळें ही संस्कृति जिचा भाग आहे ती वैदिक संस्कृतीच असावी असें मानण्यास बरीच जागा आहे. मोहेंजोदरो येथील एका चित्रांत एका झाडाच्या फांद्यामधून दोन तोंडें निघालीं आहेत असें एक, व ज्यांतून सहा निघालीं आहेत असें दुसरें अशीं चित्रें आहेत. त्यावरून तीं वृक्षांत राहणारीं भूतें असावींत अशी कांहीं संशोधकांनीं अचाट शक्कल लढविली आहे. पण एका बाजूला ही संस्कृति उच्च होती असेंहि म्हणावयाचें व दुसऱ्या बाजूला ते भुताखेतांची पूजा करण्याच्या प्राथमिक अव-स्थेंत होते हाहि आग्रह धरावयाचा हा मोठा चमत्कारिक प्रकार आहे. त्याऐवजीं ऋग्वेदाच्या 'अस्य वामस्य' या सूक्तांतील 'द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते। तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्ति अनश्नंनन्यो अभिचाकशीति ।' परस्परांचे सखे असलेले दोन पक्षी एकाच वृक्षावर राहतात. त्यांतील एक त्या वृक्षाचीं फळें खातो व दुसरा कांहींहि न खातां आपल्या तेजानें प्रकाशतो. या वर्णनांतील दोन सुपर्णांचा व सहा भुवनांना सांभाळ-

णाऱ्या एका अजाचा जो उल्लेख आहे तोच या चित्रांमधून व्यक्त होतो हें ध्यानांत घेतलें म्हणजे सिंधु संस्कृतीच्या उदात्तपणालाहि तें साजेसें होतें व ही एकभागात्मक संस्कृति कोणत्या मोठ्या संस्कृतीचा भाग आहे हेंहि स्पष्ट होतें. सिंधमधील संस्कृतीची ही अवस्था पाहिल्यावर तिच्यावरून दस्यु व द्रविडांचें वेगळें कोणतेंच अस्तित्व सिद्ध होत नाहीं हें नीट लक्षांत येतें. इतर कोणत्या पुराव्यावरून तरी आर्य संस्कृतीहून वेगळी अशी द्रविड संस्कृति दाखवितां येते काय? प्रामाणिक संशोधकांनीं या बाबतींत हात टेकले आहेत. इतकेंच नव्हे तर जेथें जेथें द्रविड संस्कृति म्हणून म्हणतात तेथें तेथें ती आर्य संस्कृतीशीं मिसळलेलीच दृष्टोत्पत्तीस येते. म्हणून स्वतंत्र अशी द्रविड संस्कृति नाहीं हेंच मानणें क्रमप्राप्त ठरतें. म्हणूनच डॉ. कीथ यांनीं 'दि रिलिजन अँड फिलॉसफी ऑफ दि वेदाज्' या आपल्या ग्रंथांत हताशपणें असे उद्‌गार काढले आहेत कीं, "We have insufficient knowledge of what was true Aryan, and we know facts regarding Dravidian though only long after it had been affected by the Aryan invasion. Here as often confession of ignorance is preferable to the affectation of knowledge." आपल्याला आर्यन म्हणजे काय याचें अत्यंत तुटपुंजें ज्ञान आहे. आणि द्रविडांच्या म्हणून ज्या गोष्टी समोर करण्यांत येतात त्या आर्यांचे त्यांच्यावर पूर्ण परिणाम घडविणारें वर्चस्व प्रस्थापित झाल्यानंतरच्याच दिसतात. त्यामुळें ज्ञानाशीं प्रेम राखावयाचें तर आपलें अज्ञान कबूल करणेंच उचित ठरतें. डॉ. कीथ यांचें हें म्हणणें अतिशय योग्य आहे. डॉ. प्राणनाथ यांनीं सिंधुसंस्कृति ही मूळची आर्य संस्कृति असून येथूनच इतर लोक सुमेरी लोकांत गेल्याकारणानें हीच संस्कृति तेथें विकासली असें म्हटलें आहे. त्यासाठीं त्यांनीं संस्कृतभाषेंतील नांवांचें सिंधुसंस्कृतींत असलेले निर्देश प्रमाण मानलेले आहेत. ते ठीक असले तरी इलस्ट्रेटेड विकली ऑफ इंडियामध्यें त्यांनीं एक लेखमाला लिहून ( इ. स. १९३५ ) ऋग्वेदांत सुमेरी लोकांचा इतिहास सांगितलेला असल्याचें जें

विधान केलें आहे तें पूर्णपणें चुकीचें आहे. त्यांचें म्हणणें असें आहे कीं " इ. स. पूर्व ४००० या काळांत इजिप्त ते उत्तर हिंदुस्थान या प्रदेशांत सुमेरियन् लोकांची वस्ती होती. उत्तर हिंदुस्थानांतील पोटभाषा या प्राचीन सुमेरियन् भाषेंतून निघाल्या आहेत. संस्कृतभाषा ही सुमेरियन्, फोनिशियन्, इजिप्शियन इत्यादि भाषांच्या मिश्रणापासून बनलेली आहे. ऋग्वेद हा सुमेरियन् इतिहासाचा ग्रंथ आहे. कारण त्यामध्यें सुमेरिया आणि इजिप्त यांतील प्रांत, शहरें आणि तेथील इ. स. पूर्व ४००० ते १००० या कालांतील राजे यांचा उल्लेख आलेला आहे."

## डॉ. प्राणनाथ

बनारस हिंदू विश्वविद्यालयांतील या प्राध्यापक महाशयांना ऋग्वेदांतून सुमेरियाच्या इतिहासाचें वाचन करण्यापूर्वीं ऋग्वेद काल हा कोणत्याहि स्थितींत इ. स. पूर्व ४५०० च्या अलीकडे खासच येऊं शकत नाहीं हें भक्कम पुराव्यानें सिद्ध झालेलें सत्य प्रथम खोडून काढतां आलें पाहिजे. नाहीं तर इ. स. पूर्व १००० नंतर ऋग्वेदाची निर्मिति सिद्ध होणार कशी? मॅक्समुल्लरपासून टिळकांपर्यंत कोणीहि इ. स. पू. १००० च्या नंतर ऋग्वेदरचना झाली असें म्हणत नाहीं. शिवाय वैदिक आर्यांच्या व सुमेरी लोकांच्या लिपिसादृश्याचें प्रमाण काय? डॉ. प्राणनाथ यांनीं ती चित्रलिपि वाचण्याचा प्रयत्न केला. पण ते करतात ते उच्चार बरोबर आहेत हें ठरविण्यास आज तरी कोणतेंहि साधन नाहीं युरोपियन संशोधकांनींच त्यासंबंधीं असें कबूल केलें आहे कीं. " It must be remembered that the reading of most of the, early Sumerian proper names is merely provisional, as we do not know how the idiographs of which they are composed were pronounced in either Sumerian or Assyrian.– *Encyclopaedia Britanica*) "सुमेरियन वाङ्मयांतील विशेषनामांचे उच्चार केवळ तात्पुरते कल्पिलेले आहेत ही गोष्ट पक्की ध्यानांत ठेविली पाहिजे. सुमेरियन चित्रलिपीचा उच्चार

वस्तुतः सुमेरियन् अथवा असीरियन् कसा करीत असत हें आपणांस मुळींच ज्ञात नाहीं." (ब्रिटिश ज्ञानकोश) तरीहि या मानीव उच्चारांच्या भरंवशावर नामसाम्य कल्पून ऋग्वेद हा सुमेरियन् लोकांचा ग्रंथ आहे असें सांगावयास डॉ. प्राणनाथ सिद्धच आहेत! खाल्डियांत ऋग्वेद तयार झाला व सुमेरी लोकांचा त्यांत इतिहास ग्रथित केला आहे या विधानाच्या सिद्धीसाठीं डॉ. प्राणनाथ यांनीं पुढें केलेल्या पुराव्यावर श्री. अप्रबुद्ध यांनीं केलेलें विवेचन पाहण्यासारखें आहे. ते म्हणतात "त्यांची सारी भिस्त पहिल्या मंडलांतील १३३ व्या सूक्तावर आहे. त्यांत 'वैलस्थान' व 'महावैलस्थान' हे शब्द आहेत. त्यांत यांना खाल्डियन 'बेल'चें साम्य आढळून त्यांची सारी इमारत तयार झाली. या सूक्तांत आर्यांच्या खाल्डियन विजयाचें व घनघोर संग्राम करून त्यांनीं बाबिलोन (बैलस्थान) घेतल्याचें वर्णन आहे असें ते म्हणतात. त्यांच्या तर्कांत चूक अशी झाली आहे कीं या सूक्तांत घनघोर संग्रामाचा संबंधच नाहीं. यांत शत्रूच्या ५०–५० च्या तीन तुकड्या मरून पडल्याचें वर्णन आहे. याला घनघोर संग्राम कोणीच म्हणणार नाहीं. ऋग्वेदीय आर्यांना असे घोर संग्राम ठाऊक होते कीं ज्यांत सहा सहा हजार लोक कापून काढले जात असत. ( ऋ. मं. ७, सू. १८ ऋ. १४ ) वैलचा खाल्डियन् बेलशीं त्यांनीं जोडलेला संबंधहि चुकीचा आहे. वैल म्हणजे स्मशान अथवा चिता हेंच बरोबर आहे असें स्वतंत्र पुराव्यावरून सिद्ध होतें. ऋग्वेदांतील कित्येक शब्द मराठीनें जसेच्या तसे थोड्या फरकानें राखून ठेवले आहेत. जसें अंतुरी याला वैदिक 'अथरी,' निम्मे याला नेम, रिते याला ऋत, तसाच वैल. वैल म्हणजे चुलीला जोडून असलेली निखाऱ्याची जागा. असा वैल शब्द मराठीनें अगदीं मूळ ऋग्वेदी अर्थांत राखून ठेवला असल्यानें डॉ. प्राणनाथ यांच्या कल्पनेस आधारच रहात नाहीं."

द्रविड संस्कृति वेदांतूनच केवळ कळते व तेंहि निश्चयात्मक नाहींच असें शेष आयंगार यांनीं आपल्या ग्रंथांत मान्यच केलें आहे. ते म्हणतातः— Regarding the pre-historic period, it

has already been shown how from the Vedic literature, we could learn something.... Beyond these few references, our knowledge, as regards the political organisation of the Dravidian society in the pre-historic period is sadly defective.

(प्रागैतिहासिक काळांतील द्रविडांसंबंधीं वेदांतून काय माहिती मिळते तें दाखविलेंच आहे. या कांहीं थोड्या उल्लेखांव्यतिरिक्त आपले या समाजांसंबंधीचें ज्ञान अतिशयच तुटपुंजें आहे.) ज्या शब्दांवरून हें ज्ञान मिळतें असें मानण्यांत येतें त्यांची अवस्था 'शिश्नदेव' व 'अनास' या शब्दांच्या परीक्षणांत दाखविलीच आहे.

## भाषासाम्याचा भ्रामक पुरावा

केल्टिक, जर्मन, सॅक्सन, ग्रीक, लॅटिन टयुटॉनिक, झेंद इत्यादि भाषांचें संस्कृत भाषेशीं बळेंच साम्य जोडून या सर्वांची जनता असलेली भाषा बोलणारे लोक एकाच आर्यन वंशाचे होते हा सिद्धांत, भाषैक्यावरून वंशैक्य कसें सिद्ध होत नाहीं हें दाखवून मागेंच खोडलेला आहे. पण हें भाषांचें साम्य त्यांची एकता सिद्ध करते हेंहि म्हणणें संशयास्पदच आहे. या सर्व भाषांचें नातें संस्कृत भाषेशीं बळेंच जोडण्यांत येत असतें; व तें आपल्या इकडील मंडळी सरळपणानें मान्य करतात. ऑल्टेर तुम्स्कुंड, गेस्सेल शाफ्ट, कुल्टुर अशा तऱ्हेचा शब्दसमूह वापरणारा जर्मन, बाँ-जूद-म सिए त्रवाव्हॉय यॉसेर, त्रूव्हेर्त यूँ द्रेजॉर असें बोलणारा फ्रेंच, ह्यांच्या भाषेशीं संस्कृतचा संबंध बेलाशक जुळवून देतात हें केवढें आश्चर्य! संस्कृतशीं, वैदिक संस्कृतशीं खरा भगिनीभाव झेंद भाषेचा आहे. जर्मन, रशियनचा जर संस्कृतशीं संबंध असेल तर मग अरबीचाहि कां असूं नये? परंतु आपल्या इकडील संस्कृतज्ञांना ग्रीक, लॅटिनची किंवा अरबी-हिब्रूची नुसती ओळखहि नसावयाची. युरोपियनांनीं झोंकलेल्या गप्पांवरच त्यांची सारी भिस्त असते म्हणूनच युरोपियन लोकांचे चुकीचे अंदाजही ते

आमच्या गळीं सिद्धांत म्हणून उतरवितात. युरोपियन विद्वान् जें भाषासाम्य दाखवितात तें ठरीव, तात्पुरतें; शास्त्रदृष्टचा त्याची छाननी आतापर्यंत कोणी केलेली नाहीं असे जे श्रुतिबोधकार रामचंद्र विनायक पटवर्धन यांनीं उद्गार काढलेले आहेत ते बरेच तथ्यपूर्ण आहेत. पण भाषासाम्यावर विश्वास ठेवला तरी त्यावरून काय सिद्ध होणार? डॉ. कीथ म्हणतो "All the Indo-European languages have certain special points in which they agree with one or another of the group, and to deduce racial mixture and migration from these facts is quite impossible."

(सर्वच इंडो-युरोपीय भाषांमध्यें एखाद्या दुसऱ्या गटाशीं साम्य दाखविणारीं विशिष्ट स्थळें आहेत व त्यावरून वंशैक्य, वंशमिश्रण वा आक्रमण घडून आल्याचें सिद्ध करणें केवळ अशक्य आहे.) शिवाय हें दाखविण्यांत येणारें भाषासाम्यहि एक प्रकारें भ्रामक आहे. कारण वैदिक आर्यांना जिचा अभिमान आहे ती त्यांची भाषा चौसष्ट वर्णयुक्त आहे. ते चौसष्ट वर्ण इतर कोणत्याच भाषेंत नाहींत. पाश्चात्य भाषांत अर्धस्वर (But, put, can,aught) आहेत ते वैदिक भाषेंत मुळींच नाहींत. उदात्त, अनुदात्त व स्वरित या स्वरांसहित वैदिक शब्दांचा उच्चार होतो व या स्वरांमुळें शब्दांचे अर्थ, समास, विभक्ति, काळ इत्यादि पालटतात. इतर भाषांतील व्यवस्थेंत स्वरांच्या योगानें असें परिवर्तन होत नाहीं. भाषासाम्याच्या दुंदुभिध्वनींत वैदिक भाषेचें हें स्वरूप अणुमात्रहि ध्यानांत घेतलेलें नाहीं. व तें पाहिलें म्हणजेस म्य कल्पितांना पाऊल किती फुंकून टाकावें लागेल तें ध्यानांत येतें.

याप्रमाणें भाषासाम्यें, ऋग्वेदांतील आर्य शब्दाचा इतिहास उत्खननांतून बाहेर पडलेल्या सिंधु संस्कृतीचे अवशेष, सुमेरियन लिपि व तिचें उच्चारणशास्त्र व शब्दांना पीडा देऊन त्यांचे बळेंच करण्यांत येणारे अर्थ इत्यादिकांचा विचार करून व त्याच्याच जोडीला लिंगपूजेसारख्या संप्रदायांचें मूळ यांचें निरीक्षण करून आर्य शब्द वेदांत वंशवाचक नाहीं; आर्यांचे डोळे, नाक, कान,

कातडीचा रंग इत्यादींसंबंधाचें करण्यांत येणारें वर्णन केवळ एक थोतांड आहे; ऋग्वेदावरून आर्य हा शब्द यज्ञक्रिया करणारे लोक, त्रेसष्ट किंवा चौसष्ट वर्णांची भाषा बोलणारे लोक व समाजांतील सुसंस्कृत लोक या अर्थानेंच येतो; दासालाहि आर्य होण्याची शक्यता असून आर्य काळेहि होते हें आपण पाहिलें. त्याचप्रमाणे चपटचा नाकाचे व लिंगपूजक द्रविड संस्कृतीचे लोक ही केवळ शब्दांना पीडा देऊन केलेली भ्रामक कल्पना असून अशा कोणत्याहि भिन्न संस्कृतीचें अस्तित्व वेदांवरून सिद्ध होत नाहीं व द्रविड संस्कृतीचें अस्तित्व मानावयास तिचा दुसरा कोणताहि शुद्ध आविष्कार दाखविणारा पुरावा नाहीं हेंहि आपण पाहिलें. ऋग्वेदांत दस्यु, दास इत्यादि शब्द येतात. तसेंच असुर याहि शब्दाचा अनेकवार उपयोग होतो. यांचें तरी वेदावरून काय स्वरूप आहे तें येथें संक्षेपानें पाहणें अवश्य आहे. ऋग्वेदांत दस्यु व दास हे दोन्ही शब्द आढळतात. त्यानंतरच्या वाङ्मयांत दस्यु हा शब्द आढळत नाहीं. दास शब्द मात्र आढळतो. ऋग्वेदांतील दस्यु आणि दास हे दोन्ही शब्द एका अर्थाचे आहेत यांत शंका नाहीं. दस्यु हा शब्द ऋग्वेदांत एकोणऐंशी वेळां आलेला आहे. व दास शब्द छपन्न वेळां आलेला आहे. या दोन्ही शब्दांचा विशेष असा आहे कीं, त्यांतील बहुतेक उल्लेख इंद्राशीं त्यांच्या झालेल्या संघर्षासंबंधींचे आहेत. व कांहीं ठिकाणीं मरुत, रुद्र इत्यादिकांशीं त्यांच्या नाशाचा संबंध जोडलेला आहे. फारच थोडचा ठिकाणीं मानव म्हणून दस्यूंचा उल्लेख येतो. दासांचीहि तीच अवस्था आहे. दासविषयक एका स्तोत्रांत तर ज्या संपत्तीनें दास आर्य होतो ती संपत्ति मागितलेली आहे. या सर्व उल्लेखांवरून दास व दस्यु हे दोन्हीहि देवयोनिविशेष आहेत. निदान ते अपार्थिव योनिविशेष आहेत हें स्पष्ट होतें. त्यांचें व इंद्राचें अथवा इतर देवांचें जें युद्ध वर्णिलें आहे, तें दाशराज्ञ युद्धासारखें वर्तमान युगांतील ऐतिहासिक घटना म्हणून वर्णिलेलें नसून ‘प्रल्हादा कारणें नरसिंह झालासी’ या ओळींत तुकारामांनीं नृसिंहावताराचें ज्या पद्धतीनें

वर्णन केलें त्याच पद्धतीनें इंद्राच्या वर्णनाच्या ओघांत अतिप्राचीन देवकृत्यांचें वर्णन या नात्यानें आलेलें आहे हें चांगलें लक्षांत ठेवणें आवश्यक आहे. ऋग्वेदांतील देवकल्पना व इंद्र यांची नीट कल्पना असली तर हे दास व दस्यु उत्कृष्ट उलगडतात.

## ऋग्वेदांतील देव व इंद्र

ऋग्वेदांतील देव व इंद्र या अपार्थिव विभूति असून त्यांना विग्रह (शरीर) आहे. वैदिक लोक आपल्या देवतेचा आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक अशा तिन्ही प्रकारांनीं निर्देश करतात व संतांना ज्याप्रमाणें पंढरीचा पाषाणाचा पांडुरंग व चिन्मय पांडुरंग यांची एकत्वानें व वेगळेपणानेंहि प्रतीति येत असे, तसेंच वैदिक द्रष्टयांचेंहि त्यांच्या देवतेच्या संबंधांत आहे. या सर्व देवतांत इंद्र हा ऋषींचा सर्वांत प्रिय देव असून तो सर्व देवतांत श्रेष्ठ मानण्यांत आला आहे. उत्तर भारतांत राम, कृष्ण व महाराष्ट्रांत पांडुरंग यांचें जें भक्तांच्या भावजगतांत स्थान आहे तेंच ऋग्वेदांत इंद्राचें आहे. हा इंद्र वारंवार वृत्रवध करतो व इतर तामसी शक्तींचाहि संहार करतो. देवाधिदेव इंद्र व देव यांच्या विषयींची ही ऋग्वेदीय ऋषींची धारणा ध्यानांत घेऊन दस्यूंचा उल्लेख असलेल्या ऋग्वेदांतील ऋचा नीट तपासल्या तर काय आढळतें? बहुतेक ऋचांतून इंद्राचें प्रेमळ व उत्कट भावानें वर्णन केलें असून त्याचा पराक्रम म्हणून त्यानें दस्यूंना मारल्याचे उल्लेख आढळतात. हे सारे उल्लेख त्या देवतांना आळविण्यासाठीं त्यांनीं फार पुरातन काळीं केलेल्या पराक्रमांचे उल्लेख आहेत. व नामदेव, तुकाराम इत्यादि संतांनीं पांडुरंगाला आळवितांना त्याच्या हिरण्यकश्यपु, रावण, हिरण्याक्ष, हयग्रीव इत्यादि दैत्यांच्या वधाच्या पराक्रमी कृत्यांचें ज्या भावोत्कटतेनें वर्णन केलें आहे त्याच भावोत्कटतेनें हेंहि वर्णन आलें आहे. अपार्थिव दिव्य विभूतीनें अपार्थिव तामसी शक्तींचा केलेला आधिदैविक क्षेत्रांतील विध्वंस व तोहि तुकारामानें नारसिंहाच्या पराक्रमाचा करावा अशा प्राचीन काळचा म्हणून ऋग्वेदीय ऋषि वर्णन करीत आहे हें ध्यानांत घेतलें म्हणजे आर्य

द्रविडांच्या झगड्याचा ऋग्वेदाशीं कसा संबंध नाहीं हें स्पष्टपणें ध्यानांत येईल. दस्यू, असूर हे आधिदैविक क्षेत्रांतील तामसी शक्ती असून, ज्याप्रमाणें मधल्या काळांत समान गुणधर्मांमुळें इस्लामी अत्याचाऱ्यांना दैत्य म्हणत, तसेंच तशा समान गुणधर्मांवरून संस्कृतिहीन, नियंत्रणहीन, अयज्वे, अव्रती, अशुद्ध भाषा बोलणारे व्यक्तिसुखांत निमग्न, असंयमी व भोगवादी लोकांनाहि वैदिक लोक हे दस्यू, असूर इत्यादि शब्द लावूं लागले हें उघड होतें.

## सुर व असुर

असुर या शब्दामध्यें अ हा उपसर्ग व त्यापलीकडे सुर हें नाम आहे. सुर् हा सहाव्या गणाचा धातु असून त्यापासूनच सुर हा शब्द झालेला आहे. सुर म्हणजे नियंत्रण करणें, नियमन करणें व्यवस्था लावणें. ज्यांच्या जीवनाला निग्रहानुग्रहात्मक हेतु आहे व विशेष प्रकारचें नियंत्रण असून ज्यांचें अस्तित्व नियमबद्ध आहे अशा आधिदैविक क्षेत्रांतील देव म्हणविण्यांत येणाऱ्या शक्तींना सुर असें म्हणतात. अ हा उपसर्ग नकारात्मक अथवा नञर्थी आहे, संस्कृत भाषेंत नकाराचे सात अर्थ होतात (नञर्थाः सप्त कीर्तिताः) हें प्रसिद्धच आहे. पण ऋग्वेदांत अ या नञ् चा आणखी एका विशेष अर्थानें उपयोग करण्यांत आलेला आहे. 'अति' या उपसर्गाचा उपयोग जसा एखाद्या गोष्टीहून श्रेष्ठ, तिच्या आटोक्यांत न येणारा, तिच्या पलीकडचा या अर्थीं करण्यांत येतो, त्याचप्रमाणें त्याच अर्थानें ऋग्वेदांत अ या उपसर्गाचा उपयोग करण्यांत आलेले कांहीं शब्द आढळतात. अमका एक विशेष अमक्या ठिकाणीं नाहीं हें नकारानें दाखविलें म्हणजे त्याचे दोन अर्थ होतात. एक तर वैशिष्टय अंगीं नसण्याच्या पातळीवर येण्याची त्याची श्रेणी नसून तो खालच्या पातळीचा आहे किंवा तो इतक्या उंच पातळीचा आहे कीं त्याच्यापर्यंत हें वैशिष्टय पोहोचूंच शकत नाहीं. किंवा या वैशिष्टयाच्या कक्षेंत तो पदार्थ येऊंच शकत नाहीं. या दुसऱ्या अर्थानें असुर शब्दाचा उपयोग ऋग्वेदांत कांहीं ठिकाणीं करण्यांत आलेला आहे. सुर म्हणजे

ज्यांचें अस्तित्व व जीवन नियंत्रित व नियमबद्ध आहे अशी देवशक्ति. असुर म्हणजे या सर्व नियंत्रणापलीकडचा, जो सर्वांचा नियंता, पण ज्याचा कोणी नियंता असू शकत नाहीं असा देवाधिदेव परमेश्वर. स्पंदनात्मक प्राणतत्त्वास वायू हें नांव मिळण्यापूर्वी मूलतत्त्वांतून व्यक्तदशेस आल्याबरोबर त्याला 'तनूनपात' ही संज्ञा मिळते हें सांगताना "तनूनपात उच्यते गर्भ आसुरः" असें म्हटलें आहे. येथें असुर म्हणजे मूल परमेश्वर व त्यापासून निर्माण झालेली जी शक्ति ती आसुर होय. असुर शब्दाचा देवाधिदेव या अर्थी जसा नियमनातीत या विशेष अर्थानें ऋग्वेदांत प्रयोग आहे तसाच त्याच्या अगदीं उलट अर्थानें जे कोणत्याहि नियमनांत व नियंत्रणांत राहूं इच्छीत नाहींत असे भोगवादी व उच्छृंखल आणि स्वैरवृत्तीचे या हीन अर्थीहि असुर शब्द येतो. किंबहुना या अर्थानें तो अधिक वेळां येतो. व नंतरच्या वाङ्मयांत तर त्याचा पहिला अर्थ पूर्णपणें लुप्त होऊन तो याच अर्थानें रुढ झालेला आहे. पारशांच्या अवेस्त्यांत मात्र ऋग्वेदांतील असुर शब्दाचा पहिला अर्थ शिल्लक आहे. असुर शब्दाचा पुढें रूढ झालेला दुसरा अर्थहि ऋग्वेदांत आहेच. जसें:– 'अनायुधासो असुरा अदेवाश्चक्रेण तां अप वप ऋजीषितं' 'हे इंद्रा ! हे आमचे प्रतिस्पर्धी कसल्याहि शस्त्रास्त्रांना न जुमानणारे म्हणजे अर्थात् अतिशय प्रबल, त्याप्रमाणें असुर म्हणजे ज्यांच्या वागण्यास कांहीं ताळतंत्र नाहीं म्हणजे सर्व प्रकारच्या नियमधर्मांना धाब्यावर बसविणारे आणि अदेव म्हणजे स्वतःला देवांपेक्षाहि अधिक समजणारे म्हणजे पराकाष्ठेचे उन्मत्त असे आहेत, म्हणून आमच्या साह्यास येऊन तूं त्यांचे निर्मूलन करून टाक.' मुळांत देवयोनि विशेष असुरांना अथवा आधिदैविक क्षेत्रांतील तामसी शक्तींना उद्देशून असलेला असुर शब्द तत्सदृश गुणांच्या माणसांना कसा लावूं लागले याचें ही ऋचा म्हणजे उदाहरणच होय. दस्यूंचें केवळ इंद्र व इतर देवतांनींच केलेले निर्देश पाहिले म्हणजे प्रथम तो शब्द आधिदैविक क्षेत्रांतील असून नंतर सदृश गुणांच्या माणसांना लावला जाऊं लागला हें स्पष्ट होतें.

मुळांत याप्रमाणेंच गुणवाचक शब्द असल्यामुळें वाईट आचरण करणारे, स्वैर व उच्छृंखल प्रवृत्तीचे जे अयज्वे ते दस्यू, व भजनशील, संस्कृतिसंपन्न, संयमी व शुद्ध वाणीचे ते आर्य असेंच ऋग्वेदांवरून ठरतें. मानववंशशास्त्र,कपालमितिशास्त्र इत्यादि शास्त्रें एकतर अनुमानधबक्याचीं; तीं निश्चयार्थक नाहींत. त्यावरून हिंदुस्थानांत वेगवेगळ्या वंशांचीं व पुराणवस्तुसंशोधनशास्त्रावरून वेगवेगळ्या थरांतील माणसें होतीं असें ठरेल. पण समाज एकथरी असतो व एका मानव वंशाची एकच संस्कृति असते असें माझें म्हणणेंच नाहीं. उलट मी या सिद्धांताच्या विरोधी आहें. इंग्लंडमध्यें अनेक वंशांचें अस्तित्व असूनहि संस्कृति एकच आहे. भारतांत मानववंश अनेक असतील पण वैदिक संस्कृति ही एकच संस्कृति होती असेंच मला म्हणावयाचें आहे.

याप्रमाणें आर्य हा शब्द वंशावाचक असल्याचें व द्रविड नि अनार्य हाही वंशवाचक असल्याचें व त्यांच्या संघर्षाचें प्रमेय ऋग्वेद व वैदिक वाङ्मयावरून सिद्ध होत नाहीं. अर्थातच या शब्दांच्या उघड दिसणाऱ्या गुणवाचकत्वामुळें, आर्यांच्या रंगरूपादिकांच्या वरून ते भारतांतील मूळ रहिवाशांहून वेगळे असण्यासंबंधींच्या कल्पना वेदाच्या आधारें सिद्ध करतां येत नाहींत. त्यामुळें भाषासाम्यावरून वंशैक्याची कल्पना करून वैदिक संस्कृति बाहेरून भारतांत आली हें सिद्ध करतां येत नाहीं. पण वैदिक संस्कृतीचे आर्य लोक एका आर्यन वंशाचें व युरोपियन लोकांचे समवंशी नसले तरी त्यांच्या संस्कृतीचें मूळ उत्तर ध्रुवप्रदेशासारख्या ठिकाणीं असल्याचें लोकमान्य टिळकांनीं सिद्ध केलें आहे. वैदिक वाङ्मयांत ज्यांच्या जीवनाचें प्रतिबिंब उमटलें आहे त्यांच्या संस्कृतीचें मूळ भारतांतच आहे कीं तें उत्तर ध्रुवप्रदेशांत? आपण मूळ भारतांतले कीं बाहेरून भारतांत आलेले ?

## व्याख्यान पांचवें

# आर्यांचें मूलस्थान

मागच्या व्याख्यानांतील प्रतिपादनावरून आर्य व अनार्य हे वंश-वाचक शब्द नसून गुणवाचक आहेत व वेदांवरून द्रविड आणि अनार्य संस्कृतीचें अस्तित्व सिद्ध होण्यासारखें नाहीं हें स्पष्ट झालेंच आहे. वेदानंतरच्या काळांत अशी कोणती संस्कृति असल्याचें सिद्ध झालें तरी ती वैदिक संस्कृतीचीच उपजीव्य ठरत असल्यामुळें येथें त्या गोष्टीचा विशेष विचार करण्याचें कारण नाहीं. तसेंच त्या प्रतिपादनावरून मध्य आशिया इत्यादि वैदिक लोकांचीं पाश्चात्यांनीं व त्यांच्या पौरस्त्य मानसपुत्रांनीं कल्पिलेलीं मूलस्थानें खोटीं ठरलेलीं असून लोकमान्य टिळकांच्या ध्रुवासारख्याच अढळ असलेल्या ध्रुवसिद्धांतावर आतां संशोधन स्थिरावलेलें आहे हीहि गोष्ट ध्यानांत येईल. या सिद्धांताच्या दुंदुभिध्वनीसमोर त्याच्या आक्षेपकांचे आवाज लोपल्यासारखे दिसत असून आर्य हे मूळ उत्तरध्रुवप्रदेशांत राहणारे होते हें संशयातीत प्रमेय त्या सिद्धांता-वरून गृहीत धरण्यांत येतें. त्यामुळें वैदिक लोकांच्या मूलस्थाना-संबंधीचें माझें मत ध्रुवसिद्धांतापासून प्रारंभ करून मांडणें व त्या आधींच्या कल्पना असिद्ध ठरल्यामुळें त्यांच्याकडे दुर्लक्ष करणें उचित ठरेल. टिळकांचा हा ध्रुवसिद्धांत आहे तरी काय ?

### लोकमान्यांचा ध्रुवसिद्धांत

ओरायन् ग्रंथ प्रसिद्ध केल्यावर लोकमान्यांच्या वेदवाङ्मयाच्या वाचनांत त्यांना असें आढळून आलें कीं ऋग्वेदांतील कांहीं वर्णनें हिंदुस्थानांतल्या व जगांतील इतर कोणत्याहि आर्यांचें मूलस्थान म्हणून सांगण्यांत येणाऱ्या भूप्रदेशाशीं जुळण्यासारखीं नाहींत. व

त्यांचा करण्यांत येणारा अर्थ हा ओढून ताणून करण्यांत येत असून तो विचारान्तीं चुकीचा ठरतो. तसेंच त्या वर्णनाचा उलगडा केवळ ध्रुवप्रदेश व ध्रुवमंडळविशिष्ट प्रदेश या ठिकाणीं वैदिक लोक होते असें गृहीत धरलें तरच होऊं शकतो. पण असें जरी त्यांना वाटत असलें तरी ध्रुवप्रदेशाचें कमालीचें थंड हवामान पाहतां तेथें मनुष्यवस्ती असणें अशक्य आहे असें त्यांना वाटे. ध्रुवप्रदेशावरील हवामान केव्हांतरी मनुष्यवस्तीला योग्य असें समशीतोष्ण असेल असें त्यांच्या कल्पनेंतहि नव्हतें. पण भूगर्भ-शास्त्राच्या संशोधनावरून ध्रुवप्रदेश व ध्रुवमंडळविशिष्ट प्रदेश केव्हां तरी मनुष्यवस्तीला योग्य होते असा पुरावा त्यांना उपलब्ध झाला; व हिमप्रलयाच्या उपपत्तीवरून तेथील मनुष्यवस्ती उठून जाण्याचें कारणहि त्यांच्या मनांत ठसलें व त्यामुळें ऋग्वेदांतील गूढ वर्णनांचा नीट उलगडा होऊन वैदिक आर्यांचें मूलस्थान उत्तर ध्रुवच होय हा सिद्धांत त्यांनीं आपल्या " दि आर्क्टिक होम इन दि वेदाज" या ग्रंथाच्या आधारें मांडला. ते म्हणतात : 'आर्यलोक हे मूळचे आशिया किंवा युरोप यांतील नसून त्यांचें मूलस्थान नव पाषाण युगांत उत्तर ध्रुवाजवळ कोठें तरी होतें व तेथून ते दक्षिणे-कडे आशिया व युरोपमध्यें गेले; आणि त्याचें कारण केवळ अनि-वार्य मनःप्रवृत्ति एवढेंच नसून त्यांच्या मूलस्थानांतील हवामानांत होणारे अहितकारक फेरबदल हे होत. या म्हणण्याला पारशी लोकांच्या धर्मग्रंथामध्यें पुष्कळच पुरावा आहे. आजपर्यंत त्यांतील गोष्टी निरर्थक म्हणून पंडितांनीं सोडून दिल्या आहेत व त्यांस वेदांत कांहीं पुरावाहि नाहीं असें तें म्हणतात. मनुष्यप्राणी हा हिमकालानंतरचा आहे अशी त्यांची पूर्वकल्पना होती. परंतु नवीन शास्त्रीय शोधांनीं अतिप्राचीन कालदर्शक असें साधन आतां आप-ल्याला उपलब्ध करून दिलें असल्यामुळें अवेस्त्यांत वर्णिलेल्या गोष्टी इतिहास असून त्यांस वेदांचाहि भरपूर पाठिंबा आहे असें आपल्याला दाखवितां येणार आहे. कांहीं प्रसिद्ध शास्त्रज्ञांनीं सर्व वनस्पति व जीवकोटींचें आदिस्थान उत्तरध्रुव असें सांगितलें आहे;

व आर्य लोकांचें अगदीं आद्यस्थान उत्तर ध्रुवाजवळ कोठें तरी होतें हें सिद्ध करण्यास वेद व अवेस्ता यांमध्यें भरपूर पुरावा आहे हेंहि आपणांस दाखवितां येईल."

**ध्रुवविशिष्ट व ध्रुवमंडळविशिष्ट गोष्टी**

पृथ्वीवरील इतर कोणत्याहि भूप्रदेशांत कधींच न आढळणारीं व केवळ ध्रुवप्रदेशांत व ध्रुवमंडळविशिष्ट प्रदेशांतच आढळणारीं दृश्यें पुढीलप्रमाणें सांगतां येतील :—

**ध्रुवविशिष्ट गोष्टी**

(१) सूर्य दक्षिणेस उगवतो.

(२) तारे उगवत किंवा मावळत नाहींत. तर क्षितिजसमान्तर पातळ्यांत ते वाटोळे फिरून चोवीस तासांत एक प्रदक्षिणा पुरी करतात. या ठिकाणीं उत्तर खगोलार्ध मात्र नेहमीं क्षितिजावर असून संपूर्ण वर्षभर दिसत असतें; परंतु खालचें म्हणजे दक्षिण खगोलार्ध कधींहि दिसत नाहीं.

(३) सहा महिन्यांचा एक अखंड दिवस व तितकीच एक अखंड रात्र मिळून तेथलें एक वर्ष होतें.

(४) तेथें वर्षांतून एकच सकाळ व एकच संध्याकाळ असते. म्हणजे सूर्य तेथें वर्षांतून एकदांच उगवतो व एकदांच मावळतो. परंतु तेथला संधिप्रकाश, मग तो सकाळचा असो कीं संध्याकाळचा असो, सारखा दोन महिने, (म्हणजे चोवीस तासांचा एक अवधि अशा ६० अवधींइतका) असतो. हा रक्तवर्ण संध्याप्रकाश आपल्या इकडल्याप्रमाणें फक्त पूर्वेस (सकाळीं) किंवा पश्चिमेस (संध्याकाळीं) असा एका ठिकाणींच न दिसतां, क्षितिजावर सारख्या वाटोळ्या प्रदक्षिणा करीत असतो. हा त्याच्या प्रदक्षिणेचा क्रम सूर्यबिंब क्षितिजावर येईतोंपर्यंत चालू असतो. आणि नंतर सूर्यही हा क्रम पुढें सहा महिने चालू ठेवतो; म्हणजे तोहि दर चोवीस तासांत एक याप्रमाणें पाहणाऱ्याच्या भोंवतीं प्रदक्षिणा करीत राहतो. आपल्या इकडल्याप्रमाणें चोवीस तासांनीं उगवत किंवा मावळत नाहीं.

## ध्रुवमंडळविशिष्ट गोष्टी

(१) सूर्य नेहमीं पाहणाऱ्याच्या खस्वस्तिकाच्या दक्षिणेस असेल, परंतु समशीतोष्ण कटिबंधांतहि ही गोष्ट प्रत्ययास येत असल्यामुळें तिला विशेष मानतां येत नाहीं.

(२) या ठिकाणीं बरेच तारे नेहमीं क्षितिजावर राहून ध्रुवताऱ्याभोवतीं प्रदक्षिणा करतात; म्हणून ते सतत दिसत असतात. बाकीचे तारे समशीतोष्ण कटिबंधांतल्याप्रमाणें उगवतात व मावळतात; पण त्यांचे फिरण्याचे मार्ग जास्त तिरके असतात.

(३) येथें वर्षाचे तीन भाग असतात: (१) एक अखंड दीर्घ रात्र; ही मकर संक्रमणाचे वेळीं होऊन विवक्षित ठिकाणच्या अक्षांशाच्या मानानें ती चोवीस तासांहून मोठी व सहा महिन्यांहून लहान अशी असते. (२) या दीर्घ रात्रीच्या जोडीला एक अखंड दीर्घ दिवस; हा कर्क संक्रमणाचे वेळीं होतो. (३) आणि बाकींच्या वर्षाच्या भागांत साध्या रात्रीदिवसांचें एक चक्र; यांपैकीं रात्र दिवस मिळून होणारा काल चोवीस तासांहून जास्त नसतो. दीर्घ रात्रीच्या मागाहून येणारा दिवस तेव्हांपासून होणाऱ्या अहोरात्रांतील रात्रीपेक्षां लहान असतो व पुढें तो मोठा होत होत त्याचा वर सांगितलेला दीर्घ दिवस होतो. या दीर्घ दिवसामागून येणारी रात्र, तेव्हांपासून पुनः सुरू होणाऱ्या अहोरात्रांतील दिवसापेक्षां लहान असते व पुढें मोठी होत होत ती वर सांगितलेल्या दीर्घ रात्रीला मिळण्याच्या वेळीं वर्ष संपतें.

(४) या दीर्घ रात्रीच्या शेवटीं येणारी उषा कित्येक दिवसपर्यंत सारखी राहते. परंतु हा तिचा अवधि तसेंच तिचा तेजस्वीपणा हे ठिकठिकाणच्या अक्षांशांच्या मानानें ध्रुवावरील उषेच्या पेक्षां कमी असतात. ध्रुवापासून थोड्याशा अंशापर्यंतच्या प्रदेशांत चक्राकार फिरणाऱ्या उषःकाळच्या तेजाचा देखावा त्याच्या एकंदर अवधीपैकीं बराच वेळ दिसत असतो. पण साध्या अहोरात्रांच्या दरम्यान येणाऱ्या उषा इतर ठिकाणांसारख्याच एक दोन तास मात्र राहतात.

अखंड दीर्घ दिवसांमध्यें सूर्य क्षितिजावर असतांना ध्रुवावर फिरतो त्याप्रमाणेंच पाहणाऱ्याच्या भोंवतीं फिरत असतो; परंतु तेथच्याप्रमाणें त्याच्या प्रदक्षिणा येथें क्षितिजसमान्तर न होतां बऱ्याच तिरक्या होतात. अखंड दीर्घ रात्रीं तो सारखा क्षितिजाखालीं असल्यामुळें मुळींच दिसत नाहीं. आणि राहिलेल्या संवत्सरभागांत उगवून मावळून चोवीस तासांपैकीं कांहीं वेळ तरी तो क्षितिजावर येतो. हा वेळ अर्थात् अक्षांशाच्या मानानें कमी जास्त असतो.

या ध्रुवप्रदेशविशिष्ट व ध्रुवमंडळविशिष्ट गोष्टी पृथ्वीवरील दुसऱ्या कोणत्याहि भागांत दृष्टीस पडावयाच्या नाहींत. ध्रुव हे अचल असल्यामुळें लाखों वर्षांपूर्वीं ते जे होते तेच आजही आहेत, व म्हणून ध्रुव प्रदेशावरील या गोष्टी पूर्वीं जशा दृष्टीस पडत होत्या तशाच त्या आजही दिसतात. या गोष्टींचे उल्लेख जर वेदवाङ्मयांत आढळले तर वैदिक लोक या गोष्टी दिसणाऱ्या प्रदेशांत कधीं काळीं रहात असले पाहिजेत हें उघडच सिद्ध होणारें आहे.

ऋग्वेदाचें वरवर निरीक्षण केलें तरी वैदिकांची यज्ञपद्धति चांद्र व सौर कालमानांनीं नियमित केलेली होती. दैनिक, पाक्षिक, मासिक, त्रैमासिक, षाण्मासिक व वार्षिक असे त्यांचे यज्ञ असल्यामुळें आजचे आपले दिवस व रात्रीचें मानच त्यांचेहि दिवसरात्रीचें मान असून ते ध्रुव प्रदेशांतील मान नव्हतें असें स्पष्ट दिसतें. तैत्तिरीय संहिता आणि ब्राह्मण यांत तीस दिवसांचा चान्द्रमास व बारा महिन्यांचें वर्ष यांचा स्पष्ट उल्लेख आहे. वर्षाचे सहा ऋतु, अयनबिन्दु व संपातबिन्दु, इतकेंच नव्हे तर पूर्वपश्चिम बिन्दूहि वैदिकांना माहीत होते. तसेंच आजच्या प्रमाणेंच ३६० दिवसांचें वर्ष व अधिक महिनाहि त्यांना माहीत होता हें "वेदमासो धृतव्रतो द्वादश प्रजावतः वेदाय उपजायते" ( ऋग्वेद १-२५-८ ) यावरून स्पष्ट दिसतें. यामुळेंच वाईचे मागच्या पिढींतील धर्ममार्तंड काशीनाथशास्त्री लेले यांनीं लोक-

मान्यांच्या ध्रुव सिद्धांतावर आक्षेप घेऊन तो मिथ्या असल्याचें प्रतिपादन केलें होतें. पण टिळकांचें म्हणणें ऋग्वेद रचणारे वैदिक ऋषि हे उत्तर ध्रुवाजवळ राहात होते असें नाहींच; त्यांचे पूर्वज फार प्राचीन काळीं तेथें नांदत होते व त्या पूर्वजांनीं प्रत्यक्ष अनुभविलेल्या गोष्टी परंपरेनें वैदिक ऋषींना माहीत होत्या एवढेंच त्यांना म्हणावयाचें आहे. त्यांचा प्रश्न मूलगृहासंबंधींचा आहे व म्हणून असे उल्लेख थोडे असले तरी ते महत्त्वाचे आहेत. आपण ज्या ध्रुवमंडळविशिष्ट गोष्टी पाहिल्या त्यांचे उल्लेख ऋग्वेदांत पुढीलप्रमाणें आढळतातः–

यो अक्षेणेव चक्रिया शचीभिर्विष्वक्तस्तम्भ पृथिवीमुत द्याम्।" (ऋग्वेद १०-८९-४) ज्याप्रमाणें आस चक्रांना धरतो त्याप्रमाणें जो आपल्या शक्तीनें पृथ्वीला आणि आकाशाला पृथक् धरून ठेवतो.

अवंशे द्यामस्ताभयत्। ( ऋग्वेद २-१५-२ ) काठीशिवाय आकाशाला धरून ठेवलें.

य इमे द्यावापृथिवी जजान उर्वी गभीरे रजसी सुमेके अवंशे धीरः शच्या समैरत्। (ऋग्वेद ४-५६-३)

जो या विस्तीर्ण द्यावापृथिवीला उत्पन्न करून त्या सुन्दर व विस्तीर्ण लोकास स्तम्भाशिवाय आपल्या शक्तीनेंच प्रेरिता झाला.

स सूर्यः पर्युरू वरांस्येन्द्रो ववृत्याद्रथ्येव चक्रा। (ऋग्वेद १०-८९-२)

तो सूर्यरूपी इन्द्र विशाल विस्ताराला म्हणजे तारागणयुक्त आकाशाला रथाच्या चाकाप्रमाणें वाटोळें फिरविता झाला.

याप्रमाणें तारागणांनीं युक्त अशी आकाशाची चक्राकार गति व त्याला स्तम्भाशिवाय धरून ठेवणें या गोष्टींचा एकत्र विचार केला तर हें केवळ ध्रुवप्रदेशविशिष्ट दृश्य आहे हें स्पष्ट होईल. शीतोष्ण व उष्ण कटिबन्धांत नक्षत्रांची चक्राकार गति दिसली तरी स्तम्भाशिवाय आकाशाला त्या चक्राकार गतीच्या अनुसार सावरून धरण्याची कल्पना केवळ ध्रुवप्रदेशांतील दृश्यावरूनच होणारी आहे. तसेंच आपल्याकडे देवांचा

दिवस व त्यांची रात्र हीं मनुष्यांच्या सहा सहा महिन्यांएवढी असतात व आपलें वर्ष म्हणजे त्यांचें केवळ एक अहोरात्र होय ही कल्पना हाडींमांसीं खिळलेली आहे. ही कल्पना ब्राह्मण ग्रन्था-इतकी प्राचीन आहे हें तैत्तिरीय ब्राह्मणांतील "एकं वा एतद्देवानां अहः यत्संवत्सरः" ज्याला संवत्सर म्हणतात तो देवांचा एक दिवस या वाक्यावरून उघड होते. ही कल्पना केवळ ध्रुवविशिष्ट दिन-मानालाच लागू पडणारी आहे व इतर कोणत्याही भूभागाला मुळींच लागू पडणारी नाहीं हें सांगावयास नकोच. खास ऋग्वेदामध्यें या सहा महिन्यांच्या दिवसाचा व रात्रीचा स्पष्ट उल्लेख नसला तरी झेंद अवेस्त्यामध्यें तो आहे. पण ऋग्वेदांतही दीर्घ रात्र व दीर्घ दिवसाचे उल्लेख आहेत. ऋग्वेदांतील परिशिष्टांत दुर्गा म्हणून घोर दीर्घ शारदीय रात्रीचा उल्लेख व तिची जी प्रार्थना केलेली आहे त्यावरून ती तीनशेसाठ दिवसांच्या वर्षांतील रात्र नव्हे, हें सांगण्याचेंही कारण उरत नाहीं. ऋग्वेदांतील उषासूक्तें जर पाहिलीं तर ती उषा हिंदुस्थानांतील अहोरात्रांची नसून ध्रुवप्रदेशांतील कित्येक दिवस टिकणारी उषा होय हें ध्यानांत यावयास वेळ लागत नाहीं. आपण ध्रुवमंडळावर व ध्रुवप्रदेशांत उषा कोणत्या पद्धतीची असते हें पाहिलें आहे. आतां त्यासंबंधानें ऋग्वेदांतील ऋषि काय म्हणतो तें पाहिलें म्हणजे उलगडा होतो. उषा ही ऋग्वेदांतील सर्वांत महत्त्वाची देवता असून वीस सूक्तांत तिचें वर्णन केलेलें आहे. हीं उषासूक्तें इतकीं मनोहर आहेत कीं त्यांचें स्वरूप पाहिल्यावर रोज दिसणाऱ्या उष्ण व समशीतोष्ण कटिबन्धांतील तास दीड तासाच्या उषेसाठीं वैदिक ऋषींनीं आपली प्रतिभा इतकी खर्चीं घातली असेल असें वाटू नये. वैदिक उषेचा दीर्घ काळ ऐतरेय ब्राह्मणावरूनही सिद्ध होतो. "गवामयनं" नांवाच्या सत्रास आरम्भ करण्यापूर्वीं होत्यानें एक सहस्र मन्त्रांचें पठण करावयाचा विधि आहे. या मन्त्रांना आश्विनशस्त्र असें म्हणतात. तें उषा, अग्नि व अश्विनौ या प्रातःकालीन देवतांना उद्देशून

आहे. तें शस्त्र "तयोः काल ऊर्ध्वमर्धरात्रात् प्रकाशीभावस्य अनुविष्ठम्भं" रात्रीचा अन्धार उषःकालाच्या प्रकाशानें नाहींसा होऊं लागण्याच्या वेळीं म्हणावें या निरुक्तांतील वचनावरून मध्यरात्रीनंतर उषाप्रकाशाच्या वेळीं म्हणावयाचें आहे असें दिसतें. हें शस्त्र पठण करण्यापूर्वी काय करावें हें सांगतांना ऐतरेय ब्राह्मणांत म्हटलें आहे कीं "नाश्विनं हैव तद्यदर्वाक् सहस्रं तस्मात् तत्सहस्रं वैव शंसेत् भूयो वा, प्राश्य घृतं शंसेत् यथा ह वा इदं मनो वा रथो वाक्तो वर्तत एवं हैवाक्तो वर्तते" हें शस्त्र पठण करण्यापूर्वी होत्यानें घृत भक्षण करावें. कारण ज्याप्रमाणें चाकांना तेल लावलें म्हणजे गाडी नीट चालते तद्वत् होत्यालाही घृतभक्षणापासून पठण करणें सोयीचें होईल असें म्हटलें आहे. या वाक्यावरून या शस्त्राचा लांबलचकपणा व्यक्त झाल्याविना राहात नाहीं. आश्वलायन श्रौतसूत्रांत व आपस्तंब श्रौतसूत्रांतही यासंबंधीं अशीं वाक्यें आढळतात कीं "यस्याश्विने शस्यमाने सूर्यो नाविर्भवति सौर्यं बहुरूपमालभेत सर्वा अपि दाशतैरनुब्रूयात् ।" सूर्योदयापूर्वी हें शस्त्र पुरें झाल्यास सूर्योदय होईपर्यंत दुसरे मन्त्र म्हणून पठण चालू ठेवावें. हें शस्त्र आटोपल्यावर गरज पडल्यास ऋग्वेदाचीं दहाही मण्डलें म्हणावीत. उषा उदयास आल्यापासून या हजार मन्त्रांच्या शस्त्राच्या पठणास आरंभ करावयाचा, व तें संपल्यावरही सूर्योदय न झाला तर संपूर्ण ऋग्वेद संहितेचा पाठ करावयाचा याचा सरळ अर्थ असाच होत नाहीं काय कीं आपल्या नित्य परिचयाच्या तास दीड तासाच्या उषेशीं या विधीचा संबंध नाहीं? खूप दिवस टिकणारी उषा दृष्टीसमोर असल्यावांचून हा असला विधि सम्भवतच नाहीं. यापेक्षांही स्पष्ट उल्लेख पुढीलप्रमाणें आहे :—

तानि दहानि बहुलान्यासन् या प्राचीनमुदिता सूर्यस्य।
यतः परि जार इवाचरन्ति उषो ददृक्षे न पुनर्यतीव ॥

उषा प्रथम दिसूं लागल्यापासून सूर्योदय होईपर्यंत किती तरी दिवस होऊन गेले. या दिवसांभोंवतीं उषा आपल्या प्रियकरा-

भोंवती जशी फिरावी तशी फिरतांना दिसली. या उल्लेखावरून अनेक दिवस सारखी दिसणारी ही उषा ध्रुवमण्डलविशिष्टच असली पाहिजे हें स्पष्ट होतें. इतकेंच नव्हे तर उषेचा उदय होऊन इतके दिवस झाले तरी अजून सूर्याचा उदय होत नाहीं तेव्हां काय करावें? असेंही ऋग्वेदांत म्हटलेलें आहे. उषेचीं ऋग्वेदांत जीं वर्णनें आहेत त्यांवरून तिचीं पुढील वैशिष्टयें स्पष्ट दिसतात व तीं केवळ ध्रुवमण्डलविशिष्टच आहेत :—

(१) ऋग्वेदांत वर्णिलेली उषा इतकी दीर्घ होती कीं, तिच्या प्रथमदर्शनापासून सूर्योदयापर्यंत कित्येक दिवस (चोवीस तासांचा अवधि) जात असत. अथवा पुष्कळ उषा एकामागून एक येऊन त्यांचें सूर्योदयांत पर्यवसान होई. (ऋग्वेद ७-७६-३ व २-२८-९)

(२) ऋग्वेदांत उषेविषयीं जे अनेकवचनी प्रयोग आहेत, ते केवळ बहुमानार्थक किंवा वर्षाच्या तीनशेसाठ उषांचे दर्शक नसून ध्रुवावरील दीर्घ उषेच्या दिवसावधि तीस भागांचे द्योतक आहेत. (ऋग्वेद १-२३-८; ६-५९-६; तैत्तिरीय संहिता ४-३-११-६)

(३) पुष्कळ उषा एकाच ठिकाणीं राहून एकमतानें वागत आणि कधींही एकमेकींशीं भांडत नसत.

(४) उषेचे तीस भाग पृथक् पृथक् नसून एकाला एक लागून असे अखंडित होते.

(५) या तीस उषा किंवा एकाच उषेचे तीस भाग चक्राप्रमाणें वाटोळे फिरत व पुन्हा त्याच ठिकाणीं येत.

हीं दीर्घ उषेचीं वर्णनें जशीं ऋग्वेदांत आहेत, तशाच दीर्घ रात्रीपासून सोडविण्याविषयींच्या स्पष्ट प्रार्थनाही आहेत. वैदिक ऋषि म्हणतात :—

"अदिते मित्र वरुणोत मृळ यद्वो वयं चकृमा कच्चिदागः।
उर्वश्यामभयं ज्योतिरिन्द्र मा नो दीर्घा अभि नशन्तमिस्राः।
(ऋ. २-२७-१४)

"आम्ही तुमचा कांहीं अपराध केला असेल तर त्याची क्षमा करा. निर्भय असा प्रकाश आम्हांला मिळो आणि दीर्घ काळोख

आमच्यावर न येवो." गृत्समदानें अदिति, मित्र, आणि वरुण यांची केलेली ही प्रार्थना अतिदीर्घ रात्रीची भीतीच व्यक्त करते. आणखीहि कांहीं उल्लेख याच स्वरूपाचे आढळतात.

प्रपन्नोऽहं शिवां रात्रि भद्र पारमशीमहि ।
रात्रिं रात्रिमरिष्यन्तस्तरेम तन्वा वयम् ॥

या अथर्ववेदांतील प्रार्थनेंत तर आम्हांला परतीराला पोहोंचूं दे, आमची प्रत्येक रात्र आमच्या शरीराला इजा केल्याशिवाय जावो असें म्हटलें आहे. या उद्गारांचें स्पष्टीकरण करतांना सायणाचार्य उत्तरध्रुवाची कल्पना नसल्यामुळें बुचकळ्यांत पडले आहेत, व शेवटीं त्यांनीं हिंवाळ्यांतील लांब रात्रींना भिऊन ही प्रार्थना चालविली होती असें हास्यास्पद स्पष्टीकरण दिलें आहे. सूर्योदय होईल कीं होणार नाहीं अशा संशयांत टाकणारी रात्र अतिशय भयानक असली पाहिजे म्हणूनच मन्त्रद्रष्टयांना तिच्या नाशासाठीं देवांची प्रार्थना करण्याची पाळी आली. अर्थात् ती ध्रुवप्रदेशाकडीलच होय. ऋग्वेदांत सूर्याला दक्षिणेचा पुत्र असें म्हटलें आहे. सूर्य दक्षिणेला उगवणें ही गोष्ट केवळ ध्रुवमण्डलविशिष्टच आहे. त्यामुळें उत्तरध्रुवाकडील सूर्योदयाचेंच तें वर्णन होय हें स्पष्ट होतें. या प्रत्यक्ष प्रमाणाबरोबरच किंवा मुख्यतः या प्रत्यक्ष प्रमाणावरच लोकमान्यांनीं वैदिकांचे मूळ पूर्वज उत्तरध्रुवप्रदेशांत राहात होते असा सिद्धान्त उभारला व नंतर त्याला साहाय्यक म्हणून गाथाशास्त्र, अनेक रूपकात्मक कथा व अवेस्त्यांतीलहि प्रमाणें वापरलीं. त्यांनीं ज्या मुख्य गोष्टींवर आपला सिद्धान्त उभारला त्यांचें येथें दिग्दर्शन केलें आहे. इतर साहाय्यक प्रमाणांचा येथें उल्लेख करण्याचें कारण नाहीं. या सिद्धान्ताला पक्केपणा आणण्यासाठीं ध्रुवप्रदेश केव्हां तरी मनुष्यवसतिक्षम होता हें सिद्ध करणें भाग होतें. त्यासाठीं त्यांनीं भूस्तरशास्त्रांतील पुढील सिद्धान्तांचा आधार घेतला.

(१) भूस्तर शास्त्रांतील अगदीं नवीन शोधांच्या निश्चयात्मक पुराव्यावरून हिमकाल संपल्याला व हिमोत्तर काल सुरू झाल्याला

सुमारे दहा हजार वर्षें झालीं असावीं असें दिसतें व सैबेरियांत सांपडलेल्या जनावरांच्या मृत शरीरांच्या ताजेपणावरून या मतास पुष्टि येते.

(२) मनुष्यप्राणी केवळ हिमोत्तरकालीन नसून तृतीय युगांतही त्याचें अस्तित्व होतें व चतुर्थ युगांत तर तो सर्वत्र होता.

(३) आजपर्यंत निदान दोन हिमकाल व मध्यें एक हिमान्तर काल असे होऊन गेले. या हिमान्तर कालामध्यें पृथ्वीवर जमीन व पाणी यांची वाटणी आजच्याहून वेगळी होती.

(४) चतुर्थयुगाच्या प्रथमार्धांत हवेचीं मोठमोठीं स्थित्यन्तरें झालीं. हिमकालांत ती फार थंड होती. आणि हिमान्तर कालामध्यें ध्रुव प्रदेशांत देखील ती सौम्य व समशीतोष्ण होती.

(५) आशिया व युरोप या दोन्ही खंडांतील ध्रुवाजवळच्या प्रदेशांत हिमान्तरकालामध्यें थंड उन्हाळे व उष्ण हिवाळे असल्यामुळें तेव्हां तेथें अक्षय्य वसन्त नांदत होता, आणि हल्लीं केवळ समशीतोष्ण व उष्ण कटिबन्धांत आढळून येणाऱ्या वनस्पतीही पूर्वीं स्फिटस्बर्जनसारख्या म्हणजे जेथें कार्तिकापासून चैत्रापर्यंत सूर्य क्षितिजाखालीं असतो अशा ठिकाणींही मोठ्या जोमानें वाढत असत असें दाखविण्यास पुष्कळ आधार आहे. या सौम्य हवेचा हिमकालावतारानें बिघाड केला व ते प्रदेश त्यामुळें उष्णकटिबन्धांतील प्राणी व वनस्पति यांना राहवयास अयोग्य झाले.

यावरून ध्रुवप्रदेश वसतिक्षम असल्यामुळें नुसते वैदिक आर्यच काय, पण संपूर्ण मनुष्यजातीचेंच मूळ तेथें होतें असें डॉ. वॉरन सारख्या पंडितांनीं प्रतिपादन केलें आहे. टिळकांचा सिद्धान्त प्रसिद्ध झाल्यावर त्यापूर्वींच्या सर्व उपपत्ती अर्थातच मागें पडल्या व उत्तर ध्रुव हेंच आर्यांचें मूल वसतिस्थान समजून वेदवाङ्मयांतील देवतावाद सुद्धां या उपपत्तीच्या अनुसारें उलगडण्याची अग्रगण्य संशोधकांच्या मध्यें एक लाटच उसळली. गुरुवर्य महामहोपाध्याय पं. कृष्णशास्त्री घुले यांच्या ‘महादेवाचें मूळ स्वरूप’ या गाजलेल्या निबन्धाकडे व पं. सातवळेकर यांच्या कांहीं लेखांकडे

या दृष्टीनें अंगुलिनिर्देश करतां येण्यासारखा आहे. पण सर्वच पण्डितांना टिळकांचा हा सिद्धान्त मान्य नसल्यामुळें त्याचीं अनेक कठोर परीक्षणें करून आर्यांचें मूल वसतिस्थान उत्तर ध्रुव नसून तें हिंदुस्थानच होय असें प्रतिपादन करणारे संशोधकही पुढें सरसावले. त्यांत कै. काशीनाथशास्त्री लेले, श्री. नानासाहेब पावगी, गुरुवर्य श्री. अप्रबुद्ध, व कलकत्ता विद्यापीठाचे डॉ. अविनाशचन्द्र दास हे अग्रगण्य होत. यांपैकीं काशीनाथशास्त्री लेले यांनीं ऋग्वेदीय आर्य हिन्दुस्थानांतच असल्याचे पुरावे फक्त मांडले आहेत. पण तेवढ्यानें लोकमान्यांचें खण्डन होत नाहीं हें मागें दाखविलेंच आहे. श्री. पावगी, व गुरुवर्य अप्रबुद्ध यांचा ध्रुवसिद्धान्ताला तसा विरोध नसून फक्त तें आर्यांचें मूलस्थान आहे हें त्यांना मान्य नाहीं. टिळकांच्या सिद्धान्ताला खरा विरोध डॉ. अविनाशचन्द्र दास यांचा असल्यामुळें त्यांचें या संबंधांत काय प्रतिपादन आहे तें पाहणें अवश्य आहे. 'ऋग्वेदिक इंडिया' या आपल्या ग्रंथांत त्यांनीं टिळकांचें म्हणणें खोडून काढून भूस्तर शास्त्राच्या आधारेंच हिन्दुस्थान हेंच आर्यांचें मूलस्थान होय असें प्रतिपादन केलें आहे. त्यांचें म्हणणें या प्रश्नाला मूलगामी स्वरूपाचा धक्का देणारें असल्यामुळें त्याचें स्वरूप काय आहे तें पाहणें अवश्य आहे.

## डॉ. अविनाशचन्द्र दास

डॉ. दास यांचा ग्रंथ लोकमान्यांच्या निधनानंतर प्रसिद्ध झाला. आपलें प्रतिपादन टिळकांना पहावयास मिळालें नाहीं याचा त्यांना वाटणारा खेद त्यांनीं आपल्या ग्रंथांत व्यक्त केला आहे. टिळकांच्या सिद्धांतासंबंधीं त्यांचे आक्षेप पुढीलप्रमाणें आहेत :–

(१) ऋग्वेदामध्यें सप्तसिंधु प्रदेशांत वैदिक लोक बाहेरून आल्याचा व त्यांचें मूळ वसतिस्थान हिमप्रलयाच्या आपत्तींत नष्ट झाल्याचा यत्किंचितहि उल्लेख आढळत नाहीं. या बाबतींत सर्व पाश्चात्य संशोधकांची एकवाक्यता आहे व टिळकांनाहि ही गोष्ट मान्य आहे.

(२) टिळक मनूची जलप्रलयाची व मत्स्यावताराची कथा

या हिमप्रलयाची निदर्शक मानतात. पण ती हिमप्रलयाची निदर्शक नसून केवळ जलप्रलयाची निदर्शक आहे. व उत्तर ध्रुव-प्रदेशांत हजारो फूट जाडीचा बर्फाचा थर सांचणारा हिमप्रलय झाला होता; जलप्रलय नव्हे. शिवाय या जलप्रलयाचाही ऋग्वेद संहितेंत मुळींच उल्लेख नसून तो त्या मानानें पुष्कळच अर्वाचीन असलेल्या शतपथ ब्राह्मणांत वर्णिलेला आहे अवेस्त्यांतील बर्फ-प्रलय व शतपथांतील जलप्रलय या दोन्ही गोष्टी एक मानण्याचें कारण नाहीं. शिवाय प्रलयांतून वांचण्यासाठीं मनूनें नौकेचा आश्रय केला होता असें स्पष्ट वर्णन आहे. पण एवढें वाढलेलें नौकानयन व या जीवघेऊ आपत्तींतून या चमत्कारिक पद्धतीनें जीव वांचल्याचें वृत्त उल्लेख करण्याइतकेंसुद्धां ऋग्वेदीय ऋषींना महत्त्वाचें वाटत नाहीं याचाच अर्थ ती त्यांच्या वेळीं घडलेली गोष्टच नाहीं असाच स्पष्ट होत नाहीं काय?

(३) टिळकांनीं ध्रुवविशिष्ट म्हणून ज्या गोष्टी सांगितल्या त्यांचा ऋग्वेदांत मागमूस सुद्धां नाहीं. त्या सिद्ध करण्यासाठीं ते जीं प्रमाणें देतात तीं सारीं तैत्तिरीय ब्राह्मण, महाभारत, मनु-संहिता, पुराणें व सूर्यसिद्धान्तासारखे जे अगदीं अर्वाचीन ग्रंथ, त्यांतील देतात. या अर्वाचीन ग्रंथांतील प्रमाणें येवढेंच दाख-वितील कीं, उत्तरध्रुवप्रदेशांतील दृश्यांचीं वर्णनें बाहेरून कर्णोपकर्णी या लोकांना कळलीं. ऋग्वेदाच्या काळीं किंवा त्याच्या पूर्वीं आर्यांचा त्या प्रदेशाशीं कांहीं संबंध होता अथवा तें त्यांचें मूळ वसतिस्थान होतें हें या उत्तरकालीन वर्णनावरून कसें सिद्ध होणार? टिळकांच्याच वाक्यांत सांगावयाचें तर, "कांहीं तुरळक वाक्यांपलीकडे ऋग्वेदांत यासंबंधानें कांहींच उल्लेख आढळत नाहीं." आणि जीं तुरळक वाक्यें आढळतात असें ते म्हणतात, त्यांचा तसा अर्थ होत नाहीं. निदान सहा महिन्यांच्या रात्रींचा व दिवसांचा तर उल्लेख हवा! व उत्तरकालीन वाङमयांत तरी काय आढळतें? त्यांतील सार्‍या वर्णनावरून व तो देवांचा प्रदेश होय या वारंवार येणार्‍या उल्लेखावरून अति-

मानवी शक्तींचें स्थान येवढेंच ध्रुव प्रदेशाचें हे उत्तरकालीन ग्रंथ वर्णन करतात. व याचाच अर्थ वैदिकांना जेव्हां ध्रुवप्रदेश कळला तेव्हां तो मानवी वस्तीस योग्य नसलेल्या अवस्थेंतच कळला हें स्पष्ट होत नाहीं काय ?

(४) देवयान व पितृयान या शब्दांचे मुळांत अर्थ उत्तरायण व दक्षिणायन म्हणजे देवांचे दिवस व रात्र हे आहेत असें टिळक म्हणतात. पण ती केवळ कल्पना आहे. देवयान म्हणजे देवांचा मार्ग व पितृयान म्हणजे पितरांचा मार्ग हे त्यांचे खरे अर्थ लक्षांत घेतले तर त्यांचा वेगळा कोणताही अर्थ करणें चुकीचें ठरतें.

(५) ऋग्वेदामध्यें ज्या उषेचें वर्णन आहे व जिच्या दीर्घत्वाविषयीं टिळकांनीं एवढें लिहिलेलें आहे, ती उषा पूर्वेलाच उगवते असें ऋग्वेदीय ऋषि स्पष्ट म्हणतो. वस्तुतः ती जर अनेक दिवस टिकणारी उत्तरध्रुवाकडील उषा असती तरती दक्षिणेस उगवावयास पाहिजे हें टिळकांच्याच म्हणण्यावरून सिद्ध होतें. केवळ शब्दार्थांच्या ओढाताणीनें तिचें दीर्घत्व सिद्ध करीत असतां उषा पूर्वेकडे उगवली आहे या वर्णनाकडे त्यांचें कां दुर्लक्ष व्हावें तें कळत नाहीं. ऋग्वेदीय ऋषींचे पूर्वज उत्तरध्रुवप्रदेशांत होते व ते ऋषि मात्र हिंदुस्थानांत होते असें मानलें तर एक महान् कौतुकाची गोष्ट म्हणून इतरत्र कोठेंही नसलेलें उषेचें दक्षिणेकडे उगवणें त्यांनीं अवश्य सांगितलें पाहिजे होतें. उषा पूर्वेकडे उगवते याचाच अर्थ ती भारतांतील उषा होय, व आपल्या अनुभवास येणाऱ्या दिवसरात्रींचीच मैत्रीण असलेली ती उषा होय असा स्पष्ट होतो. ऋग्वेदामध्यें सहा महिन्यांचा दिवस व सहा महिन्यांची रात्र यांचा तरी कोठें उल्लेख आहे? टिळकांनीं केलेलें उषेचें गोड वर्णन मान्य केलें तरी दोन महिने टिकणारी उषा ती नव्हे हें स्पष्ट आहे. त्यांनीं गवामयनाचा व त्यांतील आश्विनशस्त्राचा पुरावा दिला आहे; पण त्याचें नीट परीक्षण केलें तर असें आढळून येतें कीं, मुळांत तें शस्त्र संध्याकाळपासून सकाळपर्यंत म्हणावयाचें असे. वार्षिक सत्राच्या दुसऱ्या दिवशींचा हा विधि आहे.

पहिली रात्र तीन प्रहरांत विभागलेली असे व त्यांत बारा सूक्तें, एका प्रहरांत चार स्तोत्रें या पद्धतीनें म्हणावयाचीं असत. आश्विन शस्त्र हें हजार मंत्रांचें आहे. पण ज्याला कुशल वैदिक मंत्र किती द्रुतगतीनें म्हणतो याची कल्पना आहे त्याला याही गोष्टीची सहज कल्पना येऊं शकेल कीं सामान्यतः हें सूक्त म्हणण्यास सूर्योदय होईल अशी कल्पना मुळांत गृहीत धरलेली आहे. अश्विनींच्या उदयापासून तर सूर्योदयापर्यंत सहा तास लागतात. एक हजार मंत्रांचें सूक्त म्हणावयास दोन महिन्यांच्या उषेनंतर उगवणाऱ्या सूर्याची कांहीं गरज आहे हें कोणासही पटण्यासारखें नाहीं. ऋग्वेदाचीं दहा मंडलें म्हणण्याचा विधि घेतला तरी त्यालाही इतका काळ लागत नाहीं. नच सूर्योदय झाला, तर हीं प्रायश्चित्तें आहेत याचाच अर्थ हजार मंत्रांच्या उच्चारांत सूर्योदय व्हावा हें गृहीत धरलेलें आहे. हें ध्यानांत घेतलें म्हणजे ती सामान्य उषा आहे हेंच स्पष्ट होतें. तास दीड तासाच्या उषेसाठीं वैदिक ऋषि आपली प्रतिभा कशी खर्च करतील असें म्हणण्यांत टिळकांनीं कविमनाची स्थिति ध्यानांत घेतली नाहीं. उषेच्या सौंदर्याची ओढ तिच्या लौकर मुक्त होण्यामुळेंच कविमनाला लागू शकते. ही आपली दोन महिने तशीच आकाशांत असली व रोजच्या चोवीस तास पाहण्यांतील गोष्ट असली तर त्या दृश्याच्या बाबतींत खरें कविमन विटल्याविना राहणार नाहीं. शश्वत् या शब्दाचा अर्थ टिळकांनीं सातत्यपर जो लाविला आहे त्याचें आम्हांला कांहीं कारण दिसत नाहीं. खंड न पडतां नियमितपणें असा त्याचा सरळ अर्थ होऊं शकतो. उषेचें पूर्वेकडे उगवणें, अश्विनींच्या उदयापासून तर सूर्योदयापर्यंत बरोबर बसणारा विधि या गोष्टींचा विचार केला तर ही उषा सायण म्हणतात तशी येथीलच आहे हेंच स्पष्ट होतें. ऋग्वेद म्हणतोः—

एता उ त्या उषसः केतुमक्रत पूर्वे अर्धे रजसो भानुमञ्जते ।
(ऋग्वेद १-९२-१) लोकमान्यांनीं ही ऋचा दिली आहे पण उषेचा ध्वज पूर्वेकडे फडकला आहे यावरील विवेचनाच्या बाबतींत मात्र त्यांनीं मौन पाळलें आहे.

(६) दीर्घ दिवस व दीर्घ रात्री यांच्या ऋग्वेदांतील उल्लेखांचें संशोधन करतांना टिळकांनीं जे उतारे घेतले आहेत त्यांतील इन्द्र-वृत्त कथेचा उल्लेख आम्हांला संशयास्पद वाटतो. कारण टिळकांनीं उल्लेखिलेल्या ऋचांवरून इन्द्र वृत्राला वर्षांतून एकदां मारतो हें जसें सिद्ध होतें त्याचप्रमाणें या वृत्रवधाचे विविध उल्लेख आहेत. तो वृत्राला जसें वर्षांतून एकदां मारतो त्याचप्रमाणें मधूनमधूनहि मारतो व रोजहि मारतो, तेव्हां इन्द्र-वृत्र कथेंवरून दीर्घ रात्री व दीर्घ दिवस आणि तेंही वर्षांतून एकदांच हें सिद्ध होण्यासारखें नाहीं. ते म्हणतात त्याप्रमाणें अग्निसूक्तांत अंधाऱ्या रात्रीं तो खूप वेळ निजला असा उल्लेख आहे. पण ती हिवाळ्याची रात्रहि असूं शकते. दुपारीं एकदां होम संपल्यावर व संध्याकाळचाहि होम झाल्यावर कुंडांत झाकलेला अग्नि सकाळपर्यंत पुन्हां यज्ञाच्या उपयोगांत आणीत नाहींत येवढ्याच अर्थानें हें वाक्य आहे. कारण याच्या पुढचेंच अग्नीचें म्हणून वाक्य असें आहे कीं देव जेव्हां मला बोलवितात तेव्हां मी माझ्या तेजासहित प्रकाशित होतो व यज्ञ होऊन त्यांचें काम संपलें म्हणजे मी पुन्हां माझें तेज आवरून झोपतों. उत्तरध्रुवप्रदेशांतील वस्तुस्थितीचा यामुळें मुळींच बोध होत नाहीं. कारण तेथील अंधाऱ्या रात्रीं सूर्य झोपीं जाऊं शकेल, अग्नि कसा झोपीं जाणार? तेथील अंधाऱ्या रात्रीं उलट अग्निप्रकाशाची आवश्यकता आहे. व येथें तर देवांचें काम संपलें म्हणजे एकदां यज्ञांत आहुति दिल्या कीं अग्नि जो अन्तर्धान पावतो तो नेमका पुन्हां आहुतींच्या वेळींच प्रकट होतो. तेव्हां दीर्घ रात्रींच्या अस्तित्वाचा हा पुरावा नव्हे.

(७) अथर्व वेदांतील व ऋग्वेदांतील दुर्गास्तवांतील ज्या प्रार्थना "भद्रे पारमशीमहि" म्हणून टिळकांनीं दिल्या आहेत त्यांचें सूक्ष्म परीक्षण केलें तर टिळकांचें म्हणणें त्यावरून सिद्ध होत नाहीं. या प्रार्थनेंत आम्ही रात्रीचा पार सुखानें गाठूं शकूं काय, येणारी प्रत्येक रात्र संकटमय परिस्थिति न येतां लौकर संपो असें जें म्हटलें आहे तें केवळ ब्राह्मणांनीं म्हटलें आहे, सर्वांनीं नव्हे. दीर्घ

रात्रीचा अनुभव घेऊन कंपित होणारे वैदिक लोक केवळ ब्राह्मणच होते काय? अर्थातच ब्राह्मण या स्पष्ट उल्लेखाचा कांहीं वेगळा अर्थ आहे हें स्पष्ट आहे. संहितेंतील "रात्रीव चित्रावसुरव्युष्टचै वा एतस्यै पुरा ब्राह्मणा अभेषः" असें स्पष्ट म्हटलें आहे. या ऋचेचें स्पष्टीकरण करतांना भाष्यकार सायण म्हणतात, "हेमन्ततो रात्रेर्दीर्घत्वेन प्रभातं न भविष्यत्येवेति कदाचित् ब्राह्मणा भीता अतः पारमशीयेति प्रार्थनया प्रभातं लभते।" ही ध्रुवविशिष्ट परिस्थिति असली तर ती ब्राह्मणांपुरती मर्यादित नसून सर्व लोकांना सारखी असती. येथील ब्राह्मण शब्दाचा अर्थ ऋत्विजपर घेणें उचित आहे व त्या दृष्टीनें या ऋचेकडे पाहिलें तर सारा संदर्भ लागतो. रात्रिसत्राच्या वेळीं तासामागून तास अखंड स्तोत्रें म्हणत जागत बसणाऱ्या ब्राह्मणांना सत्र हें दीर्घकाळचें असल्यामुळें अखंड जागरण घडे व त्यामुळें ते कंटाळून केव्हां एकदां ही रात्र संपेल असें म्हणणें व तसें त्यांना वाटणें अगदीं स्वाभाविक आहे. उलट ही जर ध्रुवविशिष्ट रात्र असेल तर ती सहा महिन्यांनीं नक्कीच संपणार असल्याचें तेथील रहिवाशांना इतकें पक्कें माहीत होतें कीं भिण्याचा व प्रार्थना करण्याचा प्रश्नच नव्हता. जी रोजच्या अनुभवाची व सर्वांना नित्य परिचयाची गोष्ट तिच्यासाठीं कंपित होणें व देवांची प्रार्थना करावयास धजणें हें अनुभवाच्या विरोधी आहे. शिवाय ध्रुव प्रदेशांतील रात्री इतक्या भयानक होत्या काय हाही एक महत्त्वाचा प्रश्न आहे.

(८) "अदिते मित्र वरुणोत मृळ वयं चकृमा कच्चिदागः। उर्वश्यामभयं ज्योतिरिन्द्र मा नो दीर्घा अभिनशन् तमिस्राः।" 'हे अदिते, मित्रा व वरुणा, आम्ही तुमचा कांहीं अपराध केला असेल तर त्याची क्षमा करा. निर्भय असा प्रकाश आम्हांला मिळो आणि दीर्घ काळोख आमच्यावर न येवो.' या प्रार्थनेंतील 'दीर्घ तमिस्र' या शब्दानें लोकमान्य ध्रुवविशिष्ट दीर्घ रात्र घेतात, पण येथील 'तमिस्र' शब्दाचा अर्थ भौतिक प्रकाश व अंधार असा नाहीं. जर

हें म्हणणारा मनुष्य ध्रुवप्रदेशांत राहणारा असेल तर मृत्यूमागून येणाऱ्या जीवनाप्रमाणें अंधारामागून प्रकाश येणार याची त्याला पूर्ण खात्री आहे, व त्याच्या वेळाही ठरलेल्या आहेत. ऋग्वेदांतील विकसित देवकल्पना लक्षांत घेतल्या तर नैसर्गिक गोष्टींवर इच्छाशक्तींची मात होऊन याच्या प्रार्थनेसाठीं भलत्या वेळीं प्रकाश येणार नाहीं याची त्याला पूर्ण कल्पना आहे. म्हणून येथील तमिस्राचा अर्थ अन्तःकरणांतील कधींही न संपणारा पापवासनांचा अंधार हाच घेणें योग्य होय. आदित्य, मित्र व वरुण या देवतांच्या वेदांतील जेवढ्या प्रार्थना आहेत त्यांत सर्वत्र वासनात्मक अंधकार व पाप यांपासून वांचविण्याचीच प्रार्थना आढळून येते. व त्याच संदर्भानें या ऋचेचाही अर्थ घेतला पाहिजे. तात्पर्य ध्रुवविशिष्ट दृश्यांचा स्पष्ट उल्लेख ऋग्वेदांत कोठेंही नाहीं, व अनुमानासाठीं टिळकांनीं घेतलेले उतारे चुकीचे आहेत.

## दासांच्या आक्षेपांचें परीक्षण

दास व लोकमान्य या दोघांनींही आपापलीं अनुमानें ऋग्वेदांतील संशयित शब्दांवरून केलेलीं आहेत. त्यामुळें अनुमानें कोणाचीं बरोबर व कोणाचीं चूक हें सांगणें फार कठीण आहे. श्री. दास यांनीं ऋग्वेदांत आपण बाहेरून कोठून येथें आलों व आपलें मूलगृह हिमप्रलयाच्या अस्मानी सुलतानीनें नष्ट झालें याचा पुसट सुद्धां उल्लेख कोठेंहि नसल्याचें जें दाखवून दिलें आहे तें खरें आहे, व हाच त्यांचा खरा जोरकस आक्षेप आहे. कोठल्याहि भूभागांतील सुसंस्कृत लोकांना आपल्या मातृभूमीविषयीं विलक्षण प्रेम असतें. नाइलाज झाला तरच तिचा परित्याग संभवतो व असा परित्याग हातून घडला तरी त्याविषयींची ओढ व त्याविषयींची स्मृति कधीं जाऊं शकत नाहीं. देवत्व मिळविल्याविषयीं धन्यता प्रकट करणारे, जगांत आपलें सामर्थ्य प्रस्थापित करूं इच्छिणारे, ज्ञानसंपन्न, बलशाली व कर्मयोगी आर्य आपल्या मातृभूमीशीं इतके कृतघ्न झाले व नव्या प्रदेशांत इतके रममाण झाले कीं ते तिला पूर्णपणें विसरून गेले अशी कल्पना करणें मनुष्यस्वभावास

धरून नाहीं. पारशांच्या अवेस्त्यांतूनसुद्धां अनैसर्गिक वातावरणांतून आपलें मूलगृह सोडावें लागलें याची दुःखद जाणीव व्यक्त झाली आहे. मग ऋग्वेदीय ऋषीच इतका करंटा कसा? हा मनाला प्रश्न पडतो, व त्यावरूनच तो मूळचा भारतांतीलच असून उत्तर ध्रुव प्रदेशाच्या संबंधांत तो ऋग्वेदकालानंतर आला असला पाहिजे असें म्हणणें भाग पडतें. दासांचें जलप्रलय व मनूची कथा यांसंबंधाचेंही अनुमान बरोबर वाटतें. कांहींही झालें तरी या प्रत्यक्ष अनुभवांतून वांचण्याची स्मृति जर तसें खरोखर घडलें असेल तर ती ऋग्वेदांतून दिसलीच पाहिजे. तसेंच अलंकारिक व संशयास्पद अशा अत्यंत तुरळक शब्दरचनेवरून ध्रुवप्रदेशविषयक अनुमानें काढावीं लागतात. यावरूनच वैदिकांचा ध्रुवाशीं संबंध ऋग्वेदकालापूर्वीं आला नव्हता याच सिद्धांताला बळकटी मिळते. एरवीं पुढच्या ग्रंथाप्रमाणें ऋग्वेदांतून याचे स्पष्ट उल्लेख असते. मात्र दासांनीं उषा पूर्वेकडे उगवत होती हें लोकमान्यांच्या सिद्धांतावर फेकलेलें महास्त्र त्यांच्याच अंगावर उलटणारें आहे. कारण ऋग्वेदांत पूर्व शब्द दिशेच्या अर्थानें कोठेंहि येत नाहीं. त्यांनीं जी ऋचा टिळकांविरुद्ध बिनतोड प्रमाण म्हणून वापरली आहे, त्यांतील 'पूर्वे अर्धे' या शब्दांचा अर्थ आकाशाच्या पहिल्या भागांत एवढाच आहे. पूर्व दिशेशीं तेथें संबंध नाहीं. संपूर्ण ऋचेचा अनुवाद असाः—

"त्या त्या सर्व प्रसिद्ध उषांनीं आपला ध्वज फडकावून दिला आहे. अन्तरिक्षाच्या पहिल्या अर्ध्या भागांत त्या आपले सुंदर किरण फेकीत आहेत आणि आपलीं शस्त्रें परजणाऱ्या धाडसी योद्ध्याप्रमाणें आपलें लखलखणारें तेज प्रकट करीत ह्या माता, या आरक्त धेनु इकडे येऊं लागल्या आहेत." तात्पर्य येथें दिशेशीं कांहीं संबंध नाहीं. टिळकांचा ध्रुवसिद्धान्त सहज उडवून देतां येण्यासारखा नाहीं हें जितकें खरें आहे तितकेंच आर्यांचें मूलगृह उत्तर ध्रुवच होय हेंही ऋग्वेदावरून सिद्ध करणें कठिण आहे. एक तर ऋग्वेद संहितेनंतर ध्रुवप्रदेशाशीं त्यांचा संबंध येऊन त्यांच्या अनुभवाचें प्रतिबिंब पुढच्या वाङमयांतील

मेरूच्या वर्णनांत पडलें असलें पाहिजे. अथवा टिळकांनीं केलेले ऋचांचे अर्थ बरोबर असतील तर ऋग्वेदकाळींच आर्यांचा त्या प्रदेशाशीं ओळख होण्याचा संबंध आला तरी तें त्यांचें मूलगृह नसून ती एकादी वसाहत असली पाहिजे. मूलगृहाचा उल्लेखच नसणें व तें सोडल्याची एकहि भावना व्यक्त करणारा स्पष्ट शब्द ऋग्वेदांत मुळींच नसणें व अवेस्त्यांत मात्र असणें याला फार गंभीर अर्थ आहे असें मला वाटतें. लोकमान्य टिळकांनीं आपला सिद्धान्त सिद्ध करावयास्तव दिलेलीं प्रत्यक्ष प्रमाणें व डॉ. अविनाशचंद्र दास यांनीं त्यांचें केलेलें परीक्षण येवढ्यांचाच येथें उल्लेख केला आहे. अप्रत्यक्ष प्रमाणांचा उल्लेख केलेला नाहीं. कारण अप्रत्यक्ष पुराव्याचा प्रत्यक्षास साहाय्य म्हणूनच काय तो उपयोग होतो. या प्रत्यक्ष प्रमाणांपैकीं उषेचें प्रमाण बलवत्तर आहे. पण त्यानें ध्रुवप्रदेश हें वैदिकांचें मूलगृह आहे हें सिद्ध होत नाहीं. तो प्रदेश त्यांना परिचित होता येवढें केवळ सिद्ध होतें. त्यामुळें ध्रुवसिद्धांत मान्य करूनहि भारत हेंच आर्यांचें मूलगृह आहे असें म्हणतां येतें.

लोकमान्यांनीं आपल्या ध्रुवसिद्धांताची उभारणी भूस्तर-शास्त्राच्या आधारें केलेली आहे. याच भूस्तरशास्त्राच्या आधारें डॉ. अविनाशचंद्र दास यांनीं सप्तसिंधु (भारत) हेंच आर्यांचें मूलगृह असल्याचें सिद्ध करून दाखविलें आहे.

### डॉ. दास यांचें प्रतिपादन

डॉ. दास यांना ऋग्वेदांत सरस्वतीचें वर्णन आढळलें. ऋग्वेदांतील ही सरस्वती नदी विशाल असून तिची मोहिनी सिंधूइतकीच वैदिक ऋषींच्या मनाला पडलेली आहे. तिच्या वर्णनांत ती नदी हिमालयापासून निघून समुद्राला मिळते असा उल्लेख आहे तो असाः– "एकाचेतत् सरस्वती नदीनां शुचिर्यती गिरिभ्य आ समुद्रात्" (ऋग्वेद ७-९५-२) पर्वतराजीपासून निघून थेट समुद्रा-पर्यंत जाऊन भिडणाऱ्या नद्यांमध्यें पवित्रतेजस्क आणि सोज्ज्वळ अशी एक सरस्वतीच ढळढळीतपणें दिसते. सरस्वतीचें हें एकच

८

वर्णन नाहीं; तर तिच्या विशालपणाची व आर्यांना ती किती प्रिय होती या गोष्टीचीं आणखीही वर्णनें ऋग्वेदांत आढळतात. ऋग्वेद म्हणतो:– आपल्या सर्वपोषक प्रवाहानें ही सरस्वती नदी पहा कशी वाहात आहे. लोखंडाच्या तटबंदीसारखा तिचा सर्वांना आधार आहे. इतर सर्व नद्यांमध्यें हीच श्रेष्ठपणांत वरचढ आहे. (ऋग्वेद ७-९५-१) त्या सरस्वतीनदीचा सर्वांना प्रेक्षणीय असा जो पुष्ट स्तन आहे त्यांतील रसाची आम्हांस प्राप्ति होते आणि संतति आणि उत्साह यांचाही आम्हांस लाभ घडतो. (ऋग्वेद ७-९६-६) कमलाचे कोंब उपटून काढणाऱ्या मनुष्याप्रमाणें ही सहज लीलेनें आपल्या जोषानें धडाडीनें आणि उसळीसरशीं पर्वतांचीं शिखरें ढासळून देते. अशा या पारावतांचा नाश करणाऱ्या सरस्वतीची सेवा आम्ही तिचा अनुग्रह व्हावा म्हणून शुद्ध भक्तीनें आणि ध्याननिष्ठेनें करीत आहोंत. (ऋ. ६-६१-२) महत्त्वानें आणि महिम्यानें जी दुसऱ्या सर्व नद्यांत श्रेष्ठ अशी स्पष्टपणें दृग्गोचर होते, इतर सर्व प्रवाहांमध्यें जिच्या प्रवाहाचा वेग फारच जलद असतो, परमेश्वराच्या सेवेकरितां जिचें पात्र रथाप्रमाणें विशाल झालें, ती ज्ञानशालिनी सरस्वती खरोखरच अत्यंत स्तुत्य होय (ऋ. ६-६१-१३). हे सरस्वती, अमोलिक अभीष्ट संपत्तीकडे तूं आम्हांस ने. तुझ्या अंगावरील दूध तोडून आम्हांस दुर्बल करूं नकोस. आम्हांस दूर ढकलूं नकोस. आमचा लडिवाळपणा व सेवा यांचें कौतुक कर आणि तुला सोडून भलत्याच देशास जाणें आम्हांस भाग पाडूं नकोस" (ऋ. ६-६१-१४).

सरस्वतीचीं हीं वर्णनें पाहिल्यावर ती एक सामान्य क्षुद्र नदी नसून अतिशय वेगवान्, विशाल, ओढ असलेली, व थेट समुद्राला मिळणारी अशी आजच्या गंगा किंवा सिंधु नदीप्रमाणें मोठी नदी आहे हें स्पष्ट दिसतें. तिच्या केवळ विशाल जलरूपाचें वर्णन करणारीं वाक्येंच येथें दिलीं आहेत. पण ऋग्वेदीय ऋषींना 'अम्बितमे, नदीतमे, देवितमे, अशी वाटणारी ही नदी त्यांच्या यज्ञयागाचें अधिष्ठान त्यांना पुरवीत होती व तिच्या अत्यंत सुपीक

आणि समृद्ध प्रदेशावर त्यांचें विलक्षण प्रेम असून तो प्रदेश यज्ञीय देश म्हणून त्यांना अत्यंत पवित्र वाटत होता असें स्पष्ट दिसतें. पुराण वाङमयांत अत्यंत पवित्र असणाऱ्या गंगेचा ऋग्वेदांत केवळ उल्लेख आहे. पण सरस्वतीसारखें तिचें महत्त्व नाहीं. दृषद्वती व सरस्वती या दोन्ही ऋग्वेदांतील पवित्र नद्या होत व त्यांच्या पावित्र्याचा संस्कार ऋग्वेदामुळेंच पुढच्या धार्मिक वाङमयावरही असा उमटला आहे कीं, मनु म्हणतो :–

सरस्वतीदृषद्वत्योर्देवनद्योर्यदन्तरम् ।
तद्देवनिर्मितं देशं ब्रह्मावर्तं प्रचक्षते ।। मनुस्मृति २-१७

"सरस्वती व दृषद्वती या नद्यांमधील प्रदेशाला ब्रह्मावर्त असें म्हणतात व तो देवनिर्मित देश होय." या सरस्वतीच्या तीरावरच महर्षि व्यासांचा आश्रम होता व तेथेंच त्यांनीं आपली अमर ग्रंथसंपत्ति निर्माण केली असें पौराणिकांचें म्हणणें आहे. ऋग्वेदांत वर्णन केलेली ही सरस्वती आज जर पाहिली तर या वर्णनाचें कोणालाही हसूं आल्याविना राहणार नाहीं. ती आज समुद्राला मिळत नाहीं तर राजपुतान्याच्या वाळवंटांत विरून जाते व समुद्र तिच्या मुखापासून शेकडो मैल दूर आहे. तेव्हां ही सरस्वती कोणती असावी हा मोठा प्रश्न आहे. यावर कांहीं पाश्चात्य लेखकांनीं अशी शक्कल लढविली आहे कीं ऋग्वेदीय ऋषींना समुद्रच माहीत नव्हता, व त्यामुळें सिंधूच्या मोठ्या प्रवाहालाच ते समुद्र समजत असत; सिंधूला मिळणाऱ्या एकाद्या सामान्य प्रवाहाचें नांव त्यांनीं सरस्वती ठेविलें असावें. पण पर्वतशिखरांना मारणारी सरस्वती ही सामान्य क्षुद्र प्रवाह नव्हे हें स्पष्ट आहे. ऋग्वेदांत समुद्राचा उल्लेख हवा तितका आहे. चतुःसमुद्रांचेहि त्यांत उल्लेख असून पूर्व व पश्चिम असे दोन्ही समुद्र उल्लेखिलेले आहेत. सिंधूच्या प्रवाहांतून ते नावांनीं हिंडत. अशा स्थितींत फक्त ते समुद्राशीं तेवढे परिचित नव्हते या म्हणण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. सिंधूला मिळणाऱ्या नद्यांचे जसे ऋग्वेदांत उल्लेख आहेत तसेच समुद्राला मिळणाऱ्या नद्यांप्रमाणेंच उपमान म्हणूनही समुद्राचें वर्णन येतें.

त्यांना समुद्र माहीत होता हें निश्चित. समुद्रावरील व्यापाराची सुद्धां वर्णनें ऋग्वेदांत येतात. मग सरस्वती ज्या समुद्राला मिळते तो समुद्र कोणता असावा? यावरून हें स्पष्टच होतें कीं अशा कोणत्या तरी काळीं ऋग्वेद लिहिलेला आहे कीं त्या काळीं सरस्वती आजच्याप्रमाणें क्षुद्र प्रवाह नसून ती एक प्रचंड नदी होती व पर्वत-शिखरापासून निघून ती थेट समुद्राला मिळत असल्याचें वैदिक ऋषि प्रत्यक्ष पाहात होते. कधीं तरी अशी वस्तुस्थिति होती काय? ज्या भूस्तरशास्त्राचा आधार घेऊन लो. टिळकांनीं ध्रुवप्रदेशसिद्धांत सिद्ध केला त्याच भूस्तरशास्त्राचा आधार घेऊन डॉ. दास यांनीं असें सिद्ध करून दाखविलें आहे कीं पूर्वी केव्हां तरी राजपुतान्यांत समुद्र होता; इतकेंच नव्हे तर राज-पुतान्यापासून आसामपर्यंत एक मोठा समुद्राचाच पट्टा असून दक्षिण व उत्तर हिंदुस्थान त्यामुळें विभागलेलें होतें. वैदिक लोक हिंदुस्थानांतीलच आहेत तर ऋग्वेदांत द. हिंदुस्थानांतील प्रदे-शांचा कां उल्लेख नाहीं याही शंकेला त्यांच्या या संशोधनामुळें उत्तम उत्तर मिळालें आहे. दोन स्वतंत्र भूभाग व मध्यें विस्तीर्ण समुद्र अशी वस्तुस्थिति असल्यावर द. हिंदुस्थानची त्यांना माहिती नसणें हेंच स्वाभाविक ठरतें. भूस्तरशास्त्रज्ञ असा समुद्र मानतात इतकेंच नव्हे तर अति प्राचीन काळीं हिंदुस्थानांतील प्रदेशाची विभागणी आजच्याहून वेगळी होती हेंही कबूल करतात. श्री. व्ही. बी. केतकर यांनीं पुणें येथें भरलेल्या ओरिएंटल कॉन्फरन्स-मध्यें १९१९ सालीं आपला जो प्रबन्ध वाचला त्यांत असें स्पष्टच म्हटलें आहे कीं Proved on astronomical evidence and Pauranik account that the Rajputana and the Gangetic seas, nearly separating the Jambudweep (Southern India) from the Punjab and the Himalayas, disappeared seven thousand and five hundred B. C. by the upheaval partly volcanic and partly seismic of their beds. " व या संबंधांत पुराणांतील पुरावे व ज्योतिषांतील पुरावे यावरून राजपुतान

समुद्र व गंगासागर यांनीं जम्बुद्वीप (दक्षिण हिंदुस्थान) पंजाब व हिमालय यांपासून वेगळें केलें होतें आणि हे समुद्र ख्रिस्तपूर्व ७५०० वर्षांपूर्वी ज्वालामुखी आणि भूकंप यामुळें नष्ट झाले." श्री. वाडिया यांच्या Geology of India या ग्रंथांतही हें दाखविलें असून Encyclopaedia Britanica या ग्रंथाच्या आकराव्या आवृत्तींत या विषयावरील विवेचन पाहण्यासारखें आहे.

भूस्तरशास्त्रांतील संशोधन व ऋग्वेदांतील वर्णनें दोन्ही या प्रमाणें जुळतात. पुसट उल्लेख जर प्रमाण मानावयाचे तर भूस्तर शास्त्राच्या आधारावर सिद्ध होणारे स्पष्ट व भक्कम उल्लेख अधिक ग्राह्य नाहींत काय? ऋग्वेद, ब्राह्मणें, अवेस्ता, भूस्तर शास्त्र, मेसापोटेमिया, इजिप्त, आशिया मायनर इ. देशांतील संस्कृति, व मानवजातिशास्त्र यांच्या आधारांवर डॉ. दास यांनीं पुढील सिद्धान्त काढले आहेत :–

## डॉ. दास यांचे निर्णय

(1) Down to the Pleistocene epoch and even later, Saptasindhu, as the ancient Punjab used to be called, was entirely cut off from Southern India by sea which covered modern Rajputana and extended as far as East Assam. An arm of this sea ran up the present lower valley of the Indus to the point where she was joint by her tributories. Thus there were three seas on the three sides of the Saptasindhu. There was another sea towards the north, below the confines of modern Turkastan extending as far north as the Arctic Ocean, and as far west as the Black Sea, which disappeared in comparatively recent times, leaving the Black Sea the Caspian Sea, the Sea of Aral, and Lake Balkash as its remnants and converting its shallow beds into steppes. There was another Asiatic Mediterranean to the east of Turkastan which also dis-

appeared in comparatively recent times leaving Lake Lobour as its remnant. These four seas round about the Saptasindhu have been distinctly mentioned in the Rigveda thereby proving its hoary antiquity which goes back to the Pleistocene or post–Pleistoncene epoch.

The Pauranic legend of Agastya sipping up the ocean dry and depressing the high peak of the Vindya to enable him to go to the Southern Peninsula strongly support and corroborate this view. There can be no doubt that the Rajputana sea existed in Rigvedic times barring the progress of the Aryans southwards.

(2) Saptasindhu has been admitted by geologists to be the earliest life-producing region in the whole of India where the evolution of animal life took place in continuous succession until man was created. As the region was peopled by the Aryans from time immemorial, they came to regard it as their original craddle. The southern continent was peopled by different families of human beings of which the Kolarians and the Dravidians are the remnants.

(3) The upheaval of the bed of the Rajputana sea and the submergence of the Southern continent in post-Rigvedic times probably caused a heavy flood in Saptasindhu by the displacement of the vast volumes of its waters which is known as Manu's flood. The stupendous mass of the vapours generated by the drives of the flood-water was probably carried northward and precipitated over the Himalaya and Airyana Vaejo as snow which destroyed the latter region and compelled yima and his

people to migrate northwards and settle down in the Arctic region which in the inter-Glacial period possessed a congenial climate and was tenanted by human beings. This migration of a branch of the Aryans to the Arctic region in a remote age which was however subsequent to the Rigvedic times, indirectly proves the hoary antiquity of the race. The Rigvedic Aryans never emigrated to nor came from the Arctic region as there is not even the shadow of such emigration in the Rigweda.

(4) The climate of Saptasindhu had originally been cold which in a latter age was changed into temperate and hot in consequence of the disappearance of the Rajputana sea and the creation of the vast tract of land desert in its place. The change, however, was probably gradual. The year is first called Hima, then Hemant and lastly Sharad in the Rigveda, marking its gradual change. The total disappearance of this sea as well as the sea over the Gangetic trough made the climate hot, diminished the quantity of rainfall in the Punjab thereby causing glaciars in the lower ranges of the Himalaya to disappear and attenuated the Saraswati and the Drishadwati into straggling and insignificant streams as they are at present. The Saraswati was however a mighty river in ancient Saptasindhu flooding her valley in the rainy season and had a perrenial flow of water in her bed, probably fed by the glaciars at her source.

(5) The dark-skinned Dasas and Dasyus mentioned in the Rigveda were not the people of Kolerian and the Dravidian races but they were either the dark nomadic Aryan savages, the remnant of the race in its onward march towards progress or the non-sacrificing Aryan tribes who did not subscribe to the orthodox Vedic faith and accept the Vedic Gods and hence were put down as blacks to depict their character.

(6) There was an Aryan tribe in Saptasindhus called the panis who were merchants and traded both by land and by sea, but they were a greedy and avaricions people bent only upon amassing wealth by means, fair and foul. This abominable character of the panis, coupled with the fact that they did not subscribe to the Vedic faith or perform the Vedic sacrifice made them highly unpopular and dispised. Some of them, were so ficrely persecuted by the combined Vedic Aryan clans that they were compelled to leave Saptasindhus in there ships for other countries, where they settled as traders and mariners.

(7) It would thus appear that Europe was not the original craddle of the Aryan race nor was the Arctic region when it was habitable, and possessed congenial climate, verging upon perpetual spring in an inter-Glacial epoch. That craddle was in Saptasindhus and nowhere else. Mr. Tilak thinks that there are internal evidence in the Rigveda which go to prove an Arctic craddle of the Aryans but I have examined his arguments and found them unconvincing. The evidence to be found in the Zend Avesta of an Aryan emigration to the Arctic region in early times does not prove that this region was their original craddle or that Airyana Vaeio was situated therein. This emigration took place long after Rigvedic times in an inter-Glacial epoch when the Arctic region was habitable. As regards my calculation of the age of the oldest hymns of the Rigved which I have set down to the pleistocene or at any rate to the post-pleistocene epoch. I am afraid that Vedic scholars will accuse me of roaming wildly but if the geological dedutions are found to be correct, my calculations which are based on them cannot be wrong. They will either stand or fall with them. The Rigwedic civilization had its beginning in Saptasindhus about twentyfive thousand years ago and was at its height

probably in the seventh millennium B. C. when most of the Hymns were composed and when there still existed a sea or an arm of the Arabian sea in Rajputana."

"या काळापर्यंत व त्यानंतरहि सप्तसिंधू (प्राचीन पंजाब) प्रदेश, आजचा राजपुताना झाकून टाकून पूर्व आसामपर्यंत पसरलेल्या विस्तीर्ण समुद्रानें दक्षिण हिंदुस्थानापासून पार तोडून टाकलेला होता. या समुद्राचा एक भाग आजच्या सिंधु नदीच्या खोऱ्यापासून तर ती लहान लहान प्रवाहांनीं जेथें समृद्ध होते तेथपर्यंत पसरलेला होता. याप्रमाणें सप्तसिंधु प्रदेशाच्या तीन बाजूंना तीन समुद्र होते. आजच्या तुर्कस्थानच्या प्रदेशाखालीं उत्तरेच्या बाजूला आणखी एक समुद्र असून तो उत्तरेकडे ध्रुवप्रदेशाजवळील समुद्रापर्यंत व दक्षिणेकडे काळ्या समुद्रपर्यंत भिडलेला होता. कालांतरानें काळा समुद्र, कॅस्पियन् समुद्र, अरलचा समुद्र व बाल्कशसरोवर हे आपलें अवशेष ठेवून व आपल्या उथळ पात्राचें मोकळ्या मैदानांत परिवर्तन करून हा समुद्र नष्ट झाला. तुर्कस्थानच्या पूर्वेला आणखी एक भूमध्य समुद्र होता. व तोहि लोबनारचें सरोवर हा आपला अवशेष ठेवून कालांतरानें नष्ट झाला. सप्तसिंधु प्रदेशांभोंवतीं असलेल्या या चतुःसमुद्रांचा ऋग्वेदांत स्पष्ट उल्लेख आहे व त्यावरून ऋग्वेदाचे नवप्रदेशनिर्मितीच्या किंवा तदनंतरच्या काळाइतकें प्राचीनत्व सिद्ध होतें. अगस्त्य ऋषींचीं आचमनानें समुद्र शोषून व विंध्य पालथा घालून दक्षिणप्रवेश करण्याची पौराणिक कथा या सिद्धांताला भक्कम आधार देते. ऋग्वेदकाळीं आर्यांच्या दक्षिणभारतप्रवेशाला रोधून धरणारा राजपुतान्याचा समुद्र होता ही संशयातीत गोष्ट आहे.

(२) भारतांतील सप्तसिंधु प्रदेशांत सर्वांत आधीं जीव उत्पन्न झाले व मनुष्यांपर्यंत प्राण्यांच्या विकसनाचा क्रम येथें दाखवितां येतो असें भूस्तरशास्त्रज्ञांचें मत आहे. अज्ञात कालापासून आर्य येथेंच राहात असल्यामुळें ते या प्रदेशालाच आपलें मूलगृह समजत होते. दक्षिण भारतांत त्यावेळीं असेंच दुसरें मानवकुल नांदत होतें. आजचे द्रविडादि वंश त्या कुलाचेच अवशेष होत.

(३) ऋग्वेदकाळानंतर राजपुतान्याच्या समुद्राच्या तळाचें वर येणें व दक्षिण भूप्रदेशाचें जलमय होणें यामुळें सप्तसिंधु प्रदेशांत पाण्याचा मोठा लोंढा उसळून आला असला पाहिजे. व मनूच्या कथेंतील जलप्रलय तो हाच जलप्रलय असला पाहिजे. कालांतरानें या पाण्याच्या प्रचंड बाष्पीभवनाचा थर जवळच्याच हिमालयाला उपसर्ग देणारा ठरून त्यानें घडवून आणलेल्या लगतच्या प्रदेशांतील हिमवर्षावानें अथवा हिमप्रलयानें अवेस्त्यांत वर्णन केलेल्या यिमा व त्याच्या लोकांना तेथें राहणें अशक्य करून टाकलें. बंदिदादमधील हिमवर्षावानें यिमाचें वसतिस्थान नष्ट करणारा ऐर्यन् वइजो तो हाच होय. हे यिम व त्याचे लोक या आपत्तींनंतर उत्तरेकडे वळले व ध्रुवप्रदेशावर जाऊन राहिले, ध्रुवप्रदेशांत मनुष्यवस्तीला योग्य असणारा हिमान्तर काल तो हाच होय. (म्हणूनच हिमप्रलय व उत्तर ध्रुव प्रदेशांतील वसतीचीं स्पष्ट चिन्हें झेंदअवेस्त्यांत आढळतात व ऋग्वेदांत आढळत नाहींत. ) आर्यांच्या या एका शाखेची उत्तर ध्रुवावरील वसति याप्रमाणें ऋग्वेदोत्तरकालीन आहे. व ती ऋग्वेदीय आर्यांचा अतिप्राचीनपणाच व्यक्त करते. ऋग्वेदीय आर्य उत्तर ध्रुवावर गेलेहि नाहींत व तेथून परतलेहि नाहींत. कारण ऋग्वेदांत त्या संबंधीचे स्पष्ट उल्लेख तर लांबच राहिले; पण त्या गोष्टीची प्रतिच्छायाहि नाहीं.

(४) सप्तसिंधु प्रदेशाची मूळची हवा थंड होती. पण राजपुतान्याच्या समुद्राच्या नाशानंतर व त्याची जागा रुक्ष वाळवंटानें घेतल्यावर ती बदलून उष्ण झाली. हा फरक क्रमाक्रमानें झाला. व ऋग्वेदांत वर्षाला प्रथम हिम, नंतर हेमंत व शेवटीं शरद हीं मिळालेलीं नांवें वेगवेगळ्या खंडांतील हवामानांत कालक्रमानुसार घडून आलेल्या या स्थित्यंतराचींच निदर्शक आहेत. हा समुद्र व गंगासागर यांच्या अजिबात लुप्त होण्यानें हवा उष्ण झाली. पंजाबांतील पावसाचें प्रमाण एकदम कमी झालें, हिमालयाच्या पायथ्याशीं वाहणाऱ्या व पंचनदांपर्यंत भिडलेल्या बर्फनद्या लुप्त झाल्या व

त्यामुळेंच सरस्वती व दृषद्वती या प्रचंड नद्यांचें आजच्या मधून मधून लुप्त होणाऱ्या क्षुद्र प्रवाहांत रूपांतर झालें. सरस्वती ही प्राचीन सप्तसिंधु प्रदेशांतील अतिप्रचंड नदी होती. तिच्या प्रचंडपणांत पर्जन्यवृष्टीचें तर साहाय्य होतेंच; पण या प्रचंडपणाचें मूळ तिच्या उगमाशीं म्हणजेच हिमाचलाच्या पायथ्याशीं असलेल्या व पुढें नष्ट झालेल्या बर्फनद्यांत होतें.

(५) ऋग्वेदांत कृष्णवर्णीय म्हणून ज्या दासांचा व दस्यूंचा उल्लेख आढळतो ते कोलेरियन, द्रविडियन् इत्यादि अनार्य वंशाचे लोक नव्हत. ते सांस्कृतिक दृष्टीनें खालच्या पातळीचे असलेले भटके आर्यलोकच होत. किंवा सुसंस्कृत आर्यांतीलच यज्ञक्रिया न मानणारे, वैदिक श्रद्धा व देव यांना न मानणारे स्वैर प्रवृत्तींचे लोक होत. "कृष्ण" शब्द त्यांच्या वर्णाचा द्योतक नसून त्यांच्या स्वभावाचा द्योतक आहे.

(६) ऋग्वेदामध्यें "पणी" म्हणून ज्यांचें वर्णन येतें तेहि अनार्य नसून आर्यच होते. ते जमिनीवर व जलमार्गानें व्यापार करणारे आर्य होते. ते पक्के व्यापारी स्वभावाचे असून खऱ्या खोटया मार्गांनीं धन मिळविणें हेंच त्यांच्या भोगवादी जीवनाचें सार दिसतें. त्यांचा लोभी, हावरा व स्वार्थी स्वभाव त्यांच्या वैदिक श्रद्धांवरील, दैवतांवरील व यज्ञांवरील अविश्वास व त्यांना साहाय्य न करणें या वैशिष्टयांवरून प्रकट होतो. ते यामुळें अप्रिय झाले. व वैदिकांनीं त्यांच्या कुकृत्यांमुळें त्यांना हांकून लावल्यामुळें ते जलयानांतून अन्यदेशांत जाऊन तेथें व्यापारी म्हणून स्थिरावले.

(७) यावरून हें स्पष्टच होतें कीं आर्यांचें मूलगृह युरोपांत नाहीं. इतकेंच नव्हे तर हिमांतरकालांत वासंतिक हवामान असलेले उत्तरध्रुव हेंही आर्यांचें मूलगृह नव्हे. आर्यांचें मूलगृह भारतांतील सप्तसिंधू प्रदेश हेंच असून दुसरें कोणतेंहि नाहीं. लो. टिळक यांचें असें म्हणणें आहे कीं उत्तर ध्रुव हेंच आर्यांचें मूलगृह असल्याचे सिद्ध करणारे पुरावे ऋग्वेदांत आहेत. पण त्यांनीं दिलेले सर्व पुरावे व प्रतिपादन सविस्तरपणें परीक्षून ते खात्री पटविणारे

नाहींत हें मी दाखवून दिलेंच आहे. झेंद–अवेस्त्यामध्यें आर्यांच्या उत्तरध्रुवनिवासाचे पुरावे आढळतात हें खरें आहे. पण त्यावरून तें आर्यांचें मूलगृह होतें व ऐर्यन् वईजो तेथें होता असें सिद्ध होत नाहीं. आर्य टोळीचें उत्तरध्रुवगमन ही ऋग्वेदकाळानंतर पुष्कळ वर्षांनीं हिमांतरकालांत ध्रुवप्रदेश वसतिक्षम झाल्यानंतर घडलेली घटना आहे.

ऋग्वेदकालांतील कांहीं सूक्तांच्या पुरातनत्वाची माझी कल्पना मी मांडली तर आजचे कित्येक वैदिक संशोधक मला अवास्तव कल्पनांत रममाण होणारा म्हणून दोष देतील यांत शंका नाहीं. पण मी दिलेले भूस्तरशास्त्राचे पुरावे जर खरे असतील तर त्यांवर आधारलेले माझे सिद्धांतहि चूक ठरूं शकत नाहींत. त्या शास्त्रीय पुराव्यांच्या वरच माझ्या सिद्धांताचें स्थैर्य वा अस्थैर्य अवलंबून आहे. ऋग्वेद संस्कृतीचा प्रारंभ २५००० वर्षांपूर्वीं सप्तसिंधु प्रदेशांत झाला व तिचा उच्चतम विकसनाचा काळ ख्रिस्तपूर्व ७००० वर्षें असला पाहिजे असें यावरून सिद्ध होतें. पुष्कळशीं सूक्तें याच वेळीं रचलीं गेलीं. त्या वेळीं राजपुताना समुद्र होता अथवा अरबी समुद्राचा हात तरी राजपुतान्याच्या कंठांत होता."

श्री. दास यांनीं ऋग्वेदांतील पुरावे व त्याला भूस्तर शास्त्रांतील आजच्या संशोधनाचा आधार यांवर आपल्या सिद्धांतांचें मंदिर उभारलें आहे. त्यांचा ऋग्वेदांतील सर्वांत महत्त्वाचा आधार म्हणजे सरस्वतीचा उल्लेख होय. सरस्वती समुद्राला मिळण्याच्या या आधारावर श्री. दास यांनीं आपली इमारत उभारली आहे; व ती इतकी एक खांबी आहे कीं हा खांब कोसळून पडला तर डॉ. दास यांची इमारतहि कोसळून पडतें. त्यांच्या या आधारस्तंभावर अनेक विद्वान् संशोधकांनीं जोरकस हल्ले चढविले आहेत. दास यांच्या टीकाकारांत प्रो. क्षेत्रेन्द्रनाथ चट्टोपाध्याय, श्री. अमियकुमार चक्रवर्ती व माझे विद्यागुरु महामहोपाध्याय पंडितसम्राट् कृष्ण शास्त्री घुले हे अग्रगण्य होत. यांपैकीं प्रो. क्षेत्रेन्द्रनाथ चट्टोपाध्याय यांचें म्हणणें असें आहे कीं " ऋग्वेदकालीन संस्कृति ही लोहयुगाची

(Iron age) दिसते. आणि राजपुतान्याचा समुद्र त्यापूर्वी केव्हांच शुष्क होऊन गेला होता. त्यामुळें राजपुताना समुद्राची कल्पना अगदींच असंभाव्य आहे." पण क्षेत्रेंद्रनाथ चट्टोपाध्याय एक गोष्ट विसरलेले दिसतात कीं प्रत्येक प्रदेशांत हीं युगें बदलत असतात. व ऋग्वेदकालीन संस्कृति ही लोहयुगाचीच होय ही गोष्ट ठरविणें कठिण आहे. तसेंच डॉ. दास यांनीं ज्या कोणत्या काळांत राजपुतान्यांत समुद्र होता त्या काळांत ऋग्वेदांतील अतिप्राचीन सूक्तें रचलीं गेलीं असें म्हटलें आहे. सारा ऋग्वेद एकाच काल खंडांतील नसून त्याच्या रचनेंत सहस्रावधि वर्षें गेलीं आहेत हें मत सर्व संशोधकांना मान्य असें आहे. चट्टोपाध्याय यांचा दृष्टिकोन टीकेपुरता तरी ऋग्वेद हा एकाच काळीं झालेला आहे या गृहीत कृत्यावर आधारलेला दिसतो. श्री. अमियकुमार चक्रवर्ती यांचें म्हणणें असें आहे कीं, आजही सरस्वतीच्या गुप्त होण्याच्या स्थानाला 'विनशन' असें म्हणतात. 'विनशन' या शब्दावरून स्पष्ट दिसतें कीं हल्ली सरस्वती ज्या ठिकाणीं लुप्त होते त्याच्या पलिकडे ती पूर्वी केव्हांतरी वाहात असली पाहिजे. विनशनस्थलीं जर समुद्र असता तर तिच्या त्या मुखाला विनशन म्हणण्याचें कारणच नव्हतें. त्याशिवाय महाभारताच्या शल्यपर्वांत बलरामाच्या तीर्थयात्रेचें जें वर्णन आलें आहे. त्यांत विनशन क्षेत्रापासून अरबी समुद्रापर्यंतची सरस्वतीच्या तीरावरील अनेक क्षेत्रांचीं नांवें दिलेलीं आहेत. त्यावरून स्पष्ट दिसतें कीं, पंजाबांतील सरस्वती नदी थेट अरबी समुद्रापर्यंत जाऊन त्यांत पडत होती. अर्थातच राजपुताना समुद्राची कल्पना भ्रामक ठरते." श्री. चक्रवर्ती यांनीं विनशन हा शब्द ऋग्वेदोत्तर कालांतील वापरलेला आहे. त्यामुळें त्याचा वापर ऋग्वेदाच्या स्थलनिर्णयाच्या दृष्टीनें फारसा उपयोगी पडण्यासारखा नाहीं. राजपुतान्याचा समुद्र डॉ. दास हे भूगर्भशास्त्रावरून सिद्ध करीत आहेत, ऋग्वेदावरून नाहीं. भूगर्भ शास्त्रांत जर राजपुतान्याचा समुद्र असेल व आहे, तर तो नाकारतां कसा येणार? डॉ. दास यांच्या कल्पनेवर अन्योन्याश्रयाचा मात्र

दोष येतो. आर्य मूळचे पंजाबांतच राहणारे होते हें त्यांनीं ऋग्वेदांतील सरस्वती नदीच्या उल्लेखावरून ठरविलें आहे. व सरस्वती नदी पंजाबांतीलच होय हें त्यांनीं आर्य पंजाबांत राहणारे होते या आधारावर ठरविलें आहे. यालाच अन्योन्याश्रय असें म्हणतात. पण सरस्वती जर पंजाबाशिवाय इतर कोठेंही भारतांत नाहीं तर तिच्याशिवाय दुसरी कोणती घेतां येणें शक्य आहे? शिवाय सप्तसिंधु प्रदेश म्हणजे केवळ पंजाब असें डॉ. दास हेही म्हणत नाहींत. पंजाब, काश्मीर, बाल्हिक, गांधार, बलुचिस्थान व हिमालयाचा पश्चिमभाग हें आर्यांचें क्षेत्र असें डॉ. दास यांचें म्हणणें आहे. अवेस्त्यांतील हरक्कैति नांवाची नदी म्हणजेच सरस्वती असें कांहीं दिवस संशोधकांचें मत होतें पण आतां त्यांनीं तो नाद सोडून दिला आहे. डॉ. दास यांच्या मताचें सूक्ष्म खंडन गुरुवर्य पं. घुलेशास्त्री यांनींच केलें आहे.

## पं. कृष्णशास्त्री घुले

महामहोपाध्याय घुले शास्त्री यांचें असें म्हणणें आहे कीं ऋग्वेद पंजाबांत तयार झाला हा पूर्वग्रह आहे. वैदिक आर्य हे कोठून तरी बाहेरून फिरत पंजाबांत आले आणि येतांना जेथें जेथें ते गेले तेथील नद्यांना त्यांनीं परिचित अशींच नदीनामें दिलीं व हीं जीं नदीनामें त्यांनीं दिलीं तीं त्यांनीं येतांना आपल्याबरोबर आणलेल्या पूर्वसिद्ध ऋग्वेदांतून दिलीं एवढी एकच विशेष गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. मनाची इतकी तयारी करून ऋग्वेदांतील सरस्वतीविषयक मंत्रांचा विचार करूं लागलें म्हणजे सरस्वती किंबहुना ऋग्वेदोत्तर इतर नद्या देखील पृथ्वीवरील नसून आकाशांतील दिव्य नद्या आहेत अशी खात्री होते. ऋग्वेदांत कांहीं ठिकाणीं तरी समुद्र या शब्दाचा अर्थ अन्तरिक्ष होतो. ही गोष्ट पाश्चात्य पंडितांनाहि मान्य असून अन्तरिक्षांत दिव्य उदकें व नद्या असल्याचें आर्यांच्या ग्रंथांतून वर्णन आहे. अन्तरिक्षांत पर्वत किंवा गिरि देखील आहेत म्हणजे उदयास्ताचे अथवा अंधाराचे किंवा मेघाचेंहि वर्णन पर्वत म्हणून येतें. अन्तरिक्षांत गिरि, पर्वत, नद्या व समुद्र

रूपकात्मकतेनें आहेत हें स्पष्ट झाल्यावर सरस्वतीला देखील अन्तरिक्षांतील नदी कां मानूं नये हें मला कळत नाहीं. तिला दिव्य नदी मानलें तरच ऋग्वेदाची संगति लागते. डॉ. दास यांनीं जो मंत्र दिला आहे त्याचाहि अर्थ तसाच होतो. ऋग्वेदांत सरस्वती द्युलोकांतून, मोठ्या पर्वतांतून आमच्या यज्ञाप्रत येवो असें म्हटलें आहे. सरस्वती दिव्य नदी असली तरच ती द्युलोकांतून येऊं शकेल. तिसऱ्या मंत्रांत मोठ्या लाटांनीं पर्वतांचीं शिखरें फोडणाऱ्या सरस्वतीला 'पारावतघ्नी' असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ पाश्चात्य पंडितांना लागलेला नाहीं. डॉ. प्राणनाथ यांनीं उत्तर इजिप्तमधील परा नांवाच्या प्रदेशांतील लोक असा त्याचा अर्थ केला आहे. पण तो चुकीचा आहे. परावत् आणि अर्वावत् या ऋग्वेदांतील दोन शब्दांकडे पाहिलें म्हणजे पारावत शब्दाचा अर्थ क्षितिजाच्या पलीकडे अधोगोलार्धांत राहणारे दैत्य ( परावतिभवाः ) असाच घ्यावा लागतो. व पारावतघ्नी याचा दैत्यघातिनी असाच अर्थ घ्यावा लागतो, पण तो पंजाबांतील सरस्वतीला लागू पडत नाहीं. तेंच ती दिव्य नदी होय हें लक्षांत घेतलें म्हणजे बरोबर जुळतो.

हिरण्यवर्तनी व वृत्रघ्नी असें सरस्वतीला म्हटलें आहे. वृत्र म्हणजे अन्धकार होय हें ध्यानांत घेतलें म्हणजे सरस्वती दिव्य नदी कां होय याची कल्पना येते. दिव्य उदकांचे प्रवाह हे अन्धकाराचा नाश करून चन्द्रसूर्यादि तेजोदेवतांना सोडवून आणतात असें वर्णन ऋग्वेदांत जागोजागीं आलें आहे. सरस्वतीचें वर्णन करतांना तिला त्रिषधस्था, सिन्धुमाता, मरुत्सखा, इत्यादि विशेषणें असून तिला पावीरवी कन्या म्हणजे विद्युत्कन्या असें म्हटलें आहे. तसेंच बुद्धीची देवता, वाक् देवता असेंही तिचें वर्णन येतें. म्हणून पाश्चात्य पंडित व लो. टिळक यांच्याही मतें ती दिव्यनदीच ठरते. या सर्व कारणांस्तव ऋग्वेदांतील सरस्वती शब्दानें पंजाबांतील सरस्वती न समजतां अन्तरिक्षांतील नदी समजणें हेंच योग्य ठरतें. तसें समजलें म्हणजे आणि वैदिक आर्य हे जेथें जेथें गेले तेथें तेथें तेथील नद्यांना ऋग्वेदांतील नांवेंच ते देत गेले असें समजलें म्हणजे

दोन निरनिराळ्या ठिकाणीं एकाच नांवाच्या दोन नद्या कशा याची सुंदर उपपत्ति लागते."

ती. गुरुवर्य महामहोपाध्याय पं. कृष्णशास्त्री घुले यांच्या संशोधनपद्धतीसंबंधानें व पांडित्यासंबंधानें वाद नाहीं. पण सारा ऋग्वेद त्यांनीं अन्तरिक्षघटनांवरील रूपक म्हणून निकालांत काढून टाकला आहे. त्यांच्याशीं मी आपला मतभेद नम्रपणें व्यक्त करतों. त्यांच्या मतें विश्वामित्र, वसिष्ठ, दिति, अदिति, इतकेंच काय, पण दाशराज्ञ युद्धसुद्धां आकाशांतील ग्रहस्थितीवरील रूपकें होत. पण या पद्धतीनें शिवाजी महाराजांची आग्र्याहून सुटका व लो. टिळक व गोखले यांचें सुरत येथील द्वंद्वसुद्धां अगदीं शास्त्रीय परिभाषेंतून ज्योतिषावरील रूपक सिद्ध करतां येणें शक्य आहे. पण ही पद्धति बरोबर नाहीं. ऋग्वेदांतील आर्य शब्द उच्चारावयाचा झाला कीं तो आपला ज्योतिषावरील रूपकाचा उच्चारतात व ज्योतिष सोडून दुसऱ्या कोणत्याहि विषयावरील रूपक त्यांना मुळींच आवडत नाहीं हा एक चमत्कारिकच आग्रह आहे. शिवाय रूपक मागाहून निर्माण होतें व आधीं नांवें कोणत्या तरी स्थलकालाचीं असतात व तीच रूपकांतून उपयोगांत आणलीं जातात हा साधा क्रमही ध्यानांत ठेवणें अवश्य आहे. वृत्र म्हणजे अन्धार तरी कशावरून ? इन्द्र व वृत्र यांचा उलगडा अन्धार व सूर्योदय यावरच करणें हेंही एक पाश्चात्यांचें गृहीतकृत्य आहे. इंद्र व वृत्र यांचे उल्लेख ऋग्वेदांत विपुल आहेत व ते आध्यात्मिक पद्धतीनेंही उलगडणें शक्य आहे. वृत्र हा तमोमय म्हटला असला तरी ती एक स्वतंत्र कल्पना आहे. अन्धारी रात्र म्हणजे जर वृत्र म्हटलें तर 'वृत्र अन्धारांत पडला' व 'इन्द्रानें त्याला अन्धारांत टाकलें' या ऋग्वेदांतील वाक्यांचा काय अर्थ करतां येईल? वृत्र म्हणजे मनुष्याच्या अंन्तःकरणांतील मोहरूपी अन्धार व कल्याणकारक अशा पुण्यसंचिताला फलोन्मुख होण्याच्या कामीं अडथळा उत्पन्न करणारें दुष्ट कर्म असा अर्थ घेऊन गुरुवर्य श्री. अप्रबुद्ध यांनीं वृत्राचें रूपक अधिक चांगलें उलगडून दाखविलें आहे. वृत्राला

अही म्हटलें आहे. त्यावर श्री. अप्रबुद्ध म्हणतात, "एकदम प्राणाशींच गांठ घालणारा, हवा तेथें संचार करणारा, वाटेल तसें सूक्ष्म रूप घेणारा, यत्किंचितही आवाज न होतां सरपटणारा, बिळांत राहणारा, अतिशय चपल आणि वक्र असा सर्प कोणत्याहि काळच्या लोकांचा दुष्ट शत्रुच आहे. पापकर्माची गति तशीच आहे. म्हणून पापकर्मास सर्पाची दिलेली उपमा अत्यंत समर्पक आहे." वृत्राचा हा अर्थ पाहिला तर अन्धाराचा नाश करणाऱ्या दिव्य जलाचा येथें कांहीं संबंध नसून सरस्वतीला वृत्रघ्नी म्हणण्यांत भारतीयांची आधिदैविक कल्पनाच आहे हें स्पष्ट होतें. व ऋग्वेद प्रत्येक पदार्थाचे 'त्रिधातु' या शब्दानें वर्णन करण्यांत भौतिक घटना, तिचें आधिदैविकांतील स्वरूप व तिचें आध्यात्मिक मूळ साधतो हें ध्यानांत घेतलें म्हणजे सरस्वतीला वृत्रघ्नी म्हणण्यांतील तात्पर्यही स्पष्ट होतें. सरस्वती ही मुळांत भारतांतील नदीच होय, तिची ती. गुरुवर्य घुले शास्त्री यांनीं दिलेलीं विशेषणें तिच्या आधिदैविक स्वरूपाचें वर्णन करणारीं आहेत एवढेंच सिद्ध होतें. शिवाय गुरुवर्य घुलेशास्त्री यांनींही आर्य बाहेरून फिरत फिरत पंजाबांत आले हें पाश्चात्यांचें गृहीतकृत्यच प्रमाण मानलें नाहीं काय ? ते मुळांत बाहेरचे, व तेथून हिंदुस्थानांत आले हीच तर पाश्चात्यांना सिद्ध करावयाची गोष्ट आहे. त्यामुळें तो सिद्धान्त गृहीत धरून संगति लावणें बरोबर नाहीं. शिवाय दैत्यघातिनी म्हणून ती जर दिव्य नदी, तर ऋग्वेदांतील सरस्वतीच्या खळाळणाऱ्या प्रवाहाचें व पर्वत फोडण्याचें जें भौतिक स्वरूप वर्णिलें आहे ते मात्र रूपक कां मानावयाचें ? आपण सरस्वतीच्या वर्णनाचे जे मन्त्र मागें उल्लेखिले त्यांवरून तिच्या जलप्रवाहापासून दूर जाण्याची ऋषींची इच्छा नव्हती व मातेच्या स्तन्यापासून लहान मुलाला दूर जाण्याची पाळी येणें जसें दुर्दैवाचें, तसें दुर्दैव आमच्या वाट्यास येऊं नये असें त्यांनीं म्हटलें आहे. सरस्वती जर प्रत्यक्ष पृथ्वीवरील नदी नसेल व अन्तरिक्षांतील नदी असेल तर ऋषि तिच्या तीरावरून दूर जाण्याची इच्छा करीत नाहींत म्हणजे काय करूं इच्छितात हा

मोठाच प्रश्न आहे ! तात्पर्य सरस्वती ही भौतिक नदीच होय. आजच्या गंगेचें सुद्धां वर्णन करतांना

वधानद्रागेव द्रढिमरमणीयं परिकरं,
किरीटे बालेन्दुं नियमय पुनः पन्नगगणैः
न कुर्यास्त्वं हेलामितरजनसाधारणतया,
जगन्नाथस्यायं सुरधुनिसमुद्धारसमयः।

असें जगन्नाथपण्डितांनी म्हटलें आहे. हे माते, आपला परिकर घट्ट बांध. भालप्रदेशावरील चन्द्रकलेला सर्वबंधनांनीं नीट आवळून ठेव. तुला एकाद्या सामान्य पाप्याचा उद्धार करावयाचा नसून जगन्नाथासारख्या अधमाधमाची आज गाठ आहे. हें गंगेचें वर्णन आधिदैविकच नाहीं काय? पण यावरून जगन्नाथाची गंगा नदी ही हिंदुस्थानांतील नसून ती आकाशगंगा होय असें म्हटलें तर तें कितपत वस्तुस्थितीस धरून होईल ? गुरुवर्यांच्या उपपत्तीचीही अशीच गोष्ट आहे. यांत मी त्यांचा अधिक्षेप मुळींच करीत नाहीं. ते ज्या बुद्धिवादाचे उपासक होते तदनुसारच हें विश्लेषण मीं केलें आहे.

### निष्कर्ष

डॉ. दास यांच्या सिद्धान्तांतील खरा दोष इतकाच आहे कीं, त्यांनीं भूस्तरशास्त्रासारख्या असिद्ध शास्त्रावर कमालीचा भरंवसा ठेविला आहे. त्यामुळें त्यांच्याच ग्रंथाच्या दोन आवृत्त्यांत त्यांना सहस्रावधि वर्षांचा फरक मान्य करावा लागला. आपल्या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तींत राजपुतान्यांतील समुद्राची घटना गृहीत धरून ऋग्वेदकाळाच्या बाबतींत ते साठ हजार वर्षें पलीकडे गेले तर दुसऱ्याच आवृत्तींत त्यांना सत्तावीस हजार वर्षें मान्य करावीं लागलीं. लो. टिळकांच्याही सिद्धान्ताच्या बाबतींत भूस्तरशास्त्राचें असेंच होतें. त्यांनीं दहा हजार वर्षें मानलीं आहेत. पण तीं अमेरिकन शास्त्रज्ञांच्या नेमस्त मतानुसार. इंग्लंडचे शास्त्रज्ञ ऐंशी हजार वर्षें पलीकडे जातात तीं खरीं कां नाहींत याचें शास्त्रीय उत्तर कोणाजवळ नाहीं. अशा स्थितींत भूस्तरशास्त्र

हें या संशोधनास भक्कम आधार पुरविणें कठिण आहे. एक गोष्ट मात्र निश्चित आहे व ती दासांनीं दाखवूनही दिली आहे. ती अशी कीं, बाहेरून आर्य भारतांत आल्याचा ऋग्वेदांत कांहींही पुरावा नाहीं. अवेस्त्यांतील लोकांनासुद्धां आपल्या मूलगृहाची विस्मृति झालेली नाहीं मग वैदिक आर्यांनाच ती व्हावी इतके ते हृदयशून्य कां असतील ? भारतांतील सिंधु सरस्वतींच्या मातृ-दर्शनानें पुलकित झालेल्या व तिच्या वियोगाच्या कल्पनेनें जीव टाकणाऱ्या बालकाच्या भूमिकेवरून वर्णन करणारे वैदिक ऋषि हे कोठूनही बाहेरून आलेले नसून ते हिंदुस्थानांतीलच होते व हिंदुस्थान हेंच त्यांचें मूलगृह होय ही गोष्ट स्पष्ट होती. येथीलच मूजवान पर्वतावर त्यांचा सोम होत होता. हीच त्यांची जन्मभूमि होती. येथेंच त्यांनीं दिव्यतेचा साक्षात्कार घेतला. उत्तरध्रुवाचें स्पष्टीकरण सहज करतां येण्यासारखें आहे. नुसत्या सादृश्यवादानें त्यांचें मूलगृह उत्तरध्रुव ठरूं शकत नाहीं. शतपथाच्या काळीं ख्रिस्तपूर्व २९०० वर्षे मध्यआशियापर्यंत भारतीय संस्कृति पसरली होती व इराणापर्यंत बाल्हिकासारखे भारतीय वंशाचे लोक राज्य करीत होते याचे स्पष्ट आढळणारे पुरावे लक्षांत घेतले तर वज्रधारी इंद्राचे हे पराक्रमी भक्त आपल्या संस्कृतीच्या ऐन भरभराटीच्या काळांत ध्रुवप्रदेशापर्यंत मजल मारून येणें व तेथपर्यंत त्यांच्या वसाहती पसरल्या असणें अत्यंत स्वाभाविक आहे, इतकेंच नव्हे तर पेरूपासून मेक्सिकोपर्यंत व कामश्चाटकापासून मॅरीलीनपर्यंत सर्व प्रदेशावर भारतीय वैदिक संस्कृतीचा जो छाप उमटलेला आढळतो तो या जगभर पसरलेल्या वैदिकांच्या सांस्कृतिक वर्चस्वाचा द्योतक आहे. पुढच्या गौतमबुद्धाच्या काळा-नंतर चीन जपान पासून सर्वत्र संचार करून जगभर बौद्ध संस्कृतीचा प्रसार करणारे बौद्ध भिक्षु जर आढळतात तर त्याही पूर्वींच्या ऋग्वेदीय काळांतील आर्यांनीं वस्तीला क्षम असलेल्या उत्तरध्रुवा-पर्यंत जाणें व तेथें आपल्या वसाहती स्थापन करणें ही अगदीं सहज गोष्ट आहे. आज आपला देश न राखू शकणाऱ्या आमच्यासारख्या

करंटचा लोकांच्या कोत्या कल्पनेला ही कल्पनाहि सहन न होणें स्वाभाविक आहे; पण इराणापर्यंत भारतीय वंशाचें राज्य पसरलें होतें हें ध्यानांत घेतलें म्हणजे ध्रुवप्रदेशावर आर्यांच्या वसाहती असणें व आपलें मूलगृह जें भारत तेथून ते तेथें जाणें यांत अस्वाभाविक कांहीं वाटूं नये. कांहीं लोकांना हा मोठा प्रश्न आहे कीं ते आपल्या वसाहती सोडून परतले कां? पण इंग्लंडवर राज्य करणाऱ्या रोमन लोकांना स्वतःच्याच देशावर संकट आल्यावर तो देश सोडून परतावें लागलें होतें ही ऐतिहासिक घटना, विशिष्ट आपत्तींत देशांतर करावें लागलें हें सुचविण्यास समर्थ आहे. ऋग्वेदांत सर्वत्र आढळणारा व विपुल असलेला सोम ऋग्वेदानंतर पृथ्वीवरून संपूर्णपणें नष्ट झाला व त्यानंतर अवेस्त्यांतच तो अत्यंत दुर्मिळ झाल्याचे दाखले आढळतात. ही घटना ऋग्वेद व अवेस्ता यांच्या मध्यंतरींच्या काळांत एक मोठी विलक्षण स्वरूपाची नैसर्गिक उलथापालथ सृष्टींत घडून आल्याची निदर्शक आहे. आर्यांची एकहि यज्ञक्रिया सोमावांचून होत नाहीं. ही गोष्ट ध्यानांत घेतली म्हणजे ती वनस्पति धार्मिक जीवनाच्या दृष्टीनें ते धार्मिक प्रवृत्तीचे लोक कसोशीनें रक्षण करण्याचा प्रयत्न करतील हें उघड आहे. अशा स्थितींत ती जर नष्ट झाली तर ती अशाच कांहीं तरी विलक्षण अस्मानी सुलतानीनें नष्ट झाली असली पाहिजे कीं जी टाळणें मानवी शक्तीच्या बाहेरचें होतें. व ही अस्मानी सुलतानी म्हणजे हिमप्रलय होय असें आम्हांस वाटतें. सोमाची विपुलता व सोम एकदम नष्ट होणें ही ऋग्वेद व तदुत्तर काल यांतील महत्त्वाची घटना ध्यानांत घेतली म्हणजे ऋग्वेदकाळानंतर व अवेस्त्यापूर्वी ही हिमप्रलयाची घटना झालेली आहे असें दिसतें. हिमप्रलयानें जे अनंत फेरफार झाले त्यामुळें ध्रुवप्रदेशावरील वस्ती सोडून आर्यांच्या टोळ्या परतल्या. त्या उतरल्या न म्हणतां परतल्या म्हणण्यांत टिळकांच्या ध्रुवसिद्धांताला कांहींहि बाध येत नाहीं. उलट उतरल्या म्हणण्यांत मात्र ऋग्वेदांतील सुसंस्कृत आर्य मातृ-भूमीची आठवणही न ठेवण्याइतके हृदयशून्य होते असें आपण गृहीत

धरीत असतो. स्वार्थी लोक तर त्याचा राजकीय उपयोगही करून घेतात. तात्पर्य, ऋग्वेदांत ज्यांचें जीवन प्रतिबिंबित झालें आहे त्या वैदिकांचें मूलगृह भारत हेंच असून भारतमातेच्याच स्तन्यावर आमच्याप्रमाणेंच त्यांनाहि जीवन मिळालें होतें हें विवादातीत आहे. ध्रुवोपपत्तीनेंही त्याला बाध येण्याचें कारण नाहीं. केवळ लोकमान्य टिळकांनीं ती उपपत्ति मांडली म्हणूनच तें मूलगृह आहे अशा अभिनिवेशानें या सिद्धांतावर तुटून पडणाऱ्या पंडितांनीं शांतपणें Arctic Home in the Vedas हा लोकमान्यांचा ग्रंथ पुन्हां एकदां वाचावा म्हणजे भारत हेंच आर्यांचें मूलगृह आहे हा सिद्धांत टिळकांच्या मूळ उपपत्तीच्या आड येत नाहीं हें त्यांच्या ध्यानांत येईल.

## व्याख्यान सहावें

# वेदांचें अपौरुषेयत्व

आतांपर्यंत, वेदवाङ्मयांत ज्यांच्या जीवनाचें प्रतिबिंब आढळतें त्या आमच्या पूर्वजांच्या संबंधीं प्रचलित असलेल्या सर्व समजुतींचें समालोचन संशोधकांनीं मुळांत निर्माण केलेल्या व आमच्याकडील मोठमोठ्या धुरंधर विद्वानांनीं शिरोधार्य मानलेल्या अनेक कल्पना तपासून पाहिल्या तर त्यांतील कितीतरी कशा निराधार आहेत हें या समालोचनांतून स्पष्ट झालें आहे. वैदिक 'आर्य' शब्दाचा युरोपियन 'आर्यन्‌शीं' कांहीं संबंध नसून वेदांतील आर्य शब्द गुणवाचक आहे. तसेंच दस्यु हाहि शब्द गुणवाचक असून असुर शब्दाचीहि तीच अवस्था आहे. वैदिक संस्कृतीहून वेगळ्या अशा कोणत्याहि द्रविड संस्कृतीचें अस्तित्व वेदावरून सिद्ध होऊं शकत नाहीं; व तिचें अस्तित्व सिद्ध करण्यासाठीं इतर कोणताहि पुरावा नाहीं हें आपण पाहिलें. ज्या अर्थीं वेदांत आढळणाऱ्या संस्कृतीहून दुसरी कोणतीही प्राचीन संस्कृति अस्तित्वांत असल्याचा पुरावा उपलब्ध नाहीं, व ज्याअर्थीं हिमप्रलय पूर्वकालींच ही वैदिक संस्कृति अस्तित्वांत होती असें टिळकांच्या ध्रुवसिद्धांतावरूनहि दिसतें, त्या अर्थीं जगांत आढळणारीं साम्यस्थळें त्या त्या संस्कृतींनीं वैदिक संस्कृतीचेंच ऋण घेतलेलें आहे ही गोष्ट निर्विवादपणें सिद्ध करतात. ही उघड दिसणारी गोष्ट युरोपियन अहंगंडाला धक्का लावणारी असल्यामुळें त्यांच्या भारतीय वैचारिक दासांना आवडो वा न आवडो, पण निःपक्षपाती निरीक्षकाला ती मान्य करणें भागच आहे. भूस्तरशास्त्रासारख्या अनिश्चित शास्त्रावर कमालीचा विश्वास ठेवल्यामुळें अविनाशचंद्र दासांचें प्रतिपादन एकदम मनाची पकड घेत नसलें तरी त्यामुळें

आर्यांचें मूलस्थान हिंदुस्थान नव्हतें असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं हें मागच्या प्रकरणांत दाखविलेंच आहे. वेदवाङ्मयांत वैदिक संस्कृतीच्या लोकांनीं उत्तरध्रुवाच्या प्रदेशांत प्रत्यक्ष निवास केला होता असें स्पष्ट दाखविणारीं स्थळें आहेत. दीर्घकालीन उषा, तिचें चक्राकार फिरणें, दीर्घ रात्री इत्यादि वेदवाङ्मयांत आढळणारे स्पष्ट उल्लेख उत्तरध्रुव प्रदेशांतील प्रत्यक्ष अनुभविलेल्या दृश्यांचेंच निदर्शक असल्यामुळें ज्यांनीं वैदिक संस्कृति निर्माण केली त्या लोकांचा निवास कधीं तरी उत्तरध्रुव प्रदेशावर होता ही गोष्ट लोकमान्य टिळकांनीं दाखविली आहे. पण टिळकांच्या सिद्धांतावरून उत्तरध्रुव प्रदेशांत वैदिक लोक राहात होते येवढेंच सिद्ध होतें. उत्तरध्रुव हें त्यांचें मूलस्थान होतें असें मानण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. इतर अनेक गोष्टींवरून भारताविषयींचा वैदिकांचा व्यक्त होणारा जिव्हाळा व मूलस्थान दुरावल्याबद्दलचा यत्किंचितहि न आढळणारा भाव, हिंदुस्थान हेंच त्यांचें मूलस्थान असल्याचें सिद्ध करतो. पराक्रमी वैदिकांची एखादी टोळी वसाहतीसाठीं उत्तरध्रुव प्रदेशापर्यंत गेली असेल, व हिमप्रलयाच्या आपत्तीमुळें तेथून परततांना तिनें आपल्याबरोबर ध्रुवप्रदेशांतील स्मृति आणल्या असणें संभवनीय आहे. शतपथ ब्राह्मणाच्या काळीं म्हणजे जवळजवळ इ.स. पूर्व तीन हजार वर्षांच्या सुमारास ज्यांचें इराणपर्यंत साम्राज्य असल्याचे उल्लेख आढळतात त्यांचे पराक्रमी पूर्वज ध्रुवप्रदेश वसतिक्षम असतांना साम्राज्यविस्तारासाठीं अथवा वसाहती करण्यासाठीं उत्तरध्रुवापर्यंत जाणें असंभवनीय वाटण्यास मनाच्या कोतेपणाखेरीज दुसरें कोणतेंहि कारण नाहीं. ते उत्तरध्रुवावरून उतरले कां ? असें जें कांहीं मंडळींना मोठें कोडें पडलें आहे त्याचें हिमप्रलय हें चपखल उत्तर आहे. मातृभूमीवर आपत्ति आली असतांना स्थानिक लोक जाऊं नका म्हणून विनवणी करीत असतांहि इंग्लंडवर राज्य करणारे रोमन लोक परत फिरूं शकतात तर आर्यहि उत्तरध्रुवावरून परतले असें म्हणण्यांत अस्वाभाविक वाटण्यासारखें कांहीं

नाहीं हें आपण पाहिलें. लोकमान्यांचा ध्रुवसिद्धांत मान्य करूनहि हिंदुस्थान हेंच वैदिक आर्यांचें मूलस्थान आहे असें म्हणण्यास कोणताहि प्रत्यवाय नाहीं हें यावरून स्पष्ट झालें आहे. हा एक प्रकारें वेदांचा अथवा वैदिकांचा बहिरंगविचारच आपण केलेला असून त्यानंतर आतां त्यांच्या अंतरंग जीवनाकडे आपण वळणें व वैदिक राष्ट्राचें प्रत्यक्ष दर्शन घेणेंच क्रमप्राप्त आहे. पण त्यापूर्वी आणखी एका महत्त्वाच्या वैदिक संकेताचा अर्थ उलगडणें आवश्यक असल्यामुळें प्रस्तुत व्याख्यानांत मी त्याकडे वळतों. तो संकेत वेद हे अपौरुषेय आहेत हा होय.

वैदिक वाङमयमंदिराच्या दाराशीं उभें राहिलें कीं पहिलाच जो साक्षात्कार होतो तो वेदांच्या शब्दाच्या अपरंपार महत्त्वाविषयींच्या अपरिवर्तनीय धारणेचा होय. रामायण, महाभारत, स्मृति, पुराणें, धर्मसूत्रें, वेदान्तसूत्रें इत्यादि कितीतरी वाङमय कोणी कंठस्थ करून ठेवलें आहे, त्यासंबंधीं कोणी तसा आग्रह केला आहे व तेंहि कंठस्थ करतांना नुसते शब्दच नव्हे तर त्यांचें उच्चारणहि एका विशिष्ट पद्धतीनेंच झालें पाहिजे असे कोणी नियम घालून दिले आहेत असें आढळत नाहीं. पण वेदवाङमयाच्या बाबतींत ऋग्वेद काळापासून तर आजपर्यंत अगदीं वेगळा प्रकार दृष्टोत्पत्तीस येतो. वेदांना अनुश्रव असें नांव आहे. गुरुशिष्यपरंपरेनें त्यांचें उच्चारणासहित अध्ययन चालत आलेलें आहे. गुरूनें एका विशिष्ट पद्धतीनें म्हणावयाचें व शिष्यानें त्याच पद्धतीनें म्हणून कंठस्थ करावयाचें, हेंच वेदविद्येचें अध्ययन व संरक्षण होय. ही परंपरा किती जुनी आहे याचा दाखला प्रत्यक्ष वेदांतच मिळतो, वेद हे इतर सृष्टीप्रमाणेंच ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेले असून त्याला ते प्रत्यक्ष परमेश्वरापासून गुरुशिष्यपरंपरेनें प्राप्त झाले आहेत असें प्रत्यक्ष वेदांतच वर्णन आहे. 'यो वै ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै' हें तें वेदांतील वर्णन होय. परमेश्वरानें सृष्टीच्या आरंभीं सर्व प्रथम ब्रह्मदेवाला उत्पन्न केलें व त्याला वेद दिले. या उल्लेखा-

वरून सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवालासुद्धां गुरुशिष्यपरंपरेनेंच वेदांची प्राप्ति झालेली आहे असें म्हणण्याचा वैदिक ऋषींचा रोख स्पष्ट दिसून येतो. वेद आणि परमेश्वर यांच्यांत भिन्नता नसल्यामुळें परमेश्वराचा शब्दरूप आविष्कार हेंच वेदांचें खरें स्वरूप ठरतें. आस्तिक दर्शनकारांच्या मतें गुरुशिष्यपरंपरेविना तें कोणाजवळ असण्याचा प्रश्नच पूर्णपणें मिटतो. श्रद्धावंतांचा हा संकेत बाजूला ठेवला तरी वेदवाङमयाच्या नास्तिक निरीक्षकाला-सुद्धां वेद जसेच्या तसे कंठस्थ करून ठेवण्याचा वैदिकांचा कटाक्ष आश्चर्यमुग्ध करतो. ज्या समाजांत इतर रीतीनें संस्कृतीची वाढ झालेली असते त्या समाजांत जर लेखनकलेचें अस्तित्व नसलें तर वाङमय कंठस्थ करून ठेवणें हाच वाङमयरक्षणाचा व संस्कृतिरक्षणाचा एकमात्र मार्ग असतो हें खरें आहे. पण वेद-वाङमयाची गोष्ट तशी नाहीं. ऋग्वेदाच्या अनादि कालापासून भारतीयांना लेखनकला माहीत असल्याचा पुरावा आढळून येतो. तरीहि वेदवाङमय विशिष्ट उच्चारणपद्धतीसह कंठस्थ करून ठेवण्याकडेच भारतीयांचा कटाक्ष आहे. प्राचीन काळापासून गेल्या पिढीपर्यंत इतर अनेक ग्रंथांचीं हस्तलिखितें होत असलीं तरी वेदाक्षर लिहून काढण्याचें भारतीयांच्या जिवावर येत असे. युरोपियन पंडितांनींहि असें लिहून ठेविलें आहे कीं, लेखनकलेचें ज्ञान असूनहि वेद लिहून काढण्यापेक्षां ते पाठ करण्याकडेच भारतीयांची खरी प्रवृत्ति आहे. इतर अनेक महत्त्वपूर्ण वाङमय लेखनकला, ताम्रपट, शिलालेख, भूर्जपत्रें अशासारखीं इतर साधनें यांच्या द्वारें वैदिकांनीं जिवंत ठेवलें. पण वेदवाङमय अबाधितपणें जिवंत ठेवण्यासाठीं त्यांनीं ज्या युक्तीचा अवलंब केला ती खरोखरी स्तिमित करणारी आहे व याचें कारण प्रो. वेननें म्हटल्याप्रमाणें भारतीय दृष्टीनें वेदवाणी ही नुसती अर्थवती नसून ती सामर्थ्यवती असल्याचा जिवंत प्रत्यय हें आहे. ज्या शब्दांत जिवंत सामर्थ्य ओतप्रोत भरलेलें आहे, त्यांची चैतन्यमय परंपरा माती, दगड, धोंडे आणि पानें काय टिकविणार ? म्हणून

उच्चारासहित ती परंपरा जिवंत ठेवण्यासाठीं त्यांनीं तपानें शरीर पवित्र केलेल्या सजीव मनुष्यप्राण्याचीच योजना केली. वेदाचें एक अक्षरहि इकडचें तिकडे होऊं नये म्हणून त्यांनीं वेदाक्षरांचें संपूर्ण मोजमाप करून त्याला एका घडीव साच्यांत बसविलें. या साच्यालाच व्यूह व विकृति असें नांव आहे. व्यूह सांगणारा जो ग्रंथ त्याला चरणव्यूह असें म्हणतात. तो शौनकानें केलेला असून त्याचा काळ इ. स. १२०० हा समजण्यांत येतो. विकृति सांगणारा ग्रंथ विकृतवल्ली या नांवानें प्रसिद्ध असून व्याडी हा त्याचा कर्ता होय. त्याचाहि काळ इ. स. पूर्व १२०० हाच समजण्यांत येतो. चरण म्हणजे आन्दोलन व चरणव्यूह म्हणजे आन्दोलनाच्या सहेतुक बनविलेल्या मोडी होत. वेदरक्षणाचे हे दोन अतिशय महत्त्वाचे असे प्रयत्न आहेत. हें वाङ्मय अशा रीतीनें जिवंत ठेवावयाचें म्हणजे कांहीं विशिष्ट साच्यांत तें बसविल्याखेरीज गत्यंतर नाहीं. असा व्यूह ज्यानें तयार केला तो कात्यायन जर याज्ञवल्क्याचा पुत्र असला तर त्याचा काल इ. स. पूर्व २४०० हा ठरतो असें श्री. अप्रबुद्ध यांनीं प्रतिपादन केलें आहे. वेदरक्षणाकरतां भारतीयांनीं केलेल्या पहिल्या प्रयत्नांत मंडल, सूक्त, अष्टक, वर्ग, अनुवाक, खंड, कांड, प्रश्न, छंद अशा निरनिराळ्या रीतीनें त्याची विभागणी करून त्यांतील गद्य भागाची तर पन्नास अक्षरांच्या परिमाणानें अक्षरसंख्याहि मोजून ठेवली. मंत्रांचा कर्मांत विनियोग असल्यामुळें त्यांच्या द्वारें वेदरक्षणास साहाय्य झालेंच, पण वेदाक्षराचा प्रत्येक स्वर ठरलेल्या पद्धतीनेंच उच्चारला जावा म्हणून वेदांचें पठण करतांना कांहीं पद्धतशीर रीतीनें पदें तोडून साध्या क्रमानें अथवा तेच तेच शब्द पुन्हा पुन्हा मागेंपुढें घेऊन वेदांचें अध्ययन करण्याची विशिष्ट परंपरा उत्पन्न करण्यांत आली. चोहोकडून खिळे मारून जशी एखादी गोष्ट पक्की खिळून टाकावी तशी या पद्धतीची ही व्यवस्था आहे. अशी व्यवस्था करण्यांत आली म्हणूनच अनादि काळचे ते शब्दोच्चार आज जसेच्या तसे ऐकावयास मिळत आहेत.

वेदपठणाच्या या विशिष्ट पद्धतीला विकृति असें म्हणतात. या विकृति एकंदर आठ आहेत. त्या पुढीलप्रमाणें :–

जटा माला शिखा रेखा ध्वजो दण्डो रथो घनः।
अष्टौ विकृतयः प्रोक्ताः क्रमपूर्वा मनीषीभिः ।।

वेदांचें क्रमान्त अध्ययन व जटा, माला, शिखा, रेखा, ध्वज, दंड, रथ, घन या संपूर्ण विकृतींसह वेदाध्ययन पूर्ण झालें म्हणजे तो घनान्त वैदिक समजला जातो. ही अध्ययनाची यातायात इतकी मोठी आहे कीं, हें अध्ययन पूर्ण करावयाचें व तें टिकवावयाचें म्हणजे सारा जन्म त्यांत घालवावा लागतो. इतर कोणताहि व्यवसाय न करतां जन्मभर दारिद्र्यांत राहून या पद्धतीचें अध्ययन करून केवळ वेद टिकवून धरण्यासाठींच संपूर्ण जीवन घालविणारा एक वर्गचा वर्ग भारतीय संस्कृतीनें निर्माण केला, व अखंड टिकवून त्याला ज्येष्ठपणाचा सर्व मान दिला यावरून वेदाक्षरांच्या उच्चारण शास्त्रासह संरक्षणाचें भारतीयांना केवढें विलक्षण महत्त्व वाटत असलें पाहिजे हें स्पष्ट होतें. येवढ्या प्रयत्नांनीं वेदसंरक्षण झालें म्हणूनच भयानक अत्याचारांच्याहि काळांत वेद जिवंत राहिला. सहस्रावधि लोक मारले गेले तरी जो कोणी एक येवढ्या घोर संहारांतहि जिवंत राही तो पुन्हा नवी परंपरा उत्पन्न करून वेद-रक्षणाचें कार्य करी. वास्तविक वेद म्हणजे कांहीं महाभारतासारखा सुसंबद्ध ग्रंथ नव्हे. त्यांतहि ऋग्वेदाचें स्वरूप तर इतकें त्रुटित आहे कीं, एका सूक्ताचा दुसऱ्या सूक्ताशीं तर राहोच पण एका ऋचेचा दुसऱ्या ऋचेशींहि कांहीं विशेष संबंध आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. अशा स्थितींत या शब्दांचेच कांहीं विशेष असें स्वयंभू महत्त्व असलें पाहिजे व तें महाबुद्धिशाली वैदिकांच्या मनांत पूर्ण ठसलें असलें पाहिजे, व म्हणूनच त्यांच्या रक्षणाचा, म्हणजे त्या शब्दांच्या रक्षणाचा–अलीकडच्या भाषेप्रमाणें केवळ त्यांतील ज्ञानाच्या रक्षणाचा नव्हे–एवढा खटाटोप झाला.

वेद म्हटले कीं, ज्याप्रमाणें ही पहिली गोष्ट ध्यानांत येते, त्याच प्रमाणें दुसरी जी महत्त्वाची गोष्ट ध्यानांत येते ती ही कीं वैदिकांची

भाषा विशेष प्रकारची असून तीं स्वरयुक्त आहे. ही त्रेसष्ट किंवा चौसष्ट वर्णांची भाषा ज्यांना बोलतां येत नाहीं त्यांना वैदिक लोक असुर, मुरदेव इत्यादि शब्दांनीं कसे हीन लेखतात हें मागें दाखविलेंच आहे. ती भाषा इतकी घोटीव व संस्कारयुक्त आहे कीं तिच्यांत दुसऱ्या कुणाचे वर्ण मिश्रित झाले ही कल्पनाहि हास्यास्पद ठरते. अभिमानी ब्राह्मण जातीनें कोणाचपासून कांहीं घेतलें नाहीं असें जें एका पाश्चात्य संशोधकानें म्हटलें आहे तें अक्षरशः खरें वाटूं लागतें. ऋग्वेदांत 'ळ' हा वर्ण येतो. पुष्कळांची अशी कल्पना होते कीं, तो द्रविडांपासून घेतला असून मराठीप्रमाणें तें एक स्वतंत्र व्यंजन असावें. पण ऋग्वेदाचें सूक्ष्म निरीक्षण केलें तर असें आढळून येईल कीं, तें स्वतंत्र व्यंजन नसून परिणत उच्चार-शास्त्राला धरून उच्चाराच्या तुल्य प्रयत्नामुळें 'ळ' हा 'ड' चा पर्याय शब्द म्हणून येतो. इतकी ज्यांची भाषेंतील परिणति आहे त्यांच्या भाषेंतील स्वरप्रक्रिया ही आणखी एक सूक्ष्म व विचारणीय गोष्ट आहे. वस्तुतः शब्दांना स्वर असणें व विशिष्ट पद्धतीनें जोर देऊन शब्दांचा उच्चार केला असतां वेगळ्या अर्थाची प्रतीति येणें ही गोष्ट प्राचीन, ग्रीक, लॅटिन इत्यादि भाषांपासून तर अर्वाचीन इंग्रजी मराठी इत्यादि भाषांपर्यंत सर्वत्र आढळणारी आहे. पण या भाषांइतके केवळ ध्वनि व्यक्त करणारे तकलादू स्वरूप वैदिक भाषेंतील स्वरांचें नसून वैदिक भाषेंत स्वरामुळें शब्दांचे अर्थ, समास, विभक्ति, काळ, आणि संकेत पालटतात हा त्या स्वरांचा विशेष होय, इतकेंच नव्हे तर स्वरामुळें अर्थहि पालटत असतो. पुढील कांहीं उदाहरणें ही गोष्ट सिद्ध करतील. ऋग्वेदांत 'अपस्' हा शब्द जेव्हां अंतोदात्त असतो तेव्हां त्याचा अर्थ कुशल अथवा प्रवीण असा असतो; परंतु हाच शब्द जेव्हां आद्योदात्त असतो तेव्हां त्याचा अर्थ पालटून कर्म असा नवा अर्थ त्याला येतो. 'पोता' हा शब्द जेव्हां आद्योदात्त असतो तेव्हां त्याचा अर्थ 'पोता नांवाचा ऋषि असा होतो. पण तोच शब्द जर अंतोदात्त असला, तर त्याचा अर्थ 'पवित्र करणारा सोम' असा होतो. जूर्णि' हा शब्द आद्योदात्त

असला तर त्याचा 'अर्थ स्तवन करणारा' असा होतो. पण तोच साधा असला तर त्याचा अर्थ 'ज्वाला' किंवा 'उल्का' असा आहे. या संबंधांत वृत्रासुराच्या उत्पत्तीची कथा प्रसिद्धच आहे. इंद्रानें विश्वरूप नांवाच्या आपल्या मुलाला मारलें म्हणून संतापून जाऊन त्वष्टयानें दक्षिणाग्नींत हवन केलें. व त्या वेळीं 'इंद्रशत्रो विवर्धस्व हा मंत्र म्हटला. इंद्रशत्रु हा सामासिक शब्द असून तत्पुरुष व बहुव्रीहि अशा दोन्ही पद्धतीनें त्याचा समास सोडवितां येतो. येथें 'शत्रु' शब्दाचा अर्थ शातयिता म्हणजे मारणारा असा आहे. 'इंद्रः शत्रुर्यस्य सः' असा या शब्दाचा वहुव्रीहि समास समजलें तर इन्द्र ज्याचा ठार मारणारा आहे असा अर्थ निष्पन्न होतो. व 'इन्द्रस्य शत्रुः असा षष्ठी तत्पुरुष समास केला तर त्याचा अर्थ इन्द्राला ठार मारणारा असा होतो. त्वष्टयाला वस्तुतः इन्द्राला मारणारा मुलगा हवा असल्यामुळें षष्ठी तत्पुरुष समासच अपेक्षित होता. पण संतापाच्या भरांत त्यानें स्वरांत चूक केल्यामुळें तत्पुरुषा-ऐवजीं बहुव्रीहि समासाचा अर्थ शब्दाला चिकटून झालेल्या मुलाला म्हणजे वृत्रासुराला उलट इंद्रानेंच ठार मारलें. स्वरांचें वैदिक भाषेंत असणारें महत्त्व ही कथा उत्कृष्ट रीतीनें व्यक्त करते. स्वरांचा वेदांवर व वेदाक्षरांवर इतका प्रभाव आहे कीं, उदात्त अनुदात्त आणि स्वरित या त्रयीशीं संबंध असल्यावांचून वेदमंत्र असूंच शकत नाहीं. मंत्रांच्या उच्चाराचें स्वतंत्र शास्त्र म्हणून शिक्षा या वेदांगाची वाढ झाली आहे. म्हणून वेदाक्षरांच्या बाबतींत शिक्षेंत असा नियमच घालून दिला आहे कीं,

मंत्रो हीनः स्वरतो वर्णतो वा मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह।
स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतोऽपराधात् ॥

स्वरानें अथवा वर्णानें हीन असलेला मंत्र खोटा असून तो त्याच्या खऱ्या अर्थाचें व्यक्तीकरण करूं शकत नाहीं. इतकेंच नव्हे तर अशा अशुद्ध मंत्राची वाणी वज्र बनून यजमानालाच ठार मारते. स्वर चुकल्यामुळें इन्द्रशत्रु या शब्दाच्या बाबतींत जें झालें तें या गोष्टीचें उत्तम निदर्शन होय.

तिसरी महत्त्वाची गोष्ट जी दृष्टोत्पत्तीस येते ती ही कीं, जसे व ज्या क्रमानें जे शब्द वेदांत आले असतील तशा व त्याच क्रमानें त्यांचा उच्चार झाला पाहिजे हा वैदिकांचा कटाक्ष होय. (नियतानुपूर्व्या नियतवाचो युक्तयो भवन्ति । ) अग्निमीळे पुरोहितम् हें वाक्य ईळ अग्नि पुरोहितम् असें एक वर्णच इकडचा तिकडे करून उच्चारलें तरीसुद्धां तें वेदवाक्य होणार नाहीं. वास्तविक भाषा ही अर्थानुसारी असते. त्यामुळें योग्य अर्थाच्या अनुसंधानानेंच शब्दाला महत्त्व असतें. पण वेद म्हटला कीं, तेथें तुमच्या अर्थाला कोणी विचारीत नसून शब्दालाच खरें महत्त्व आहे. एकामागून एक शब्द येणें याला आनुपूर्वी असें म्हणतात. व या आनुपूर्वीचें आणि त्या विशिष्ट शब्दांचेंच वेदांत महत्त्व आहे. धियो यो नः प्रचोदयात् हे शब्द उच्चारले तरच तो गायत्री मंत्र होईल व 'बुद्धि दे रघुनायका' हा श्री समर्थांचा वाक्प्रयोग गायत्री मंत्राचाच अर्थ व्यक्त करीत असला तरी तो गायत्री मंत्र होऊं शकणार नाहीं.

चवथी महत्त्वाची गोष्ट म्हणजे विशिष्ट शरीरांनींच वैदिक मंत्रांचा उच्चार केला पाहिजे यावरील वैदिकांचा विशेष कटाक्ष ही होय. यांत कोणत्याहि प्रकारें ज्ञानापासून इतरांना वंचित ठेवण्याचा प्रश्न नाहीं. उलट 'शहाणें करून सोडावे सकळहि जन' या गोष्टीची वैदिक ऋषींना इतकी तळमळ लागलेली दिसते कीं, ब्रह्मविद्येसारखी विद्या व इतर संपूर्ण ज्ञानाचा प्रांत सर्व लोकांना सोप्यांत सोप्या रीतीनें हस्तगत करतां यावा म्हणून त्यांनीं महाभारतासारखे प्रचंड ग्रंथ व समुद्रासारखे विस्तीर्ण पुराणवाङ्मय निर्माण केलें. पण शरीराला नादयंत्र समजून उच्चारणशास्त्राशीं त्याचा संबंध कल्पिल्यामुळें वेदमंत्रांच्या उच्चारणाच्या बाबतींत मात्र विशिष्ट शरीरांचा व नियमांचा कटाक्ष उत्पन्न झालेला आहे.. सत्तासंपत्तीपासून दूर रखरखीत वैराग्याच्या वाळवंटांत जन्मभर राहण्याची सिद्धता असणाऱ्यालाच या उच्चाराचे अधिकार दिले गेले.

या वर उल्लेखिलेल्या अगदीं स्थूल स्वरूपाच्या गोष्टी

वेदवाङ्मयमंदिराच्या दाराशीं उभें राहतांच प्रत्ययास येणाऱ्या आहेत. जन्मचे जन्म आटवून केवळ, स्वर, शब्द व वाक्यें जशीच्या तशीं कोणत्याहि मोबदल्याची अपेक्षा न करतां संरक्षण करीत बसावयाचा व त्या साठीं हौसेनें भोगसुखहीन निष्कांचन जीवन पत्करावयाचा हा प्रकार मनुष्यजातीच्या इतिहासांत केवळ अपूर्व आहे यांत शंका नाहीं. भोळसर, देवलसीपणा या शब्दांनीं त्याची संभावना करणें म्हणजे विचाराच्या क्षेत्रांत स्वतःची अपात्रता व्यक्त करून दडपेगिरी करणें होय. आपल्या सूक्ष्म तर्कशक्तीनें केसाचे शंभर भाग पाडून जगत्कारणाच्या बाबतींत मतभिन्नता प्रकट करणाऱ्या परमबुद्धिशाली भारतीय दार्शनिकांचाहि वेदसंहि-तेच्या या विशिष्ट महत्त्वासंबंधीं मतभेद आढळत नाहीं. या गोष्टीचा विचार केला तर ती विचारार्ह बाब ठरते ही गोष्ट निश्चित आहे. आणखीही एक आश्चर्यजनक बाब स्थूल दृष्टीनें पाहिलें तरी दृष्टोत्पत्तीस येते. व ती बाब म्हणजे वेदवाङ्मय हा शब्दराशि असूनसुद्धां त्याला रंग रूप इत्यादि असल्याचीं वर्णनें आढळतात. उदाहरणार्थ चरणव्यूहासारख्या ग्रंथांत ऋग्वेदादि वेदांचें पुढीलप्रमाणें वर्णन आढळतें :–

मूलः– य इमे चत्वारस्तेषां एकैकस्य कीदृशं रूपं वर्णविधो-च्यते । ऋग्वेदः पद्मपत्राक्षः सुविभक्तग्रीवः कुञ्चितकेशश्मश्रुः श्वेतवर्णो वर्णेन कीर्तितं प्रमाणं तावत्तिष्ठान्वितस्तीः पञ्च यजुर्वेदः पिंगाक्षः कृशमध्यस्थूलगलकपोलस्ताम्रवर्णः कृष्णवर्णो वा प्रादेश-मात्रः षड्दीर्घत्वेन ; सामवेदो नित्यं स्रग्वी सुप्रयतः शुचिवासः शमी दान्तो बृहच्छरीरः शमी दण्डी कातरनयन आदित्यवर्णो वर्णेन नवारालीमात्रः ; अथर्ववेदस्तीक्ष्णः प्रचण्डः कामरूपी विश्वकर्ता क्षुद्रकर्मा स्वशाखाध्यायी प्राज्ञश्च महानीलोत्पलवर्णो वर्णेन दशारालीमात्रः ।

भाष्य :– अथ वेदानां गोत्रदेवता छंदांस्याह । ऋग्वेदस्य आत्रेय-सगोत्रम् । आत्रेयाः सगोत्राः समानगोत्रा यस्य तत् । अत्रिगोत्र ऋग्वेद इत्यर्थः । सोमदैवत्यं सोमः देवता यस्य तत् । गायत्री छंदो

यस्य तत्। एवं अग्रेऽपि व्याख्यातव्यम्। अथ यजुर्वेदस्य काश्यपगोत्रं इंद्रदैवत्यं त्रिष्टुप्छंदः। अथ सामवेदस्य भारद्वाजगोत्रं रुद्र दैवत्यं जगती छंदः। अथर्ववेदस्य वैतानस गोत्रं ब्रह्मदैवत्यं अनुष्टुप् छंदः।

मूलः– य इदं वेदानां नामरूपगोत्रप्रमाणच्छंदोदैवतवर्णं वर्णयति। अविद्यो लभते विद्यां जातिस्मरोऽथ जायते जन्म जन्म वेदपारगो भवत्यव्रती व्रती भवत्यब्रह्मचारी ब्रह्मचारी भवति। ‘ कमलासारखे डोळे, तीन रेखायुक्त मान, कुरळे केस व श्मश्रु, शुभ्रवर्ण, व अडीच हात देहाचें प्रमाण हें ऋग्वेदाचें स्वरूप होय. घारे डोळे, कृश मध्यभाग, भरदार गळा, गुबगुबीत गाल, व अडीच हात शरीराचें प्रमाण हें यजुर्वेदाचें स्वरूप असून त्याचा वर्ण रक्त व कृष्ण ( शुक्ल यजुर्वेद व कृष्ण यजुर्वेद यांमुळें )असा दोन्ही प्रकारचा आहे. नित्य पुष्पमालाधारी, यमनियमांचें आचरण करणारा, शुद्ध वस्त्र परिधान करणारा, शांत मनाचा, बाह्येंद्रियांचा पूर्ण निग्रह केलेला, शमी वृक्षाचा दंड हातांत धारण करणारा, शरीरानें स्थूल, सुवर्णाप्रमाणें तेजस्वी डोळे असलेला, सूर्याप्रमाणें कांतिमान्, साडेचार हात शरीर प्रमाणाचा, शुभ्रवर्ण असें सामवेदाचें स्वरूप आहे. उग्र, क्रोधी, इच्छेप्रमाणें रूप धारण करणारा, विश्वाची उत्पत्ति करणारा व त्याचें जीवन चालविणारा, हवीं तीं हलकीं कामें करणारा, स्वशाखेचें अध्ययन, करणारा, महाबुद्धिशाली, नीलकमलाप्रमाणें सुंदर, शामवर्णाचा व पांच हात देहप्रमाण असलेला असें अथर्ववेदाचें स्वरूप आहे. अत्रि हें ऋग्वेदाचें गोत्र, सोम ही देवता, व गायत्री हा छंद होय. यजुर्वेदाचें काश्यप गोत्र, इंद्र ही देवता व त्रिष्टुप् हा छंद होय. सामवेदाचें भारद्वाज गोत्र रुद्र ही देवता व जगती हा छंद होय. अथर्ववेदाचें वैतानस हें गोत्र, ब्रह्मा ही देवता व अनुष्टुप् हा छंद होय. जो पुरुष वेदाची ऋग्वेद इत्यादि नांवें, कमलनेत्र इत्यादि रूप, आत्रेय इत्यादि गोत्र पांच विती इत्यादि प्रमाण, गायत्री इत्यादि छंद, सोम इत्त्यादि देवता, श्वेत इत्यादि वर्ण, यांचें वर्णन करतो म्हणजे

जाणतो तो विद्याहीन असला तरी त्याला विद्या मिळते. दुसऱ्या जन्मांत उत्तम जन्म घेऊन पूर्वजन्माला स्मरतो. म्हणजे त्याला पूर्वजन्म आठवतो. प्रत्येक जन्मांत वेदपारंगत होतो. व्रताचरण न करतां व्रताचें फळ मिळवितो. ब्रह्मचर्य न राखतां ब्रह्मचारीपणाचें फळ मिळवितो." हें सारें वर्णन मंत्रशास्त्राशीं संबद्ध असल्यामुळें व प्रत्यक्ष फळाशीं त्याची गांठ घालून दिलेली असल्यामुळें केवळ थोतांड म्हणून तें बाजूला काढतां येण्यासारखें नाहीं.

वेदवाङमयाच्या दारांत पाऊल टाकतांच हे जें कांहीं त्याचें विशेष ध्यानांत येतात ते पाहिले म्हणजे अलीकडे 'विद्-ज्ञाने' एवढ्या एकाच उपपत्तीवरून वेद म्हणजे जुन्या ज्ञानाचीं पुस्तकें हा करण्यांत येणारा अर्थ बरोबर नसून त्यांत कांहीं वेगळें सामर्थ्य असल्याची वैदिक धारणा स्पष्ट होते. वेदांच्या शब्दांत तसें कांहीं विशेष सामर्थ्य आहे हा विश्वास प्रत्यक्ष वेदांतच व्यक्त केलेला आहे. हें सामर्थ्य न ओळखतां व आपल्या जीविताच्या कल्याणासाठीं त्याचा प्रत्यक्ष उपयोग करून न घेतां जो नुसताच घोकम्पट्टी करील तो 'किं ऋचा करिष्यति' नुसती ऋचा घेऊन काय करणार आहे असें ऋग्वेदानेंच विचारलें आहे. विद् धातु हा नुसताच ज्ञानार्थक नसून कांहींतरी मिळविणें, संपादन करणें असा त्याचा अर्थ आहे, वेद म्हणजे असे प्रत्यक्ष जीवनावर परिणाम घडविणारे शब्दसमूह होत अशी भारतीयांची धारणा आहे. इतर सर्व प्रकारच्या ज्ञानमय ग्रंथापेक्षां वेदाला भारतवर्षांत वेगळ्या प्रकारचें महत्त्व आहे हें सिद्ध करणाऱ्या कांहीं स्थूल गोष्टी वर उल्लेखिल्याच आहेत. वेदांना हें जें निराळेंच महत्त्व प्राप्त झालें त्याचें खरें कारण वेद हें नुसतें वाङमय नसून ते मंत्र आहेत म्हणजे ती सिद्ध वाणी असून तिच्यांत दृश्य आणि अदृश्य असे दोन्ही प्रकारचे परिणाम घडवून आणण्याचें विलक्षण सामर्थ्य भरलेलें आहे अशी ऋग्वेदापासून तर परवांच्या महर्षि आण्णासाहेब पटवर्धनांच्या काळापर्यंत, इतकेंच नव्हे तर आजच्या अरविंद घोषांच्या काळापर्यंत दृढ धारणा आहे हें होय.

मंत्र म्हणजे विशिष्ट प्रकारचा प्रत्यक्ष परिणाम घडवून आणणारा शब्दसमूह होय. अशा शब्दसमूहांत अर्थाला खरें महत्त्व नसून विशिष्ट शब्द, विशिष्ट पद्धतीचे त्या शब्दांचे उच्चार व त्या शब्दांची विशिष्ट प्रकारची आनुपूर्वी अथवा क्रमानें एकामागून एक असें येणें यालाच खरें महत्त्व असतें. या मंत्रविषयक धारणेच्या मुळाशीं शब्दांत उत्पादक शक्ति आहे अशी धारणा आहे. ही धारणा वेदांत व वैदिक संस्कृतींतूनच उत्पन्न झालेल्या झरथुष्ट्री अथवा पार्शी इत्यादि धर्मांतच आहे असें नव्हे तर ज्यांना वृक्ष-पाषाणादिकांची पूजा करणारे संस्कृतिहीन असें समजण्यांत येतें त्या सर्व रानटी लोकांच्याहि धर्मांत मंत्रशास्त्रावरील विश्वास व विशिष्ट शब्दांत विशिष्ट प्रकारचें सामर्थ्य असतें अशी श्रद्धा आढळून येते. फार तर काय, पण पृथ्वीच्या पाठीवर जेथें कोठें सुधारलेला वा न सुधारलेला धर्म म्हणून आहे त्या प्रत्येक ठिकाणीं हा विश्वास आहेच. जडवादाचा दंभ मिरविणाऱ्या कांहीं मूठभर बुद्धिवाद्यांची गोष्ट वेगळी. पण या तथाकथित बुद्धिवाद्यांना धर्म म्हणून कोणताहि नसल्यामुळें त्यांचा येथें विचार कर्तव्य नाहीं, व आधुनिक शास्त्रांना शब्दांतील हें विशिष्ट सामर्थ्य मान्यच करावें लागत असल्यामुळें बुद्धिवाद्यांनाहि या सिद्धांतावर येणें कसें भाग पडतें हें मी पुढें दाखविणारच आहे.

धर्माचें साधनापर व प्रार्थनापर असें दोन प्रकारचें वर्गीकरण करतां येईल. यांपैकीं प्रार्थनापर धर्मांत मंत्रविद्येचा फारसा संबंध नसला तरी विशिष्ट प्रकारच्या स्तोत्रांनीं प्रार्थना केली असतां तिचें फळ लवकर मिळतें असा विश्वास असतो हें ध्यानांत घेतलें म्हणजे पर्यायानें शब्दसामर्थ्याची जाणीव त्या धर्मांतहि आहे हें स्पष्ट होतें. साधनापर धर्माविषयीं तर बोलावयासच नको. प्रत्येक साधनापर धर्मांत ईश्वराचीं विशेष लाडकीं म्हणून कांहीं नांवें सांगितलेलीं असतात. व त्या नांवांचा पुन्हापुन्हा एकसारखा उच्चार करीत राहिल्यास अथवा जप केल्यास ईश्वरी शक्ति लवकर प्रसन्न होते असा विश्वास आढळतो. हल्लीच्या सर्व

साधनापर धर्मांत तर हा विश्वास आहेच; पण प्राचीन धर्मांतही तो होता. ख्रिस्ती व मुसलमानांच्या प्रार्थनापर धर्मांत अशा नामजपाला विशेष महत्त्व आहे. जपाकरतां म्हणून खास ईश्वराचीं लाडकीं अशीं नांवें कुराणांत सांगितलीं असून अनेक इस्लामी पोटसंप्रदायांत त्यांच्या द्वारें सिद्धि मिळविण्याच्या साधना आहेत, व कर्मठ मुसलमान या जपाच्या साधना करतात हें प्रसिद्ध आहे. जवळजवळ प्रत्येक मुसलमान बादशहा असे जप करीत असत व त्यांच्या जपाच्या रत्नमाळा प्रसिद्ध आहेत. ख्रिस्ती धर्मांत विशेषतः त्यांतील कॅथॉलिक पंथांत मोठमोठे संत झाले असून त्यांच्या जपमाळाहि प्रसिद्ध आहेत. In the beginning was the word' and the word was with God, and word was God, हें जॉनचें वाक्य प्रसिद्ध असून ख्रिस्त्यांच्या मंत्रविद्येचें तें मूळ होय. भारतवर्षांत पाहिलें तरी वैदिक धर्माला नांवें ठेवणाऱ्या जैन व बौद्ध संप्रदायांतहि नियमित जपावर कटाक्ष असून जप हें सिद्धि मिळविण्याचें महत्त्वाचें साधन मानलें जातें. 'मामी पामी हूँ' (मणि पद्मे हूँ) ही बौद्धांची गायत्री आहे. यहुदी, मिस्त्री व खालडी लोकांत हा पद्धतशीर मंत्रजपाचा प्रकार होताच. ग्रीक व रोमन लोकांतहि शब्दांत विशेष सामर्थ्य असतें ही कल्पना होती. ग्रीक भाषेंतील 'Logas' शब्द मंत्रविद्येचा वाचक असून वैदिक 'ऋक्' शब्दाचा तो अपभ्रंश आहे अशी पुष्कळ जाणत्या लोकांची कल्पना आहे. या शब्दाचा अर्थ सृष्टि उत्पन्न करण्यापूर्वी ईश्वराच्या मनांत असलेला तद्विषक शब्द असा आहे. सारांश, शब्दसामर्थ्यावर श्रद्धा नसलेला एकहि धर्म नाहीं. त्यामुळें वैदिक धर्मांत हा सिद्धांत असला तर त्याचें कोणालाहि आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. पण यावरून इतर धर्मांच्या लोकांची शब्दसामर्थ्याविषयींची धारणा व वैदिक लोकांची धारणा एकच आहे अशी कल्पना करणें मात्र पूर्णपणें चुकीचें होईल.

इतर सर्व धर्मांतील लोक शब्दांत आलेलें हें सामर्थ्य त्या शब्दाचें स्वयंभू नसून एकतर ईश्वराच्या कृपाप्रसादानें त्या शब्दामध्यें

आलेलें आहे अथवा वारंवार जपासारख्या साधनांनीं चित्त एकाग्र झालें असतां त्या एकाग्रतेंतून शब्दद्वारें चित्താचेंच सामर्थ्य प्रकट होतें असें मानतात. ईश्वराच्या ज्या लाडक्या व्यक्ती असतात, त्या ईश्वरी प्रसादानें स्वतःच सामर्थसंपन्न असल्यामुळें आपलें असें सामर्थ्य शब्दांतही ओतूं शकतात. भारतीयांमध्यें असे ईश्वर, संत व चित्ताची एकाग्रता यामुळें शब्दांत सामर्थ्य उत्पन्न होतें असें मानतातच; या विशिष्ट पार्श्वभूमीनें सामर्थ्य उत्पन्न झालेल्या शब्दांना वरदमंत्र असें नांव आहे. जसें 'श्रीराम जय राम जय जय राम' हा वरद मंत्र आहे. स्वतःच्या अंतकाळीं लोककल्याणाच्या तळमळीनें श्रीसमर्थ रामदासांनीं श्रीरामचंद्राना असें वरदान मागितलें कीं, कोणत्याहि प्रकारची विशेप शुद्धि न करतां व विशेष यम नियम न पाळतांहि कोणी या मंत्राचा तेरा कोटी जप केला तर संख्या पूर्ण होतांच त्याला आपलें दर्शन झालें पाहिजे. श्रीरामचंद्रांनीं ही गोष्ट श्रीसमर्थांवरील प्रेमामुळें मान्य केली. व जोंवर समर्थ रामदासांचें सामर्थ्य या शब्दांच्या पाठीमागें उभें आहे तोंवर साधकाला हें फळ मिळणार हें स्पष्ट आहे. श्रीमंत् भागवत, श्रीज्ञानेश्वरी, व श्रीगुरुचरित्र या ग्रंथांतहि असें सामर्थ्य असल्यामुळें ते मंत्रमय ग्रंथ समजण्यांत येतात. जोंवर श्रीशुकाचार्यांचें, श्री ज्ञानेश्वर महाराजांचें अथवा श्रीनृसिंहसरस्वती महाराजांचें सामर्थ्य या ग्रंथांच्या पाठीशीं उभें आहे तोंवर त्यांच्या मंत्रमयतेला कसलीहि बाधा नाहीं. पण वरदमंत्र वैदिक मंत्रशास्त्राची धारणा व्यक्त करूं शकत नाहींत. वरद मंत्र हा भारतीय मंत्रशास्त्राचा केवळ एक भाग आहे. वेदासंबंधीं भारतीयांची याहून वेगळी धारणा आहे. व ती धारणा अशी कीं, वेदमंत्र हे वरद मंत्र नसून ते स्वयंभू मंत्र आहेत. म्हणजे त्यांच्यांतील सामर्थ्य चित्ताची एकाग्रता, ईश्वराची प्रसन्नता अथवा महापुरुषांच्या तपःसामर्थ्याची पार्श्वभूमि यांमुळें आलेलें नसून तें या कोणत्याहि गोष्टी नसतांना स्वयमेव शब्दांचेंच सामर्थ्य आहे. व जी सिद्धि मिळते ती तो शब्द योग्य पद्धतीनें उच्चारला गेला कीं, ईश्वर प्रसन्न असो वा

नसो, महापुरुष विरुद्ध जावोत की अनुकूल असोत अथवा चित्ताची एकाग्रता असो वा नसो, मिळाल्याखेरीज राहात नाहीं. पुराण वाङमयांतील हिरण्यकश्यपू व रावण यांना वरदानानें मिळालेल्या सामर्थ्याच्या उपपत्तीचें बीज या धारणेंत आहे. ईश्वर त्यांच्यावर अप्रसन्न असूनहि मंत्राच्या सामर्थ्यानें त्याला त्यांच्याकडे येणें व त्यांचें ईप्सित पुरविणें भागच आहे. ज्याप्रमाणें तुमची इच्छा असो अगर नसो, निखाऱ्यावर पाय पडला तर अग्नीची दाहक शक्ति त्याला चटका दिल्याशिवाय रहात नाहीं, असेंच या शब्दाचेंहि आहे. शब्दांच्या सामर्थ्याविषयींची ही स्वयंभुतेची वैदिक धारणा भागवतधर्मीयांनीं आपल्या नारायणीय अथवा भागवत धर्माचें उपास्य दैवत जो नारायण त्याच्या नांवाच्या बाबतींत लावून स्वतःची श्रेष्ठता प्रस्थापित केली आहे. श्रीमत् भागवताच्या सहाव्या स्कंधाच्या प्रारंभीं आलेल्या अजामिलोपाख्यानांतून ही गोष्ट मांडलेली आहे. कोणी एक अजामिल नांवाचा महापापी गृहस्थ अंतकाळ जवळ आला असतां घाबरला व प्रेमाचें सर्वश्रेठ स्थान म्हणून आपल्या नारायण नांवाच्या मुलाला हांक मारूं लागला. त्याबरोबर विष्णुदूतांनीं येऊन यमदूतांनीं त्याच्याभोंवतीं टाकलेल्या पाशांतून त्याची सुटका केली. पुढें यमदूत व विष्णुदूत यांच्या झालेल्या संवादांत यमदूतांनीं हा महापापी असून नारायण नांवाचा उच्चार करण्यांत त्याची कोणत्याहि प्रकारें परमेश्वरविषयक धारणा नव्हती, केवळ मुलाला त्यानें हांक मारली, कांहीं कारण नसतां असे पापी सुटूं लागले तर कसें होईल असें पुष्कळ सांगून पाहिलें. पण विष्णुदूतांनीं त्यावर एकच उत्तर दिलें कीं, 'पतितः स्खलितः चार्तः स्मृत्वा वा विवशो ब्रुवन्। वैकुंठनामग्रहणं अशेषाघहरं विदुः'। कोणत्याहि परिस्थितींत व कोणत्याहि निमित्तानें जिभेनें परमेश्वराच्या नांवाचा उच्चार केला कीं उद्धार झालाच पाहिजे. शब्दांच्या ठिकाणीं असलेल्या स्वयंभू सामर्थ्याचीच ही जाणीव येथें वेगळ्या प्रकारानें व्यक्त करण्यांत आली आहे. ही जाणीव अथवा शब्दाच्या सामर्थ्याविषयींचा हा वैदिक संकेत आजचा नसून

तो प्रत्यक्ष ऋग्वेदांतहि दृष्टोत्पत्तीस येतो. स वाग् ऋग्भ्यो अजायत तस्मात् ऋचो अजायन्त, ऋचो अक्षरे परमे व्योमन् यस्मिन् देवा अधि विश्वे निषेदुः, यस्तन्नवेद किं ऋचा करिष्यति य इत् तत् विदुः त इमे समासते ।, प्र नूनं ब्रह्मणस्पतिर्मंत्रं वदति उक्थं यस्मिन् इन्द्रो वरुणो मित्रो अर्यमा देवा ओकांसि चक्रिरे । " हें जड विश्वच तर काय पण तें चालविणाऱ्या आणि त्याला कारणीभूत असलेल्या दिव्य शक्तीहि ऋचांमध्यें वास करतात. हे जगत्कारणभूत शब्द-समुच्चय परमेश्वरानें उत्पन्न केले व त्यांत विश्वविधारक शक्ति राहिल्या. त्या तेथें कशा वास करतात हें ज्याला कळेल तोच त्या प्रकट करूं शकेल. हें गूढ ज्याला कळत नाहीं तो नुसता ऋचा घेऊन काय करणार? असें प्रत्यक्ष ऋग्वेदांतच म्हटलें आहे. वाणीचे परा, पश्यन्ती, मध्यमा, आणि वैखरी असे चार भेद ऋग्वेदांतच सांगितले असून त्यांपैकीं केवळ वैखरी हा प्रकार सर्व लोकांच्या बोलण्यांतून प्रकट होतो. व इतर तीन गुप्त व सामर्थ्यवती वाणी असून त्या वेदविद्येचें रहस्य जाणणाऱ्या श्रेष्ठ सामर्थ्यवंतांनाच कळतात असें स्पष्ट म्हटलें आहे. 'अस्य वामस्य' सूक्तांत सूक्तकार म्हणतो,

चत्वारि वाक् परिमिता पदानि तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः ।
गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ।।
(ऋ. १-१६४-४५.) हीच ऋग्वेदांतील धारणा मांडुक्यासारख्या ब्राह्मणग्रंथांतूनहि 'त्रयमिदं नामरूपं वा कर्म तेषां नाम्नां वागेव उक्थम्' अशा शब्दांनीं व्यक्त झालेली आहे.

शब्दाचा अर्थाशीं वाचक, लाक्षणिक व व्यंजक असा तीन प्रकारचा संबंध लौकिक संस्कृतांत व इतरहि भाषांतून सांगण्यांत येतो. पण हा सर्व संबंध एक प्रकारें सांकेतिक आहे. त्याची कोणतीहि शास्त्रीय उपपत्ति नाहीं. शब्दाचा अर्थाशीं आणखी एक विशेष प्रकारचा संबंध असतो; व त्या संबंधाला स्वयंभू अथवा औत्पत्तिक संबंध असें म्हणतात. "औत्पत्तिकस्तु शब्दस्य अर्थेन सम्बन्धः" असें पूर्वमीमांसाशास्त्र म्हणतें. पदार्थ या शब्दाचा

विचार केला तर ही गोष्ट लक्षांत येईल. पद म्हणजे शब्द व अर्थ म्हणजे वस्तु. शब्दांचा उच्चार झाला कीं वस्तु प्रकट झाली पाहिजे व वातावरणावर त्याचा आवश्यक तो विपरिणाम नुसत्या उच्चारानेंच घडवून आणतां आला पाहिजे. यालाच शब्दाचें स्वयंभू व औत्पत्तिक स्वरूपाचें वस्तूशीं नातें आहे असें म्हणतां येईल. वैदिक शब्दांत असें स्वयंभू उत्पादक सामर्थ्य आहे व ते शब्द कोणाहि पुरुषानें निर्माण केलेले नसून त्यांच्यापासूनच सर्व विश्व उत्पन्न झालें अशी वैदिक लोकांची धारणा आहे. सर्व आस्तिक दर्शनकारांची या बाबतींत एकवाक्यता आहे. वैदिक-लोक जेव्हां वेदाला पौरुषेय म्हणतात तेव्हां त्याचा खरा अर्थ वेद हे पुरुषानें म्हणजे ईश्वरानें केले आहेत असा असतो. व जेव्हां ते वेदाला अपौरुषेय असें म्हणतात तेव्हां त्याचा अर्थ वेद स्वतःच ईश्वर असल्यामुळें ईश्वरानें ईश्वराला निर्माण केलें असें म्हणण्यांत जितका अर्थ इतकाच ईश्वरानें वेद निर्माण केले असें म्हणण्यांतहि असल्यामुळें त्यांना पौरुषेय म्हणण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं असा असतो. या धारणेवरूनच वेदांचा अर्थ करावा कीं नाहीं या संबंधांत प्राचीनकाळीं मोठा वाद निर्माण झाला होता. व त्याचें प्रतिबिंब आजहि यास्कांच्या निरुक्त ग्रंथांत पहावयास सांपडतें. एका पक्षाचा अध्वर्यु कौत्स होता तर दुसऱ्या पक्षाचा अध्वर्यु स्वतः यास्क हाच होता. कौत्स हा कालिदासानें रघुवंशांत वर्णन केलेला वरतंतूचा शिष्य होता कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं. पण कौत्साचें म्हणणें निरुक्तावरून असें असल्याचें दिसतें कीं "अनर्थका हि मंत्राः नियतवाचो युक्तयो नियतानुपूर्व्या भवन्ति" "मंत्र ठरलेल्या शब्दांचे, ठरलेल्या पद्धतीनेंच उच्चारावयाचे व ठरलेल्या आनुपूर्वीचेच असल्यामुळें त्यांच्या उच्चाराचेंच महत्त्व आहे. त्यांना अर्थ असूं शकत नाहीं." यास्काचें याच्या उलट असें म्हणणें आहे कीं धर्म व वेद यांच्या ज्ञानासाठींच वेदमंत्रांचा अर्थ केलाच पाहिजे. पण यास्काच्या "स्थाणुरयं भारहारः किलाभूत् अधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम्" "जो वेदांचें

अध्ययन करतो, पण त्याचा अर्थ जाणत नाहीं तो केवळ भारवाहक होय" या उद्‌गारांवरून यास्क नुसते आजच्याप्रमाणें अर्थाला भारसर्वस्व समजणारे होते असें कोणी अनुमान काढलें तर तें पूर्णपणें चुकीचें ठरेल. यास्काला वेदाची अपौरुषेयता व त्यांतील शब्दांचें दिव्य सामर्थ्य पूर्णपणें मान्य आहे. पण वेदांचा अर्थ करण्यामुळें या सामर्थ्याला व त्याच्या अपौरुषेयतेला कोणत्याहि प्रकारें बाध येऊं शकत नाहीं येवढेंच त्याचें म्हणणें आहे.

वेदांची ही अपौरुषेयता, त्यांची प्रत्यक्ष ईश्वरापासून झालेली निर्मिति व त्यांच्याकडेच देण्यांत येणारें विश्वाचें उत्पादकत्व या गोष्टी ऐकल्या कीं आजचा मनुष्य हसूं लागतो. एकदां तर किर्लोस्कर मासिकामध्यें 'वेद हे परमेश्वरानें टाइप रायटरवर टाईप केल आहेत काय?' असा एक गमतीचा प्रश्नहि विचारला गेला होता. पण वेदांपासून तर श्रीशंकराचार्यांपर्यंत व त्यानंतर अण्णासाहेब पटवर्धनांच्या काळापर्यंत हा विश्वास आढळतो. 'तस्मात् यज्ञात् सर्वहुतः ऋचः सामानि जज्ञिरे' 'अरे अस्य महतो भूतस्य निश्वसितमेतत्' यासारख्या वेद व उपनिषदांतील वाक्यांनीं ही धारणा व्यक्त केलेली असून 'अनन्ता वै वेदाः' असें म्हटलें आहे. तैत्तिरीय ब्राह्मणांत म्हटलें आहे 'तं ह त्रीन्गिरिरूपानविज्ञातानिव दर्शयांचकार। तेषां हैकैकस्मान्मुष्टिमाददे स होवाच भरद्वाजेत्याऽमंत्र्य वेदा वा एते अनंता वै वेदाः।" "ब्रह्मदेवानें त्या भरद्वाजाला पूर्वी कधींहि ठाऊक नसलेले असे पर्वतप्राय तीन वेद दाखविले व त्या वेदांच्या तीन पर्वततुल्य राशींतून एकएक मूठ वेद हातांत घेऊन तो म्हणाला : हे भरद्वाजा, हे तीन पर्वत दिसत आहेत हे वेदांचे राशी आहेत. त्यांच्यांतील एकेक कण म्हणजे एकेक स्वतंत्र वेदच आहे. वेद अनंत आहेत." पण वेद चार आहेत हें आपणांस पक्कें माहीत आहे व कांहीं वेदवाङ्मयाचा लोप झाला असें म्हटलें तरी शेवटीं त्याच्या विस्ताराला मर्यादा राहणारच. मग वेद अनंत आहेत या म्हणण्याला अर्थ काय? शिवाय एक एक कण म्हणजे एक एक वेद आहे याचा अर्थ काय?

जसें ‘ हृदय ’ हा एक शब्द आहे. तो वेदमंत्रांत उच्चारला गेला तर सामर्थ्यवान् ठरेल. पण त्याचा एकेक कण म्हणजे एकेक मात्रा उच्चारली गेली तर ती सामर्थ्यशाली व सार्थ ठरते काय? लौकिक भाषेंत शब्दाचा अथवा पदाचा अर्थाच्या अनुरोधानें उच्चार केला तर तो सार्थ ठरतो. पण नुसत्या मात्रा वेगवेगळ्या करून त्यांच्या उच्चार केला तर तो निरर्थक व हास्यास्पदच ठरेल. जसें राम शब्दाचा उच्चार केला अथवा पाणी म्हटलें तर तें सार्थ ठरेल. पण र आ म अ, प आ ण ई असा उच्चार केला तर वेड्यांत गणना झाल्यविना राहणार नाहीं. पण वैदिक मंत्रांत मात्रांच्या उच्चारांतहि सामर्थ्य सांगितलें असून पदांच्या अथवा शब्दाच्या एकेका अक्षराच्या वेगवेगळ्या उच्चारांतहि वेगवेगळीं फलोत्पत्ति आहे असें म्हटलें आहे. जसें ‘हृदय’ याच शब्दाचें उदाहरण घेतलें तर शतपथ ब्राह्मणांत असें म्हटलें आहे कीं “हृ इत्येकमक्षरमभिहरन्त्स्मै स्वाश्चान्ये च य एवं वेद । द इत्येतदक्षरं ददन्त्स्मै स्वाश्चान्ये च यँ एवं वेद । यमित्येकमक्षरमेति स्वर्गलोकं य एवं वेद” शब्दाच्या उच्चाराचाच काय पण अक्षरांच्याहि वेगवेगळ्या उच्चाराचा येथें फलोत्पत्तीशीं संबंध दाखविलेला असून प्रत्येक अक्षराचें रहस्य स्पष्ट केलें आहे. मांडूक्य उपनिषदानें तर पद निर्माण करणाऱ्या मात्रांचा उच्चारहि सामर्थ्यशील असल्याचें सांगून मात्रा व पाद हे एकाच वस्तूचे पर्याय असल्यामुळें केवळ मात्रांच्या साहाय्यानें एका पर्यायाचें दुसऱ्या पर्यायांत रूपांतर करावें त्याप्रमाणें पादांचीहि सिद्धि मिळते असें स्पष्ट सांगितलें आहे. मांडूक्योपनिषदांत म्हटलें आहे. “ओमित्येतदक्षरमिदं सर्वं तस्योपव्याख्यानं भूतं भवद्भविष्यदिति सर्वमोंकार एव । यच्चान्यत् त्रिकालातीतं तदप्योंकार एव । सर्वं ह्येतद्ब्रह्म अयमात्मा ब्रह्म ।

सोऽयमात्माऽध्यक्षमोंकारोऽधिमात्रं पादा मात्रा मात्राश्च पादा अकार उकारो मकार इति । जागरितस्थानो वैश्वानरोऽकारः प्रथमा मात्राऽऽप्तेरादिमत्वाद्वाऽऽप्नोति ह वै सर्वान्कामानादिश्च भवति

य एवं वेद । स्वप्नस्थानस्तैजस उकारो द्वितीया मात्रोत्कर्षादुभयत्वाद्वोत्कर्षति ह वै ज्ञानसंततिं समानश्च भवति नास्याब्रह्मवित्कुले भवति य एवं वेद । सुषुप्तस्थानः प्राज्ञो मकारः तृतीया मात्रामितेरपीतेर्वा मिनोति ह वा इदं सर्वं अपीतिश्च भवति य एवं वेद ॥"

सर्व जग ओंकार असून भूत, भविष्य, वर्तमान व त्रिकालातीत असें ईश्वरी तत्त्व सर्व कांहीं ओंकारच आहे असें येथें सांगितलें असून नुसत्या अकाराच्या उच्चारानें सर्व कामसिद्धि व सर्वश्रेष्ठत्वाची प्राप्ति, नुसत्या उकाराच्या उच्चारानें परमज्ञानसिद्धि व कुळांत सर्वब्रह्मवित् निर्माण होणें याप्रमाणें प्रत्येक मात्रेच्या उच्चाराची फलप्राप्ति सांगितलेली आहे. व 'पादा मात्राः मात्राश्च पादाः' असा सिद्धांत सांगितलेला आहे. वस्तुतः लौकिक भाषेप्रमाणें 'पादाः मात्रार्थाः' असें म्हटलें पाहिजे. पण येथें तसें म्हटलेलें नाहीं. याचें कारण शब्दाचा अर्थाशीं केवळ संकेताचा संबंध नसून अर्थाशीं म्हणजेच वस्तूशीं स्वयंभू अथवा औत्पत्तिक संबंध आहे ही धारणा याच्या मुळाशीं आहे. शब्द हे एक वस्तूची घडण घडविणारें स्वतंत्र द्रव्य असल्यामुळें संपूर्ण पाद अथवा त्याच्या मात्रा हे त्या द्रव्याचे पर्यायच ठरतात. व त्यामुळें पाद व मात्रा म्हणजे एका पर्यायाचा रूपांतरित असा दुसरा पर्याय असल्यामुळें 'मात्रार्थाः' न म्हणतां 'पादाश्च मात्राः मात्राश्च पादाः' असें मांडूक्योपनिषदांत म्हटलें आहे. शब्दाचा अर्थाशीं म्हणजे वस्तूशीं असलेला हा जो जन्यजनकभावसंबंध हा स्वयंभू व औत्पत्तिक संबंध होय. प्रत्येक वस्तूंच्या या स्वयंभू शब्दाची जी भाषा तिलाच ऋग्वेदांत श्रेष्ठ भाषा असें म्हटलें असून तिचा अर्थाशीं नैसर्गिक संबंध आहे. पण ती गूढ असून सहज ओळखतां येत नाहीं. दुसरी यदृच्छेनें उत्पन्न झालेली जी संकेतित भाषा ती व्यवहारापुरती आहे. पहिल्या भाषेच्या नैसर्गिकतेमुळें व उत्पादनसामर्थ्यामुळें तिच्या उच्चारानें प्रत्यक्ष वस्तू उत्पन्न होईल; परिणाम घडून येईल. दुसरी संकेतित भाषा व्यवहार

करील; पण अशा सामर्थ्याच्या दृष्टीनें ती 'अफल' व 'अपुष्प' आहे. ऋग्वेदांतच भाषेचे हे दोन प्रकार वर्णिलेले आहेत.

"बृहस्पते प्रथमं वाचः अग्रं यत् प्रऐरत नामऽध्येयं दधानाः। यत् एषां श्रेष्ठं यत् अरिप्रं आसीत् प्रेणा तत् एषां निऽहितं गुहा आविः॥
उत त्वः पश्यन् न ददर्श वाचं उत त्वःशृण्वन् न शृणोति एनाम्।
उतो त्वस्मै तन्वं वि सस्त्रे जायाऽइव पत्ये उशती सुऽवासाः॥
यज्ञेन वाचःपदऽवीयं आयन् तां अनु अविन्दत् ऋषिषु प्रऽविष्टाम्।
तां आऽभृत्य वि अदधुः पुरुत्रा तां सप्तरेभा अभिसं नवन्ते॥
उत त्वं सख्ये स्थिरऽपीतं आहुः न एनं हिन्वन्ति अपि वाजिनेषु।
अधेन्वा चरति मायया एषः वाचं शुश्रुवान् अफलां अपुष्पाम्॥
अक्षण्वन्तः कर्णवन्तः सखायो मनःऽजवेषु असमाः बभूवुः।
आदध्नासः उपऽकक्षासः ऊंत्वे ऱ्हदाःऽइव स्नात्वा उंत्वे दऊश्वे॥
त एते वाचं अभिऽपद्य पापयासिरीः तन्त्रं तन्वते अप्रऽजज्ञयः॥

—(ऋग्वेद मं. १० सू. ७१ ऋचा. १,४,३,५,७व९)

"हे बृहस्पते, प्रथम ही जी अग्र म्हणजे अलीकडची भाषा शिकविली जाते ती नामरूपांचा संबंध जोडून शिकविली जाते. (अर्थात् संकेतित आहे.) याच्या पलीकडची जी श्रेष्ठ (म्हणजे नामरूपांचा संकेतित संबंध नसलेली, तर स्वयंभू संबंध असलेली) भाषा आहे ती शुद्ध व गूढ असून तिची प्राप्ति कृपेनें होते." "कोणी (करंटा) डोळ्यांनीं सर्व कांहीं पाहूनहि दिव्यवाणी मात्र पाहूं शकत नाहीं; कानांनीं सर्व कांहीं ऐकूनहि वाणीची दिव्यता त्याला कळत नाहीं. आणि एखादा मात्र—पण तो क्वचितच—असा निघतो कीं ती दिव्यवाणी त्यालाच आपली काया, अनेक विभ्रमांनीं एखाद्या वस्त्रालंकारमंडित पतिव्रतेनें पतीकडे जावें त्याप्रमाणें दाखविते (सारें रहस्य उलगडून दाखवितें.)"

"यज्ञाच्या योगानें सत्पुरुष या दिव्यवाणीच्या साक्षात्कारासाठीं प्रयत्न करूं लागले. ती दिव्यवाणी ऋषींच्या अंतःकरणांत प्रविष्ट झालेली त्या पुरुषांना आढळली. तिला तेथून आपल्या स्वाधीन करून घेऊन त्यांनीं तिची निरनिराळ्या प्रकारांनीं योजना केली

म्हणून तिला अनुलक्षून सात कवी स्तोत्र गायन करीत असतात."

"या दिव्यवाणीच्या दिव्यतेचा एकदां ज्याला साक्षात्कार झाला तो तिचा आश्रय कधीं सोडीत नाहीं व (तो इतका निर्भय बनतो कीं) मग कोणत्याहि सत्त्वपराक्रमाच्या कार्यापासून त्याला कोणी परावृत्त करूं शकत नाहीं. पण ज्याला वाणीच्या या दिव्यतेचा साक्षात्कार झालेला नाहीं तो या अधेनू (कल्याणाच्या दृष्टीनें निरुपयोगी), अफल (निष्फळ) व अपुष्प (अविकसित) शब्दव्यवहाराच्या भुलावणींत जीवन घालवितो. कानांवरून शब्द जात येत असतात; पण ना त्यांत फुलोरा ना फलप्राप्ति."

"(असें होण्याचें कारण) सर्वांनाच कान व डोळे असतात आणि इतरहि सर्व प्रकारचें सादृश्य असतें, पण धारणेच्या सामर्थ्याच्या दृष्टीनें प्रत्येकांत फरक असल्यामुळें (दिव्यवाणीच्या साक्षात्काराच्या बाबतींत सर्वच) सारखे ठरत नसतात. ज्याप्रमाणें कांहीं जलाशय–गळ्याइतके खोल, आणि कांहीं तर कमरेइतकेच असतात, परंतु दुसरे कांहीं बुडी मारून स्नान करण्याला योग्य अशा डोहांप्रमाणें अथांग खोल असलेले पाहण्यांत येतात."

"या वाणीच्या सन्निध असूनहि मूढजन पापवासना उराशीं बाळगून आपल्याच बुद्धीनें कांहीं तरी तंत्र चालवीत असतात."

ही जी अर्थाशीं म्हणजे पदार्थमात्राशीं या औत्पत्तिक, स्वयंभू अथवा नैसर्गिक संबंधानें संबद्ध अशी दिव्य वाणी तीच वेदवाणी असून तिचें हें सामर्थ्य ज्यांना ओळखतां येणार नाहीं ते नुसत्या ऋचांच्या पुटपुटण्यानें काय मिळविणार असें प्रत्यक्ष ऋग्वेदांतच म्हटलें आहे.

"ऋचो अक्षरे परमे विओमन् यस्मिन् देवाः अधिविश्वे निषेदुः। यः तत् न वेद किम् ऋचा करिष्यति ये इत् तत् विदुः ते इमे समासते" (ऋ. १-१६४-३९)

"हें जड विश्वच तर काय पण तें चालविणाऱ्या दिव्यशक्तिहि (देव) स्वर्लोकांत रहावें त्याप्रमाणें ऋचांच्या अक्षरांत वास करतात. त्या दिव्य शक्ति ऋचांच्या अक्षरांत कसा वास करतात

(हें ज्याला समजेल त्यालाच त्या त्यांतून प्रकटहि करतां येतील.) पण हें गूढ ज्याला समजलें नाहीं त्याला नुसत्या ऋचेचा काय उपयोग होणार? हें ज्यांना समजलें तेच खरे कृतार्थ होतात."

"एकं गर्भं दधिरे सप्तवाणिः" "स वा ऋग्भ्यो अजायत" इत्यादि वचनांतून तर शब्दांपासूनच जग उत्पन्न झालें असें स्पष्ट म्हटलेलें असून शतपथ ब्राह्मणांत म्हटलें आहे:—

"त्रयमिदं नामरूपं वा कर्म तेषां नाम्नां वागेव ऊक्थम्।।" नाम, रूप, कर्म हीं त्रयी म्हणजेच सारी सृष्टि व वाणी हेंच तिचें कारण होय. या शतपथाच्या म्हणण्याचाच आविष्कार श्रीमन्महाभारत व मनुस्मृति या जगन्मान्य ग्रंथांतून श्रीव्यास व मनु या 'साक्षात्कृतधर्माणः' अशा योग्यतेच्या ऋषींनीं केला आहे. श्री व्यास व मनु म्हणतात:

अनादिनिधना नित्या वागुत्सृष्टा स्वयंभूवा ।
आदौ वेदमयी दिव्या यतः सर्वाः प्रवृत्तयः।।
नाम रूपं च भूतानां कर्मणां च प्रवर्तनम्।
वेदशब्देभ्य एवादौ निर्ममे स महेश्वरः।।

—महाभारत शांतिपर्व २३३–२४,२५

सर्वेषां तु सनामानि कर्माणि च पृथक् पृथक्।
वेदशब्देभ्य एवादौ पृथक् संस्थाश्च निर्ममे।।

—मनुस्मृति १–२१

जिच्यापासून सर्व जग उत्पन्न झालें अशी अनादिनिधन व नित्य असणारी वेदरूप दिव्य वाणी जगन्निर्मात्यानें सर्वांत प्रथम निर्माण केली. व नंतर प्राणिमात्रांचीं नामें, रूपें व त्यांच्या कर्मप्रेरणांचीहि निर्मिति परमेश्वरानें वेद शब्दापासूनच केली." "सर्वांचीं वेगवेगळीं नांवें, कर्में व भिन्नभिन्न संस्था यांची निर्मिति परमेश्वरानें वेदांच्या शब्दांपासूनच केलेली आहे." वेद शब्द हें सृष्टीचें आदिद्रव्य होय. ऋग्वेदांतील धारणाच व्यास व मनूंच्या

या वचनांतून व्यक्त झालेली आहे हें स्पष्ट आहे. 'अत एव च नित्यं या बादरायणांच्या सूत्रावरील आपल्या भाष्यांत भगवत्पूज्यपाद श्रीमदाद्यशंकराचार्य यांनीं हीच धारणा उल्लेखिली आहे.

पण ही धारणा केवळ श्रद्धामूलक आहे कीं तिच्या मागें कांहीं शास्त्रीय स्वरूपाचा पायाशुद्ध विचार आहे व असा कांहीं विचार असला तर तो आधुनिक पद्धतीनें मांडतां येण्याची शक्यता आहे काय हा प्रश्न आहे प्राचीन मीमांसकांच्या ग्रंथांतून व अलीकडेहि पंडितसभांमधून या प्रश्नाची चर्चा व उत्तरें प्रत्युत्तरें होतात. पण वचप्रनामाण्य व शुष्क कोटचा यांच्या तेथील प्रसरानें आजच्या श्रद्धेचा पाया उखडून गेलेल्या माणसाचें समाधान होण्याची शक्यता नसते. वस्तुतः जुन्या पंडितांच्या व मीमांसकांच्या शब्द-प्रामाण्याला आजच्या नव्या माणसानें हंसण्यासारखें कांहीं नसतें. कारण तो स्वतः वचनप्रामाण्यवादीच असतो. फक्त वचन कोणाचें प्रमाण मानावयाचें येवढचापुरताच त्याचा खरा वाद असतो. आजचाहि मनुष्य एडिसन्, आईन्स्टीन यांचींच नांवें व वचनें प्रमाण म्हणून घेतो. स्वतः प्रयोगशाळेंत जाऊन तो कांहीं प्रयोग करीत नसतो. पण यांत आपण कांहीं चूक करीत आहों असें त्याला मुळींच वाटत नाहीं. कारण आजचे आइन्स्टीन, वगैरे शास्त्रज्ञ, व त्यांचा प्रामाणिकपणा व त्यांच्या प्रयोगशाळेची निर्णायकता या गोष्टीवर त्याचा विश्वास असतो. यालाच श्रद्धा असें म्हणतात. जुन्या मनुष्याचीहि अशीच व्यास, मनु, पतंजलि, श्रीशंकराचार्य यांच्या सत्यनिष्ठेवर, व त्यांच्या योगासारख्या प्रयोगशास्त्रांवर श्रद्धा असते व म्हणून त्यांच्या वचनावर तो विश्वास ठेवतो व इतरांनाहि तसें सांगतो. पण ज्यांची अशी श्रद्धा नसते त्यांना त्यांतील मूलभूत शास्त्रीय विचाराची कल्पना दिली तरच ती एक विचारार्ह गोष्ट आहे असें ते मानण्याचा संभव असतो. जुन्या वचनावरील आजच्या माणसाचा श्रद्धेचा पाया उखडून गेला आहे. त्यामुळेंच या मूलभूत शास्त्राचा विचार मांडण्याचीहि आवश्यकता उत्पन्न झालेली आहे.

उदाहरणार्थ श्रीतुकाराम महाराज सदेह वैकुंठाला गेले असा जर उल्लेख असला तर व कशावरून असा जर जुन्या सश्रद्ध माणसानें प्रश्न विचारला तर सदेह स्वर्गाला जाणें शक्य आहे, कारण कीं धर्मराज सदेह स्वर्गाला गेल्याचा महाभारतांत उल्लेख आहे; तुकाराम महाराजहि युधिष्ठिरांप्रमाणेंच पुण्यश्लोक होते, त्यामुळें ते सदेह वैकुंठाला गेले अशा तर्कपद्धतीनें त्याचें समाधान करतां येणें शक्य आहे. कारण कीं महाभारत व त्यांतील दाखले खरे आहेत अशी त्याची निश्चिति आहे. पण नव्या माणसाला जर हेंच उत्तर दिलें तर त्याची महाभारतांतील उल्लेखांच्या बाबतींत तशी श्रद्धा नसल्यामुळें तो सहजच पुढें असा प्रश्न विचारील कीं युधिष्ठिर सदेह स्वर्गाला गेले हीच थाप अथवा कविकल्पना नसेल कशावरून? निदान त्यानें तुकारामाचें सदेह स्वर्गाला जाणें ही एकादी गंभीर विचारार्ह घटना आहे असें समजावें म्हणून त्याला सप्तलोकात्मक विश्वाची शास्त्रीय मांडणी योगाच्या साहाय्यानें शरीर पंचतत्त्वांत विलीन करून टाकण्याची शक्यता, मानवी शरीरांतील पृथ्वी-परमाणूंच्या घटकांचें तेज-परमाणूंत रूपांतर करतां येण्याची शक्यता व त्याच्या मुळाशीं असणारी प्रत्यक्ष प्रयोगाच्या शास्त्राची प्रक्रिया सांगणें हेंच आवश्यक ठरतें. त्यामुळेंच वेदांच्या अपौरुषेयत्व-सिद्धीच्या जुन्या मीमांसकी कोटयांचा आतां उपयोग नाहीं.

वेदाचा कर्ता कोण हें कोणालाहि सांगतां येणें शक्य नाहीं म्हणून ते अपौरुषेय आहेत अशी एक मीमांसकी कोटी आहे. पण हें विधान एखाद्या अप्रसिद्ध मराठी लावणीसंबंधानें सुद्धां करतां येईल. म्हणून तिला अपौरुषेय म्हणावयाचें कीं काय ? वेदांच्या अध्ययन-अध्यापनाची गुरुशिष्यपरंपरा अनादि आहे असा एक दुसरा युक्तिवाद असतो. पण प्रत्येकच सम्प्रदायांतील परंपरांच्या बाबतींत असें म्हणतां येणें शक्य आहे. मग वेदांच्या अनादित्वाचें व अपौरुषेयत्वाचें महत्त्व तें काय ? वेद हे जर मन्त्र आहेत व ते जर नित्य आहेत तर त्यांच्या उच्चाराची पद्धतीहि एकच असावयास पाहिजे. मग वैदिकांच्या शाखाभिन्नत्वाची व

भिन्न भिन्न शाखेप्रमाणें भिन्न भिन्न असणाऱ्या उच्चारांच्या पद्धतीची संगति काय? मग निरुक्तकारांच्या मंत्राविषयींच्या 'नियतवाचो युक्तयो' या म्हणण्याला कांहीं अर्थ राहात नाहीं. मंत्रांतील सामर्थ्य ईश्वरी कर्तृत्वामुळें उत्पन्न झालें व शाखाभेद अध्ययनदोषामुळें उत्पन्न झाला असें त्याला जुन्या लोकांचें उत्तर आहे. पण एकदां झालेला दोष सुधारावयाचा कीं दोषच शाखा-भेदांच्या रूपानें तसाच चालू ठेवावयाचा याला त्यांच्याजवळ उत्तर नाहीं. व भ्रष्ट उच्चारणाच्या दोषांपासून यामुळेंच त्यांची सुटका नाहीं. या दोषपरिहारासाठीं "यद्यप्यर्थो नित्यो या त्वसौ वर्णानुपूर्वी साऽनित्या। तद्भेदाच्चैतद्भवति काठकं कालापकं मौदकं पैप्पलादिकमिति" "वेद नित्य आहेत याचा अर्थ त्यांतील अर्थ नित्य आहे; पण वर्णानुपूर्वी म्हणजे शब्दक्रम अनित्यच आहे व त्यामुळें शाखाभिन्नत्व उत्पन्न झालें" असें स्पष्टीकरण करण्यांत येतें पण तें चांगलेंच अंगावर येणारें आहे. त्यानें शाखाभिन्नत्वावर पाहिल्या स्पष्टीकरणानें येणारा भ्रष्ट उच्चारणाचा आरोप जरी जात असला तरी वेदांचें मंत्रमयत्व पार निकालांत निघते, कारण मंत्रांचें लक्षण निरुक्तांत "नियतानुपूर्व्या नियतवाचो युक्तयो" म्हणजे 'शब्द, शब्दाचा अनुक्रम व उच्चारण पद्धति अविचल असणें' हें जें केलें आहे त्याला कांहीं अर्थच राहात नाहीं. अर्थ नित्य व शब्द अनित्य म्हटलें कीं 'धियो यो नः प्रचोदयात्' या गायत्री मंत्रांतील शब्दांऐवजीं 'बुद्धि दे रघुनायका' ही त्याच अर्थाची मराठी ओळ म्हटली तरी गायत्री मंत्राच्या उच्चाराचें फळ मिळेल असें मानावेंच लागतें. मग वेदाध्ययन वेदाच्या इंग्रजी भाषांतरावरूनहि होऊं शकतें. यावर एकच परिहार आहे व तो म्हणजे कल्पाच्या आरंभीं परमेश्वरानें हें असेंच ठरवून दिलें म्हणून तें तसेंच उच्चारलें पाहिजे हा तो परिहार होय. पण हा केवळ श्रद्धेचा प्रश्न आला; शास्त्राचा नाहीं. अपौरुषेय-त्वाच्या संकेताच्या मुळाशीं कांहीं शास्त्रीय प्रणालि आहे काय? असल्यास ती कोणती? सारें विश्व वेदांपासून निर्माण झालें असें

जें ऋग्वेदाचे मंत्रद्रष्टे, मनु व व्यास म्हणतात त्यांत कांहीं शास्त्रीयता आहे काय?

लोकमान्य टिळकांनीं आपल्या 'आर्क्टिक होम इन् दि वेदाज्' मध्यें या विषयाचा शेवटच्या प्रकरणांत फक्त उपन्यास करून तो विषय सोडून दिलेला आहे. वेद हे शब्द आहेत. वेदांपासून जग निर्माण झालें याचा अर्थ शब्दांपासून जग निर्माण झालें असा आहे. लोकमान्यांनीं असें म्हटलें आहे कीं "शब्दांपासून सृष्टयुत्पत्ति झाली कीं काय हा प्रश्न ऐतिहासिक विवेचनाच्या बाहेरचा आहे." त्यांच्या ग्रंथांतील विवेचनाच्या दृष्टीनें तो बाहेरचा असला तरी प्रस्तुत प्रकरणांतील तोच प्रतिपाद्य विषय आहे. व "आमच्या आर्यांच्या आद्यग्रंथांतील कथा व अगदीं नवीन शास्त्रीय-शोध यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न करण्यांत काळाच्याच धोर-णाचें अनुकरण आहे" या त्यांच्या ग्रंथांतील शेवटच्या वाक्यांत त्यांनींच पुरस्कारिलेल्या पद्धतीनें या विषयाकडे पाहण्याचा प्रयत्न करणेंच योग्य आहे.

### वैदिक दृष्टिकोनांतून सृष्टीची उत्पत्ति–

वेद हे मंत्र आहेत व त्यामुळें त्यांच्या अपौरुषेयत्वाच्या संकेताचा उलगडा करतांना मंत्रशास्त्राच्या विचारप्रणालीचाच उलगडा होतो. मंत्र अथवा मंत्रशास्त्र म्हटलें म्हणजे कांहीं तरी गूढ व निरर्थक वटवट अशी समजूत आधुनिक संस्कारांच्या माणसानें करून घेतलेली असते. वस्तुतः हें भारतीयांचें शास्त्र आहे. व शास्त्र म्हणून त्याचा विचार करणें हेंच बुद्धिवादी प्रामाणिक-पणाच्या दृष्टीनें आवश्यक आहे. जस्टिस वुड्रॉफ म्हणतो–

Mantra in the words of a distingwished Indian has been called meaningless jabber. When we find Indians thus talking of their Shastra, it is not surprising that Europeans should take it to be of no account. They naturally, though erroneously, suppose that Indian always understands his own beliefs and that if he says

that they are absurd, it is taken that they are so. Even however amongst Indians who have not lost themselves through an English education, the Science of Mantra is largely unknown. There are not many students of the Mimansa now-a-days. The English educatad have in this as in other matters generally taken the cue from their western Gurus and passed upon Mantra Vidya a borrowed condemnation. There are those among them who have in the past thought little of their own culture and have been only too willing to sell their old lamps for new ones. Because they are new, they will not always be found to give better light. Let us hope this will change as indeed it will. Before the Indian condemns his cultural inheritance, let him at least first study and understand it. It is true that Mantra is meaningless to those who do not know its meaning. But to those who do, it is not jabber. Though of course, like everything else, it may become, and indeed has become, the subject of ignorance and superstitous use. A telegram written in a code in a merchant's office, will seem the merest gibberish to those who do not know that code. Those who do may spell out a translation bringing lakhs of real rupees for those who have sent it. Mantra Vidya, whether it be true or not, is a profoundly conceived science."

Shakti and Shakta pp. 452

"आजच्या भारतीयांच्या कल्पनेनुसार मन्त्र म्हणजे निरर्थक वटवट होय. ज्या वेळीं प्रत्यक्ष भारतीयच आपल्या शास्त्रासंबंधानें असें बोलतांना आढळतो, त्या वेळीं युरोपियनांनीं त्या शास्त्राकडे दुर्लक्ष करणें आश्चर्यकारक वाटत नाहीं. ते चुकीनें कां होईना पण स्वाभाविकपणें असें समजतात, कीं, 'हिंदु मनुष्याला त्याच्या शास्त्रीय श्रद्धा अधिक कळतात, व तोच जर त्यांना निरर्थक म्हणूं लागला तर तेही तसेंच गृहीत धरतात. ज्यांना

इंग्रजी शिक्षणानें पूर्ण आत्मविस्मरण झालेलें नाहीं अशाही भारतीयांना बहुधा मन्त्रशास्त्र माहीत नसतें. मीमांसाशास्त्राचे फारसे अभ्यासक आतां उरलेले नाहींत. ज्या हिंदूंनीं इंग्रजी शिक्षण घेतलें आहे त्यांनीं इतर अनेक गोष्टींप्रमाणेंच या बाबीं-तही आपल्या पाश्चात्य गुरूंचा दृष्टिकोनच आत्मसात् केलेला आढळतो. त्यामुळें त्यांचे मन्त्रशास्त्रावरील प्रलाप म्हणजे त्यांच्या या गुरूंच्या मतांची उसनवारीच असते. त्यांच्यापैकीं कांहींनीं तर आपल्या प्राचीन संस्कृतीचा मुळींच अभ्यास केलेला नसतो. व नवे दिवे घेऊन जुने विकण्यासाठीं ते फारच उत्कंठित झालेले असतात. पण दिवे नवे असले म्हणजे ते अधिक चांगला प्रकाश देतात असें मानण्याचें कारण नाहीं. यांत परिवर्तन घडून येईल हें निश्चित. आपल्या संस्कृतीच्या श्रद्धाकेन्द्रांचा धिक्कार करण्याआधीं हिंदु मनुष्यानें निदान त्यांचा अभ्यास करणें व त्या समजावून घेणें तरी आवश्यक आहे. ज्यांना मंत्रांचा अर्थ कळत नाहीं त्यांच्या दृष्टीनें मन्त्र निरर्थक आहे हें खरें; पक ज्यांना तो समजतो त्यांच्या दृष्टीनें ती रिकामी वटवट निश्चित नव्हे. दुर्दैवानें हा विषय अज्ञान व अवास्तव कल्पना यांच्या जाळयांत फसलेला आहे. एकाद्या व्यापाऱ्याच्या कार्यालयांत सांकेतिक भाषेंत लिहि-लेली तार ज्यांना तो संकेत समजत नाहीं त्यांच्या दृष्टीनें निरर्थक वटवट आहे. पण ज्यांना तो संकेत माहीत आहे ते त्याच्या जोरावर उलाढाल करून प्रत्यक्ष लाखो रुपये मिळवितात. मन्त्र-विद्या खरी असो वा नसो, पण तें एक अर्थपूर्ण शास्त्र आहे हे निश्चित.''

पुष्कळ लोक मन्त्र म्हणजे प्रार्थना समजतात. पण मन्त्र ही प्रार्थना नव्हे. कारण प्रार्थनेंत साधकाच्या इच्छेनुरूप हवे ते शब्दांचे फेरफार होऊं शकतात. पण मन्त्र हे 'नियतवाचोयुक्ति' असल्यामुळें त्यांच्यांतील ठरीव शब्दांत कांहीं बदल होऊं शकत नाहीं. मन्त्र म्हणजे शब्दसमूह, पण सामर्थ्यवान् शब्दसमूह. वेदांची अपौरुषेयत्वाची धारणा व मन्त्रांची ही विशिष्ट प्रक्रिया

उलगडण्यासाठीं आधीं शब्द म्हणजे काय हें पाहिलें पाहिजे. भगवान् पंतजलींनीं आपल्या व्याकरण महाभाष्यांत पहिल्याच पस्पश आन्हिकांत शब्दाची व्याख्या पुढीलप्रमाणें केली आहे :—

" प्रतीतपदार्थकः लोके ध्वनिः शब्द इत्युच्यते । " "ज्याच्यामुळें प्रत्यक्ष पदार्थ अनुभवास येतो अशा ध्वनीला म्हणजे नादाला शब्द असें म्हणतात." शब्द हा एक नाद आहे, ध्वनि आहे व सार्थ ध्वनीलाच शब्द असें म्हणतात हें यावरून स्पष्ट होईल. त्यामुळें शब्दाचा विचार याचा खरा अर्थ नादाचाच विचार असा होतो.

एका अव्यक्त तत्त्वापासून ही सर्व व्यक्त सृष्टि उत्पन्न होते. व पुन्हा त्या अव्यक्त तत्त्वांतच ती विलीन होते असा आमच्या शास्त्रांचा सिद्धान्त असून त्यामुळें जगाचें लक्षण अथवा वर्णन 'व्यक्तमध्य' या शब्दानें आमच्या शास्त्रकारांनीं केलेलें आहे. ही अव्यक्तांतून व्यक्त होणारी सृष्टि हवी तशी व्यक्त होत नसून कांहीं एका विशिष्टक्रमानेंच ती व्यक्त होते व त्या क्रमानेंच ती मूलतत्त्वांत विलीन होते. सृष्टीचा हा व्यक्त होण्याचा क्रम उपनिषद् वाङ्मयांत पुढीलप्रमाणें सांगितलेला आहे :—

" सोऽकामयत बहुस्यां प्रजायेय । तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः सम्भूतः । आकाशाद्वायुः वायोरग्निः अग्नेरापः अद्भ्यः पृथिवी " सर्व जगांत भरून राहिलेलें जें आत्मतत्त्व त्याच्यांत मी एकटा आहे व मला पुष्कळ झालें पाहिजे अशी जाणीव प्रथम उत्पन्न झाली. ही जी मूल तत्त्वाची इच्छारूप प्रेरणा तीच सृष्टीच्या निर्मितीचें खरें कारण होय. ही निर्मिति म्हणजे त्याच्याहून कांहीं वेगळें नसून तें एकच तत्त्व नानारूपांनीं नटलें. या प्रेरणेनंतर आत्म्यापासून जी पहिली सृष्टि निर्माण झाली अथवा अव्यक्ताचें जें पहिलें व्यक्तीकरण झालें तें म्हणजे आकाश होय. पुढें आकाशापासून वायु उत्पन्न झाला. वायु म्हणजे गतितत्त्व. आकाशरूपी सघन तत्त्वाच्या आश्रयानें गतितत्त्वाचीं हीं विविध आन्दोलनें चालू असतात. आकाश हें वायूचें कारण आहे.

वायूपासून तेज उत्पन्न झाल्यामुळें वायु हें तेजाचें कारण आहे. तसेंच तेज हें आपतत्त्वाचें व आपतत्त्व पृथ्वीतत्त्वाचें कारण होय. नंतर पृथ्वीवर हळूहळू वनस्पति, प्राणी इत्यादि उत्पन्न झाले हें सरळच आहे. सृष्टिक्रमाच्या या पसाऱ्याच्या उपसंहाराची वेळ आली म्हणजे सर्व वनस्पति व प्राणिजात पृथ्वीतत्त्वांत, पृथ्वीतत्त्व आपतत्त्वांत, आपतत्त्व तेजतत्त्वांत, तेजतत्त्व वायुतत्त्वांत व तें आकाशतत्त्वांत विलीन होतें. हें आकाश तत्त्व आत्माच्या प्रेरणेंत व ती आत्मतत्त्वांत विलीन होते हा लयक्रम आहे. उपनिषदांत कोठें कोठें तीनच महाभूतांचें वर्णन आहे. पण आत्म्यापासून पहिली उत्पन्न झालेली सृष्टि म्हणजे आकाश होय व त्यापासूनच इतर सर्व सृष्टि उत्पन्न झाली, या सिद्धान्ताच्या बाबतींत वेद व उपनिषद वाङमयाचा कोठेंही मतभेद नाहीं. व्यक्त सृष्टीचें आदिद्रव्य आकाश होय असा याचा सरळ अर्थ आहे. पण आकाश म्हणजे तरी काय ?

अद्वैतदर्शनाच्या परिभाषेप्रमाणें पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं पंच महाभूतें पंचीकरणांतून म्हणजे या पांचही तत्त्वांच्या मिश्रणांतून उत्पन्न झालीं असून आजचीं त्यांचीं स्वरूपें हीं त्यांचीं शुद्ध व अमिश्रित स्वरूपें नव्हेत असें आहे. या पांचही महाभूतांचीं मूलस्वरूपें म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस, गन्ध हीं होत. याचा अर्थ असा कीं, आज आपण ज्याला आकाश असें म्हणतों तें मिश्र स्वरूपाचें आहे, व त्याचें शुद्ध स्वरूप केवळ नाद अथवा शब्द हें होय. म्हणूनच शब्द, स्पर्श, रूप, रस, गन्ध यांना पंच महाभूतांच्या **तन्मात्रा** असें म्हणतात. तन्मात्रा म्हणजे मिश्रण न झालेले केवळ तेंच शुद्ध स्वरूप होय. सांख्य शास्त्राप्रमाणें आकाश हें द्रव्य असून शब्द हा त्याचा गुण होय. याचा अर्थ सरळच असा होतो कीं या संपूर्ण व्यक्त सृष्टीचें आदिद्रव्य शब्द अथवा ध्वनि हेंच आहे, व तें आदि द्रव्य आहे याचा अर्थ तें जगाचें घटक द्रव्य असून त्याला उपादान कारण म्हटलें पाहिजे. याप्रमाणें साऱ्या

सृष्टीचें उपादान कारण म्हणजे नाद अथवा शब्द असल्यामुळें मंत्रशास्त्रांत जगाचें वर्णन 'नादबिन्दुमय कलासुन्दरी' असें केलें आहे.

शब्दाला आकाश म्हणण्याचें तरी काय कारण असें स्वाभाविकच वाटेल. आकाश या शब्दांत आ हा उपसर्ग व काश् हा धातु आहे. काश् म्हणजे प्रकाशणें. हा त्या धातूचा अर्थ लक्षांत घेतला तर आसमन्तात् काश असा शब्द तयार होतो. आकाश शब्दाचा अर्थ अव्यक्ताचें पहिलें व्यक्तीकरण, अप्रकाशित असलेल्याचें पहिलें प्रकाशांत येणें असा आहे. आत्म्यापासून प्रथम आकाश उत्पन्न झालें याचा अर्थ आतां अधिक स्पष्ट होईल. आत्म्यापासून आकाश उत्पन्न झालें म्हणजे पहिलें व्यक्तीकरण झालें. पण त्या व्यक्तीकरणाचें स्वरूप काय होतें असें विचारलें तर तें मात्र शब्द अथवा नाद हेंच होतें हें स्पष्ट होईल. पण याप्रमाणें शब्द हें जगाचें आदि द्रव्य अथवा उपादान कारण होय असें म्हटलें कीं वेदान्त्यांच्या अंगावर कांटा आल्याखेरीज राहणार नाहीं. ब्रह्म हेंच जगाचें उपादान कारण असतां शब्द हें जगाचें उपादान कारण आहे असें सांगणें हा त्यांच्या मतें उपनिषदांचाच द्रोह होईल व स्वतः श्रीमद्‌भगवत्पूज्यपाद श्रीशंकराचार्यांनीं आपल्या शारीरक भाष्यांत "न चेदं शब्दप्रभवत्वं उपादानकारणाभिप्रायेण उच्यते" जग हें शब्दापासून उत्पन्न झाले याचा अर्थ शब्द हा जगाचें उपादान कारण आहे असा नाहीं असें म्हटलें आहे. व त्यावरूनच वेदान्तमताप्रमाणें शब्द हें जगाचें उपादान कारण ठरूं शकत नाहीं. पण यावर आचार्यांचें भाष्य संभाळून गुरुवर्य श्री. अप्रबुद्धांनीं आपल्या "वैदिक संस्कृतीची पुनर्घटना" या ग्रंथांत जें स्पष्टीकरण केलें आहे तें पुरेसें आहे. गुरुवर्य श्री. अप्रबुद्ध म्हणतात : "वेदान्तसूत्रांप्रमाणें ब्रह्म हेंच जगाचें उपादानकारण असून इतर सर्व अध्यास आहे व ब्रह्माखेरीज बाकी जें जें भासतें तें तें अध्यास असून त्यास खरोखर सत्ता अशी नाहींच असें जें शंकराचार्यांनीं म्हटलें आहे तें केवळ परमार्थतः आहे. जगताची पारमार्थिक सत्ता जरी त्यांनीं अमान्य केली तरीही त्याची

व्यावहारिक सत्ता मान्य करणें त्यांनाही भागच होतें. गारोड्याचा साप कितीही खोटा म्हटला तरी तो हातास डसून रक्त काढीत होता ही गोष्ट वामन पंडितास नाकबूल करतां येईना. एकदां जगताची व्यावहारिक सत्ता म्हटली कीं त्यांतील सर्व कार्यकारणादि नियमांच्या प्रणालिका व्यावहारिक सत्तेच्या दृष्टीनें कां होईना, जशाच्या तशाच घेणें भाग पडतें, व त्या तशा घेतल्या म्हणजे नाद हें जगताचें मानवी बुद्धीच्या आटोक्यांत येणारें अध्यस्त व्यक्ततेंतील 'धाता यथा पूर्वं' असें नित्य उपादान कारण असून नाद हा देखील अध्यासच आहे व त्याच्या सुद्धां सर्वांचें ब्रह्म हें बुद्धीला सुद्धां अग्राह्य असें "बुद्धेः परतः" असें पारमार्थिक उपादानकारण आहे असें म्हटलें म्हणजे झालें. उपादान कारण अशी कांहीं प्रत्यक्ष वस्तु असली पाहिजे व शब्द ही कांहीं प्रत्यक्ष वस्तु आहे हें सांख्य व योग यांच्या साहाय्यावांचून समजत नाहीं."

हें उपादानकारणभूत शब्द सृष्टिरूपानें नटले व प्रत्येक वस्तुजाताचें नाद हेंच खरें स्वरूप होय हें ध्यानांत घेतलें म्हणजे शब्दापासून अथवा नादापासून सृष्टि उत्पन्न झाली म्हणजे काय याची कल्पना येते. पदार्थ या शब्दांतही हाच भाव अभिप्रेत आहे. अर्थ म्हणजे जगांतील यच्चयावत् वस्तु व पद म्हणजे त्यांचीं घटक द्रव्यें असणारे शब्द किंवा नादद्रव्य. सर्वच सृष्टीचें अथवा विश्वाचें आदिद्रव्य याप्रमाणें वैदिकांच्या सृष्टीच्या उलगड्याप्रमाणें शब्दच ठरत असल्यामुळें देव, देवता सुद्धां शब्दापासूनच उत्पन्न झाल्या व ऋचांत देवसुद्धां निवास करतात या ऋचांतील वचनांचा खरा अर्थ उलगडतो. कारण सर्व विश्वांत आधिभौतिक सृष्टीप्रमाणेंच आधिदैविक सृष्टीही आल्याविना रहात नाहीं.

आधुनिक शास्त्राप्रमाणें सर्व सृष्टीला आधारभूत असें एक द्रव्य असून त्या द्रव्याच्या आधारें गतिस्वरूप परमाणूंचीं चाललेलीं आंदोलनें हेंच जगाचें मूळ स्वरूप ठरतें. electrons हें जें आज जगाचें मूल द्रव्य म्हणून सांगण्यांत येतें तें शक्तिप्रवाह असून प्रचंड गतिमयता हेंच त्याचें स्वरूप आहे. कल्पनेच्या पलीकडे

असलेल्या निरनिराळ्या गतींनीं फिरणाऱ्या या विद्युत्परमाणूंचे संघ म्हणजेच कोणतीही वस्तु असून पदार्थांची परस्परभिन्नता अथवा त्यांचा वेगवेगळेपणा हा केवळ त्या गतीच्या वेगवेगळ्या स्वरूपांत दडलेला आहे. प्रकाश आणि ध्वनि हीं एकाच मूलद्रव्यांत होत असलेल्या निरनिराळ्या आंदोलनांचीं स्वरूपें असून त्यांत मूलभूत भेद कांहींही नाहीं असें आजच्या शास्त्रज्ञांचें मत आहे. या आंदोलनांच्या निरनिराळ्या संख्या हेंच भिन्न भिन्न प्रतीतींचें मुख्य कारण असून या व्यक्त सृष्टींत केवळ अनंत अपरिमित गतितत्त्व आहे व कालक्रम आणि ती गति यांच्या परस्परप्रमाणावरून सृष्टींत नानात्व दिसतें. वस्तुतः एका अखंड गतीवांचून दुसरें कांहींच नाहीं असें आजच्याहि शास्त्रज्ञांचें मत आहे. आपल्या Mysterious Universe या ग्रंथांत सर जेम्स जीन्स म्हणतात,

The tendency of modern physics is to resolve the whole material universe into waves and nothing but waves. These waves are of two kinds. Bottled up waves which we call radiation or light. If anihilation of matter occurs the process is merely that of unbottling imprisoned wave-energy and setting it free to travel through space. These concepts reduce the whole Universe to a world of light, potential or existent, so that the whole story of its creation can be told with perfect accuracy and completeness in the six words "God said let there be light."

अर्वाचीन पदार्थविज्ञानशास्त्राची प्रवृत्ति संपूर्ण जड विश्वाचें खरें स्वरूप गतिमान लहरी, केवळ गतिमान लहरी हेंच आहे असें सिद्ध करण्याची आहे. या लहरी दोन प्रकारच्या आहेत. ठराविक सघन लहरींच्या समुदायालाच आपण किरणोत्सर्ग किंवा प्रकाश म्हणून अनुभवितों. जर जड द्रव्याचा नाश झाला तर त्याचा अर्थ इतकाच होईल कीं एका साचेबंद अवस्थेंतील या गतिमान लहरींचें तें बंधन सुटून त्या मोकळ्या झाल्या व त्या शक्तिरूप लहरी

दिक्तत्त्वांतून मोकळेपणानें संचार करूं लागल्या. या अलीकडच्या व्याख्या अव्यक्त व व्यक्त असें दोन्ही प्रकारचें जग म्हणजे केवळ प्रकाश, केवळ तेजतत्त्वात्मक आहे हेंच सिद्ध करतात. व त्यामुळें सृष्टीची जन्मकथा परिपूर्ण रीतीनें व चपखलपणानें केवळ सहा शब्दांत सांगतां येते. "God said let there be light (ईश्वर म्हणाला, प्रकाश व्हावा)." तात्पर्य, अखंड गतिमय इलेक्ट्रॉन्स (Electrons) व त्यामुळें आधारभूत आकाशतत्त्वांत होणारें अखंड आन्दोलन हें जगाचें आजच्या शास्त्राप्रमाणें वास्तविक स्वरूप आहे. अर्थातच मनुष्याला या स्वरूपाच्या जगाची जी भिन्न भिन्न स्वरूपानें प्रतीति येते ती या मूलद्रव्याच्या गतिमान् लहरींचा तो जसा बोध घेईल अथवा त्याला जसा बोध होईल त्यावरच अवलंबून आहे. जगाचें ज्ञान करून घेण्याची मनुष्याजवळ पांचच प्रकारचीं यंत्रें आहेत. तीं यंत्रें अथवा साधनें म्हणजे कान, डोळे, नाक, जीभ व त्वचा हीं पांच ज्ञानेन्द्रियें होत. मूलद्रव्याच्या गतिमय लहरींचा परिणाम या यंत्रांवर त्यांच्या कमीजास्त सामर्थ्याच्या दृष्टीनें होऊन त्याच्या अभिव्यक्तीच्या स्वरूपांत तो परिणाम बाहेर पडेल. याच्याच जोडीला प्रकाश आणि ध्वनि हीं एकाच मूल द्रव्यांत नियमित वेळीं होणाऱ्या आन्दोलनांच्या भिन्न भिन्न संख्या आहेत हा आजच्या शास्त्रांचा सिद्धांत ध्यानांत घेतला म्हणजे आज पदार्थांचें मूळ स्वरूप प्रकाश आहे हें जसें सर जेम्स जीन्सनें दाखविल्याप्रमाणें या मूलद्रव्यांतील गतिमय लहरींच्या विशिष्ट सघनतेला उद्देशून म्हणतां येतें तसेंच दुसऱ्या विशिष्ट सघनतेला उद्देशून पदार्थाचें मूळ स्वरूप ध्वनि आहे असें म्हणतां येईल. व विद्युत् परमाणूंची गति व त्यामुळें आकाश तत्त्वांत होणारें हें आन्दोलन ध्वनिरूप आहे हें यावरून सरळच दिसत असल्यामुळें ध्वनि हें जगाचें आदिद्रव्य होय हा वेदाचा सिद्धांत आजच्याहि शास्त्रीय दृष्टीनें सत्यच ठरतो. या ध्वनिमय जगाची प्रतीति पांच ज्ञानेंद्रियांना त्यांच्या मर्यादित शक्तीमुळें मर्यादित स्वरूपांत येते. पण या ज्ञानेंद्रियांची सूक्ष्मता व सामर्थ्य जर वाढवितां आलें तर

पांचहि प्रकारांनीं एकाच वस्तूची प्रतीति घेतां येईल. अत्यंत तीव्र प्रकाशाच्या क्ष किरणांची प्रतीति डोळ्यांना येत नाहीं. याचें कारण नेत्र या इंद्रियाच्या शक्तीची मर्यादितता हेंच आहे. हीच गोष्ट कानांचीही आहे. आजच्या शास्त्राच्या दृष्टीनें सुद्धां ध्वनिमयता हेंच जगाचें स्वरूप कसें ठरतें हें आपण पाहिलें. पण त्यावरून जर कोणी हे मूलभूत ध्वनि ऐकण्याचा प्रयत्न केला तर ते त्याला मुळींच ऐकतां येणार नाहींत. वातावरणामुळें मनुष्याला ध्वनि ऐकूं येतो. ऐकूं येणाऱ्या या ध्वनिलहरी स्थूल स्वरूपाच्या आहेत. ध्वनिलहरींनीं ज्या वेळीं वातावरण कंपित होतें त्या वेळीं त्याला आधारभूत असें द्रव्यही कंपित झालेंच पाहिजे. पण त्यांतील सूक्ष्म लहरींची संवेदना आपल्या इंद्रियांना घेतां येत नाहीं. विशेष लहरींची प्रकाशात्मकतेनें मात्र विशेष मर्यादेपर्यंत प्रतीति घेण्याची सोय हल्लींच्या यन्त्रांनीं केली आहे. जर आपणांस कर्णेंद्रियांची शक्ति वाढवितां आली आणि डोळे व कान यांचें सामर्थ्य विशिष्ट प्रक्रियेनें वाढवून दोन्हींची संवेदना-शक्ति एकाच प्रकाराची करतां आली तर एकाच लहरीच्या सघनतेमुळें भासमान होणारी वस्तु त्याला ध्वनिरूपानें ऐकतांहि येईल व त्याच वेळीं वर्णरूपानें पाहतांही येईल. आणि पांचही ज्ञानेंद्रियांची शक्ति वाढवून जर तुल्यबल करतां आली तर एकाच पदार्थाची प्रतीति शब्द स्पर्श, रूप, रस, गन्ध अशा पांचही प्रकारांनीं घेतां येईल. हें जें आपण तर्कशास्त्राच्या दृष्टीनें पाहिलें तेंच प्रत्यक्ष अनुभव म्हणून भारतीय शास्त्रकारांनीं मांडलें आहे. योगशास्त्र असें सांगतें कीं अशीं इंद्रियें सूक्ष्मसंवेदनाक्षम करतां येतात, व त्यांनाच उद्देशून दिव्य दृष्टि इत्यादि शब्द वापरलेले आहेत. व या विशिष्ट शक्तीच्या योगानें प्रतीति घेऊनच ऋग्वेदा-सारख्या शब्दराशीच्याही रूपाचें वर्णन त्याच्या ध्वनिमयतेबरोबरच परंपरेनें चालत आलेलें चरणव्यूहासारख्या ग्रंथांतून मांडून दाखविलेलें आहे. आपण आरंभींच ऋग्वेदाचें रूप व वर्ण यांचें जें चरणव्यूहांतील वर्णन येथें उद्धृत केलें आहे त्याची उपपत्ति ही

अशी आहे. संपूर्ण जग हें पांच विषयांचें व सप्त लोकात्मक आहे व त्यांतील फक्त आकाश हेंच सर्वांना व्यापून असून शब्द या एकाच गुणाचें आहे. आकाश सर्व विश्वाला व्यापून आहे याचा अर्थ त्याचा शब्द गुण अथवा आजच्या परिभाषेप्रमाणें लहरी (waves) सर्व विश्वाला व्यापून आहेत असा होतो, त्यामुळें प्रत्येक वस्तूला दोन स्वरूपें आहेत हें स्पष्ट होतें. एक स्थूल इंद्रियांना प्रतीत होणारें त्या वस्तूचें स्वरूप व दुसरें हें नाद-लहरींचें स्वरूप संपूर्ण विश्वाचा जर कर्णेंद्रियांनीं अनुभव घेतो असें म्हटलें तर त्याची संवेदना आपण ॐ शब्दाचा जो उच्चार करतो त्यासारखी येते असें आमच्या शास्त्रकारांचें म्हणणें आहे व म्हणूनच मागें दाखविल्याप्रमाणें मांडूक्योपनिषदानें ॐ हेंच खरें मूलद्रव्य असून इतर नानात्वानें नटलेलें विश्व त्या ॐचें स्पष्टीकरण आहे असें म्हटलें आहे. आजचें जग विश्वाची नाद-मयता जाणतें. आमच्या शास्त्रांनीं त्या पलीकडे पाऊल टाकून हें आकाशरूपी द्रव्य व त्यांतील गतिमय लहरी या केवळ स्वयंभू नसून या गतीला नियंत्रित करणारी अशी एक अखंड ज्ञानमयी इच्छा तिच्या पलीकडे आहे हें शोधून काढलें व ती ज्या कोणाची इच्छा आहे त्या परब्रह्माचेंच आमच्या हृदयांतील अस्मितेच्या रूपानें व्यक्त होणारा आत्मा हा स्वरूप असल्यामुळें त्यालाही आपल्या इच्छाशक्तीनें या गतीच्या क्रमांत स्थित्यंतर घडवून आणतां येतें असें त्यांचें म्हणणें आहे. प्रत्येक पदार्थ म्हणजेच शब्दाचें एक व्यक्त स्वरूप आहे. जिवानें जर अखंड इच्छा व ज्ञानशक्तिरूप परमेश्वराशीं तादात्म्य संपादन केलें तर त्याला कांहीं प्रमाणांत ध्वनिलहरींवर परिणाम घडवून आणतां येतो. याचाच अर्थ सृष्टींतील वातावरणावर विशिष्ट परिणाम घडवून आणतां येतो. भगवान् पतंजलींनीं "क्रमान्यत्वं परिणामान्यत्वे हेतुः" व "जात्यन्तरपरिणामः प्रकृत्यापूरात्" या योगशास्त्रांतील दोन सूत्रांतून हा सिद्धान्त मांडलेला आहे. असो. कोणत्याही अवस्थेंतील जी जी व्यक्त वस्तु आहे तिला अशी मूलभूत शब्दात्मक

प्रतीति असल्यामुळें हे शब्द अथवा नाद हेंच त्या वस्तूचें बीज होय असें म्हटलें तरी चालेल. प्रत्येक वस्तूचें असें हें स्वरूप नित्य आहे, स्वयंभू आहे व अपौरुषेय आहे असें जर म्हटलें तर तेंच अधिक योग्य नाहीं काय? किंबहुना दुसरें कांहीं म्हणतांच येत नाहीं. electrons चा शोध ज्यांनीं लावला त्यांनीं तें निर्माण केलें हें म्हणणें हास्यास्पदच नाहीं काय? तसेंच हें मूलभूत नादमय विश्व ज्यानें नादमय म्हणून ओळखलें व त्यांच्या लहरींचे क्रम समजावून घेतले त्यानें तें निर्माण केले असें म्हणणें हास्यास्पद नाहीं काय? जस्टिस वुड्रॉफ हाच विषय मांडताना म्हणतात:

Shabda literally means and is usually translated sound the word coming from the root Shabd to sound. It must not however be wholly identified with sound in the sense of that which is heard by the ear or sound as effect of cosmic stress. Sound in this sense is the effect produced through excitation of the ear and brain by vibrations of the atmosphere between certain limits. Sound so understood exists only with the sense organ of hearing; and even then it may be perceived by some and not by others due to keenness or otherwise of natural hearing. Further, the best ears will miss what the microphone gives. Considering Shabda from its primary or causal aspect, independent of the effect which it may or may not produce on the sense organs, it is vibrations ( स्पंदन ) of any kind or motion which is not merely physical motion which may become sound for human ears, given the existence of the ear and brain and the fuifilment of the physical conditions. Thus Shabda is the possibility of sound and may not be actual sound for this individual or that. There is thus Shabda wherever there is motion or vibration of any kind. It is now said that the electrons revolve in a sphere of positive electrification at an enormous rate of motion. If the arrangement is stable

we have an atom of matter. If some of the electrons are pitched off from the atomic system, what is called Radio-activity is observed. Both these rotating and shooting electrons are forms of vibrations as Shabda though it is no sound for mortal ears. To a Divine ear, all such movements would constitute the music of the spheres.

Were the human ear subtle enough, a living tree would present itself to it in the form of a particular sound which is the natural word for that tree. It is said of ether (Akasha) that its Guna or quality of Spandana or vibration of any kind. It is that state of premordial, material substance (Prakriti) which makes motion or vibration of any kind possible. (Shabda Guna Akasha) The Brahma swarupa or Chit is motionless. It is also known as Chidakasha; but this Akasha is not created. Chidakasha is the Brahma in which stress of any kind manifests itself a condition from which the whole creation proceeds. This Chidakasha is known as the Shabda Brahma through which mayashakti which is the cause of all vibrations manifesting themselves as the sound to the ear, as touch to the tactical sense, as colour and form to the eye, as taste to the tongue, and as odour to the nose. All mental functioning is again a form of vibration(Spandana). Thought is a vibration of mental substance just as the expression of thought in the form of spoken word is the vibration of the ear. All the Spandana pre-supposes heterogencty (Vaishamya). Movement or any kind implies inequality of tensions, electric current flows between two points because there is a difference of potential between them. Fluid flows from one point to another because there is a difference of pressure. Heat travels because there is a difference ot temperature. In creation, (Srishti) this condition of heterogenity appears and renders motion possible. Akasha is the possibility of spandana of any

kind. Hence its precedence in the order of creation. Akasha means Brahma with Maya which Mayashakti or stress is rendered actual from a previous state or possibility of stress which is the Shakti's natural condition of equilibrium. (प्रकृतिसाम्यावस्था) In the dissolution of the Mayashakti, Brahman returns to homogenity when in consequence Akasha disappears. This disappearance means that Shakti is equiliberated and that therefore there is no further possibility of motion of any kind.

- Shakti and Shakta pp; 466-468

"शब्दाचा खरा अर्थ नाम असा आहे व तसाच त्याचा अनुवादहि होतो. कारण शब्द–ध्वनि करणें असें त्याच्या मूळधातूचें रूप आहे. हा नाद म्हणजे आपण कानांनीं ऐकतो तोच केवळ समजूं नये अथवा विश्वांतील वातावरणाच्या दाबाचा परिणाम म्हणून असलेला नादहि केवळ नव्हे. विशिष्ट अंतरांतील वातवरणांतील लहरींचा कर्णेंद्रिय व मेंदू यांवर होणाऱ्या आघातांचा परिणाम येवढेंच नाद याचा वरील अर्थ घेतला तर निष्पन्न होईल. कर्णेन्द्रियानें प्रतीत होणें येवढेंच या अर्थांतील नादाच्या अस्तित्वाचें प्रमाण आहे व तें फारच अस्थिर आहे. कांहींचे कान उत्कृष्ट स्थितींत असले तर त्यांना मंदस्वरहि ऐकूं येईल व कांहींना मुळींच ऐकूं येणार नाहीं. व सर्वोत्कृष्ट कान जरी घेतले तरी मायक्रॉफोननें (अस्पष्ट शब्द मोठें करणारें यंत्र) जे ऐकूं येतात ते शब्द कानानें ऐकूं येणें अशक्य होतें. कर्णेन्द्रियांवर नाद परिणाम करतो वा नाहीं ही गोष्ट यासाठीं बाजूस सारून शब्दाच्या मूळ स्वरूपाच्या व नैमित्तिक अवस्थानाच्या दृष्टीनें विचार केला तर शब्द म्हणजे कोणत्या तरी गतीनें होणारें स्पन्दन अथवा आन्दोलन होय हें ध्यानांत येतें. त्यामुळें ते म्हणजे क्वचित् कर्णेन्द्रिय व मेंदू यांचें अस्तित्व सिद्ध करण्यासाठीं अथवा अन्य शारीरिक अव-स्थांच्या परिपूर्तीसाठीं होणारी केवळ शारीरिक हालचाल नव्हे. त्यामुळें शब्द म्हणजे नादाचें अवस्थान होय; मग तो एखाद्या व्यक्तीच्या अनुभवास येवो वा न येवो. ज्या ज्या ठिकाणीं कसल्याहि

प्रकारची गति, आन्दोलन वा स्पंदन आहे तेथें तेथें शब्द आहेच. असें सांगतात कीं मूळ गतितत्त्वाच्या वातावरणांत निरनिराळ्या गतींनीं प्रचंड वेगानें इलेक्ट्रॉन्स (विद्युत्परमाणु) अखंड परिभ्रमण करीत असतात. त्यांची गति जर स्थिर (एकाच दिशेची) असली तर जडद्रव्याचा एक अणु उपलब्ध होतो. या अणुरचनेंतून कांहीं इलेक्ट्रान्स जर बाहेर पडले तर ज्याला किरणोत्सर्गी द्रव्य म्हणतात त्याचा प्रत्यय येतो. हे चक्रगतीनें फिरणारे व त्यांतून जाणें येणें करणारे दोन्ही प्रकारचे इलेक्ट्रॉन्स आन्दोलनस्वरूप, स्पंदनस्वरूप म्हणजेच शब्दस्वरूप आहेत. मग मनुष्याच्या कर्णेन्द्रियांच्या दृष्टीनें त्यांची प्रतीति येवो वा न येवो. दैवी सामर्थ्याच्या कानांच्या दृष्टीनें हीं सर्व आन्दोलनें म्हणजे वातावरणाचें संगीतच होय. जर मनुष्याचें कर्णेन्द्रिय परिपूर्ण शक्तियुक्त असतें तर समोर दिसणारा वृक्ष त्याला विशिष्ट नादाच्या रूपानें प्रतीत झाला असता. तो विशिष्टनाद म्हणजेच स्थूलवृक्ष होय व तो नाद हाच त्या वृक्षाचा वाचक खरा शब्द होय. शब्द हा आकाशाचा (ईथर) गुण (क्वालिटी) आहे असें म्हणतात. आकाशद्रव्याच्या आधारावरच कोणतेंहि स्पन्दन शक्य आहे असा याचा अर्थ आहे. आकाश म्हणजे मूलप्रकृतीची विशिष्ट अवस्था कीं जी कोणतेंहि स्पंदन अथवा गति शक्यकोटींत आणतें. ब्रह्मस्वरूप अथवा चित निश्चल आहे. त्याला चिदाकाश असें म्हणतात. पण तें उत्पन्न झालेलें वा केलेलें नाहीं. ज्याच्यापासून संपूर्ण सृष्टि प्रारंभ होते व जें नानात्वानें आविष्कृत होतें तें ब्रह्म म्हणजे चिदाकाश होय. शब्दरूपानें कानाला, स्पर्शरूपानें त्वचेला, वर्ण व आकार म्हणून डोळ्यांना, रस म्हणून जिभेला व गंध म्हणून नाकाला ज्याची प्रतीति येते तें हें स्पंदन अथवा गतिलहरींचें आन्दोलन जिच्यामुळें उत्पन्न होतें त्या मायाशक्तीमुळेंच हें चिदाकाश शब्दब्रह्म म्हणून ओळखलें जातें. सर्व मानसिक क्रिया म्हणजेहि विशिष्ट प्रकारचें स्पंदनच होय. विचार म्हणजे मनाच्या गाभ्याचें स्पंदन तर शब्दरूपानें तो बाहेर येणें म्हणजे कर्णेन्द्रियांवर परिणाम

करणें हें विशिष्ट प्रकारचें स्पंदन होय. सर्व स्पंदन वैषम्यांतून उत्पन्न होतें. दाबांच्या वैषम्यांतूनच कोणतीहि हालचाल होते. विद्युत्प्रवाह दोन केन्द्रांमधून वाहतो, कारण त्यांच्यांत शक्यतेचा फरक असतो. प्रवाह एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत वाहतो कारण त्यांच्यांत दाबाचा फरक असतो. उष्णतामानांतील फरकामुळेंच उष्णता गतिशील आहे. सृष्टीमध्यें हें वैषम्य उतरतें व आवश्यक गति निर्माण करते. सर्व प्रकारच्या स्पंदनाचें आकाश हेंच आधारद्रव्य होय. म्हणूनच सृष्टीच्या सृजनक्रमांत त्याचें प्राधान्य आहे. (तेंच प्रथम उत्पन्न झालें.) आकाश म्हणजे मायेसहित ब्रह्म होय. हीच मायाशक्ति मूळच्या शक्तीच्या नैसर्गिक समतेंत वैषम्य उत्पन्न करणारी होय. लयाच्या वेळीं ही ब्रह्माची मायाशक्ति आपल्या समतेवर स्थिर होते व आकाश लोप पावतें. यापुढें कसल्याहि प्रकारचें स्पंदन शक्य नाहीं असें दाखविणारा हा आकाशतत्त्वाचा लोप म्हणजेच प्रकृतीनें आपली मूळ साम्यावस्था ग्रहण करणें होय.'

जस्टिस वुड्राफनें केलेली ही मांडणी इतकी स्पष्ट कल्पना देणारी आहे कीं तिच्या संबंधीं अधिक सांगण्याचें कारण नाहीं. या ज्या प्रत्येक वस्तूच्या मूलभूत नादलहरी अथवा शब्द त्यांनाच **वेद** असें म्हणतात; व सृष्टि जशी अनंत तसाच तिच्यांतील प्रत्येक व्यक्त पदार्थाचें कारण असणाऱ्या या नादलहरीहि अनंत व त्यांतील प्रत्येक स्वयंपूर्ण, म्हणून शतपथ ब्राह्मणानें 'अनंता वै वेदाः' असें म्हटलें आहे. आकाश तत्त्वांतील हें स्पंदन ध्वनिरूपानें जसें कानांना अनुभवास येतें तसेंच वर्णरूपानें नेत्र या इंद्रियाच्याहि अनुभवास येतें. व या प्रत्ययावरूनच वर्ण आणि ध्वनि हीं परस्परांचीं मापकें ठरवून चातुर्वर्ण्याची रचना झालेली आहे. केवळ समाजांतील चार वर्ग म्हणजे चातुर्वर्ण्य नव्हे. कारण वर्णशब्दाचा मूळ अर्थ रंग असा आहे, वर्ग असा नाहीं. वेदांच्या या विचाराशीं संबद्ध असाच चातुर्वर्ण्याचा विचार करणें यासाठींच आवश्यक आहे.

वर्ण व ध्वनि हे एकमेकांचे ठोकताळे होत हें तर भारताचे

विश्वविख्यात वैज्ञानिक सर चंद्रशेखर रमण यांच्या Raman Spectrum नें सिद्ध केलें आहे. १७ एप्रिल १९३१ रोजीं वाशिंग्टन येथील कोलंबिया रेडिओवरून हॉपकिन्स युनिव्हर्सिटीचे डॉ. डोनाल्ड एच्. अँड्र्यूज यांनीं अल्कोव्हल व रासायनिक द्रव्यांच्या अन्य सारांमधून हें संगीत प्रत्यक्ष ऐकविलें. विश्व हें एक संगीतच आहे ही कविकल्पना या प्रयोगानें प्रत्यक्षांत उतरली. इ. स. १९३१ च्या ऑगस्ट महिन्याच्या मॉडर्न रिव्ह्यूच्या अंकांत हें वर्णन आलेलें असून त्यांत म्हटलें आहे कीं,– "Sir Chandrasekhar V. Raman of calcutta, India, has recently given Physicists a new way of listening to or really seeing the music of the atoms. The Raman spectrum, said Dr. Andrews, shows us that a molecule, such as one unit of water is really a little musical instrument, much like a harp, playing its own characteristic tune. In fact, it is really light and not sound that is given off. The chords of water, grain alcohol, wood alcohol, chloroform, benzene, gasoline, sulphuric acid were played in turn by Dr. Andrews. Alcohol had rather a sweet-sounding chord, but chloroform, like wood alcohol, was harsh.

Modern Review, August 1931

(भारतांतील कलकत्त्याचे सर चंद्रशेखर व्ही. रमण यांनीं पदार्थ विज्ञान शास्त्रज्ञांना अणूंचें संगीत ऐकविण्याचा, खरें म्हटलें तर पाहण्याचा एक नवा मार्ग उपलब्ध करून दिला. डॉ. अँड्र्यूज यांनीं असें सांगितलें कीं रमण स्पेक्ट्रम आपल्याला असें दाखवितो कीं कोणताहि द्रव पदार्थ, जसें पाणीच घेतलें तर तें एकाद्या वीणेसारखें वाद्य असून आपल्या विशिष्ट संगीताचा आविष्कार करतें. वस्तुतः तेथें ज्याचा प्रत्यय येतो तो ध्वनि नसून प्रकाश आहे. डॉ. अँड्र्यूज् यांनीं पाण्याचा सूक्ष्म अंश, ग्रेन अल्कोव्हल, वुड अल्कोव्हल क्लोरोफॉर्म, सलफ्यूरिक ॲसिड इत्यादिकांचें एकामागून एक संगीत

ऐकविलें. अल्कोव्हलमध्यें मंजूळ नाद करणारे तंतू आहेत व
वुड अल्कोव्हलप्रमाणेंच क्लोरोफॉर्मचें संगीत कर्णकठोर आहे अ
दिसून आलें) विज्ञानच वैदिकांच्या धारणेची सत्यता हळू ह
पटवीत असल्यामुळें विज्ञानाचें चांचल्य ध्यानांत घेऊन आप
आपल्या द्रष्टयांच्या त्रिकालाबाधित सिद्धांतावरील विश्वास ढ
देऊं नये हें बरें.

असो. वेदांतील शब्दांचें हें शास्त्रीय स्वरूप व सृष्टींतील वस्
जाताशीं त्याचा असलेला नैसर्गिक संबंध ओळखूनच पाणिनी
वैदिक भाषेला 'छंद' असें पारिभाषिक नांव देऊन केवळ संकेति
अशा संस्कृत भाषेला 'भाषा' असें म्हटलें आहे.

अशा या स्वयंभू वेदांचें ज्या भोगसंपन्न विभूतींना तुर्याव
ईश्वरी अवस्थेंत ज्ञान झालें ते ऋषि होत. ज्यांनीं दृश्यानुवि
समाधीच्या द्वारें वेदांचें प्रत्यक्ष दर्शन घेतलें ते 'वेदद्रष्टे' हो
ज्यांनीं शब्दानुविद्ध समाधींत ते ऐकले त्यांनीं वेदाला 'श्रुति' अ
म्हटलें. व ज्या ऋषींनीं त्यांचें प्रकटीकरण केलें ते 'मंत्रकृत
म्हणविले गेले.

वेद म्हणजे आजचे व्यक्त पदार्थ ज्या ध्वनिलहरींचे स्थूल स्वरू
आहेत त्या विश्वाचें आदिद्रव्य असणाऱ्या ध्वनिलहरी हो
त्या नित्य, अपौरुषेय, स्वयंभू, अनादि असून त्यांच्यापासून
सृष्टि कशी झाली हें आतांपर्यंत आपण आजच्या विज्ञानाच
प्रकाशांत पाहिलें; व त्यामुळें वेदांचें अपौरुषेयत्व नुसती श्र
नसून शास्त्रीय स्वरूपाचा संकेत आहे हें लक्षांत येतें. रमण स्पेक्ट्
अथवा आईन्स्टीननें शोधून काढलेलें सत्य हें रमण व आईन्स्टीन
तयार वा निर्माण केलें असें कोणीं म्हटलें तर तें जितकें हास्य
स्पद, तसेंच वेद पौरुषेय म्हणजे कोण्या पुरुषानें तयार केले
म्हणणेंहि कां हास्यास्पद ठरतें हें यावरून स्पष्ट होईल. पण म
ऋचांची रचना कशी झाली हा प्रश्न येतो.

कोणताहि शब्द म्हणजे ध्वनिलहरींचा संघात असतो. मू
आदिद्रव्यात्मक ध्वनिलहरी व व्यक्त सृष्टींतील पदार्थ यांचा

स्वयंभू व नैसर्गिक संबंध ओळखून आत्मकल्याणाच्या व जगत्कल्याणाच्या दृष्टींनीं वातावरणांत योग्य ते परिणाम घडवून आणण्याच्या दृष्टीनें त्या संबंधाला धरून त्याला अनुरूप अशी जी शब्दरचना करण्यांत आली त्याच ऋचा होत. त्यामुळें वेदांतील शब्द आजच्या भाषेप्रमाणें विशिष्ट energy चा, velocity चा व mass चा आहे. केवळ शब्दरचनेकडे पाहून त्यांना पौरुषेय म्हणावयाचें असल्यास म्हणावें; पण त्यांची मंत्रमयता ज्या वर दिलेल्या गोष्टीसाठीं आहे त्या दृष्टीनें त्यांना नित्य, स्वयंभू व अपौरुषेयच म्हटलें पाहिजे. 'वेद परमेश्वरानें टाइप रायटरवर टाइप केले काय?' हा प्रश्न किती अहंकारी मूर्खपणाचा आहे हें यावरून ध्यानांत येईल.

जीव हा परमेश्वराचाच अंश असल्यामुळें त्यालाहि या नादलहरींचे संघात असलेल्या वेदरूपी शब्दांपासून सामर्थ्य उत्पन्न करतां येईल व आत्मकल्याण साधतां येईल.पण आपली क्षीण संकल्पशक्ति, पंचीकरणाच्या कर्दमांत रुतून असणें व अशा शब्दसंगीताचें शरीर हेंच नादयंत्र असल्यामुळें तें शुचितम व सिद्ध करणें या तीन गोष्टी करतां आल्या तर ! व येवढ्यासाठींच शुद्धतेचे नियम अस्तित्वांत आले आहेत. वेदधारण हें एक महाव्रत ठरलें तें यासाठींच होय. या वेदांच्या शब्दांची, ही नादलहरींची वाहकता लक्षांत घेतली तर तोच शब्द व त्याच अनुक्रमानें व त्याच उदात्त अनुदात्त स्वरिताच्या ठसक्यानें कां म्हणावयाचा व स्वरप्रक्रियेचें वैदिक भाषेंत इतकें महत्त्व कां हें ध्यानांत येतें. 'अग्निमीळे'च्या जागीं 'वह्निं स्तौमि' कां म्हणावयाचें नाहीं; इतकेंच नव्हे तर 'ईळे अग्निं' असें सुद्धां कां म्हणावयाचें नाहीं हें यावरून स्पष्ट होईल. कारण दोन्ही वाक्यांचे लौकिक अर्थ सारखेच असले तरी अग्नि व वह्नि या शब्दांतील नादलहरींचे संघात भिन्न असणार व त्यामुळें अपेक्षित परिणाम घडून येणें अशक्य आहे.

नव भारताचे ब्रह्मर्षी व लोकमान्यांना गुरुस्थानीं असलेले अतीन्द्रिय साक्षात्कारी ब्रह्मज्ञ श्री. अण्णासाहेब पटवर्धन हे वेदाचा उलगडा करतांना म्हणतातः—

"The highly-gifted men of the Vedic race early found out or rather became conscious that language as vehecle of thought must always remain in or assume two forms. One of these forms of language has been that which has been used and acquired by ordinary men in their working state, and in which the powers of the स्व or human soul of producing sound have been called forth for the purpose of forming and clothing conscious notions which might answer the impressions produced by the mind and the senses in respect of external objects. As a hypothetical instance, it may be said that water may be called and denoted by the name of stick-breaker. Thus varieties of external forms, qualities etc. of objects and other accidental facts and circumstances may be said to form the basis of the bulk of words and the relations of words as contained in the ordinary human language. The second form of language would naturally be one of which the sound producing powers of the soul are affected and called forth by the direct impulse received by the powers, for instance, from the constitutional parts of the external objects and the internal state of consciousness and thus water in the language of the second form might receive some such name as hydric oxide. Thus there came to be recognised by the Vedie people two forms of human language from very early times. The ordinary or the conventional form was called by them भाषा; and the secoud higher and transcendental form was called छन्दस्, वेद or परोक्ष.

- The Brahmarshi's Gospel pp. 158-9

As all the powers proceed from the soul or the active part of the supreme being, the modes of their action must be considered to be determined by the soul; and it is for this simple reason that all kinds of powers being various

modes or degrees of motions are found to be interchangea- ble. Thus colour, light,heat,magnetism, and the like being forms of motion are mutually convertible and as sound is a form of conscious motion of the soul, and as direct cons- ciousness of external objects including men tal conditions etc. can be produced by means of the practice of the transcendental science, homogenity and correspondence being directly established between the sound on the one hand and the external objects on the other and thus sound can be and has been made to assume all forms of conceivable and conscious living motion and thus the Vedic people found that the whole universe was a sort of congelation of sound. Thus the gifted individuals of the Vedic race therefore early recognised that sound was in itself an independent creative original power and the Greek word Omega is the Greek name of the vedic sound OM which corresponds to the sound of the vowel O in English language. Note the Sound of O in the native Greek words is smaller spasmodically short as the sound of O in. the English word not. The word Omega is made of the Sanskrit words Om ek which together meanig that the syllable OM is the sound of the unity. Thus owing to the vedic teaching which propagated among mankind the transcendental and other sciences, the vedic fact that sound was at the root of creation percolated as it were into the languages and the religious ideas of the various non-Vedic races. And accordingly the first book of Moses called Genesis recorded though abruptly and in an isolated manner the above mentioned grand vedic fact by using the word said in its verse No. 3 etc. and God said let there be light and there was light. And the same vedic fact was also, though in the same manner, yet more clearly stated by St. John in first book which opens with the following verse :

In the beginning was the word and the word was with God and the word was God.

*–The Brahmarshi's Gospel pp.*165- 67

श्रेष्ठ प्रतिभेच्या वैदिक लोकांनीं आधींच हें ओळखलें होतें कीं विचारांचें वाहन असलेली भाषा नेहमीच दोन प्रकारची राहिली पाहिजे. या भाषेचा एक प्रकार म्हणजे जो सामान्य माणसें व्यवहारांत उपयोगांत आणतात तो होय. या प्रकारांत ध्वनि उत्पन्न करणाऱ्या आत्म्याच्या शक्तीचा केवळ विचारांचें प्रकटीकरण करण्यासाठीं आणि त्याला सजविण्यासाठीं उपयोग करण्यांत येतो आणि इंद्रियें आणि मन यांच्यावर बाह्य गोष्टींनीं घडवून आणलेल्या परिणामांचें आविष्करण करण्यांत येतें. उदाहरणार्थ, अशा भाषेंत कामचलाऊ दृष्टीनें 'पाणी' या द्रव्याला 'काठी तोडणारा' या अर्थाच्या ध्वनीनेंही उच्चारलें जाईल व तो शब्द संकेतित म्हणून रूढ होईल. सामान्य मनुष्यांच्या या भाषेंत अनेक भिन्न भिन्न प्रकारच्या बाह्य गोष्टी, गुण, हेतु, आणि यदृच्छा या, शब्द व शब्दार्थांचे संबंध यांच्या निर्मितीस कारणीभूत होतात. भाषेचा जो दुसरा प्रकार आहे त्यांत नैसर्गिक रीतीनेंच आत्म्याच्या ध्वनि उत्पन्न करणाऱ्या शक्तीवर परिणाम केला जातो आणि त्या आघातानें त्या शक्ति व्यक्तस्वरूप धारण करतात. उदाहरणार्थ, वस्तुजाताचीं घटक द्रव्यें व आंतरिक ज्ञानशक्तीचें व्यक्तीकरण यांची एकरूपता दिसून येते. या भाषेंमध्यें पाणी या बाह्य द्रव्याला त्याच्या हायड्रोजन व ऑक्सिजन या मूळ घटक द्रव्याचेंच नांव मिळेल. येथें ध्वनि हा त्या पदार्थाच्या रूपाशीं नैसर्गिक रीतीनें संबद्ध असलेला राहील. याप्रमाणें भाषेचे दोन्ही प्रकार फार प्राचीन काळापासून वैदिक लोकांना माहीत होते. व्यावहारिक व सामान्य भाषेला त्यांनीं भाषा असें नांव दिलें व अतींद्रिय शास्त्रास धरून असलेल्या दुसऱ्या श्रेष्ठ स्वरूपाला त्यांनीं छन्दस्, वेद अथवा परोक्ष असें नांव दिलें. सर्व प्रकारच्या शक्ति या परब्रह्माच्या प्रत्यक्ष अंशापासून अथवा जीवा-

पासूनच व्यक्त होत असल्यामुळें त्या आत्म्याकडूनच नियंत्रित करण्यांत येतात. आणि याच कारणास्तव त्या कितीही वेगवेगळ्या स्वरूपानें भासमान होत असल्या तरी त्या स्पंदनरूप शक्ति या एकमेकांत रूपांतरित होऊं शकतात. याप्रमाणें वर्ण, प्रकाश, उष्णता, आकर्षणशक्ति, इत्यादि सर्व स्पंदनाचेच वेगवेगळे प्रकार असल्यामुळें तेहि एकमेकांत रूपांतरित होऊं शकतात. त्याचप्रमाणें ध्वनि हा आत्म्याच्या ज्ञानशक्तीचा प्रकार असल्यामुळें, तसेंच बाह्य वस्तुजाताचें, व जाणीव आणि मानसिक अवस्था यांच्या व्यक्तीकरणाचें तें प्रत्यक्ष साधन असल्यामुळें तो अतींद्रिय शास्त्राच्या अभ्यासानें उपलब्ध झालेल्या साधनांनीं व्यक्त करतां येईल. व त्यांत ध्वनि आणि बाह्य वस्तुजात यांचें संगतीकरण आणि संबंध प्रत्यक्ष साधतां येतील. याप्रमाणें ध्वनीला आवश्यकतेनुरूप वेगवेगळे आकार व ज्ञानशक्तियुक्त गतींचीं वेगवेगळीं स्वरूपें प्रकट करतां येतील. वैदिक लोकांनीं हें ओळखलें होतें कीं संपूर्ण विश्व म्हणजे नादब्रह्म आहे. या प्रमाणें वैदिक लोकांनीं शब्द ही एक स्वतंत्र उत्पादक शक्ति आहे हें ओळखलें होतें. 'ओमेगा' हा ग्रीक शब्द म्हणजे वैदिक ॐ चेंच रूप होय. त्यांतील ओ हा वर्ण इंग्रजी भाषेंतील ओच्या उच्चाराशीं समान आहे. मूळच्या ग्रीक भाषेंतील ओ हा इंग्रजी भाषेंतील नॉट या शब्दांतील ओच्या उच्चाराप्रमाणेंच ऱ्हस्व आहे. ओमेगा हा शब्द ॐ+एक या दोन्ही शब्दांच्या एकत्रीकरणांतून झालेला आहे. हे दोन्ही शब्द एकत्रित आले म्हणजे ॐ शब्द होतो व तो ऐक्याचा वाचक शब्द होय. जगांतील इतर लोकांत वैदिक लोकांनीं आपल्या अतींद्रिय शास्त्राचा प्रसार केला. त्याचें निदर्शन म्हणजे शब्द हेंच विश्वोत्पत्तींचें कारण असून त्याच्या ठिकाणीं उत्पादक शक्ति आहे असा वेगवेगळ्या अवैदिक भाषांत व अवैदिक धार्मिक कल्पनांत दिसून येणारा विश्वास होय. म्हणूनच बायबलच्या पहिल्याच सृष्टयुत्पत्तिप्रकरणांत आकस्मिक रीतीनें व तुटक

पद्धतीनें ‘सेड’ असा शब्द घालून हाच वैदिक सिद्धान्त मांडलेला आहे. जसें ‘गॉड सेड लेट देअर बी लाईट अॅण्ड देअर वॉज लाईट.’ हाच वैदिक सिद्धान्त अधिक स्पष्टपणें सेंट जॉन यानें आपल्या ग्रंथाच्या पहिल्याच वाक्यांत घातला आहे. तें वाक्य असें : सृष्टीच्या आरंभीं शब्द होता. शब्द ईश्वराबरोबर होता. आणि शब्दच ईश्वर होय.

## दोन शंका

वैदिक शब्द हे जर या पद्धतीनें मंत्र आहेत तर त्यांना लौकिकार्थत्व असूं शकतें कीं नाहीं अशी एक शंका आहे. पण त्या शब्दांची ही मन्त्रमयता संभाळून त्यांच्या लौकिकार्थत्वाला कोणताही बाध येऊ शकत नाहीं. जसें विशिष्ट रागांत गाइलेलें एखादें भावगीत त्या रागाच्या स्वररचनेनें अन्तःकरणावर जो परिणाम घडवील तो घडवूनही त्या गीताला स्वतंत्र अर्थ असूं शकेल. व अशी स्वरलहरींच्या योगानें योग्य परिणाम घडविणारी व योग्य अर्थ असणारी गीतरचना आपण प्रत्यक्षांत पाहतोंहि. गीताचें गानत्व त्याच्या स्वररचनेंत आहे व लौकिकार्थत्व त्याच्या शब्दांच्या लौकिकार्थांत आहे. हे दोन स्वतंत्र असे भाग असल्यामुळें त्यांत विरोध येण्याचें कारण नाहीं. वेदांचें सामर्थ्य त्याच्या मंत्रमयतेंत आहे. तें ओळखून इतिहास इत्यादि कारणासाठीं त्याच्या लौकिकार्थत्वाचा उपयोग करून घ्यावा यांत शंकाच नाहीं. लौकिकार्थानें वैचारिक संपत्ति हस्तगत होते, तर उच्चारशास्त्राच्या अनुसार केलेल्या पठनानें होणारा परिणाम वेगळया प्रकारचा आहे. त्यामुळेंच प्राचीन काळीं उच्चाराची परंपरा राखून जसें वेदांचें संरक्षण झालें त्याचप्रमाणें निरुक्त भाष्यादि वेदार्थाचे प्रयत्नही झाले. आजच्या वेदार्थकारांचे प्रयत्न श्रेष्ठ स्वरूपाचे आहेत यांत शंका नाहीं. पण प्राचीन भाष्यकाराप्रमाणें त्यांनीं दुर्दैवानें वेदांचें वेदत्व मात्र ओळखलें नाहीं.

दुसरी अशी एक शंका प्रदर्शित करण्यांत येते कीं वेदासारखी ंभीर गोष्ट आपल्या पूर्वजांनीं केली असें म्हणण्यांत त्यांचा

जसा गौरव होतो तसा वेद हे ईश्वरानें केले आहेत असें म्हणण्यानें त्यांचा गौरव होत नाहीं. कारण त्यांत कर्तृत्व ईश्वराकडे जातें व हे नुसते पाठचे बनतात. पण आतांपर्यंतचें विवेचन लक्षपूर्वक पाहिलें तर ही शंका कशी निर्मूल आहे हें ध्यानांत येईल. रेडियमचें संशोधन क्यूरी दांपत्यानें केलें. सर रमण व आयन्स्टाईन यांनीं कांहीं महत्त्वाचे शोध लावले असें म्हणण्यानें त्यांचें महत्त्व कमी होतें व त्याऐवजीं क्यूरीनें रेडियम निर्माण केलें व रमण व आयन्स्टाईन यांनीं तीं तीं सूक्ष्म द्रव्यें निर्माण केलीं असा अशास्त्रीय शब्दप्रयोग करण्यानें त्यांचें महत्त्व फार वाढतें असें आपणांस म्हणतां येईल काय? वैदिक ऋचा जशाच्या तशा ईश्वराकडून आल्या व त्या केवळ ऋषींनीं संभाळल्या अशा रीतीची जी अपौरुषेयत्वाची कल्पना असते त्या स्थूल कल्पनेऐवजीं वेदांना पौरुषेय असें म्हणून—म्हणजे वैदिक ऋचांना पौरुषेय असें म्हणून त्या आपल्या पूर्वजांनीं केल्या असें म्हणण्यांत पूर्वजांचा गौरव वाढतो हें खरें आहे पण या दोन्ही प्रकारच्या वाक्प्रयोगांत ज्या भावना दिग्दर्शित करण्यांत आल्या आहेत त्यांत शास्त्रापेक्षां भावनाशीलतेचा संबंध अधिक आहे. शास्त्रीय विचार वेदांना ज्या कारणासाठीं स्वयंभू व अपौरुषेय म्हणतो तें लक्षांत घेऊन त्या अपौरुषेय ध्वनिलहरींचें वहन करणारी शब्दसृष्टि ज्यांनीं बसविली त्यांच्याकडे त्याचें कर्तृत्व आपण देतोंच. व ही घडी बसविण्याचें कर्तृत्व देण्यांत केवढ्या तरी मोठ्या व आजच्या विज्ञानालाही चकित करणाऱ्या शास्त्राचे प्रत्यक्षदर्शी संशोधक म्हणून आपण आपल्या पूर्वजांचा यथार्थ व अधिक गौरवच करतों.

तात्पर्य, सृष्टीचें आदिद्रव्य असणाऱ्या ध्वनिलहरी हेच वेद असून त्या दृष्टीनें वेदांना अपौरुषेय असें यथार्थ म्हटलें आहे. त्या ध्वनिलहरींचें वहन करणारे ऋचांचे शब्द ऋषींनीं शोधून काढून त्यांची रचना केली या अर्थानें ते ऋषी मंत्रद्रष्टे व मंत्रकर्ते आहेत. अपौरुषेयत्वाचा संकेत हा अशा स्वरूपाचा आहे. वेद-

वाङमयाच्या बहिरंगपरीक्षणाबरोबरच त्याच्या विषयींच्या या महान् संकेताचा उलगडा करणें आवश्यक होतें. त्याशिवाय इतर सर्व ग्रंथांपेक्षां वेदांनाच वेगळें महत्त्व कां याची उपपत्ति लागणें शक्य नव्हतें. म्हणून हा विषय इतक्या विस्तारानें मांडला. येथें वेदांचें बहिरंग परीक्षण संपवून पुढच्या व्याख्यानांत आपण वैदिक राष्ट्राचें अंतरंग दर्शन घेऊं.

## व्याख्यान सातवें

# वेदांतील तेजस्वी जीवनवाद

'वेद' हा शब्द उच्चारला कीं गेल्या दीडशें वर्षांच्या पारतंत्र्यांतील संस्कारांनीं व प्रचारानें ज्या अनेक जुजबी कल्पना ( Tentative suggestions ) सिद्धांत म्हणून गृहीत धरण्यांत येतात त्यांचें स्वरूप आतांपर्यंत आपण पाहिलें. एक प्रकारें वेद विषयाच्या बहिरंगा-संबंधींचा विचारच मागच्या सहा व्याख्यानांतून मांडण्यांत आला आहे असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. या व्याख्यानापासून वेद-वाङमयांत ज्या राष्ट्रजीवनाचें प्रतिबिंब पडलेलें आहे त्याचें अंतरंग-दर्शन घ्यावयाचें आहे. पण त्यापूर्वी आतांपर्यंत जो विषय मांडला आहे त्याचें दहापांच वाक्यांत सिंहावलोकन करणें इष्ट होईल.

आपल्या नवोदित स्वातंत्र्याबरोबर राष्ट्रनिर्मितीचा प्रश्न सध्यां आपल्यासमोर आहे. ज्या भारतीय राष्ट्राचे आपण घटक आहोंत तें मृत्यूवर विजय संपादन करणारें अमर राष्ट्र म्हणून जगांतील राष्ट्रांच्या श्रेणींत आपल्या वैशिष्टयानें तळपत असून त्याचें सिद्ध स्वरूप वेदवाङमयांत दृष्टीस पडतें. नव्या जीवनमंदिराच्या उभा-रणीपूर्वी आपल्या राष्ट्राची ही सिद्धस्वरूप अस्मिता ओळखणें व आधारशिला म्हणून तिचा स्वीकार करणें आवश्यक आहे. त्यासाठीं वेदवाङमयाकडे दृष्टि वळविली पाहिजे.

वेदवाङमय म्हटलें कीं चार वेदांपैकीं प्राचीन कोणता असा प्रश्न स्वाभाविकपणेंच उत्पन्न होतो. पण यज्ञसंस्थेंतील ऋत्विजांच्या उपयोगासाठीं एकाच वेदराशीचे केलेले हे चार भाग आहेत ही गोष्ट ध्यानांत घेतली म्हणजे पौर्वापर्याचा वाद निर्मूल ठरतो. अभ्यासकानें वेद हा एकच आहे ही दृष्टि ठेवणें यासाठींच आवश्यक आहे. वेद म्हटले कीं त्यांचा काळ कोणता हा प्रश्नहि स्वाभाविकच आहे.

पण कालनिर्णयासाठीं उपयोगांत आणली जाणारी व निर्णायक म्हणून समजण्यांत येणारीं ज्योतिषशास्त्र, भाषाशास्त्र, भूस्तरशास्त्र इत्यादि प्रमाणें निर्णायक म्हणून सदोष व कच्च्या पायावरचीं ठरतात व शेवटीं प्राचीन व आधुनिक असा दोघांनाहि अर्थाच्या कांहीं फरकानें कालनिर्णयाच्या बाबतींत 'अनादि' या विशेषणा-चाच अपरिहार्यपणें आश्रय घ्यावा लागतो. या अनादि वेदवाङ्मयांत ज्यांच्या जीवनाचें प्रतिबिंब आढळतें ते आर्य नांवाचे श्वेत-वर्णीय, सरळ नासिकेचे व विशिष्ट चेहेरेपट्टीचे अभारतीय लोक असून कोणी म्हणतात ते मध्य आशियांतून, तर कोणी म्हणतात यूरोपमधून, तर कांहीं म्हणतात उत्तर ध्रुवप्रदेशांतून ते हिंदुस्थानांत आले, व त्यांनीं येथील मूळच्या अथवा त्यांच्या आधीं येथें येऊन वसलेल्या अनार्य, द्रविड लोकांना जिंकून या देशावर आपलें व्यावहारिक व सांस्कृतिक वर्चस्व प्रस्थापित केलें. आर्यांनीं ज्यांना जिंकिलें ते अनार्य द्रविड उच्च संस्कृतिसंपन्न होते. पण वेदवाङ्मयावरून हें कांहींहि सिद्ध होऊं शकत नाहीं, व तें सिद्ध करावयास इतर कोणतेंहि प्रमाण नाहीं. आर्य व अनार्य हे शब्द वेदांत वंशवाचक नसून ते गुणवाचक आहेत. आर्य काळे होते असा व आर्य अनार्य सारख्याच शरीराचे होते असा वेदांत उल्लेख आहे. इतकेंच नव्हे तर आर्याचा अनार्य व अनार्याचा आर्य होऊं शकेल. हा शब्द वंशवाचक असता तर ही गोष्ट कधींहि शक्य नाहीं. यज्ञसंस्कृति मानणारे व ६३ किंवा ६४ वर्णांची भाषा बोलणारे ते आर्य, व 'अयज्वे' आणि उच्छृंखल ते अनार्य असे या शब्दांचे खरे अर्थ असून युरोपियन आर्यनशीं त्यांचें कांहींहि नातें नाहीं. द्रविड नांवाचा एखादा वंश आहे असें म्हटलें तरी वैदिक संस्कृतीहून भिन्न अशा कोणत्याहि द्रविड संस्कृतीचें अस्तित्व वेदावरून सिद्ध होण्यासारखें नाहीं. व म्हणूनच सिंध येथील मोहेंजोदारोच्या उत्खननांत सांपडलेली संस्कृति वस्तुतः वैदिक संस्कृतीच आहे. येवढ्याचसाठीं प्रस्तुत ग्रंथांत आर्य शब्द शक्य तोंवर न वापरतां वैदिक असाच शब्द वापरलेला आहे. हे वैदिक लोक हिंदुस्थानांत रहात होते कीं

हिंदुस्थानाबाहेर याचा संपूर्ण विचार करून लोकमान्यांच्या उत्तर-ध्रुवसिद्धांतास धक्का न लावतांहि आर्य हिंदुस्थानांतीलच होते व भारत हेंच त्यांचें मूळ गृह होय हें मानणेंच युक्त आहे असें आपण पाहिलें आहे. आतांपर्यंत ज्या विषयाचा सविस्तर, सर्व उपलब्ध पुराव्यानिशीं व त्या पुराव्याच्या छाननीसह विचार करून जे सिद्धान्त आपण मांडले त्यांचें थोडक्यांत सिंहावलोकन हें असें आहे. आतां वेदांतून आढळणाऱ्या वैदिक राष्ट्राच्या अंतरंगाकडे वळूं.

वेदवाङमय-मंदिराच्या दारांतून आंत डोकावतांच वैदिक राष्ट्राच्या तेजस्वी जीवनवादानें डोळे दिपतात यांत शंका नाहीं. हिंदू धर्मांतील अनेक विकृतींनीं पुढें ज्या नैराश्यवादाला जन्म देऊन जगाकडे व जीवनाकडे पाहण्याची 'सर्वं दुःखं सर्वं क्षणिकं' ही दृष्टि उत्पन्न केली तिचा मागमूसमुद्धां वेदांत आढळत नाहीं. शोपेनहॉर नांवाचा एक पाश्चात्य तत्त्वज्ञ आहे. या जर्मन तत्त्वज्ञानें आपल्या World as will and representation या ग्रंथांत सर्वं दुःखं या भारतीय विकृतीच्या चालीवरच संसाराच्या दुःखांचें वर्णन केलें आहे. तो म्हणतो, 'मनुष्याच्या एकंदर सुखेच्छांपैकीं त्याच्या जितक्या सुखाच्या इच्छा सफल होतील त्या मानानें त्याला आपण सुखी समजतों आणि सुखोपभोग जर सुखेच्छेपेक्षां कमी पडला तर तो मनुष्य त्या मानानें दुःखी आहे असें आपण म्हणतों. हेंच प्रमाण गणिताच्या पद्धतीनें दाखवावयाचें झाल्यास सुखोपभोगाला सुखेच्छेनें भागून अपूर्णांकाच्या रीतीनें $\frac{\text{सुखोपभोग}}{\text{सुखेच्छा}}$ असें लिहिलें पाहिजे. परंतु हा अपूर्णांक असा कांहीं विलक्षण आहे कीं, त्याचा छेद, म्हणजे सुखेच्छा ही त्याच्या अंशापेक्षां म्हणजे सुखोपभोगापेक्षां नेहमीच अधिक प्रमाणानें वाढत असतो. त्यामुळें हा अपूर्णांक प्रथम $\frac{१}{२}$ असला तर पुढें $\frac{३}{१०}$ म्हणजे अंश तिप्पट तर छेद पांचपट वाढून अधिकाधिक अपूर्णच होत जातो. म्हणून मनुष्य पूर्ण सुखी होण्याची आशा बाळगणें व्यर्थ आहे.

लोकमान्य टिळकांनीं आपल्या गीतारहस्यांत दुःखवादाची मांडणी करतांना शोपेनहारच्या या गणिताची मांडणी उद्धृत करून पुढें स्पेन देशांतील एक गमतीदार उदाहरण उद्धृत केलें आहे. ते म्हणतात, "स्पेन देशांत मुसलमानी राज्य असतां तिसरा अबदुल रहमान नांवाच्या तेथील एका न्यायी, व पराक्रमी बादशहानें आपले दिवस कसे जातात याची रोजनिशी ठेवली होती व त्यावरून अखेर पाहतां पन्नास वर्षांच्या त्याच्या राज्यकारकीर्दींत फक्त चौदाच दिवस पूर्ण सुखाचे गेल्याचें त्यास आढळून आलें." शोपेनहारनें तर यापलीकडे जाऊन असें म्हटलें आहे कीं, 'या जगांतील मनुष्यप्राण्याच्या बाबतींत तो जन्मास न येणें ही उत्तम गोष्ट व तरुणपणीं मरणें ही त्या खालोखाल उत्तम गोष्ट होय.' हा विलक्षण निराशावाद वेदांत मुळींच आढळत नाहीं. साऱ्या जगाला जीवनाचा पुरवठा करणाऱ्या सूर्यनारायणाकडे पाहून ऋग्वेदाचा ऋषि म्हणतो, ' तच्चक्षुर्देवहितं शुक्रमुच्चरत् । पश्येम शरदः शतम्, जीवेम शरदः शतम् । (ऋग्वेद ७, ६६, १६) "देवांचें हित करणारें हें तेज आमच्यासमोर प्रकट झालें आहे. आम्ही शंभर वर्षें पहावें, आम्ही शंभर वर्षें जगावें." त्यांना शंभर वर्षें जगण्याची पूर्ण इच्छा आहे. परमेश्वरानें आपणांस जन्माला घातलें याबद्दल शोपेनहारप्रमाणें त्यांना मुळींच वाईट वाटत नसून त्याचे ते मोठे उपकार होत म्हणून ते उलटे कृतज्ञ आहेत. तरुणपणीं मरण्याचीहि करंटी इच्छा न बाळगतां ते उलटे शंभर वर्षें, इतकेंच नव्हे तर त्याहूनहि अधिक जगण्याची इच्छा करतात व तें जीवनहि सर्व इंद्रियांच्या कार्यक्षमतेचें त्यांना हवें आहे. ऋग्वेदांतील एखाद्या कोपऱ्यांतल्या वचनांत त्यांची ही भावना प्रकट झालेली नसून चारहि वेदांतून, इतकेंच नव्हे तर ब्राह्मण ग्रंथांतूनहि त्यांची ही भावना प्रकट झाल्याचें आढळतें. उदाहरणार्थ पुढील प्रातिनिधिक स्वरूपाचीं वेदवचनें पहाः—

"तच्चक्षुर्देवहितम् पुरस्ताच्छुक्रमुच्चरत् । पश्येम शरद शतम् । जीवेम शरदः शतम् । प्रब्रवाम शरदः शतम् । अदीनाः स्यामः

शरदः शतम् । भूयश्च शरदः शतात् । (शुक्ल यजुर्वेद ३६, २४)

बुद्धेम शरदः शतम् । रोहेम शरदः शतम् । भूयसीः शरदः शतात् । (अथर्ववेद १९, ६७).

नन्दाम शरदः शतम् । मोदाम शरदः शतम् । भवाम शरदः शतम् । अजिताः स्याम शरदः शतम् । (तैत्तिरीयारण्यक ४, ४२) वाङ्म आसन्नसोः प्राणश्चक्षुरक्ष्णोः श्रोत्रं कर्णयोः । अपलिताः केशाः अशोणा दन्ता बहुबाह्वोर्बलम् ॥१॥ ऊर्वोरोजो जंघयोर्जवः पादयोः प्रतिष्ठा अरिष्टानि मे सर्वात्मा निभृष्टः । (अथर्ववेद कांड १९ सू. ६० ते ६३.)

" देवांना प्रिय, तेजाचा अखंड पुंज, विश्वाचा सर्वसाक्षी असा जो भगवान् श्रीसूर्य नारायण तो पूर्वदिशेस उदयगिरीवर उदय पावता झाला. त्या देवाच्या कृपाप्रसादानें आम्ही शंभर वर्षें डोळ्यांनीं नीट पहात असावें. शंभर वर्षें आम्ही नीट जिवंत असावें. शंभर वर्षें कानांनीं धड ऐकत असावें. शंभर वर्षें आम्ही वाणीनें धड बोलत असावें. शंभर वर्षें आम्ही दैन्यरहित असावें. इतकेंच नव्हे तर कसलेंहि दैन्य जीवनांत उत्पन्न न होतां आम्हांला शंभर वर्षेंच काय, पण त्याहूनहि अधिक जीवन लाभावें. शंभर वर्षें आमची ज्ञानग्रहणशक्ति अखंड तळपती राहून आम्हांला स्थिर जीवन लाभावें. आम्हांला शंभर वर्षांहूनहि अधिक जीवनाची इच्छा आहे. आमचें शंभर वर्षें आनंदांत जीवन जावें. आमचें जीवन सदैव सुखमय असावें. आम्हांला अजिक्य जीवन लाभण्याची इच्छा आहे. कोणीहि आम्हांला जिंकण्यास समर्थ असूं नये. आमच्या तोंडांत वाक्शक्ति,श्वासोच्छ्वासांत प्राणशक्ति, डोळ्यांत नेत्रशक्ति व कानांच्या ठिकाणीं श्रोत्रेंद्रिय अखंड कार्यकारी असावें. केस कधींही पिकूं नयेत. दांत कधींहि हलूं नयेत. बाहूंच्या ठिकाणीं अपार बल नित्य नांदावें. हृदयांत उत्साहवर्धक ओज असावें. मांड्यांत वेग व पावलांत स्थिरपणा असावा. आमचें अंगप्रत्यंग नीट व सुदृढ असावें. व कोणत्याहि बाबतींत असामर्थ्यरूप अरिष्टाची आमच्यावर आपत्ति न यावी."

ज्याप्रमाणें त्यांना जीवनाचा अधिकांत अधिक लाभ हवा आहे त्याचप्रमाणें त्यांना कोणत्याहि प्रकारचें दैन्य जीवनांत नको असल्यामुळें तें जीवन ऐश्वर्यसंपन्न, सामर्थ्यसंपन्न व मुलाबाळांच्या संपत्तीनें भरलेलें हवें आहे. देवतांच्या स्तुतिपर म्हणून प्रसिद्ध असलेल्या व सर्वांत प्राचीन म्हणून गणण्यांत येणाऱ्या ऋग्वेदांतीलच यासंबंधीचे उद्‌गार पहाण्यासारखे आहेत. वैदिक ऋषि म्हणतात, "अस्मभ्यं शर्म यच्छतम्" । (ऋ. १, १७, ८) "आम्हांस सर्व प्रकारचें सुख द्या." "विश्वानि द्रविणानि धेहि" । (ऋ. ५, ४, ७) "आम्हांस सर्व प्रकारची संपत्ति द्या." "आ नो अग्ने सुचेतुना रयिं विश्वायुपोषसम् । मार्डीकं धेहि जीवसे ।" (१, ७९, ९) "हे अग्ने! आमची जीवनयात्रा उत्तम चालावी म्हणून सुंदर ज्ञानानें युक्त, सर्व आयुष्यभर पुरेल व आमच्या सुखास कारणीभूत होईल अशी उत्तम संपत्ति दे." "इंद्र श्रेष्ठानि द्रविणानि धेहि ।" (ऋ. २, २१, ६) इंद्रा! आम्हास श्रेष्ठ प्रतीचें धन दे." "उरु क्षयाय नः कृधि ।" (ऋ. ८, ६८, ६) "आमच्या घरादारांची चांगली भरभराट कर." अस्मे धेहि श्रवो बृहत् । (ऋ. ८, ६५, ९) "आम्हांस मोठी कीर्ति द्या" "प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्याम् ।" (ऋ. ५, ४, १०) "प्रजेच्या द्वारें आम्ही अमर होऊं" "तन्नो देवः यच्छत सुप्रवाचनम् छर्दिरादित्याः सुभरं नृपाय्यम् ।" (ऋ, १०, ३५, १२) "अहो आदित्य देवांनो! अत्यंत प्रशस्त, सुसमृद्ध माणसांचें रक्षण करणारें असें घर तुम्ही आम्हांला द्या." नित्यस्य रायः पतयः स्याम" (ऋ. ७, ४, ७) आम्ही औरस पुत्राचें धनी व्हावें "नः पशुमाँ अस्तु गातुः ।" (ऋ. ३, ५४, १८) "आमचें घर पुत्रपौत्रादि संततींनीं व अश्वगवादि पशूंनीं भरभराटून असो." "रयिं देहि सहस्रिणं अग्ने वीरवती मिषम् ।" (ऋ. ८, ४३, १५) "हजारांनीं धनसंपत्ति व तसेंच बलवर्धक अन्न आम्हांस दे." "विश्वायुर्धेह्यक्षितं (ऋ. १, ९, ७) खंडरहित असें उदंड आयुष्य आम्हांस दे. "शं नः करत्यर्वते सुगं मेषाय, मेष्ये, नृभ्यो नारिभ्यो गवे ।" (ऋ. १. ४३. ६) "आमच्या घोड्यांना, मेंढ्यांना, मेंढीला, पुरुषांना, स्त्रियांना व गाईंना अर्थात् सर्वांनाच सुखी ठेंव."

ज्याप्रमाणें प्रत्यक्ष स्वरूपांत त्यांनीं संपन्न जीवनाच्या या आकांक्षा प्रकट केलेल्या आहेत त्याचप्रमाणें आक्रमक शत्रूपासून संरक्षण मागितलेलें असून आपणांस काय नको तेंहि त्यांनीं स्पष्ट-पणें सांगितलेलें आहे. ते म्हणतात, "हृद्रोगं मम सूर्य हरिमाणं च नाशय ।" (ऋ. १, ५०, ११) "माझा कावीळ व क्षयरोग हे सूर्य देवा, नष्ट कर. "पाहि रीषत उत् वा जिघांसतः ।" (ऋ. १, ३६, १५) "व्याघ्रादि दुष्ट प्राण्यांपासून व घात करूं पाहणाऱ्या शत्रूपासून आमचें रक्षण कर" "अप त्यं परिपन्थिनं मुषीवाणं हुरश्चितम् । (ऋ. १, ४२, ३) "वाटमारे, चोर, व कपटी लोक यांस आम्हांपासून दूर, अतिदूर ठेव." "पाहि धूर्तेरराव्णः ।" (ऋ. १, ३६, १५) "धूर्त कवडीचुंबकापासून आमचें रक्षण कर." "व्यमीवा श्चातयस्वा विषूचीः ।" (ऋ. २, ३३, २) "सर्व शरीरांत व्यापून राहणाऱ्या रोगाचें उच्छेदन कर." मा ते गोदत्र निरराम राधसः । (ऋ. ८, २१, १६) "हे उदार इंद्रा! आम्ही जे तुझे भक्त ते संपत्तीपासून ढळून धनरहित असूं नये." मा नः क्षुधे परा दाः । (ऋ. ७, १ १९), "आम्हांस भुकेच्या तडाख्यांत देऊं नकोस." "मा नो अग्ने अव सृजो अविष्यवे ।" (ऋ. १, १८९, ५) "आम्हांस भुकेकंगाल बनलेल्यांच्या स्वाधीन करूं नकोस. "मा दत्वते दशते परा दाः ।" (ऋ. १, १८९, ५) "दातांनीं दंश करणाऱ्या सर्पादिकांच्या व शिंगांनीं डिवचणाऱ्या पशूंच्या सपाटयांत आम्हांस देऊं नकोस" 'मा शूने निषदाम (क्र. ७, १, ११) "निपुत्रिकाच्या घरीं राहण्याचा अनिष्ट प्रसंग आमच्यावर येऊं नये." दरिद्रतेचा आर्यांना इतका तिटकारा आहे कीं, ते म्हणतात, "अरायि काणे विकटे गिरिं गच्छ सदान्वे, शिरिं विष्टस्य सत्त्वभिष्टेभिष्ट्वा चातयामसि ।" (ऋ. १०, १५५, १) "हे धनहीन कुरूप व सदा आक्रोश करणाऱ्या दरिद्रते! निर्जन पर्वतावर जा. नाहींतर पराक्रमानें आम्ही तुझा नाश करूं." "गोमायुरदादजमायुरदात्पृश्निरदाद्धरितो नो वसूनि गवां मण्डूकाः ददतः शतानि सहस्रऽसवि प्रतिरन्त आयुः (ऋ. ७, १०३, १०)

"बैल आम्हांस संपत्ति देवोत तसेंच मेंढेहि पण आम्हांस सौख्य देवोत. हे बेडुक आम्हांस शेकडो गायी देवोत. हजार वर्षेपर्यंत हे बेडुक आपलें आयुष्य आम्हांस देवोत."

या ऋग्वेदीय ऋषींच्या व ब्राह्मण ग्रंथापर्यंतच्या सर्वच वेद-वाङ्मयाच्या द्रष्टयांच्या उद्गारांकडे पाहिलें तर इहलौकिक संपत्ति, ऐश्वर्य व जीवन यांच्या विषयीचा कोणताहि खुरटलेला भाव त्यांच्या अंतःकरणांत दिसून येत नाहीं. स्वाधीनतेनें सुखोपभोग घेण्याची त्यांची इच्छा आहे व ती प्रकट करणें त्यांना मुळींच कमीपणाचें वाटत नसून उलट तें उमद्या मनाचें वाटतें. बौद्ध व जैन विकृती-नंतर भारतांत दृढमूल झालेल्या विकृत निराशावादाचा त्यांच्या मनावर यत्किंचितहि परिणाम झालेला नाहीं. पण हें ऐश्वर्य त्यांना दुसऱ्याकडून भीक म्हणून नको आहे. तर स्वतःचा पुरुषार्थ व उद्योग यांच्या भरंवशावर त्यांना तें मिळविण्याची इच्छा आहे. ऋग्वेद म्हणतो, "न ऋते श्रान्तस्य सख्याय देवाः"। जो पुरुषार्थ करतो व घाम गाळून श्रम करतो त्याचाच ईश्वर मित्र व पाठीराखा असतो. आळशी मनुष्य पापी असून श्रमावांचून संपत्तीची प्राप्ति होऊं शकत नाहीं व आयतें मिळालेलें धन तिरस्करणीय असून स्वतः कष्ट करून ऐश्वर्यशाली होण्यांतच खरा पुरुषार्थ आहे असें ऋग्वेदानें म्हटलें आहे. ऐतरेय ब्राह्मणांत इंद्रानें हरिश्चंद्राचा मुलगा रोहित याला अविश्रांतपणें उद्योग व पुरुषार्थ करण्याची प्रेरणा देत असतां असें म्हटलें आहे कीं,"नाऽना श्रान्ताय श्रीरस्ति पापो नृशद्वरोजन इन्द्र इच्चरतः सखा चरैवेति। कलिः शयानो भवति संजिहानस्तु द्वापरः। उत्तिष्ठंस्त्रेता भवति कृतं संपद्यते चरन् चरैवेति॥ चरन्वै मधु विन्दति चरन् स्वादुमुदुंबरन् सूर्यस्य पश्य श्रेमाणं यो न तंद्रयते चरन् चरैवेति॥ (ऐतरेय ब्राम्हण ७, १५)" "हे रोहिता, श्रमा-वांचून श्रीची प्राप्ति होऊं शकत नाहीं. आळशी मनुष्य पापी आहे. जो पुरुषार्थी असतो त्याचाच ईश्वर मित्र असतो. म्हणून कष्ट कर. पुरुषार्थ कर. आळशी मनुष्य व केवळ झोपून राहणारा हा मूर्ति-मंत कलि म्हणजे सर्वांत अधःपतित आहे. थोडे पुरुषार्थाचे विचार

मनांत आले कीं, ती त्यापेक्षां वरची द्वापराची अवस्था होय. प्रत्यक्ष पुरुषार्थासाठीं सिद्ध होणें ही त्याहीपेक्षां वरची त्रेतायुगाची अवस्था होय व प्रत्यक्ष कार्य करूं लागणें हीच सर्वश्रेष्ठ अवस्था होय. अविरत परिश्रम व भ्रमण करते म्हणूनच मधमाशी मध मिळविते. अखंड संचार करतात म्हणूनच पक्षी मधुर फळें मिळवितात. सूर्य अखंड व निरलसपणें विश्रांतीची क्षणमात्रहि अपेक्षा न करतां भ्रमण करतो म्हणूनच त्याचें तेज त्याची शोभा व स्थावर जंगम सृष्टीला प्रकाशाचा आणि जीवनाचा पुरवठा करण्याचें त्याचें सामर्थ्य अखंडितपणें टिकून आहे. म्हणून पुरुषार्थाची कास धर व उद्योग कर."

याप्रमाणें रसरशीत जीवनवादी व पुरुषार्थी असणारे वैदिक लोक विलक्षण धैर्यशील व कसल्याहि संकटाचा फडशा पाडणारे तेजस्वी आहेत हें सांगावयास नकोच. देवाजवळून ते फक्त तेज व कृपा यांचीच मागणी करतात. आणि कसल्याहि आपत्ति वा घनघोर युद्ध यांना न डगमगतां व न टाळतां त्यांत धडक घेऊन यशस्वी होण्याची ते आकांक्षा बाळगतात. ते म्हणतात, "सासह्याम पृतन्यतो वनुयाम वनुष्यतः" । (ऋ. ८, ४०, ७) "आमच्याशीं जे द्वेषभावानें वागतील त्यांची आम्ही चांगली खोड जिरवूं. व आमच्याशीं जे मित्रत्वानें वागतील त्यांच्याशीं आम्हीहि सलोख्यानेंच वागूं." प्रत्यक्ष युद्धांत शिरल्यावर त्यांच्या धनुष्याचा टणत्कार त्यांच्या कानांना कसा लागे व त्या धनुष्याच्या दर्शनांत केवढ्या तेजस्वी पार्श्वभूमीचें त्यांना स्मरण होई हें ऋग्वेदांतील पुढील ऋचांवरून दिसून येण्यासारखें आहे. ते म्हणतात, "धन्वना गा धन्वनाजिं जयेम धन्वना तीव्राः समदो जयेम । धनुः शत्रोरपकामं करोति धन्वना सर्वाः प्रदिशो जयेम ॥ वक्ष्यन्तीवेदा गनीगन्ति कर्णं प्रियं सखायं परिषस्वजाना ।" योषेव शिङ्क्ते विततािध धन्वञ्ज्या इयं समने पारयन्ती ॥ (ऋ. ६, ७५ ऋचा २ व ३) "आमच्या धनुष्याच्या साहाय्यानें आम्ही गाई जिंकाव्या व लढायामागून लढाया जिंकाव्या असें त्याचें तेज

आहे. या धनुष्याच्या भरंवशावर उद्धत व अत्यंत मदोन्मत्त अशा शत्रुसेना आम्ही जिंकूं. आमचें धनुष्य शत्रूचा इच्छाभंग करील व आम्ही दिशा आणि विदिशा यांच्यावर विजय संपादन करूं. ही धनुष्यावर चढविलेली व रणकर्मांत पार नेणारी प्रत्यंचा (दोरी) प्रियसख्याला आलिंगन देणाऱ्या स्त्रीप्रमाणें जणूं काय बोलण्याच्या इच्छेनें कानापाशीं येते व मंजूळ नाद करते." ते स्वच्छच सांगतात कीं, "उत वा यो नो मर्चयात् अनागसः अरातीवा मर्तः सानुको वृकः। बृहस्पते अप तं वर्तया पथः सुगं नो अस्यै देववीतये कृधि ।। (ऋ. २, २३, ७)" "अथवा आमच्याशीं वैर धरणारा आणि गर्वानें ताठून जाऊन अपहार करणारा असा जो जो मनुष्य, आम्ही जे तुझे निरपराधी भक्त त्यांना पेचांत आणूं पाहील त्याला, हे वाक्पते, तूं आमच्या वाटेंतून कायमचा उखडवून टाक आणि देवसेवा आमच्या हातून व्हावी म्हणून आमचा मार्ग सुगम कर." खड्ग व धनुष्य केवळ अन्यायाच्या प्रतिकारार्थ वापरावयाचें पण एकदां दुर्जनांनीं शस्त्र वापरावयास भाग पाडल्यावर मग मात्र कोणताहि मुलाहिजा न ठेवतां त्याचे स्वाभाविक परिणाम तेजस्वीपणानें घडूं द्यावयाचे पण नमावयाचें मात्र नाहीं असा त्यांचा कणखर बाणा आहे. ते म्हणतात,

"इन्द्राग्नी युवं सू नः सहन्ता दासथो रयिं । येन दृळ्हा समत्सु आ । वीळु चित् साहिषीमहि । अग्निर्वनेव वात इत् नभन्तां अन्यके समे ।।१।।

अपि वृश्च पुराणवत् व्रततेरिव गुष्पितं । ओजो दासस्य दम्भय । वयं तत् अस्य सम्भृतं वसु । इन्द्रेण विभजेमहि नभन्तां अन्यके समे ।।६।।" (ऋ. मंडल ८ सूक्त ४०)

"हे इंद्राग्नी हो! दुर्जनांना असह्य होणारे तुम्ही भक्तांना असें अढळ ऐश्वर्य द्या कीं, तेणेंकरून शत्रू कितीहि बळकट असोत, झंझावात सुटला असतां दावाग्नि जशीं अरण्यें फस्त करतो त्याप्रमाणें त्यांना आम्ही युद्धांत चिरडून टाकूं. एखाद्या वेलाचें जुनें वाळलेलें जाळें छाटून टाकावें त्याप्रमाणें दुष्ट नीचांचें जाळें तूं पूर्वीप्रमाणें

छाटून टाक. त्यांचें तेज तूं फिकें पाड म्हणजे त्यांनीं सांठविलेलें धन इंद्राच्या साह्यानें आम्ही सर्वांना वाटून देऊं." एकदा संकटांत पाय टाकला म्हणजे अविकम्पितपणें धैर्यानें आणि निर्भयपणानें तो पुढेंच पडला पाहिजे असा त्यांचा उग्र निश्चय आहे अथर्ववेदांतील धीरांचें धैर्यवर्धन करणारे पुढील उद्गार या दृष्टीनें मनन करण्यासारखे आहेतः–

"यथा द्यौश्च पृथिवी च न बिभीतो न रिष्यतः ।
एवा मे प्राण मा बिभेः ।।
यथाहश्च रात्री च न बिभीतो न रिष्यतः ।
एवा मे प्राण मा बिभेः ।।
यथा सूर्यश्च चंद्रश्च न बिभीतो न रिष्यतः ।
एवा मे प्राण मा बिभेः ।।

"ज्याप्रमाणें द्युलोक व पृथ्वी, दिवस व रात्र, सूर्य व चंद्र, ब्रह्म व क्षत्र, सत्य व सरलता, भूत व भविष्य हीं द्वंद्वें जशीं कोणालाही न भितां अखंडितपणें सारखीं पुढेंच चाललीं आहेत त्याप्रमाणेंच, माझ्या प्राणा, तूं कधींच न भितां नित्य प्रगमनशील रहा." माणसानें धैर्यानें व निर्भयपणें अखंड पुढें पाऊल टाकण्यासाठीं त्याला दिलेला हा अथर्ववेदांतील काव्यमय संदेश किती बहारीचा आहे! अथर्ववेदांतील सारींच युद्धगीतें व संग्रामगीतें या दृष्टीनें अत्यंत उत्कृष्ट व स्फूर्तिदायक आहेत. अथर्ववेदांतील पांचव्या कांडांतील विसाव्या सूक्तांतील रणदुंदुभीचें वर्णन करणाऱ्या पुढील बहारीच्या ऋचा पहा :–

"उच्चैर्घोषो दुन्दुभिः सत्वनायन वानस्पत्यः संभृत उस्त्रियाभिः।
वाचं क्षुणुवानो दमयन्तसपत्नान्त्सिंह इव जेष्यन्नभि तंस्तनीहि ।।१।।
सिंह इवास्तानीद द्रुवयो विबद्धोभिक्रन्दन्नृषभो वासितामिव ।
वृषा त्वं वध्रयस्ते सपत्ना ऐन्द्रस्ते शुष्मो अभि मातिषाः ।।२।।
वृषेव यूथे सहसा विदानो गव्यन्नभि रुव सन्धनाजित् ।
शुचा विध्य हृदयं परेषां हित्वा ग्रामान् प्रच्युता यन्तु शत्रवः ।।३।।

दुन्दुभेर्वाचं प्रयतां वदन्तीमाशृण्वन्ती नाथिता घोषबुद्धा ।
नारी पुत्रं धावतु हस्तगृह्यामित्री भीता समरे वधानाम् ।।५।।

"लाकडाचा बनविलेला, वादयांनीं आंवळलेला, वीराप्रमाणें आचरण करणारा दुन्दुभि मोठा शब्द करीत आहे. आपला आवाज चढवून, शत्रूंना जेरीस आणणारा तूं, विजयी सिंहाप्रमाणें मोठ्यानें ओरड. १ विबद्ध द्रुवय (दुन्दुभि) सिंहाप्रमाणें ओरडला. त्यानें कामुक बैलाप्रमाणें शब्द केला. हे दुंदुभे! तूं बैल (वृष) आहेस, तुझे शत्रु नेभळे आहेत; शत्रूंना जिंकण्याची तुझी शक्ति इंद्रासारखी आहे. २ जनावरांच्या कळपांत, बैलाप्रमाणें शक्तीनें प्रसिद्धीस आलेला असा तूं लूट जमा करीत व गाई मिळवीत ओरडत राहा. दुःखानें शत्रूंचीं हृदयें विदारण कर व त्यांची धूळधाण उडून ते आपलीं घरेंदारें सोडून जावोत. ३ दुन्दुभीचा आवाज दूरवर दुमदुमत असलेला ऐकून, त्यानें जागी होऊन व्यथित झालेली शत्रुपत्नी मुलाचा हात धरून शस्त्रांचा खणखणाट चाललेल्या समरभूमींतून भीतीनें पलायन करो. ५ "

वेदवाङमयांतील या जीवनवादाकडे पाहून पुष्कळांनीं आपली अशी कल्पना करून घेतली आहे कीं, वैदिक काळीं उपनिषदांतील अध्यात्मज्ञानापर्यंत लोकांचा विकास झालेला नसून एखाद्या जडवादी मनुष्याप्रमाणें केवळ इहलौकिक सुखोपभोग हेंच वैदिक लोक आपलें सारसर्वस्व समजत असत. वेदांविषयीं अभिमान बाळगणारे व ते मागासलेल्या लोकांचे उद्गार आहेत अशी कल्पना करून बसलेले अशा दोन्ही प्रकारच्या लोकांच्या प्रतिपादनांतून या बाबतींत जणूं कांहीं एकमत असल्याचें आढळतें. ऐहिक सुखोपभोगप्रधान प्रवृत्तीलाच चुकीनें हिंदु धर्मांतील प्रवृत्तिपरता समजणारे लोक वेदांत संन्यासप्रवणता व निवृत्तिपरता नाहीं हें सिद्ध करावयासाठीं याच गोष्टीचा आश्रय घेत असतात, व केवळ हा ऐहिक जीवनवादच राष्ट्रांत तेज उत्पन्न करतो अशा समजुतीनें वेदांचा पुरस्कार करीत असतात. आध्यात्मिकता ही राष्ट्राची श्रेष्ठ विकासाची स्थिति होय असें मानणारे लोक उपनिषत्काळीं वैदि-

कांचा अध्यात्मवाद पूर्णावस्थेस गेला असला तरी वेदकाळीं ते कर्मकांड व लौकिक जीवनविषयक आकांक्षा यांतच रममाण झाले होते असें यावरूनच ठरवून वेद ते उपनिषदें असा एक विकासाचा अथवा ज्ञानाच्या चढत्या श्रेणीचा क्रम लावीत असतात. अलिकडच्या विद्यापीठांतील शिक्षणक्रमांतून नियुक्त झालेल्या ऐतिहासिक पुस्तकांतील क्रम याच पद्धतीचा आहे असें आपणांस आढळून येईल. सामान्य लोक तर काय, पण ज्ञानकोशकार डॉ. केतकरांच्या सारखे लोकहि या जाळ्यांत फसलेले आहेत. आणि तेहि इतके कीं, वेदांचें संशोधन करतांना स्वतःच जे सिद्धान्त लोकांना त्यांनीं सांगितले त्यांच्या विरुद्धच ते स्वत: अनुमानें काढावयास पुढें सरसावतात. याचा अर्थ विचारान्तीं जें पटलें तेंहि मनावर झालेले संस्कार प्रत्यक्षांत आणू देत नाहींत असाच आहे. वेदांचें संशोधन कसें करावें असें जर डॉ. केतकरांना विचारलें तर ते स्वतःच त्या संबंधीं एक सत्य सिद्धांत सांगतील, पण त्यांच्यासारख्यांचेंहि मन त्यांच्यावर झालेल्या संस्कारांना इतकें वळी पडलेलें आहे कीं, अनुमानें काढतांना नेमके ते स्वतःच्याच सिद्धांतांच्याविरुद्ध जातील! ऋग्वेद सूक्तांत आढळून येणारे आर्यांचें जीवन कसें होतें यासंबंधीं विवेचन करतांना डॉ. केतकर म्हणतात, “भारतीय आर्य लोक चपल, आनंदी व भांडखोर होते असें दिसतें. त्यांची राहणी साधी, पण कांहींशी रानटी अशी होती. वैदिक सूक्तांची रचना करणारे लोक शत्रूशीं लढण्याच्या कामीं देवांची मदत मागत. युद्धांत आपणांस जय मिळावा म्हणून ते त्यांची प्रार्थना करीत. वैभव व यथास्थित लूट सांपडावी म्हणून ते देवांना आळवीत. पैसा, सुवर्णाच्या राशीच्या राशी, गोधनांचे कळप, पिकाकरितां पाऊस इत्यादि गोष्टी मिळाव्या, संतति, संपत्ति व दीर्घायुष्य हीं प्राप्त व्हावीं म्हणून ते देवांची पूजा करीत. या काळपर्यंत वैदिक सूक्तांत पुढच्या पुढच्या वाङ्मयांत वारंवार आढळून येणारा भारतीय लोकांचा दुबळा, निर्जीव निवृत्तिपर स्वभाव मुळींच आढळत नाहीं. ऋग्वेदांत नीतितत्त्वाखेरीज सर्व कांहीं आहे.” जे डॉ. केतकर स्वतः यज्ञप्रक्रियेची व

वेदाभ्यासाची सांगड घालून ऋग्वेदादि चारहि वेद म्हणजे ऋत्विजांच्या कामाच्या सोयीसाठीं तयार करण्यांत आलेलीं जुडगीं म्हणजे चार वेद होत असें म्हणतात, व स्वतःच वेदाच्या भावी अभ्यासकांना संपूर्ण वेद म्हणजे एकच वाङ्मय आहे असें समजून वेदाचा अभ्यास करावा अशी स्पष्ट सूचना देतात, ते स्वतःच या ठिकाणीं ऋग्वेद म्हणजे सलग वाङ्मय आहे अशी कल्पना करून केवळ ऋग्वेदावरून आर्यांच्या जीवनपद्धतीविषयीं स्वतः अनुमानें काढतात ही आश्चर्याचीच गोष्ट नव्हे काय? व तीं अनुमानें काढतांना सुद्धां पाश्चात्यांनीं गृहीत धरलेला ऋग्वेद ते उपनिषदें हा विकासक्रम तसाच गृहीत धरून ऋग्वेदकालीन लोकांना जीवनाच्या इहलौकिक आकांक्षाच्या पलीकडे विचार न करूं शकणारे लोक असें ठरवितात हें तर त्याहूनहि महदाश्चर्य होय! ऋग्वेदांतील लोकांची आध्यात्मिक प्रगति किती होती व त्यांच्यांत नीतिमत्ता आणि नीतितत्त्वांचा प्रसर किती होता याचे ऋग्वेदांतीलच पुरावे मी पुढें दाखविणारच आहे. डॉ. केतकरांपेक्षांहि आश्चर्याची गोष्ट विख्यात भारतीय तत्त्वज्ञ प्रा. आर. डी. रानडे यांची आहे. आपल्या A Constructive Survey of Upanishadic Philosophy' या ग्रंथांत ते म्हणतात, " ऋग्वेदांत धर्माचा विचार बाह्य दृष्टयाच केला आहे हें प्रथम लक्षांत ठेवणें जरूर आहे. कारण त्यामध्यें सृष्टींतील निरनिराळ्या शक्ति देवता आहेत असें मानून त्यांची स्तुति केली आहे. त्यावरून ऋग्वेदकालीं धर्मभावना अद्याप इतकी परिणत झाली नव्हती असें दिसतें." प्रा. रानडे यांच्याविषयीं आदर बाळगूनहि आम्हांस असें म्हणावयाचें आहे कीं, त्यांनीं ऋग्वेदावर येथें अन्याय केलेला आहे. 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति' अशासारखे ऋग्वेदांतील विपुल उल्लेख अनेक देवतावाद सिद्ध करीत नसून उपनिषदांतील परम तत्त्वाचें ऋग्वेदीय ऋषींना संपूर्ण आकलन झालें होतें असेंच सिद्ध करतात. सृष्टीच्या मुळाशीं असणारें व सृष्टीला आधारभूत असलेलें तत्त्व ऋग्वेदीय ऋषींना उपनिष-

दांतील अनुभूतीच्या मार्गानेंच संपूर्ण आकलन झालें होतें हें सिद्ध करावयास 'अस्य वामस्य' व 'नासदीय' हीं दोन सूक्तेंसुद्धां पुरेशीं आहेत. 'गच्छ धर्मणा' म्हणणाऱ्या ऋग्वेदांत व 'सन्नद्धो मनसा चरामि' असे उद्घोषिणाऱ्या ऋग्वेदांत धर्माचा बाह्यदृष्टयाच विचार केला आहे असें म्हणणें व धर्मभावना परिणत झाली नव्हती असा शेरा देऊन मोकळे होणें केवळ हास्यास्पद आहे. प्रा. रानडे यांनीं उपनिषदांतील रहस्याऐवजीं ऋग्वेदांतीलच रहस्य सांगावयाचें ठरविलें तर दोन रहस्यें एकच व एकाच मूल्याचीं आहेत अशी त्यांची खात्री पटेल असें आम्हांस वाटतें. वेदवाङ्मयांत आढळून येणाऱ्या जीवनवादी आकांक्षांच्या या स्पष्ट आविष्कारामुळें मोठमोठ्या स्वतंत्रप्रज्ञ म्हणून प्रसिद्ध असलेल्या लोकांचीहि कशी संभ्रमपूर्ण अवस्था होते हें दिग्दर्शित करावयास्तवच मी डॉ. केतकर व प्रा. रानडे यांचीं नांवें येथें उल्लेखिलीं. त्यावरून प्रत्यक्ष ऋग्वेद वाचण्याचे परिश्रम न घेतलेल्या व वुड्रॉफच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे आपल्या पाश्चात्य गुरूंच्या तालावर वाङ्मयनर्तनाचीं पावलें टाकणाऱ्या इतर सामन्यांची काय अवस्था होत असेल हें सांगावयासच नको; या जीवनवादावरून बुद्धयाच भारतीय वाङ्मयाच्या विकृतीकरणास्तव बद्धपरिकर झालेले कॉ. डांगेसारखे लोक केवढी भयानक विधानें करीत असतील व विलक्षण स्वरूपाचे इतिहास लिहीत असतील याची कल्पनाच करणें बरें. कॉ. डांगे हे आपल्या 'इंडिया फ्रॉम प्रिमिटिव्ह कम्यूनिझम टु स्लेव्हरी' या ग्रंथांत ऋग्वेदीय जीवनाचें वर्णन करताना म्हणतातः—

All Vedic literature is dominated with but one demand and the measures for the fulfilment of that demand namely wealth meaning primarily food and more men (man-power) Dhanam and Praja. The first Dhanam describes his instruments of production, his economic productive activity, and as an adjunct of that the second one Praja. All Vedic Sanhitas contain abundent material on these two questions.

The struggle for food was a very hard one. With those crude stone tools, it was bound to be so. The precarious existence of the hunter, with uncertainty of the game, with running after the prey, with no shelter, no fire, no protection against nature and wild beasts, caused a shudder in the memory of the Aryan. Whole groups of societies perished in the struggle for food and some times men wandered if they would all perish in the battle. The fear is expressed by the Vedic philosopher in his own way. (pp. 36)

"संपूर्ण वैदिक वाङ्मय केवळ एकाच मागणीनें व त्या मागणीच्या परिपूर्तीच्या उत्कंठेनें भरलेलें आहे. ती मागणी म्हणजे संपत्तीची मागणी होय. मुळांत या संपत्तीचा अर्थ अन्न असा आहे. त्याच-बरोबर प्रजा असाहि त्याचा अर्थ आहे. या धनसंपत्तीच्या मागणीनेंच सर्व वेदवाङ्मय भरलेलें आहे. धन शब्दाचा पहिला अर्थ उत्पादनसाधनें व दुसरा अर्थ तीं ज्यांच्यासाठीं असतात व जे निर्माण करतात ते लोक अथवा प्रजा असा आहे. जीवनार्थ लागणाऱ्या अन्नासाठीं करावा लागणारा संघर्ष वैदिक काळांत अत्यंत तीव्र स्वरूपाचा होता असें यावरून दिसतें व वेदांतील लोक पाषाण युगांतील असल्यामुळें पाषाणाच्या ओबडधोबड साधनांच्या काळांत तो तसा असणें स्वाभाविकहि होतें. शिकारी-शिवाय उपजीवनाचें दुसरें साधन नाहीं, तेंहि साधन इतकें अनिश्चित कीं, शिकार मिळेलच असा नियम नाहीं, निसर्ग व जंगली श्वापदें यांची स्वतःच शिकार होण्याची भीति सतत असणें, सारखें शिकारी-मागून धावणें, वर आच्छादन नाहीं, अग्नीचा पत्ता नाहीं, कसलेंहि संरक्षण नाहीं, या सगळ्या गोष्टींची भीति आर्यांच्या अंतःकरणांत सदैव थरकाप उत्पन्न करी. उपजीवनाच्या या संघर्षांत सर्वच समाज सांपडलेला होता, व या संघर्षांत सर्व समाजच नष्ट होईल अशी भीति वैदिक ऋषीला सदोदित वाटत असे व ती त्यांनीं व्यक्तविलीहि आहे." ही कल्पित कथा रचल्यावर

श्री. डांगे यांना वेदांतील अग्नीच्या प्रेमळ सूक्तांची एकदम उकल झाली व रानटी अवस्थेतल्या या लोकांना अग्नि सांपडला व त्यामुळें त्यांच्या जीवनपद्धतींत जो आमूलाग्र सुखास्पद बदल झाला त्याचेंच चित्रण अग्निसूक्तांतून दृष्टीस पडतें असाहि त्यांनीं उलगडा करून दाखविला. ते म्हणतात :–

The Aryans had at last that instrument which immediately caused a great revolution in their life. The revolution was so great that all later Aryan life is ascribed to fire, revolves round it and is centred round it. Creation, existence, growth, wealth, happiness, all proceed from fire (Agni). The two most vital changes resulting from it are the production of wealth in cattle and population (Praja-pashavah).

Fire made the hunt and fish easily digestible, when roasted or cooked on it. Hence the great God Agni is called Amad, eater of raw food, and Kravyad, eater of dead flesh. It scared off wild animals, hostile goblins and ghosts. It could be thrown as a weapon in the form of burning cinders of wood or torches against wild animals and enemies who had no such invention as yet. It protected man from the inclemancies of weather and made movement and sight possible in the darkness of the night which could be very long and cold in the oppressive Siberien regions.

Allied with fire, came the art of domestication of animals, which solved the most pressing problem of a stable supply of food." (pp. 38.)

" शेवटीं आर्यांना एक नवें साधन सांपडलें व त्यानें त्यांच्या जीवनांत तात्काळ मोठी क्रांति घडवून आणली. तें साधन म्हणजे अग्नीचा शोध होय. ही क्रांति एवढी मोठी होती कीं, अग्नीकडे संपूर्ण आर्य जीवन आकर्षिलें गेलें व त्याच्याचभोंवतीं केंद्रित झालें. उत्पत्ति, अस्तित्व, विकसन, ऐश्वर्य, सुख इत्यादि सर्व गोष्टींचें

अग्नीच उत्पत्तिस्थान बनला. यानंतर जी मोठी क्रांति घडून आली तिचें पर्यवसान पशुपालन हीच संपत्ति व प्रजाभिवृद्धि यांत झालें. अग्नीनें शिकार व मासे यांचें मांस भाजून व शिजवून सहज पचन-योग्य करतां येणें शक्य झालें. अग्नीला क्र्व्याद व अमद अशीं दोन नांवें मिळालीं. पहिल्याचा अर्थ प्रेतें खाणारा, व दुसऱ्याचा अर्थ कच्चें धान्य खाणारा असा आहे. (येथें खाणें म्हणजे जाळणें) जंगली क्रूर श्वापदें, राक्षस व पिशाच्चें यांना तो हाकलून लावण्याचें सामर्थ्य असलेला ठरला. जळत्या कोलताडांच्या रूपानें वा निखाऱ्यांच्या रूपानें शत्रू अथवा जंगली श्वापदें यांच्यावर तो शस्त्रासारखा त्यांच्या नाशासाठीं फेकतां येऊं लागला व त्यामुळें विजयाचे हमखास हत्यार ठरला. कारण कीं आर्यांच्या शत्रूंची एवढी प्रगति झालेली नव्हती. थंड हवेपासून अग्नि माणसांचें रक्षण करूं शकत होता. त्याचप्रमाणें रात्रीच्या गाढ अंधकारांत त्याच्या साह्यानें व्यवहार शक्य होत होता व मार्गदर्शनहि होत होतें. सैबेरियाच्या दीर्घ व थंड रात्रीं तर त्याची उपयुक्तता अधिकच पटणारी होती. या अग्नीबरोबरच पशुपालनहि आलें व त्यामुळें स्थिर स्वरूपांत खाद्य पदार्थ मिळण्याची व पूर्वीचा या बाबतींतला अस्थिरपणा जाण्याची फारच मोठी सोय झाली."

याप्रमाणें प्रथम ऋग्वेदांतील जीवन पाषाणयुगांतील रानटीपणाचें आहे, असें केवळ त्यांतील जीवनवादावरून ठरवून त्यावर आर्यांच्या अग्निविषयक धारणेची उपपत्ति डांगे यांनीं कल्पिली व यज्ञ आणि सत्रें यांच्यांतील सामुदायिक अग्निपूजन हा रानटी लोकांच्या अग्नीभोवती फेर धरण्याच्या पद्धतीचा एक प्रकार ठरवून ऋग्वेदांत मुळींच न आढळणारी व वेदांतहि कोठेंच दृष्टीस न पडणारी सामुदायिक सहभोजन, एकत्र नृत्य व हव्या त्या पुरुषानें हव्या त्या स्त्रीला निवडून रात्रभर मौज करणें इत्यादि गोष्टी वैदिक लोकांच्या जीवनाला चिकटविल्या. त्यांत फक्त सामुदायिक मद्यपानाची उणीव होती. वेदांतील सोमपानांत डांगे यांना त्यादृष्टीनें मोठाच आशय सांपडला व ऋग्वेदीय जीवन चित्रित करतांना

त्यांनीं तें असें चित्रित केलें कीं, "Well-fed and well-drunk, they slept round the fire in promiscuity in the early days or retired with their selected pairs to their huts when, later on, the pairing family developed in the commune household. Man was pleased and so was Agni. Thus the Brahman, the commune, lived and laboured, enjoyed and multiplied."(याप्रमाणें यज्ञ नांवाच्या सामुदायिक महोत्सवप्रसंगीं खूप खाऊन (मांस) व खूप पिऊन (दारू) ते पुरातनकाळीं अग्नी-भोवतीं झोपत अथवा आपली निवड बरोबर घेऊन आपल्या झोपड्यांमध्यें विहार करावयास जात. येथूनच कुटुंबसंस्थेचा जन्म झाला. या पद्धतीनें मनुष्य व अग्नि दोघेहि तृप्त होत. याप्रमाणें तें ब्रह्म अथवा तो संघ कष्ट करी, राही व आनंद करी.)

बरें झालें कीं, प्रत्यक्ष होडगा असा शब्द डांग्यांनीं वापरला नाहीं. नाहीं तर खास कम्युनिस्टांच्या संघजीवनाचेंच वेदाच्या नांवानें तें वर्णन करीत आहेत हें सरळच स्पष्ट झालें असतें. आपण लिहितों आहोंत तें संपूर्णपणें खोटें आहे व ऋग्वेदांतच त्याच्या विरोधी अनेक प्रत्यक्ष पुरावे आहेत; इतकेंच नव्हे तर यज्ञ, ब्रह्म, गोत्र, सदसद्वाद इत्यादि अनेक वेदवाङमयांतील शब्दसुद्धां आपल्या प्रतिपादनांत अडथळा उत्पन्न करणारे व वैदिक लोकांच्या श्रेष्ठतेची स्पष्ट जाणीव देणारे आहेत याची त्यांना पूर्णपणें जाणीव आहे.पण त्यासाठीं त्यांनीं एक वेगळीच शक्कल लढविलेली आहे व ती त्यांच्या साम्यवादी दंडेलीला व दडपेगिरीला पूर्णपणें साजेशी आहे. ही शक्कल म्हणजे शब्दांचे अर्थ फिरविणें ही होय. आधीं ऋग्वेदी लोक रानटी आहेत,असें ठरवावयाचें,मग त्यांच्यांत विकसनावस्थेचे द्योतक शब्द आढळले तर त्यांच्या अवस्थेच्या दृष्टीनें त्यांचे रूढ अर्थ तेथें लागूं शकत नाहींत असें गृहीत धरून कपोलकल्पित अर्थ त्यावर लादावयाचे अशी ही दडपेगिरी आहे. ऋग्वेदावर लिहिणारे इतर लोक व डांगे यांच्यांत हा महत्त्वाचा फरक आहे. इतरांचे दृष्टिदोष व संस्कारदोष कांहींहि असले तरी जें आहे तें त्यांना सांगावयाचें आहे व डांगे यांना कम्युनिस्ट प्रक्रियेंत भारतीय

इतिहास कोंबण्यासाठीं जें नाहीं तें आहे असें दाखववायाचें आहे. या दृष्टीनें त्यांचें ब्रह्म या शब्दावरील पांडित्य पहाण्यासारखें आहे. ते म्हणतात:–

"They very well see that this Brahman of the Vedic Aryan is quite different from the Brahman of the Upanishadic philosophers. The Vedic barbarian in his primitive commune, not yet confronted by social contradictions, class-struggles and exploitation, was far away from developing the idealist philosophy and cant of the later Upanishadic period. There the Brahman is the original intelligence, consciousness or spirit whose manifestation is the world. That Brahman is without qualities (Nirguna) while the Vedic one is objectively real, with qualities (Saguna). That one is realisable only by those subjective proceses of contemplation which we find in the Yoga or Vedanta philosophy, while the Vedic one is an objective reality enjoyed through the quite material efforts of man. The Vedic Brahman enjoys life, eats, drinks, dances, is happy and growing. The Upanishadic Brahman is beyond senses, even reason, without feeling, emotions, to whom eating, drinking, and enjoying is taboo, and through that taboo and starvation alone is it approachable. The healthy growing living Vedic Aryan had no use for a non-existent, subjective, senseless, miserable, "Unseen" Brahman. To the Vedic Aryan, Brahman lived in the collective commune and in the universe and, therfore, he himself was a part of it. To the Vedic Aryan, the Brahman was the commune and its members and like the barbarian attached the moon, heavens, earth and all to the commune, which with the Agni (fire) was, of course, the centre of everything.

Vedic scholars have seen this in the literature, but being under the influence of idealist philosophy want to

make this Brahman a mysterious thing. Hang, Giggling, Hillebrantt, Ketkar, Tilak and all went round and round this Brahman and failed to identify him.

" वैदिक आर्यांचें ब्रह्म व उपनिषदांतील तत्त्वज्ञांचें ब्रह्म या अगदीं भिन्न भिन्न गोष्टी आहेत. वेदांतील रानटी मनुष्य आपल्या प्राथमिक अवस्थेंत समाजांतील क्रिया प्रतिक्रियांचीं द्वंद्वें, वर्गसंघर्ष व पिळवणुकी यांच्या क्षेत्रापर्यंत सुद्धां अजून येऊं शकला नव्हता व त्यामुळें कल्पनावादी तत्त्वज्ञान उत्पन्न व्हावयास आवश्यक त्या विकसनापासून, पुढच्या उपनिषदांच्या काळापासून पुष्कळच दूर होता. तें तत्त्वज्ञान त्याच्या परिस्थितींत त्याच्या कल्पनेंतहि येऊं शकत नव्हतें. उपनिषदांतील तत्त्वज्ञानाप्रमाणें ब्रह्म म्हणजे मूलभूत ज्ञानशक्ति, जाणीव अथवा चित् शक्ति असून संपूर्ण विश्व म्हणजे तिचेंच विश्वरूपानें प्रकट होणें आहे. ब्रह्म हें निर्विशेष म्हणजेच निर्गुण आहे; तर वेदांतील ब्रह्म प्रत्यक्ष वस्तुसत्त्व असून तें सविशेष व सगुण आहे. उपनिषदांतील ब्रह्म केवळ योग व वेदांतांत सांगितलेल्या प्रक्रियांनीं समजणारें आहे; पण वैदिक ब्रह्म हें प्रत्यक्ष असणारें भौतिक सत्य असून मनुष्याच्या बाह्य व भौतिक क्षेत्रांतील प्रयत्नांनीं त्यांतील आनंद घेतां येतो. वैदिक ब्रह्म जीवनाचा प्रत्यक्ष उपभोग घेतें, खातें, पितें, नृत्य करतें, सुखी आहे व त्याचा विकास होत असतांना दिसून येतो. उपनिषदांतील ब्रह्म इंद्रियातीत, इतकेंच नव्हे, तर बुद्धीच्याहि अतीत आहे. त्याला कसलीहि जाणीव व भावना नाहीं. खाणें, पिणें व आनंदाचा उपभोग यांचा तेथें संस्पर्श नाहीं. या गोष्टींचा परित्याग व सर्व प्रकारची उपासमार हीच तर केवळ त्याच्या प्राप्तीचीं साधनें आहेत! आनंदाचा उपभोग घेत जीवन जगणाऱ्या व विकास पावत असलेल्या वैदिक आर्याला या अस्तित्वाच्या कोणत्याहि कसोटीनें सिद्ध न होणाऱ्या, जाणिवेच्या कोणत्याहि क्षेत्रांत न येणाऱ्या, दीनवाण्या व बापड्या अशा उदासीन ब्रह्माचा कांहीं एक उपयोग नव्हता. वैदिक आर्यांच्या दृष्टीनें त्याचें ब्रह्म त्याच्या सामुदायिक संघजीवनांत रहात होतें, विश्वांत

तें प्रत्यक्ष वावरत होतें, व म्हणूनच तो स्वतःहि त्या ब्रह्माचा एक प्रत्यक्ष भाग होता. वैदिक आर्यांच्या दृष्टीनें ब्रह्म म्हणजे त्याचा समाज, त्याचा संघ व त्याचे घटक हे होते. व रानटी माणसा-प्रमाणेंच चंद्र, स्वर्ग, भूमि इत्यादि गोष्टींचा त्यानें या समाजाशीं प्रत्यक्ष संबंध जोडून दिला. अर्थातच हा संबंध त्यानें अग्नीच्या द्वारें जोडून दिला. कारण त्याच्या दृष्टीनें अग्नि हेंच सर्व गोष्टींचें केंद्र होतें.

"आजवरच्या वेदांचें संशोधन करणाऱ्या पंडितांना या सर्व गोष्टी वेदसाहित्यांत प्रत्यक्ष दिसत होत्या. पण कल्पनावादी तत्त्वज्ञानाचें त्यांच्या मनावरील दडपण इतकें विलक्षण होतें कीं त्यामुळें या ब्रह्माभोंवतीं गूढतेचें वलय निर्माण करून तें अतिगूढ करण्याच्या दिशेनेंच ते विचार करूं लागले. हॉग, हेगलिंग, हिलब्रँट, केतकर, टिळक इत्यादि सर्वच या ब्रह्माभोंवतीं फीरफीर फिरले; पण त्याला ओळखावयास पूर्णपणें असमर्थ ठरले."

ऋग्वेदांत आढळणाऱ्या इहलौकिक आकांक्षांच्या परिपूर्तीच्या मागण्यांनीं व जीवनवादानें संपत्ति व प्रजा यांची देवांजवळ मागणी करतांच त्याचा हा केवढा भयानक विपर्यास करण्यांत आला आहे! वैदिक आर्यांनीं देवांजवळ ज्या अर्थीं धन व संपत्तीची मागणी केली त्या अर्थीं ते दरिद्री व अन्नाविणें तडफडत असले पाहिजेत व अशी स्थिति शिकारीवर जगणाऱ्या रानटी लोकांची असते म्हणून तेहि उत्पादनसाधनांचा शोध न लागलेल्या रानटी अवस्थेंत होते असें डांगे यांचें अनुमान आहे. पण हें अनुमान श्री तुकाराम महारा-जांच्या अभंगांत "पतित मी पापी" असे शब्द आढळतात म्हणून तुकाराम महाराज हे जन्मभर पंचमहापातकें करीत आलेले समाज-कंटक होते असें अनुमान काढण्याइतकेंच मूर्खपणाचें आहे. हें दुसरें अनुमान जितकें विकृत, तितकेंच पहिलेंहि विकृतच म्हटलें पाहिजे. संपत्ति अथवा धनाचा अन्न हा जो एकच अर्थ डांग्यांनीं केलेला आहे तोहि केवळ कपोलकल्पित आहे. ऋग्वेदांत सोनें, मोतीं, रत्नें यांचे उल्लेख आहेत. व सोनें तर इतकें व इतक्या प्रकारांनीं

उल्लेखिलेलें आढळतें कीं त्याची चांगलीच विपुलता असली पाहिजे हें स्पष्ट होतें. अलंकार व पात्रें यांचे तर विपुलतेनें उल्लेख आढळतातच; पण सोन्याच्या रथांचीं सुद्धां वर्णनें आहेत. यज्ञ-कर्मांत ऋत्विजांना दान देतांना गाई, घोडे, सुवर्ण, वस्त्रें, रथ, भूमि इत्यादिकांची दक्षिणाद्रव्यांत गणना करण्यांत येत असे. इतकेंच नव्हे तर सप्तरत्न व समुद्रावरील व्यापार यांचेहि ऋग्वेदांत उल्लेख आहेत. हें सर्व लक्षांत घेतलें म्हणजे धन या शब्दाचा केवळ अन्न असा अर्थ करणें शुद्ध दडपेगिरीचें आहे हें ध्यानांत येईल. ऋग्वेदांतील नुसतीं दानाचीं वर्णनें पाहिलीं तरी ते लोक शिकारीवर उपजीवन करणारे व अन्नासाठीं जंगलोजंगलीं भटकणारे नव्हते. उलट सुस्थिरता उत्पन्न झालेले धनसंपन्न व सुखी लोक होते हें स्पष्ट होतें. प्रत्यक्ष ऋग्वेदांतच वेगवेगळचा धंद्यांचा उल्लेख आहे. भटक्या रानटी लोकांत हें व्यावसायिक जीवन असतें काय ? ऋग्वेदांत एक सूक्तकार म्हणतो :—

"नानानं उ नो धियो वि वैतानि जनानाम् । तक्षा रिष्टं रुतं भिषग्ब्रह्मा सुन्वन्तमिच्छति । इन्द्रायेन्दो परि स्रव ॥१॥

जरतीभिरोषधीभिः पर्णेभिः शकुनानाम् । कार्मारो अश्मभिर्द्युभिर्हिरण्यवन्तमिच्छति । इन्द्रायेन्दो परि स्रव ॥२॥

कारुरहं ततो भिषगुपलप्रक्षिणी नना । नानाधियो वसूयवोनुगा इव तस्थिम । इन्द्रायेन्दो परि स्रव ॥३॥" ऋग्वेद, म. ९, सू. ११२.

"आमच्या बुद्धी नाना प्रकारच्या; तसेंच लोकांच्या वागणुकीचे नियमही नाना तऱ्हेचे आहेत. (पहा कीं) सुतार तासलेलें लाकूडच शोधतो; वैद्य रोगी हुडकतो, आणि ब्रह्मा (ऋत्विज) सोम अर्पण करणारा भक्त भेटावा अशी इच्छा करतो; परंतु हे सोमरसा, तूं मात्र इन्द्राप्रीत्यर्थच आपला पावनप्रवाह वहात ठेव. जुन्या औषधींनीं पक्ष्यांच्या पिसाऱ्यांनीं, किंवा चमकणाऱ्या पाषाणांनीं, खटपटी मनुष्य सुवर्णाचा सांठा शोधतो, तसेंच आम्हीहि हिरण्यवर्णाचा जो सोम त्याचा शोध करतों. हे सोमा, तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपला पावनप्रवाह वहात ठेव. मी स्वतः कवी आहे. माझा

बाळचा वैद्य आहे. आणि माझी 'नना (आई ?) धान्य निवडून त्यांतले खडे वेंचून टाकते. याप्रमाणें द्रव्याची इच्छा धरणारे आम्ही नाना प्रकारच्या बुद्धी चालवून, गाई तृणाकडे धांवतात त्याप्रमाणें द्रव्याच्या पाठीमागें धांवत आहों; परंतु हे सोमा, तूं मात्र आपला पावनप्रवाह इन्द्राप्रीत्यर्थ वहात ठेव."

सुतार, वैद्य, कवी हे ज्या समाजांत नांदत आहेत व प्रयत्नपूर्वक सुवर्णाचा सांठा शोधणारे लोक ज्या समाजांत आहेत, तसेंच व्यवसाय म्हणून धान्य साफ करण्याचें काम ज्या समाजांत रूढ आहे तो समाज केवळ अन्नाला संपत्ति समजत होता व म्हणून उत्पादनसाधनें माहीत नसलेला तो समुदाय होता असें सांगणें याहून बौद्धिक दिवाळखोरीचें दुसरें कोणतें लक्षण असूं शकेल? केवळ भौतिक शास्त्रांचीच प्रगति घेतली तर वेदकाळीं अंकगणित व भूमापनाचे नियम लोकांना माहीत होते. संख्यांचें उल्लेख शंभर, हजार, तीसहजार, लाख, पांच लाख (सहस्राणि शतावधि । अधिपंचप्रधि ।। ऋ. मं. ४ सू. ३०) असें ज्यांना करतां येतात त्यांना गणित माहीत असलेंच पाहिजे. इतकें संख्यांचें पद्धतशीर ज्ञान समाजाच्या सुस्थिर व विकसित संस्कृतीचेंच द्योतक आहे हें एखाद्या डोळसाला तरी सांगावयास नको. स्थंडिलांचे निरनिराळे आकार व यज्ञप्रक्रियेंतील त्यांचें महत्त्व लक्षांत घेतलें तर आर्यांना भूमिति शास्त्राचें उत्तम ज्ञान असलें पाहिजे ही गोष्ट मान्य करण्याविना गत्यंतरच नाहीं. सूर्य हा कधींहि मावळत नाहीं व उगवत नाहीं या प्रमेयाचें ज्यांना ज्ञान आहे, पृथ्वीला 'परीणाह' म्हणजे परिधि आहे हें ज्यांना ज्ञान आहे, समुद्रोदकापासून मेघ निर्माण होतात व सूर्य हाच ऋतुचक्राचें खरें कारण आहे हें ज्यांना अवगत आहे, अनेक धातूंचा रस काढणें व औषधी बनविणें या कला ज्यांच्या समाजांत आहेत, लोहदुर्ग, सहस्रस्तंभांचीं मंदिरें यांचे उल्लेख करण्याइतकें ज्यांच्याजवळ शिल्पशास्त्राचें ज्ञान आहे ते लोक भटके, शिकारी व रानटी म्हणावयास कम्युनिस्टिक कोडगेपणाच हवा. प्रामाणिकपणाचा थोडासाहि अंश अंतःकरणांत असणारा

ऋग्वेदाचा कोणताहि वाचक इतकें धाडस करावयास धजणें शक्य नाहीं. जलनाडी यंत्रासारखीं यंत्रें, ग्रहणांचा वेध घेण्याचीं साधनें, फाळें चमकणारे भाले, नावेंत बसून लाटांवर झोंके घेण्यासारखे जलविहार, वक्षःस्थळांवर रुळणाऱ्या सुवर्णमाला व सुवर्णाचे बाजुबंद, जरीच्या फेट्यांसारखीं शिरोभूषणें इत्यादि केवळ भौतिक गोष्टी व भौतिक शास्त्रांतील प्रगतीचीं स्पष्ट दिसणारीं चिन्हें यांचा विचार केला तरी सुस्थिर जीवनाच्या संस्कृतिसंपन्न लोकांची व आपली ऋग्वेदांत गांठ पडते. व भटक्या रानटी लोकांचें अस्तित्व पृथ्वीच्या पाठीवर कधींकाळीं असलें तरी ऋग्वेदांतील लोकांशीं त्यांचा कांहीं संबंध नाहीं हें सहजच सिद्ध होतें. डांगे यांचें धन म्हणजे केवळ अन्न हें पांडित्यहि या वर्णनाचें ओझरतें दर्शन घेतल्यानेंच निकालांत निघतें. ऋग्वेदांत चातुर्वर्ण्याचा उल्लेख आहे. प्रक्षेपाचें आधुनिकांचें आवडतें हत्यार वापरलें तरी ब्रह्मक्षत्र व विश् या त्रैवर्णिकांचें अस्तित्व तर कोणाला नाकारतांच येत नाहीं. ही चातुर्वर्ण्यात्मक अथवा त्रिवर्णात्मक समाजरचना आम्ही म्हणतों त्याप्रमाणें उच्च श्रेणीच्या ध्वनिशास्त्राला धरून झालेली असो, अथवा गुणकर्मांच्या करण्यांत येणाऱ्या आधुनिक अर्थाप्रमाणें केवळ स्वभाव व व्यवसाय यांना धरून झालेली असो, पण ती एका सुघटित समाजपद्धतीची निदर्शक आहे हें कांहीं कोणास सांगावयास नको. व अशी समाजघटना ज्या समाजांत अस्तित्वांत असते तो समाज भटकी स्थिति संपून श्रेष्ठ अवस्थेला प्राप्त झालेला असतो हेंहि त्यावरूनच स्पष्ट होतें. ऋग्वेदाचें केवळ वरवर वाचन करणाऱ्याला सुद्धां 'वक्षन् सुविताय वर्णम्' 'उन्नौ वर्णो ऋषिरुग्रः पुपोष' 'मम द्विता राष्ट्रं क्षत्रियस्य' 'क्षत्रिया यातमर्वाक्' 'विशः पूर्वीः चर्षणी आः' 'ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः। ऊरोरजस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो ह्यजायत' हे समाजघटनेच्या सुघटिततेचे उल्लेख आढळतील. त्यांतील शेवटचा पुरुषसूक्तांतील उल्लेख 'तुष्यतु दुर्जनः' या न्यायानें त्या मानानें अर्वाचीन म्हणून सोडला तरी

बाकीचे तर निर्विवादच प्राचीन आहेत. डांगे यांना हे दिसले नाहींत काय?

याप्रमाणें डांगे यांच्या इमारतीचा पायाच कोसळून पडल्यावर त्यांची त्यावर उभारलेली इमारत भुईसपाट व्हावयास वेळ लागत नाहीं. ऋग्वेदांतील लोकांना अग्नीचा प्रथम शोध लागला व तोच त्यांचें सर्वश्रेष्ठ दैवत ठरला हें त्याचें म्हणणें ऋग्वेदाचा अभ्यास ऋग्वेदावरून केला तर टिकण्यासारखें नाहीं. वैदिक आर्यांचें मुख्य दैवत अग्नि नसून इन्द्र आहे. ऋग्वेदांत अग्नीवर पुष्कळ सूक्तें आहेतच; पण केवळ सूक्तांची संख्या मोजली तरी त्या दृष्टीनेंहि इन्द्राचाच क्रमांक पहिला लागतो. सर्वश्रेष्ठ परमेश्वर म्हणून ऋषींनीं इन्द्राला जितकें आळविलेलें आहे तितकें दुसऱ्या कोणालाही नाहीं. ही गोष्ट लक्षांत घेतली तर अग्नीवरील डांग्यांचें काव्य विरून जातें. सोम हें उन्मादक द्रव्य नाहीं हें वेदांतील सोमाच्या वर्णनावरूनच स्पष्ट होतें. आर्यांचा देवतावाद जडवादी कम्युनिस्टांच्या ध्यानांत येण्यासारखा नसल्यामुळें केवळ भौतिक व स्थूल दृष्टीनेंहि वेदवाङमयाकडे पाहिलें तरीहि डांगे यांचें म्हणणें कसें लटकें पडतें हें दाखविण्यापुरतेंच येथें विवेचन केलें आहे. अग्नीवरील डांग्यांचें भाष्य जर खरें मानावयाचें तर इंद्र हा कोणता सृष्ट चमत्कार आहे व असला असें गृहीत धरलें तरी त्याचा त्या रानटी(!) लोकांच्या जीवनांत काय उपयोग होण्याची शक्यता होती कीं ज्याच्यासाठीं त्यांनीं अग्नीपेक्षांहि त्याचींच अधिक सूक्तें रचावीं व उत्कट भक्तिभावानें त्यालाच सर्वांत अधिक आळवीत बसावें? डांगे याचें कांहीं स्पष्टीकरण देऊं शकतील काय? कारण त्यांच्या 'इंडिया फ्रॉम प्रिमिटिव्ह कम्यूनिझम् टू स्लेव्हरी' या भारतीय इतिहासावरील तृतीय श्रेणीच्या कादंबरींत या गोष्टीचा कोठेंहि ऊहापोह नाहीं. स्थापत्यशास्त्र, दंपतिजीवन इत्यादिकांचे तर ऋग्वेदांत इतके विपुल उल्लेख आहेत कीं अग्नीभोंवतीं फेर धरून, नृत्य करून, खाणेंपिणें झाल्यावर हव्या त्या पुरुषाबरोबर हवी ती स्त्री झोंपडींत विहार

करावयास्तव जाई ही डांगे यांची कथा केवळ मूर्खपणाची ठरते. ऋग्वेदांतील नुसतें विवाहसूक्त व 'सुमंगलीरीयं वधूरिमां समेत पश्यत' हे उल्लेख विचारांत घेतले तरी आर्यांच्या परिणत विवाह-संस्थेचें स्वरूप दृष्टीस पडतें. व साम्यवादी डांगे हे आजच्या सुधारलेल्या (?) युगांत जें उत्पन्न करूं इच्छितात व जें केवळ रानटी अवस्थेंतील समाजांत कदाचित असेलहि, त्या स्वैर व उच्छृंखल स्त्रीपुरुष संबंधाच्या वातावरणाचा वेदांत तरी माग-मूसहि सांपडत नाहीं.

कल्पनावादी तत्त्वज्ञानाइतकी ऋग्वेदांतील समाजाची प्रगति झालेली नव्हती म्हणून ब्रह्म शब्दाचा अर्थ वेगळा केला पाहिजे हें त्यांचें म्हणणेंहि असेंच फोल आहे. ऋग्वेदांतील 'अस्यवामस्य' व 'नासदीय' या दोन सूक्तांचाच केवळ विचार केला तरी त्यांची ही कल्पना ढांसळून पडते. प्रेताला अग्नीवर ठेवल्यावर 'गच्छ धर्मणा' म्हणून जीवाला सांगणारा ऋग्वेदांतील ऋषि भारतीय संस्कृतीच्या परिणतावस्थेंतील कर्मतत्त्वाचा, जीवाच्या संसरणाचा व इंद्रियातीत अस्तित्वाच्या तत्त्वाचाच उच्चार करीत आहे हें कांहीं वेगळें सांगावयास नको. "नासदासीन्नो सदासीत्तदानीं" या शब्दांनीं ऋग्वेदानें परमतत्त्वाचें जें वर्णन केलें आहे त्याचाच अनुवाद 'सदेव सौम्येदमग्र आसीत्" असदेव सौम्येदमग्र आसीत्। या शब्दांनीं छांदोग्योपनिषदानें व 'असतन्ना-सदुच्यते' या शब्दांनीं भगवद्गीताकारांनीं केलेला आहे. या परमतत्त्वाची गूढता व अज्ञेयता व्यक्त करतांना ऋग्वेदाचा ऋषि म्हणतो तेंच उपनिषदेंहि म्हणतात. ऋग्वेद म्हणतो:–"को अद्धा वेद क इह प्रवोचत् कुत आऽजाता इयं विसृष्टिः। अर्वाग्देवा अस्य विसर्जनेनाथ को वेद यत आ बभूव॥६॥ इयं विसृष्टिर्यत आ बभूव यदि वा दधे यदि वा न। यो अस्याध्यक्षः परमे व्योमन्त्सो अङ्ग वेद य दिवा न वेद॥६। ( ऋग्वेद मं. १० सू. १२९ ) ही विविध सृष्टि कोठून व कशी झाली हें परमार्थतः कोण जाणतो? कोण येथें या गोष्टीचें प्रवचन करूं शकेल? देव हे या विसृष्टीहून

अर्वाचीन आहेत. म्हणून मूळ ही विसृष्टीच जेथून निर्माण झाली तें कोण जाणतो? ही विसृष्टि जेथून निर्माण झाली व हिला कोणी धारण करतो किंवा नाहीं तें, हिचा स्वप्रकाश व परमव्योमाचें ठिकाणीं असणारा जो अध्यक्ष तोच एक जाणीत असेल; (किंवा नसेल तर मग तें कोणीच जाणूं शकणार नाहीं.) पुढच्या भारतीयांच्या 'सहा अनादीं' तील पहिल्या अनादि परब्रह्माचेंच हें वर्णन नव्हे काय? उपनिषदांनीं 'यतो वा इमानि भूतानि' या वाक्यांनीं व ब्रह्मसूत्रकारांनीं 'जन्माद्यस्य यतः' यासारख्या सूत्रांनीं याच गोष्टींचा अनुवाद केला आहे. ऋग्वेदांतील दहाव्या मंडलांतील सोळाव्या सूक्तांत इंद्रियें त्या त्या देवतांकडे जातात असें वर्णन असून आत्मतत्त्वाचें 'अज' म्हणून वर्णन आहे. व तो भाग अग्नीनें जाळला जाऊं शकत नसल्यामुळें त्याला नुसतें तप्त करण्याची अग्नीला प्रार्थना केली आहे. गीतेमध्यें 'न जायते म्रियते' 'नैनं दहति पावकः' हें आत्म्याचें केलेलें वर्णन म्हणजे या ऋग्वेदांतील सिद्धांताचा अनुवादच नव्हे काय? 'कामस्य यत्राप्ताः कामाः' हेंच सर्व इच्छा नष्ट झाल्याचें आत्यंतिक स्थितीचें वर्णन आहे. तेंच उपनिषदांत ऋग्वेदापासून घेतलेलें दृष्टीस पडते. 'न विजानामि यत् इव इदमस्मिन्निण्यन सन्नद्धो मनसा चरामि'' (मी स्वतःच्या आत्म स्वरूपाला ओळखत नसल्यामुळेंच मनानें बांधला जाऊन संसारांत परिभ्रमण करतों) असें जें संसाराचें अज्ञानरूपी कारण ऋग्वेदांत वर्णन केलें आहे त्यांहून वेगळें असें उपनिषदें, श्रीशंकराचार्य, गीताकार, फारतर काय पण श्रीज्ञानेश्वर महाराज तरी दुसरें काय सांगतात? या सर्व प्रत्यक्ष ऋग्वेदांतीलच गोष्टींचा विचार केला तर अध्यात्माच्या बाबतींत उपनिषत्काळांतले सिद्धांत स्फुरण्याइतकी ऋग्वेदकालीन आर्यांची निस्संशय प्रगति झाली होती असें स्पष्ट सिद्ध होतें. व ही खात्री पटल्यामुळेंच लोकमान्य टिळकांसारखे प्रतिभासंपन्न पुरुष ऋग्वेदांतील 'ब्रह्म' शब्दाचा गंभीरपणें विचार करतात. गीतारहस्यांतील अध्यात्म प्रकरणांत ऋग्वेदकालींच आर्यांची आध्यात्मिक परिणति कशी पूर्णावस्थेस पोहोंचली होती

याचें उत्कृष्ट चित्रण त्यांनीं केलेलें आहे. लोकमान्यांचें तें विवेचन व डांगे यांचें हें पांडित्य पाहिलें म्हणजे Fools rush in where angels fear to tread या इंग्रजी म्हणीची स्मृति झाल्याविना रहात नाहीं. तात्पर्य, ज्याला डांगे महाशय Idealist Philosophy म्हणतात तेथपर्यंत वैदिकांची ऋग्वेदकाळींच प्रगति झाल्याचें या पुराव्यांवरून स्पष्ट होत असल्यामुळें बुद्धचा ते रानटी होते हें गृहीत धरून शब्दांचे अर्थ बदलविण्याची आवश्यकता उरत नाहीं. व हें सर्व लक्षांत घेतलें म्हणजे जें टिळकादिकांना समजलें नाहीं तें केवळ मलाच समजलें हा डांगे यांचा डौलहि फुकट जातो.

केवळ भौतिक जडदृष्टि हेंच डांगे यांच्यासारख्यांचें वैशिष्टच असल्यामुळें त्यांच्याच भूमिकेवरून आम्ही येथें त्यांच्या प्रतिपादनाचें समालोचन केलें आहे. पण वेदांच्या अभ्यासकांसाठीं आम्हांला असें सांगावयाचें आहे कीं आर्यांचा देवतावाद समजावून घ्यावयाचा असला तर ते निसर्गचमत्काराचे उपासक व सृष्ट पदार्थांची पूजा करणारे होते हा अपसमज मनांतून काढून टाकला पाहिजे. रानटी लोक देखील केवळ सृष्ट पदार्थांची पूजा करीत नाहींत. तर त्या चिन्हांना अदृश्य परमेश्वरी शक्तीचें माध्यम समजूनच त्यांची पूजाअर्चा करीत असतात. जस्टिस वुड्रॉफ म्हणतो, "Even Negroes of the Gold Coast are always conscious that their offerings and worship are not paid to the inanimate object itself but to the indwelling God, and every native with whom I hove conversed on the subject has laughed at the possibility of its being supposed that he would worship or offer sacrifice to some object as a stone." (Shakti and Shakta P. 279 )

(ऑफ्रिकेंतील निग्रो सुद्धां या बाबतींत पूर्णपणें जागरूक आहेत कीं त्यांचें समर्पण केवळ बाह्य पदार्थांना मुळींच नसून त्यांच्यामधून डोकावणाऱ्या परमेश्वरी शक्तीला असतें. मी या बाबतींत ज्यांच्या ज्यांच्याशीं बोललों ते आफ्रिकन निग्रो मी त्यांना केवळ

झाडें, दगड इत्यादि सृष्ट पदार्थांची पूजा करणारे समजत असल्याचें पाहून उपहासानें हंसले.) आर्यांचें आधिदैविक प्रथम समजावून घेतलें पाहिजे. म्हणजेच त्यांचा देवतावाद उलगडतो, एरवीं नाहीं. या विषयाचा याच व्याख्यानमालेंत मी पुढें विस्तार करणार असल्यामुळें येथें इतकें पुरें आहे.

इहलौकिक आकांक्षांच्या वेदांतील तेजस्वी आविष्कारावरून करण्यांत येणाऱ्या अर्वाचीन संशोधकांच्या अनुमानांचें स्वरूप आपण पाहिलें. वेदांतील आंतरजीवनविषयक धारणा व त्या दृष्टीनें आर्यांनीं प्रकट केलेले आपले भाव याकडे त्यांचें संपूर्ण दुर्लक्ष झालेलें आहे असें त्यावरून म्हणावेसें वाटतें. वैदिकांची सांस्कृतिक पातळी वेदांवरून समजावून घेतली तर या अनुमानांच्या हिमराशि आपोआपच वितळून वैदिक जीवनाचें वेगळेंच दर्शन घडतें. व मग "ऋग्वेदांत नीतितत्त्वांखेरीज सर्व कांहीं आहे" हें डॉ. केतकरांचें विधान चुकीचें व अन्याय करणारें आहे असें वाटूं लागतें. वैदिकांच्या तेजस्वी जीवनवादांबरोबरच त्यांच्या विकसित अंतःप्रेरणांचेंहि स्वरूप पाहिलें पाहिजे. त्याकडे पुढच्या व्याख्यानांत वळूं.

## व्याख्यान आठवें

# वैदिक जीवनवादाची धारणा

वेदांत आढळणाऱ्या वैदिक लोकांच्या अंतरंगजीवनाचें दर्शन म्हणजेच वेदांतील राष्ट्रदर्शन होय. हें राष्ट्रदर्शन सम्यक् रीतीनें व्हावें यासाठीं सर्व प्रकारचे पूर्वग्रह बाजूस सारून शुद्ध अंतःकरणानें जें वाङमयावरून उघड उघड दिसेल तें ग्रहण करण्याची सिद्धता ठेविली पाहिजे. त्यासाठीं कांहीं पथ्यें पाळणें आवश्यक आहे. अभिमानी ब्राह्मण जातीनें जगांत कोणापासून कांहींही उसनें घेतलें नाहीं असें ब्रॉक हाऊसनें म्हटलें आहे तें अक्षरशः सत्य आहे. आर्य व अनार्य स्थलनिर्णय, वेदकाल इत्यादि प्रश्नांची चर्चा करतांना कांहीं पूर्वग्रहांची व त्यांच्या निर्मूलतेची यापूर्वीं चर्चा केलेली आहे. भाषासाम्य, स्थलनामसादृश्य, मानववंशशास्त्र इत्यादि गोष्टींवरून सांस्कृतिक उसनवारी, आक्रमण इत्यादि सिद्ध होण्यासारखीं नाहींत हें तर आतां पाश्चात्य पंडितहि म्हणू लागले आहेत. भाषासाम्याच्या बाबतींत डॉ. कीथनें दिलेला अभिप्राय या दृष्टीनें पाहण्यासारखा आहे. तो म्हणतो: "All the indo-European languages have certain special points in which they agree with one or another of the groups and to deduce racial mixture and migration from these facts is quite impossible" सर्वच इंडो-युरोपियन भाषांमध्यें असे कांहीं खास विशेष आढळून येतात कीं त्यांच्या बाबतींत साम्य दाखवितां येईल. पण या साम्यावरून मिश्रवंश किंवा आक्रमण सिद्ध करतां येणें अशक्य आहे. अशा साम्यावरून सांस्कृतिक उसनवारीची कल्पना करणेंहि तितकेंच धोक्याचें आहे. या सांस्कृतिक साम्यांचा विचार करतांना जित

अंतःकरणांत नेहमींच उद्भवणाऱ्या न्यूनगंडानें आमच्या संशोधकांच्या अंतःकरणांत इतकें विलक्षण ठाण मांडलें आहे कीं, असें कांहीं साम्य वा साधर्म्य कोठेंहि आढळलें कीं भारतीयांनीं त्या त्या समाजांजवळून ती उसनवारी केलेली आहे असेंच ते आग्रहानें प्रतिपादन करूं लागतात. पण हें अनुमान करतांना दोन गोष्टींचा विचार करणें आवश्यक आहे. त्यांपैकीं पहिली महत्त्वाची गोष्ट ही कीं, वेदकाळीं दुसऱ्या एकाद्या अवैदिक पण वैदिक संस्कृतीपेक्षां श्रेष्ठ असणाऱ्या संस्कृतीचें अस्तित्व होतें हें स्वतंत्र व अवांतर पुराव्यावरून सिद्ध होऊं शकतें काय? तसें तें सिद्ध होऊं शकत नाहीं हें आपण आर्य व अनार्य या प्रकरणांत सविस्तरपणें पाहिलें आहे. व दुसरी गोष्ट म्हणजे अशीं आढळणारीं साम्यें व साधर्म्य आज त्या त्या राष्ट्रांत आढळणाऱ्या संस्कृतीशीं व समाजजीवनाच्या संकेताशीं मुळींच जुळणारीं नसून केवळ भारतीय संस्कृतीशींच जुळणारीं कां आहेत या गोष्टींचा सूक्ष्म विचार केला तर हें सरळच सिद्ध होतें कीं हीं पदचिन्हें भारतीय संस्कृतीच्या प्रकृतींतील असून तीं त्या त्या भिन्न संस्कृतीच्या व समाजजीवनाच्या प्रकृतींतील नाहींत. कारण तीं तशीं असतीं तर त्यांच्या परंपरा आजहि त्या त्या भिन्नसंस्कृतींत व समाजजीवनांत आढळल्या असत्या. अर्थातच मूळ प्रकृतींत ज्यांच्या त्या नाहींत त्यांनींच त्या ज्यांच्या प्रकृतींत त्या आहेत त्यांच्याजवळून उसन्या घेतलेल्या आहेत हें स्पष्टच होतें. साधर्म्य व साम्यावरून उसनवारी सिद्ध होईल तर ती भारतीयांची इतरांनीं केलेली आहे येवढेंच सिद्ध करील. निर्विकारपणें व न्यूनगंड टाकून या बाबतींत मनुष्य विचार करूं लागला तर त्याला गुरुवर्य श्री. अप्रबुद्धांच्या या बाबतींतल्या पुढील उद्गारांशीं सहमत व्हावेंच लागेल. ते उद्गार असेः– "हें भाषासादृश्य आणि तुरळक आढळणारें अनेक प्रकारचें साधर्म्य भारतीयांच्या भारताबाहेरील साम्राज्यानें आणि व्यापारी दळणवळणानें आलें असें म्हणणें अयुक्त होणार नाहीं. भारतीयांनीं

भारताबाहेर साम्राज्यें चालविलीं असें मानण्यास भारतीय वाङ्मयांत पुरावा आहे. आणि न मानण्यास शास्त्राच्या नांवाखालीं युरोपियनांनीं उत्पन्न केलेली कोती समजूत व ऋग्वेदांत आधार नसलेली आक्रमणाची मिथ्या कल्पना यांखेरीज आधार नाहीं." उसनवारीचा विचार ज्या साम्य व सादृश्य दर्शकस्थळांवरून होतो त्यांच्या संबंधीं हें ध्यानांत ठेवून, वैदिक लोकांचें अंतरंग समजावून घेण्यासाठीं पुढील गोष्टी ध्यानांत वाळगणें अवश्य आहे. त्या अशाः—

(१) वेदवाङ्मय हें एकेका विषयाला वाहिलेलें असें सलग व स्वयंपूर्ण वाङ्मय नसून ते संग्रहग्रंथ आहेत हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. एरवीं ही गोष्ट मान्य करणारे संशोधकहि प्रत्यक्ष उल्लेखांची गोष्ट आली कीं नगण्य बावतींतसुद्धां ऋग्वेद म्हणजे ऋग्वेद असा वालिश हट्ट धरून विकृत सिद्धांत काढीत असतात. ऋग्वेदाच्या बावतींत तर एका सूक्ताचा दुसऱ्या सूक्ताशींच काय, पण पुष्कळदां एकाच सूक्तांतील एका ऋचेचा दुसऱ्या ऋचेशींहि संबंध नसतो. आज आमच्या पुढें ज्या संहिता आहेत त्यांच्या आजच्या रचनेला कांहीं सहस्र वर्षांचा काळ लोटलेला आहे. व त्या वेळीं त्या संहितांची निर्मिति झालेली नसून ती जुनीं चालत आलेलीं सूक्तें केवळ एकत्रित करण्यांत आलीं होतीं. अलीकडे ऋग्वेद संहितेचा बराच सूक्ष्म अभ्यास झालेला आहे व ऋग्वेदाच्या आजच्या संहितेची चार पांच सहस्र वर्षांपूर्वीं जी निर्मिती झाली ती जुनीं सूक्तें एकत्र गोळा करूनच झालीं हें मत आतां सर्वमान्य झालें आहे. त्यामुळें जुन्या विखुरलेल्या सूक्तांचें एकत्रीकरण झालें हें आजच्या संहितांचें स्वरूप आहे. या एकत्रीकरणांत निरनिराळ्या ऋषींच्या कुलांच्या कुटुंबीयांच्या आवश्यकतेनुरूप एकेका मंडळांत सूक्तांचा संग्रह करण्यांत आलेला आहे. सामान्यपणें एका किंवा कांहीं नियत देवगणांच्या ऋचा एका सूक्तांत याव्या येवढेंच धोरण या रचनेंत आहे. त्यामुळें वेदवाङ्मयाचें

परीक्षण आजच्या कांटेकोर गणितागत पद्धतीनें लिहिण्यांत येणाऱ्या ग्रंथांचें परीक्षण करण्याचे निकष लावून करणें व त्या दृष्टीनें उल्लेखांच्या अभावाला कडक अनुपलब्धीचें स्वरूप देणें अत्यंत चुकीचें आहे. तसेंच गेलीं शतकानुशतकें भारतीय ग्रंथ-संपत्तीचा जो नाश होत आलेला आहे तोहि उल्लेखांचा कांटेकोर विचार करतांना ध्यानांत बाळगणें अवश्य आहे. त्यामुळें श्रेष्ठ आध्यात्मिक धारणेचे तुरळक उल्लेख ऋग्वेदांत असले तर ही धारणा समाजांत उत्पन्न व्हावयास आवश्यक अशी सुगठित व संपन्न समाजरचना त्या काळीं होती असें अनुमान काढणेंच सुसंगत व तर्काला धरून योग्य ठरतें. ते लोक रानटी होते, व उल्लेख तर असे आढळतात म्हणून शब्दांचे अर्थच बदलवा असें म्हणणें केवळ अप्रयोजकपणाचें होय.

( २ ) श्रेष्ठ जीवनाची धारणा व्यक्त करणारीं पदचिन्हें तुरळक आढळलीं तरी त्यावरून वैदिक लोकांची सांस्कृतिक श्रेष्ठता ओळखली पाहिजे. उल्लेख कितीं वेळां येतो हें अशा संग्रहग्रंथांत मुळींच महत्त्वाचें नसून जो उल्लेख येतो तो कोणत्या श्रेणीचा आहे हें पाहणें हेंच खरें महत्त्वाचें आहे. हिमप्रलयाच्या संपूर्ण मानवी संस्कृती गारद करून टाकणाऱ्या काळांतून कसें बसें वांच-लेलें व नंतरच्या थोड्याशा स्वस्थतेंत जें राहिलें तें एकत्रित करून संभाळलेलें हें वाङ्मय आहे हें ध्यानांत घेतलें, म्हणजे मी असें कां म्हणतों याची खरी कल्पना येईल. नाहींतरी आजही मानवी संस्कृतीच्या श्रेणीची उंची ठरवितांना ज्या वाङ्-मयावरून व संशोधनावरून ती ठरविण्यांत येते तें अतिशय थोडेंच असतें. आजच्या मानवी संस्कृतीची उंची ठरवितांना आपण “आई-न्स्टीनच्या सापेक्षतावादापर्यंत” असें म्हणूं. इंग्लंडचें वाङ्मयीन श्रेष्ठत्व वर्णन करतांना ‘शेक्सपीयर’चें नांव उच्चारण्यांत येतें. पण समाजांत न्यूटन, आइन्स्टीन, शेक्सपीयर, अरविन्द, चंद्रशेखर रमण किती असतात? हाच न्याय ऋग्वेदकालीन सांस्कृतिक श्रेणीचें मोज-माप करतांना वापरला पाहिजे. राजकीय हेतूस्तव प्रेरित झालेल्या

पाश्चात्यांनीं निकषाच्या या साध्या नियमाकडे दुर्लक्ष केलें असलें तरी स्वातंत्र्याच्या स्फूर्तिशाली उदयानंतर तरी आतां आपल्यावरील व आपल्या साहित्यावरील अन्यायाच्या संबंधांत आपण पूर्ण जागरूक असलेंच पाहिजे. उल्लेख, भाषासाम्य व उल्लेखांच्या संख्येवर जोर देऊन आर्यांच्या सुधारणेसंबंधीं काढण्यांत येणारीं अनुमानें यासंबंधीं इषारा देतांना लोकमान्य टिळक आपल्या 'आर्क्टिक होम इन दि वेदाज'मध्यें म्हणतात. :—

"Though we may accept the results of comparative Philology so far as they go, we shall have to be more cautious hereafter in inferring that such a thing was not known to the primitive Aryans because common etymological equations for the same cannot be discovered in all the Aryan languages. We have, it is true, no means of ascertaining how much of the original civilisation was lost in the deluge but we cannot on that account, deny that some portion of it must have been irrevocably lost in the great cataclysm that destroyed the original home. I only want to point out the reservation with which we shall have now to accept the results of comparative philology in forming our estimate of the degree of culture reached by the primitive Aryans and show that when the primitive Aryan culture is carried back to the inter-Glacial age, the hypothesis that primitive Aryans were hardly better than the savage races of the present day at once falls to the ground.

"—(The Arctic Home in the Vedas. P. 441 and 443)

(अमुक एक सुधारणा दर्शविणारे शब्द सर्व आर्य भाषांत सांपडत नाहींत येवढ्यावरूनच केवळ ती सुधारणा मूळ आर्यांमध्यें नव्हती हा कोटिक्रम करणें अगदीं अयुक्त होईल. तुलनात्मक व्युत्पत्ति शास्त्राच्या अनुमानांचा उपयोग फक्त विध्यर्थी असून तो निषेधार्थी करणें बरोबर नाहीं. प्रलयामध्यें किती सुधारणा नाहींशी झाली

तें सांगणें केवळ अशक्य आहे व तेवढ्यासाठीं ती सत्यघटना नाकारणेंहि अशक्यच आहे. आर्यसुधारणेसंबंधीं अनुमान करतांना तुलनात्मक व्युत्पत्तिशास्त्राचा वापर जपून व सावधगिरीनेंच करावा असें माझें सांगणें आहे. कारण हिमप्रलयाच्या उपपत्तीनें आर्यांच्या रानटीपणाविषयींचीं अनुमानें भुईसपाट झालेलीं आहेत.)

या दृष्टीनें गुरुवर्य श्री. अप्रबुद्ध यांचा पुढील इषारा प्रत्येक वेद वाङ्मयाच्या अभ्यासकानें ध्यानांत घेणें अवश्य आहे तो असाः– "ऋग्वेदासारख्या संग्रहग्रंथांत एखाद्या गोष्टीचे किती उल्लेख आले आहेत याचें महत्त्व नाहीं. एकदां कां होईना तिचा स्पष्ट उल्लेख असेल तर इतिहासाच्या दृष्टीनें त्याचेंच महत्त्व आहे. कोणत्याहि काळच्या लोकांच्या संस्कृतीची परिणति ठरवितांना अनेक प्रकारचे उल्लेख आले असले तरी त्यांत जास्त उन्नतिदर्शक जो असेल त्यावरूनच त्या संस्कृतीची वाढ कोठपर्यंत झाली होती हें ठरविलें पाहिजे. आजसुद्धां आपण आईन्स्टीन व रमण यांच्यावरून मानवी संस्कृतीचें विकसन ठरवितों हें वर दाखविलेंच आहे."

(३) कोणत्याहि गोष्टीची उसनवारी व मूळ ठरवितांना संस्कृतीच्या प्रकृतीवरूनच तें ठरविलें पाहिजे. केवळ बाह्य सादृश्यावरून तें ठरविणें चुकीचें आहे. जे वैदिक संस्कृतीच्या मूलतत्त्वांना व तिच्या प्रकृतीला धरून आहे तें त्या संस्कृतीचेंच अंग समजलें पाहिजे. व जें तसें नसेल तेंच बाह्य समजलें पाहिजे. मग प्रत्यक्ष उल्लेख असो वा नसो. वैदिक संस्कृतीची प्रकृति म्हणजे पुढील तत्त्वें होत: (१) अतीन्द्रिय अनुभूतीवर आधारलेलें शास्त्रप्रामाण्य (२) विश्वाच्या नियामक शक्तीचें अस्तित्व, तिची ज्ञानमयता, व तिचें सर्व शक्तिमत्त्व (३) आत्म्याचें अमरत्व (४) जीवाचें कर्मानुसार संसरण (५) पुनर्जन्म (६) कर्मतत्त्व (७) संस्कार व कर्म यांवर अवलंबून असणारें जीवाचें विकसन व पतन (८) प्रत्येक पदार्थाची कर्म व संस्कार यांनीं होणारी उत्क्रांति व अपक्रांति (९) अतीन्द्रिय विश्व व दृश्य सृष्टि अथवा आधिदैविक व आधिभौतिक यांचा परस्पराश्रय (१०) पशुता नष्ट

करून देवजीवन निर्माण करण्याचा ध्येयवाद व त्याच्या सिद्धीचा साक्षात्कार अथवा अनुभूतिवाद. (११) बाह्य जीवनाऐवजीं आंतरजीवनविकसन हेंच जीवनमूल्य व त्याला मिळती बाह्य जीवनाची उभारणी (१२) तप हेंच सृष्टीच्या उत्पत्तीचें व स्थितीचें साधन आणि तोच सर्वश्रेष्ठ धर्म होय. (१३) स्वस्वरूपाचें अज्ञान हेंच संसरणाचें कारण असून सर्व कांहीं परमार्थतः एकच आहे या सिद्धधारणेलाच ज्ञान असें म्हणतात. (१४) देव हे अतीन्द्रिय अशा आधिदैविक व स्थूल विश्वाचें नियमन करणाऱ्या शक्ती असून ते ज्योतिर्मय, ज्ञानरूप व अमर आहेत. (१५) त्यांचा व मानवांचा परस्पराश्रय असून 'परस्परं भावयन्तः' या सूत्राप्रमाणें मानवांच्या तपस्येमुळें देवांचें बळ वाढतें व देवांच्या अनुग्रहामुळें मानवी जीवाचें कल्याण होतें. (१६) मनुष्याला देव होण्याची शक्यता आहे. (१७) देवांच्या वर्तनास निग्रहानुग्रहापलीकडे कोणताहि हेतु नाहीं. (१८) यज्ञप्रक्रिया (१९) ध्यानयोग (२०) वाणीचें दैवी व लौकिक असे दोन प्रकार असून ती परा, पश्यन्ती, मध्यमा व वैखरी अशा चार रूपांनीं प्रकट होते. दैवीवाणी सामर्थ्यशील असून या स्वयंभू सामर्थ्यसंपन्न वाणीच्या द्वारेंच सृष्टीची उत्पत्ति झालेली आहे. (२१) सर्व सृष्टीची भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः व सत्यम् याप्रमाणें सात या संख्येंत विभागणी करण्याची अर्वाचीन पदार्थविज्ञानशास्त्राप्रमाणेंहि सशास्त्र असणारी पद्धति. हेंच सप्त लोकात्मक विश्व होय. या तत्त्वांना अथवा वैदिक संस्कृतीच्या या प्रकृतीला धरून असलेली कोणतीहि गोष्ट कोणत्याहि काळीं आढळली तरी ती वैदिक संस्कृतीचीच समजली पाहिजे. ऋग्वेदांतूनच ही वैदिक संस्कृतीची प्रकृति कशी सिद्ध होते हें आपण पाहणारच आहोंत व आजपर्यंत या प्रकृतींत कांहींहि मूलभूत स्वरूपाचें परिवर्तन झाल्याचें कोणासहि दाखवून देतां येणार नाहीं.

(४) प्रक्षेप ठरवितांनाहि हाच नियम लक्षांत ठेविला पाहिजे. मूलभूत प्रकृतीशीं जें पूर्ण विसंगत असेल तें प्रक्षिप्त होय. पाश्चात्य व त्यांचे अंधानुयायी यांनीं या प्रक्षेपाच्या ब्रह्मास्त्राचा इतका

विकृत उपयोग केलेला आहे कीं प्रांजल बुद्धीच्या कोणत्याहि निरीक्षकाला त्यामुळें कंप उत्पन्न झाल्याविना राहात नाहीं. वेदांतील गूढें उकलतांना व सिद्धांत ठरवितांना परंपरांची अवाधितता ध्यानांत घेऊन इतिहास, पुराणें व वेदांगें यांच्या साह्यानें वेद उलगडला पाहिजे. तसेंच वेदांतील शब्दांचा अर्थ करतांना निरुक्त व सायण भाष्य विचारांत घेणें आवश्यक आहे. प्राचीन वेदार्थयत्नकारांमध्यें आध्यात्मिक, ऐतिहासिक, केवळ यज्ञपरतेचेंच सूत्र वापरणारे मीमांसक व यास्कासारखें नैरुक्तिक होते. या प्रत्येकास आपापल्या संप्रदायाप्रमाणें वेदार्थाच्या यत्नाचा जितका अधिकार होता तितकाच तो आजच्याहि वेदार्थाचा यत्न करणाऱ्या व्यक्तीला आहे. पण अशा व्यक्तीनें अलीकडचे पाश्चात्य पंडित व हे प्राचीन भाष्यकार यांच्यातील एक मूलभूत फरक ध्यानांत ठेवला पाहिजे. प्राचीन भारतीय भाष्यकारांना परंपरांचें ज्ञान होतें, सांस्कृतिक बंधन होतें, परंपरेविषयीं आत्मीयता असून संस्कृतीचें सूक्ष्म ज्ञान होतें व तिचें संरक्षण हेंच त्यांचें ध्येय होतें. युरोपियन पंडितांजवळ यांपैकीं कांहींहि नसून स्वतःच्या विषयींचा बेसुमार अहंगंड व राजकीय दुष्ट हेतु यांची मात्र त्यांच्यापैकीं बहुसंख्य लोकांवर घनदाट छाया आहे. त्यामुळें प्राचीन भाष्यकारांच्या दृष्टीनें परंपरांचें व संस्कृतीच्या प्रकृतीचें ज्ञान करून घेऊन नवा वेगळा अर्थ त्या प्रकृतीशीं जुळता कोणालाहि करतां येईल व तोच सत्याशीं अधिकांत अधिक जुळता असण्याची शक्यता आहे. वेदांचें रहस्य समजावून घेतांना प्राचीन वेदार्थयत्नकारांनीं एक विशेष सूचना केलेली आहे. ती सूचना म्हणजे इतिहास व पुराणवाङ्मयाच्या साहाय्यानें वेद उलगडावा ही होय.

"इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत्।
बिभेत्यल्पश्रुताद्वेदो मामयं प्रहरेदिति॥"

(इतिहास व पुराणें यांच्या साहाय्यानें वेदाच्या अर्थाची उकल करावी. आपल्यावर प्रहार होईल अशा कल्पनेनें वेद मूर्खांना नेहमींच भीत असतो.) पुराणें म्हणजे भाकडकथा या मूर्खपणाच्या

समजुतीमुळें व 'पुराऽपि नवम्' या कोटीसारख्या हास्यास्पद व कल्पित उपपत्तीमुळें पुराणांच्या स्वरूपाची यथार्थ कल्पना येत नाहीं. पुर आणि अन् या दोन शब्दांच्या एकत्रीकरणांतून पुराण शब्द बनलेला आहे, अन् धातूचा प्राणन (अन् प्राणने) असा अर्थ असून पुर म्हणजे सप्तलोकात्मक विश्व होय. सप्तलोकात्मक विश्वाचा जीवनव्यापार सांगणारें जें वाङमय त्याला पुराण असें म्हणतात; व याच दृष्टीनें डॉ. विंटरनिट्झ यानें पुराणांचें वर्णन Cosmic mythology या शब्दांनीं केलेलें आहे. विश्वाच्या सर्ग, स्थिति व विलयासंबंधीचें शास्त्र हें पुराणांचें स्वरूप ध्यानांत न घेतां त्यांतील वंशावळयांच्या भोंवतींच जे घुटमळले त्यांची पुराणाकडे पाहण्याची दृष्टि चुकीची ठरली व त्यावरून वेद उलगडण्याचा त्यांचा प्रयत्नहि घोटाळ्याचा ठरला हें डॉ. केतकर यांच्या दाशराज्ञ युद्धासंबंधींच्या विवेचनावरून ध्यानांत येतें. पुराणांचें हें स्वरूप ध्यानांत घेऊन त्यांच्यावरून आर्यांचें अधिदैव व त्यांचा विश्वाचा उलगडा ध्यानांत घेतला तरच वेदांतील दैवतवादाचा उलगडा होतो व निसर्गपूजा वगैरे कल्पनाजालांतून सुटका होऊन वैदिक देवतांची कल्पना येते. मग ऋग्वेद ते उपनिषदें हा देवकल्पनेच्या विकासाचा क्रम मानणें कसें चुकीचें आहे हेंहि ध्यानांत येतें. वैदिक संस्कृतीच्या इतिहासाचें हिमप्रलयाच्या विपत्तीनें दोन विभागच केलेले आहेत. आजचें वेदांचें संहितीकरण हिमप्रलयानंतर त्रुटित असलेलें वेदवाङमय एकत्रित करून श्रीव्यासांनीं केलेलें आहे. पण हें वेदांचें दुसरें संहितीकरण आहे. याच्या पूर्वी हिमप्रलयपूर्वकालीं यज्ञप्रधान वैदिक संस्कृति, वैदिकांचा सुघटित समाज व त्याला आवश्यक तें वेदांचें संहितीकरण अस्तित्वांत होतें हें ऋग्वेदावरूनहि उघड दिसतें. या प्रलयपूर्वकालीन स्थितीचा उल्लेख 'देवानां पूर्वे युगे' 'तानि धर्माणि प्रथमान्यासन्' इत्यादि शब्दांनीं वेदवाङमयांतून होतो. खऱ्या व विपुलतेनें उपलब्ध होणाऱ्या सोमाची आहुति याच प्रलयपूर्वकालीन काळांत वैदिक लोक आपल्या आवडत्या देवांना देत असत.

विश्पला व मुद्गलानी यांचे पराक्रम व घोषा आणि अपाला यांचे उत्कट भक्तीचे ऋग्वेदांतील उल्लेख हे या काळांतीलच घटना होत. याचकाळीं आजहि ज्याचें अवशेष मेक्सिकोपर्यंत आढळतात त्या वैदिकांच्या सांस्कृतिक साम्राज्याचा जगभर प्रसार होता. या काळीं असलेल्या वेदांच्या संहितीकरणाचे उल्लेख 'पुरूरवस एवाऽसीत् त्रयी त्रेतामुखे नृप।' 'वेदा आसंश्चतुर्मुखात्' असे पुराणवाङमयांतून आढळतात. हिमप्रलयानें जगाची जी उलथापालथ घडविली त्यांत ही समाजव्यवस्था कोसळली, आर्यांचा सोम लुप्त झाला व त्रुटित स्वरूपांत अत्यंत निष्ठेनें व कष्टप्रद प्रयत्नांनीं वेदवाङमयाचें कसेंबसें संरक्षण आमच्या प्रलयोत्तरकालीन पूर्वजांनीं केलें म्हणूनच आजच्या संहितीकरणांत परस्परांशीं संबध नसणारीं सूक्तें व एकाच सूक्तांतील परस्परांशीं संबंध नसणाऱ्या ऋचा आढळतात. यज्ञप्रक्रियेचें सूत्र पक्कें धरून या काळांत वेदवाङमयाचें एकत्रीकरण करून त्यांची संहितीकरणात्मक व्यवस्था लावण्याचें कार्य श्रीव्यासांनीं आपल्या अतिमानवी प्रतिभेनें तडीस नेलें. पण प्रलयपूर्वकालीन इतिहास, विश्वाच्या सर्व स्थित्यंतरांचें शास्त्र व समाजघटना यांचे उल्लेख समाजाच्या तोंडीं होतेच. त्यांचा एका पद्धतीनें संग्रह करण्यासाठीं अठरा विभागांतून त्यांनीं पुराणवाङमयाची रचना केली. पुराणांच्या रचनेचें हें स्वरूप ध्यानांत घेतलें तर आर्यांच्या प्राचीन धारणांचे व इतिहासाचें केवढें मोठें भांडार त्यांच्यांतून संगृहीत केलेलें आहे व त्यांचा वेदवाङमयाशीं केवढा व कशा प्रकारचा जिव्हाळयाचा संबंध आहे याची कल्पना येईल. याच कारणासाठीं वेदांचें स्वरूप समजावून घ्यावयास्तव पुराण व इतिहास वाङमयाचें साहाय्य घेण्याची आवश्यकता आहे.

(५) वेदवाङमयाचें निरीक्षण करतांना वैदिक समाज केवळ एकथरी होता ही कल्पना गृहीत धरून निरनिराळ्या उल्लेखां-वरून वैदिकांच्या इतिहासाचे कालखंड ठरविण्याचा पाश्चात्य

संशोधकांनीं प्रयत्न केलेला आहे. उच्च श्रेणीचा आध्यात्मिक धारणेचा उल्लेख असला तर तो उत्तरकालीन स्थितीचा बोधक असला पाहिजे, व केवळ इहलौकिक आकांक्षा अथवा अनेक देवतावादाचे उल्लेख असले तर ते पूर्वकालीन असले पाहिजेत, या पद्धतीच्या अनुमानांत समाज एकथरी असतो हें गृहीत कृत्यच असतें. पण आजच्या प्रमाणेंच त्या काळींहि समाज अनेक-थरी होता ही साधी गोष्ट ध्यानांत घेतली तर या अनुमानिक इतिहासाचा डोलारा कोसळून पडल्याविना राहात नाहीं. आज ज्याप्रमाणें एकाच युरोपियन समाजांत आईन्स्टीनसारखा थोर शास्त्रज्ञ व तत्त्वचिंतक, डॉ. मालनसारखा संकुचित वृत्तीचा स्वार्थी नृशंस व अगदीं सामान्य प्रतीचा व्यवहारवादी मनुष्य हे एकाच काळांत समाजांतील वेगवेगळ्या थरांचे प्रतिनिधी म्हणून असूं शकतात; अथवा भारतांतहि अरविन्द, रमणांसारखे थोर तत्त्वज्ञ, चंद्रशेखर रमणांसारखे प्रथमश्रेणीचे शास्त्रज्ञ व हवें तें करून केवळ पोटवाद पुढें करणारे सामान्य लोक हे एका काळींच समाजांतील वेगवेगळ्या थरांचे प्रतिनिधी म्हणून असूं शकतात; त्याप्रमाणेंच ते वेदकाळीं असणें शक्य आहे ही कल्पनाहि मनांत येऊं नये हें आश्चर्यकारकच नव्हे काय? एकाच काळांतील भिन्नभिन्न सामाजिक थरांनीं ज्या उपपत्ति लागूं शकतात त्यासाठीं कालभेद मानण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. तात्पर्य समाज अनेकथरी असतो हें ध्यानांत घेतलें पाहिजे.

(६) भाषाशास्त्र, मानववंशशास्त्र, भूस्तरशास्त्र इत्यादि अपूर्ण शास्त्रांतील जुजबी कल्पनांना (Tentative suggestions) सिद्धांतांचें स्वरूप न देतां त्यांच्या त्या कल्पनांचा डोळसपणेंच वापर केला पाहिजे.

(७) प्राचीनतेमुळें वेदवाङमयांतील कित्येक गोष्टी आतां अगदीं दुर्बोध होऊन बसलेल्या आहेत. अशा स्थितींत शब्दांचे हवे ते अर्थ करून त्यांचा उलगडा करण्याच्या व तो चुकीचा उलगडा लोकांच्या माथीं मारण्याच्या भानगडींत न पडतां न समजणाऱ्या

गोष्टी तशाच ठेवणें हितावह आहे. या दृष्टीची प्रामाणिकता कै. रामचंद्र विनायक पटवर्धन यांच्या विख्यात 'श्रुतिबोध' या ऋग्वेदाच्या भाषांतरांत दृष्टीस पडते. "पारावतघ्नी" "नना" यासारख्या ऋग्वेदांतील दुर्बोध शब्दांचे संकेत उलगडण्याचा व्यर्थ प्रयत्न न करतां त्यांनीं ते शब्द जाड ठशांत तसेच मुद्रित करून अभ्यासकांसाठीं मार्ग मोकळा ठेविला आहे. न समजणाऱ्या गोष्टी तशाच ठेवणें चांगलें.

(८) इतर गोष्टी काय म्हणतात यांना गौणस्थान देऊन व पूर्वग्रहरहित अंतःकरण करून वेदवाङमयावरूनच वेद उलगडण्याचा प्रयत्न करावा. श्रेष्ठ जीवनदर्शक पदचिन्हें वेदांत आढळलीं तर त्या लोकांचें जीवन तसें होतें असें प्रामाणिकपणानें मान्य केलें पाहिजे. एरवीं कॉमरेड डांगे यांच्या तर्कटाप्रमाणें ते लोक रानटी होते अशी भ्रांत कल्पना आधीं मनाशीं पक्की धरावयाची व मग ब्रह्म शब्दाचा अर्थ उलगडत बसावयाचा हें करंटेंपण उगाच पदरीं येतें.

हीं पथ्यें पाळून वेदवाङमयाचें आलोडन केलें तर वेदांत एका सिद्ध व श्रेष्ठ धारणेच्या समाजाचें स्वरूप दृष्टोत्पत्तीस येतें. व त्या धारणांच्या पायांवरच सहस्रावधि वर्षें भारतीय संस्कृतीचें मर्मरमंदिर उभें असल्याची निश्चिति पटते.

## वैदिक आर्यांची नीतिमत्ता

वेदांतील जीवनवादाच्या तेजस्वी आविष्कारावरून डांगे यांनीं किती विकृत कल्पना करून घेतली आहे याचें स्पष्टीकरण मागच्या व्याख्यानांत केलेंच आहे. डॉ. केतकर यांनींहि ऋग्वेदांत नीतीखेरीज सर्व कांहीं आहे असें उल्लेखून ऋग्वेदकालीन लोकांची दृष्टि बाह्यजीवनापलीकडे गेली नव्हती असें पर्यायानें सुचविलें आहे. अलीकडचे इतिहासहि याच पद्धतीनें लिहिले जात असून कित्येक गरम रक्ताचे हिंदुत्वनिष्ठ प्रचारक तर उथळपणानें हाच जीवनवाद आम्हांस हवा असें म्हणत पुढच्या अंतरंग जीवन-

विकासाच्या धारणेला दूषणें लावीत असतात. पण वरील नियम ध्यानांत ठेवून वेदवाङ्मयाकडे पाहिलें तर वेगळाच प्रकार ध्यानांत येतो. धन, संपत्ति, प्रजा, पशु इत्यादींविषयींच्या पुरुषार्थ-साधनाच्या आकांक्षा आपण मागच्या व्याख्यानांत पाहिल्या. पण तेवढयाच केवळ न पाहतां त्यांच्याच बरोबरीनें ऋग्वेदांत व इतर वेदवाङ्मयांत आढळणाऱ्या या अंतरंगजीवनाविषयींच्या आकांक्षा पहा:—

" इमे मा पीता यशस: उरुष्यवो रथं न गाव: समनाह पर्वसु ।
ते मा रक्षन्तु विस्रसश्चरित्रादुत मा स्रावाद्यवयन्तु इन्दव: ।।
अग्निं न मा मथितं सं दिदीप: प्रचक्षय कृणुहि वस्यसो न: ।
अथा हि ते मद आ सोम मन्ये रेवानिव प्रचरा पुष्टिमच्छ ।।
(ऋ. ८-४८-५,६)

(हें मीं प्राशन केलेलें यशस्कर आणि पापनिर्मुक्त करणारे सोमरस, रथ आणि वृषभ जसे एकत्र जोडलेले असतात तसे माझ्या गात्रांत-अगदीं भिनून गेलेले आहेत; ते माझें रक्षण करोत, **मला चारित्र्या-पासून भ्रष्ट न होऊं देवोत**, मला रोगापासूनही दूर ठेवोत. घांसून प्रदीप्त झालेल्या अग्नीप्रमाणें **मला उज्ज्वल कर**. आम्हांला उत्तम दृष्टि दे. नेहमीं ऐन उमेदींत ठेव. हे सोमा, तुझ्या हर्षांत असतांना मी वैभवशाली आहेच असें वाटतें.तर तशीच समृद्धि तूं निरंतर चालीव.)

चारित्र्यापासून भ्रष्ट न व्हावें या हृदयाच्या तळमळीचा व उज्ज्वल होण्याच्या आकांक्षेचा उल्लेख प्रथम व दशम मंडलांतील नसून तो अष्टम मंडलांतील आहे हें आधुनिक संशोधकांनीं लक्षांत घेतलें पाहिजे. म्हणजे त्यांना तो मागाहूनचा आहे हें म्हणण्याची सोय उरत नाहीं. नीतिविषयक कल्पनांचा उल्लेख ऋग्वेदांत आढळत नाहीं असें म्हणणाऱ्यांनीं पुढील उल्लेखांचें स्मरण ठेवावें हें चांगलें. तसेंच प्रजा व धनाशिवाय ऋग्वेदांतील लोक कांहींच मागत नाहींत असें बिनदिक्कतपणें विधान करणाऱ्यांनींहि पुढील उल्लेखांचें मनन करावें. ते असे:—

'अस्मे धेहि श्रवो बृहत्' (ऋ. ८-६५-९) आम्हांस मोठी कीर्ति द्या. 'अतारिष्म तमसस्पारं' (ऋ. १-१८३-६) आम्ही अज्ञानांधकारांतून पार व्हावें. 'त्वं नः पाहि अंहसः' ( ऋ. ७-१५-१५ ) आमचें पापापासून रक्षण कर. 'युयुताऽमतिम्' (ऋ.-८-१८-११) आमची बुद्धिहीनता नाहींशी कर. 'मा नो मर्ता अभि द्रुहन्' (ऋ.१-५-१०) मनुष्य आमचा द्रोह न करो. मा व एनो अन्यकृतं भुजेम (६-५१-७) इतरांनीं केलेल्या पापाचें प्रायश्चित्त भोगण्याचा दुर्धर प्रसंग न येवो. 'मा तत्कर्म वसवो यच्चयध्वे (ऋ. ६-५१-७) हे देवानो ! जें कर्म केल्यानें तुम्ही आम्हांस शिक्षा कराल, तसलें पापकर्म आमच्या हातून केव्हांहि न घडो.

'अन्तः पश्यन्ति वृजिनोत साधु' (ऋ. २-२७-३) देव हे अंतःकरणांत राहून मनुष्यांचीं भलीं बुरीं कृत्यें पाहात असतात.

अभ्रातरो न योषणोव्यन्तः पतिरिषो न जनयो दुरेवाः।
पापासः सन्तो अनृता असत्या इदं पदमजनता गभीरम् ॥
(ऋ. १०-१२५-४)

बंधूरहित असलेली अर्थात् आडमार्गी लागलेली स्त्री, तसेंच पतीचा द्वेष करणारी दुराचारी बायको, आणि कपटी व लबाड अशा पापी लोकांनीं अगाध असा हा नरक लोक उत्पन्न केला आहे.

'आदित्यासो युयोतना नो अंहसः (ऋ ८-१८-१०) हे आदित्यदेव हो! तुम्ही आम्हांला सर्व पापांपासून मुक्त करा.

'इदमापः प्रवहत यत्किञ्च दुरितं मयि' (ऋ.१०-९-८) जें कांहीं माझ्या ठिकाणीं पाप असेल तें हें उदक पार वाहून नेवो.

'उतो रयिः पृणतो नोप दस्यति उतापृणन् मर्डितारं न विन्दते' (ऋ.१०-११७-१) जो भुकेलेल्यांना अन्नदान करतो त्याची संपत्ति कधींहि क्षय पावत नाही व जो त्यांना देत नाहीं, त्याला सुखविणारा असा या जगांत कोणीच भेटत नाहीं.

'ऋतस्य पन्थां न तरति दुष्कृतः (ऋ.९-७३-६) सत्याचा मार्ग पापी लोक तरून जात नाहींत.

'ऋतं च सत्यं चाभीद्धात् तपसोध्य जायत (ऋ.१०-१९०-१) हे सर्व सृष्टिधर्म व नीतिधर्म त्या परमेश्वराच्या तपःसामर्थ्यानेंच उत्पन्न झाले आहेत.

'कृतं चिदेनो नमसा विवासे' (ऋ. ६-५१-८) आम्ही जें कांहीं पाप केलें असेल तें सर्व देवाला भक्तिभावपूर्वक केलेल्या नमस्कारानें पार सगळें वितळून जावो.

'न स स्वो दक्षो वरुण ध्रुतिः सा सुरा मन्युर्विभीदको अचित्तिः (ऋ. ७-८६-६) हे वरुण देवा, पापाला प्रवृत्त करणारें तें पुरुषाचें स्वसामर्थ्य नव्हे तर त्याच्या जन्मसमयीं निर्माण झालेली ती दैवगति ही होय. अर्थात् सुरा, क्रोध, फांस व अज्ञान हे सर्व दुर्वासना उत्पन्न करणाऱ्या दैवगतीचे घटकच होत.

'नार्यमाणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलादी' (ऋ. १०-११७-६) जो देवांना व इष्टमित्रांना जेऊं न घालतां एकटाच अन्नावर यथेच्छ ताव मारतो तो कृपण केवळ पापीच होय. (गीतेंतील भगवंतांचें 'भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात्' हे उदगार या ऋग्वेदांतील सिद्धांताचा केवळ अनुवादच नव्हेत काय? यावरून भारतीयांच्या नीतिकल्पना ऋग्वेदकालींच सिद्ध झाल्या होत्या व आजवर त्यांचेंच प्रभुत्व भारतीय मनावर अधिराज्य गाजवीत आहे हेंच सिद्ध होत नाहीं काय? व तरीहि ऋग्वेदांत नीतितत्त्वें नाहींतच हा केतकरांचा केवळ दुराग्रहच नाहीं काय?)

'परिहृतेदना जनो युष्मादत्तस्य वायति (ऋ. ८-४७-६) स्वतः अंगमेनत करून जगणारा मनुष्यच तुम्ही देवांनीं दिलेलें धन उपभोगूं शकतो (हें काय नीतितत्त्व नव्हें?)

पुलुकामो हि मर्त्यः (ऋ. १-१७९-५) हा मनुष्य प्राणी जो आहे तो विविध वासनांनीं युक्त आहे.

'मा गा मनागामदितिं वधिष्ट' (ऋ. ८-१०१-१५) अहो जन हो! निष्पाप व दैन्यरहित अशा गोमातेचा वध करूं नका.

'मोघमन्नं विन्दते अप्रचेताः सत्यं ब्रवीमि वध इत् स तस्य। (ऋ. १०-११७-६) जो अगदीं कृपण आहे अशानें मिळविलेलें अन्न हें अगदीं व्यर्थ होय! मी खरें खरें सांगतों कीं तें अन्नच नव्हे, तर त्याचा प्रत्यक्ष मृत्यूच होय. (हें घ्या ऋग्वेदांतील नीतितत्त्व!)

'माहं राजन्नन्यकृतेन भोजम्' (ऋ. २.२८.९) हे इंद्र देवा! दुसऱ्याच्या अन्नावर जगण्याचा आम्हांवर दुर्धर प्रसंग न येवो.

'विश्वं सत्यं कृणुहि' (ऋ. ३-३०-६) हे परमेश्वरा! हें सर्व जग धर्म परायण होईल असें कर.

'श्रद्धे श्रद्धापयेह नः' (१०-१५१-५) हे श्रद्धा देवी! तूं आमच्या अंतःकरणांत श्रद्धेची दृढ स्थापना कर.

'स इद् भोजो यो गृहवे ददात्यन्नकामाय चरते कृशाय' (ऋ१०-११७-३) जो भुकेनें व्याकूळ व क्षीण झाला आहे असा मनुष्य अन्नासाठीं घरीं आला असतां जो त्याला अन्नदान करतो तोच खरा पुण्यवान् दाता होय.

'सच्चासच्च वचसी पस्पृधाते। तयोर्यत्सत्यं यतरदृजीयस्तदित् सोमोऽवति हन्त्यासत्॥ (ऋ. ७-१०४-१२) सत्य व अनृत यांमध्यें सदैव वाक्स्पर्धा चाललेली असते. त्यांपैकीं जें सत्य व सरळ असतें, त्याचेंच सोमदेव रक्षण करतो. आणि जें अनृत म्हणजे असत्य असतें, त्याचा तो धुव्वा उडवून देतो.

'समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति'॥ (ऋ.१०-१९१-४) अहो मित्र हो! तुमचीं मनें सारख्याच विचारांचीं म्हणजे एकाच निश्चयानें प्रेरित असोत. म्हणजे तुमचे सर्व मनोरथ सहज सिद्धीस जातील.

'समाना हृदयानि वः' (ऋ. १०-१९१-४) तुम्हां सर्वांचीं अंतः-करणें सारखींच असावींत.

'सुगा ऋतस्य पन्थाः' (ऋ. ८-३१-१३) सत्याचे मार्ग आम्हांस सुगम होवोत.

'सुरा मन्युर्विभीदको अचित्ति: (अनृतस्यप्रयोता)' (ऋ.७-८६-६) सुरा, क्रोध, फांसे व अविचार हे सर्व दुर्वासनेला प्रोत्साहन देणारे व म्हणून दुर्गतीला नेणारे असे अधम आहेत.

'स्वप्नश्चने नृतस्य प्रयोता' (ऋ. ७-८६-६) स्वप्न देखील केव्हां केव्हां दुर्वासनेला प्रेरक असतें.

'स्वस्ति पन्थामनुचरेम' (ऋ. ५-५१-१५) आम्ही केव्हांहि कल्याणाचा सरळ मार्गच सुधारूं.

मागच्या व्याख्यानांतील वैदिकांच्या तेजस्वी जीवनवादाचा आविष्कार करणाऱ्या उल्लेखांइतकेच हेहि उल्लेख ऋग्वेदांत विपुल आहेत. येथें उद्धृत केलेल्या या उल्लेखांवरून केवळ प्रजा व धनाच्या पाठीमागें लागलेले हे भोगवादी लोक नसून उच्च नैतिक मूल्यांचें सिद्ध अधिष्ठान लाभलेले, शील, चारित्र्य व निष्पापता यांची कांस धरणारे, उच्च संस्कृतिसंपन्न लोक आहेत हेंच सिद्ध होत नाहीं काय? या उल्लेखांचें जो नीट मनन करील त्याच्या अंत:करणांतील आर्य रानटी व मागासलेले होते, ते केवळ धन व प्रजा यांच्या मागें लागलेले होते, व त्यांच्यांत नीति कल्पनांचा उदय झाला नव्हता इत्यादि भ्रामक कल्पनांचें हिमनग पार वितळून गेल्याविना राहणार नाहींत. स्वप्नांतीलहि पापांपासून संरक्षण करण्याविषयीं परमेश्वराची आर्ततेनें प्रार्थना करण्याइतका पवित्रतेवर व शुद्धतेवर ज्यांचा कटाक्ष आहे त्यांच्या अंतरंग जीवनाच्या विकसनाविषयीं आणखी कोणता स्पष्ट पुरावा हवा आहे ?

वैदिक आर्य स्वत: तर केवळ भोगवादी नव्हतेच, पण केवळ भोगवादाचा व व्यक्तिसुखवादाचा पुरस्कार करणाऱ्या लोकांचा त्यांना आत्यंतिक तिटकारा असे. 'त्यागाय संभृतार्थानाम्' त्यागासाठीं अर्थसंचय करणारे हें जें रघुवंशांतील राजेलोकांचें कालिदासानें वर्णन केलेलें आहे तें ऋग्वेदांतील जीवनाला यथार्थतेनें लागू पडतें. व्यक्तिसुखवादापलीकडच्या सामाजिक दृष्टीचा त्यांनीं पुरस्कार

केलेला असून ज्यांच्या धनसंपत्तीचा सामाजिक आवश्यकतेला उपयोग होत नाहीं त्यांचा त्यांनीं व्याजोक्तिपूर्ण निर्दय उपहास करून आपली स्वार्थी प्रवृत्तीविषयींची कडवट भावना व्यक्त केलेली आहे. उदाहरणार्थ पुढील कांहीं ऋचा पहाः—

"न वा ऊ देवाः क्षुधमिद्वधं ददुरुताशितमुप गच्छन्ति मृत्यवः ।
उतो रयिः पृणतो नोप दस्यत्युतापृणन् मार्डितारं न विन्दते ।। १
य आध्राय चकमानाय पित्वोऽन्नवान्सन् रफितायोप जग्मुषे ।
स्थिरं मनः कृणुते सेवते पुरोतो चित्स मर्डितारं न विन्दते ।।२
स इत् भोजो योगृहवे ददात्यन्नकामाय चरते कृशाय ।
अरमस्मै भवति यामहूता उतापरिषु कृणुते सखायम् ।।३
न स सखा यो न ददाति सख्ये सचाऽभुवे सचमानाय पित्वः ।
अपास्मात्प्रेयान्न तदोको अस्ति पृणन्तमन्यमरणं चिदिच्छेत् ।। ४
पृणीयादिन्नाधमानाय नव्यान् द्राघीयांसमनु पश्येत पन्थाम् ।
ओ हि वर्तन्ते रथ्येव चक्रान्यमन्यमुपतिष्ठन्त रायः ।। ५
मोघमन्नं विन्दते अप्रऽचेताः सत्यं ब्रवीमि वध इत्स तस्य ।
नार्यमाणं पुष्यति न सखायं केवलाघो भवति केवलादी ।। ६
कृषन्नित्फाल आशितं कृणोति यन्नध्वानमप वृङक्ते चरित्रैः ।
वदन्ब्रह्माऽवदतो वनीयान् पृणन्नापिरपृणन्तमभि स्यात् ।। ७
एकपाद्भूयो द्विपदो वि चक्रमे द्विपात् त्रिपादमभ्येति पश्चात् ।
चतुष्पादेति द्विपदामभिस्वरे संपश्यन् पंक्तीरुपतिष्ठमानः ।। ८
समौ चिद्धस्तौ न समं विविष्टः संमातरा चिन्न समं दुहाते ।
यमयोश्चिन्न समा वीर्याणि ज्ञाती चित्सन्तौ न समं पृणीतः ।। ९

ऋग्वेद १०, ११७–१ते९

( १ ) मनुष्याला क्षुधेमुळें ( उपासमारीनें ) मृत्यु यावा हा हेतु दिव्य विबुधांनीं ठरविलेला खास नव्हे. कारण चापून अन्न खाणारे लोक देखील मृत्युमुखीं पडतात हें आपण पाहतों; एवंच खच्चून अन्न खाणाऱ्याला मृत्यु येत नाहीं असें नव्हे; आणि ( हें लक्षांत ठेवावें कीं ) ( क्षुधिताला ) अन्नदानानें संतुष्ट

केल्यानें कोणाचीहि संपत्ति नष्ट होत नाहीं, पण जो क्षुधिताला अन्न देऊन संतुष्ट करीत नाहीं, त्याला ( संकटकालीं किंवा परलोकीं ) उपयोगी पडणारा कोणीहि भेटणार नाहीं. ( या पहिल्या ऋचेवर A Ludwig यानें आपल्या Der Regweda या ग्रंथांत फार चांगलें भाष्य केलें आहे. तो म्हणतो : "क्षुधेनें व्याकूळ होणाऱ्या माणसाला अन्नदान न करणें म्हणजे देवांच्या आज्ञेविरुद्ध वागणें होय असें जें म्हटलें आहे ती व्याजोक्ति होय. जे दांभिक लोक स्वतःच्या निष्ठूरपणाचें समर्थन 'क्षुधेनें व्याकूळ झालेल्या लोकांचें भवितव्य परमेश्वरानें आगाऊच ठरविलेलें आहे' असल्या कोटिक्रमानें करावयास पाहतात त्यांना उद्देशून ही व्याजोक्ति होय. यांत व्याजोक्ति आहे हें पुढील गोष्टीवरून सिद्ध होते. पुढें शेवटीं सूक्तकर्ता कवि म्हणतो कीं 'गरीब लोकांनीं उपासमारीनें मेलेंच पाहिजे असा ईश्वरी संकेत असेल तर श्रीमान् लोकांनीं चिरंजीव राहिलें पाहिजे असाही ईश्वरी संकेत असलाच पाहिजे.)"

( २ ) (ध्यानांत ठेवा कीं ) क्षुधेनें त्रस्त झालेला अन्नार्थी याचक ( दाराशीं येऊन ) अन्न मागत असतां ( त्याला कांहींहि न देतां ) मन कठोर करून त्याच्या समक्ष जो कोणी खुशाल भोजन करीत बसतो त्याचा (अधोगतीपासून) उद्धार करणारा कोणीहि भेटणार नाहीं.

(३) जो याचक अन्नार्थी असून अन्नासाठीं फिरत असतो आणि क्षुधेमुळें क्षीण झालेला असतो अशा याचकाला जो अन्न देतो तोच खरा उदार, सर्व प्रकारचे यज्ञ त्यानेंच पूर्ण केले असें समजा. इतकेंच नव्हे, तर अतिशय प्रतिकूल परिस्थितीमध्यें त्या अन्नदात्यानें आपल्यास एक जिवलग साहाय्यकर्ताच जोडला असें समजा.

(४) आपल्याकडे नेहमीं येणाऱ्या आणि आपल्याजवळ नेहमीं असणाऱ्या मित्रालाहि जो मनुष्य योग्य प्रसंगीं भोजनास बोलावीत नाहीं तो त्या मित्राचा मित्र नव्हे, अशा (निकृष्ट वृत्तीच्या) मनुष्यांपासून दूर रहावें; त्याचें जें घर तें ( गृहस्थधर्म आचरणाऱ्याचें )

घरच नव्हे असें समजून मित्रवर्गाला जो भोजनास बोलावीत असेल आणि क्षुधिताला अन्न देऊन संतुष्ट करीत असेल असा दुसरा कोणी तिऱ्हाईत देखील मित्र करावा.

(५) संपत्तिमान् मनुष्यानें हें करावें कीं (मित्र आणि) जे कोणी क्षुधार्त याचक असतील, त्यांचा अन्नदानानें संतोष करावा. कारण मार्ग दूरचा परंतु हितकर असेल तर त्याच मार्गाकडे दृष्टि द्यावी. रथाचीं चाकें (रथ पुढें जात असतां) क्षणभर येथें तर दुसऱ्याच क्षणीं दुसऱ्या ठिकाणीं याप्रमाणें फिरत जातात त्याप्रमाणें संपत्ति ही देखील आज ह्याच्यापाशीं, तर उद्यां दुसऱ्यापाशीं, अशा रीतीनें फिरत रहाते.

(६) (ह्याप्रमाणें जो वागत नाहीं) त्या मूर्खानें अन्न मिळविण्याचे श्रम व्यर्थ घेतले. मी खरोखर असेंच म्हणतों कीं (अशा मूर्खानें मिळविलेलें अन्न हें अन्नच नव्हे तर) तो त्याचा प्रत्यक्ष मृत्यूच आहे. कारण (याचकरूपानें येणाऱ्या) अर्यमादिकांना जो अन्न समर्पण करून प्रसन्न करीत नाहीं, आणि मित्रांनाहि संतुष्ट करीत नाहीं, जो तें अन्न एकटाच (बकाबक) खात बसतो, तो स्वतः एकटाच महापातकी ठरेल.

(७) नांगरण्याचे श्रम घेण्यानेंच नांगराचा फाळ हा आपणांस तृप्तिदायक धान्यादिक पदार्थ देतो. त्याचप्रमाणें परोपकारी मनुष्य आपल्या परिश्रमानें व आपल्या सत्कृत्यांनीं इतरांना मार्ग आंखून देतो. विद्वान् परंतु कांहीं न बोलणाऱ्या मुखस्तंभापेक्षां आपल्या विद्येचा उपयोग शिकवून करून देणाराच श्रेष्ठ होय. तसेंच अन्नदानानें याचकाला संतुष्ट करणारा पुरुष हाच आप्त होय. तो दानधर्म न करणाऱ्या कंजुषांचा हटकून पराभव करील.

(८) ज्याला एकच पाय आहे तो (उभा न राहूं शकणारा बालक) उद्यां दोन पायांनीं चालणाऱ्यांना गांठील, आणि दोन पायांनीं चालणारा हा तीन पायांनीं (म्हणजे सत्कृत्यरूप काठीचा आधार घेऊन) जाणाऱ्यांच्या स्थितीला पोहोंचेल. त्याचप्रमाणें

चतुष्पाद देखील द्विपाद (मनुष्यांचा) शब्द ऐकून आणि आपापले समुदाय पाहून उठून (मनुष्यांचें) अनुकरण करून चालतात. (एकपाद या शब्दानें एकपाद अजा म्हणजेच एक मरुद्देवता उद्दिष्ट आहे. त्रिपाद म्हणजे काठीच्या आधारावर उभा राहिलेला एक म्हातारा व चतुष्पाद म्हणजे कुत्रा या डॉ. विंटरनिट्झनें या ऋचेवर बसविलेल्या कल्पना चुकीच्या आहेत. व डॉ. केतकरांनींहि अकारणच कूटकाव्याचें उदाहरण म्हणून या ऋचेचा उल्लेख केला आहे. वस्तुतः ऋचा सरळ आहे व तिचा श्रुतिबोधकारांनीं केलेला अर्थच प्राकरणिक व सरस असल्यामुळें आम्ही तोच स्वीकारला आहे.)

(९) (हा असा व्यवहारच आहे कीं) आपले दोन्ही हात सारखे खरे; पण ते सारखेच काम करूं शकत नाहींत. माता जरी दोन असल्या तरी दोघींना पान्हा सारखा असत नाहीं. एकाच आईला झालेलीं जुळीं भावंडें पण त्यांची सुद्धां कर्तबगारी एकसारखी नसते. त्याचप्रमाणें एकाच (चांगल्या) कुळांत जरी अनेकांचा जन्म झाला तरी ते सर्व सारख्याच अंतःकरणाचे नसतात.

या सूक्ताचें जो कोणी मनन करील त्याला अतिथिरूपानें येणारा याचक परमेश्वराचाच प्रतिनिधि असतो व त्या सत्त्वपरीक्षा पाहावयास आलेल्या देवाचा अपमान पापमय आहे यासारख्या आमच्या आजच्या धार्मिक जीवनांतील समजुतीचें मळ सुद्धां ऋग्वेदासारख्या प्राचीन काळांत दडलेलें आहे असें आढळून येईल. जो केवळ स्वतःचाच स्वार्थ पहातो तो स्वतःचेंच पाप खाणारा मनुष्य आहे. या तीव्र शब्दांत स्वार्थवादी प्रवृत्तींचा धिक्कार करून सामाजिक प्रवृत्तींचा व तोहि निष्कामत्वाच्या भूमिकेवरून जो सामर्थ्यशील पुरस्कार केलेला आहे तो पाहून तरी ऋग्वेदीय जीवन नीतिमत्तेचा पुरस्कार करणारें नव्हतें असें विधान करण्याचें साहस कोणालाहि होऊं नये. डॉ. केतकरसुद्धां या सूक्तासमोर गडबडले आणि त्यांनीं शेवटीं अशी हास्यास्पद पुस्ती

जोडली आहे कीं नीतितत्त्वांचा निर्देश याखेरीज ऋग्वेदांत इतरत्र कोठेंहि आढळत नाहीं. यामुळें हें सूक्त ऋग्वेदांत मोठें चमत्कारिक दिसतें. वस्तुतः चारहि वेद एकच आहेत असें समजून त्यांचा अभ्यास करावा या मताचा जोरदार पुरस्कार करणाऱ्या केतकरांना ऋग्वेद म्हणजे ऋग्वेद अशा पद्धतीनें ऋग्वेदाकडे पहाणें योग्य दिसत नाहीं. व तसें तें पाहिलें तरी त्यांचें विधान खोटें ठरतें हें येथें दाखविलेंच आहे. हें एकच सूक्त नव्हे तर ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं असणारा नीतीचा पुरस्कार, चारित्र्याची तहान, व स्वप्नांतहि अशुद्धता उत्पन्न होऊं नये म्हणून ऋषींना लागलेली तळमळ यांचे जे येथें विविध उल्लेख केलेले आहेत त्यावरून ऋग्वेदीय ऋषींची अंतरंगजीवनाची श्रेष्ठ धारणा स्पष्ट होते. त्यांची सत्याची चाड "सत्यं वदति हन्त्यासत्" यासारख्याच केवळ उद्गारांवरून व्यक्त होत नसून चारित्र्यसंपन्नता, सत्यनिष्ठा व कोणत्याहि प्रलोभनाला बळी न पडणारी सरमा-पणि संवादासारखीं आख्यानसूक्तें यांच्यांतूनहि उत्कटत्वानें व्यक्त झाली आहे.

## सरमा पणि संवाद

या आख्यानसूक्ताची पार्श्वभूमि पुढीलप्रमाणें आहे:– "देवगुरु बृहस्पति हा इंद्राचा राजपुरोहित होता. त्याच्याजवळ सुंदर व दुधाळ गाईंचें एक मोठें खिल्लार होतें. चोरट्या पणींनीं (पणि हे अनार्य होते व ते मोठे संस्कृतिसंपन्न असून आर्यांनींच त्यांना लुबाडलें अशी एक कल्पित कथा अलीकडच्या संशोधकांनीं तयार केली आहे. पण ते आर्यांपैकींच असून व्यापारी, धनलोभी व हव्या त्या अपहरणादि मार्गांनीं संपत्ति जोडणारे होते असें वेदावरूनच दिसतें.) संधि साधून त्या गाई पळवून नेल्या आणि आपल्या जागेंत आणून सुरक्षित व बंदिस्त अशा डोंगरी गुहेंत लपवून ठेवल्या. बृहस्पतींनीं याची कागाळी इंद्राच्या कानावर घातली. व त्याला गाईंचा शोध करण्यास सांगितलें. इंद्रानें आपली विश्वासू सरमा नांवाची दूती गाईंच्या शोधार्थ पाठवून

दिली. ती फिरत फिरत रसा नदी ओलांडून पणींच्या प्रदेशांत आली आणि शोध करीत करीत अखेर पणींनीं जेथें गाई लपवून ठेवल्या होत्या त्या ठिकाणीं आली. सरमेला पाहून पणींना संशय आला आणि म्हणून ती कोण, कोठून आली याविषयीं त्यांनीं तिच्याजवळ जाऊन चौकशी प्रारंभ केली. त्या वेळीं पणींचा व सरमेचा जो संवाद झाला त्याचें ऋग्वेदांतील सूक्त मोठें बहारीचें आहे. तें असें:–

" किम् इच्छन्ती सरमा प्र इदम् आनट् दूरे हि अध्वा जगुरिः पराचैः । का अस्मेऽहितिः का परिऽतक्म्या आसीत् कथं रसायाः अतरः पयांसि ॥१॥

इन्द्रस्य दूतीः इषिता चरामि महः इच्छन्ती पणयः निऽधीन् वः । अतिऽस्कन्दः भियसा तत् नः आवत् तथा रसायाः अतरम् पयांसि ॥२॥

कीदृङ इन्द्रः सरमे का दृशीका यस्य इदं दूतीः असरः पराकात् । आ च गच्छात् मित्रम् एन दधाम अथ गवाम् गोऽपतिः नः भवति ॥३॥

न अहं तं वेद दभ्यं दभत् सः यस्य इदं दूतीः असरम् पराकात् । न तम् गूहन्ति स्तवतः गभीराः हताः इन्द्रेण पणयः शयध्वे ॥४॥

इमाः गावः सरमे याः ऐच्छः परि दिवः अन्तात् सुऽभगे पतन्ती । कः ते एनाः अव सृजात् अयुध्वी उत अस्माकम् आयुधा सन्ति तिग्मा ॥५॥

असेन्या वः पणयः वचांसि अनिषव्याः तन्वः सन्तु पापीः । अधृष्टः वः एन वै अस्तु पन्थाः बृहस्पतिः वः इभया न मृळात् ॥६॥

अयम् निऽधिः सरमे अद्रिऽबुध्नः गोभिः अश्वेभिः वसुऽभिः निऽऋष्टः । रक्षन्ति तम् पणयः ये सुऽगोपाः रेकु पदम् अलकम् आ जगन्थ ॥७॥

आ इह गमन् ऋषयः सोमऽशिताः अयास्यः अङ्गिरसः नवऽग्वाः। ते एतम् ऊर्वम् वि भजन्त गोनाम् अथ एतत् वचः पणयः वमन् इत् ॥८॥

एव च त्वम् सरमे आऽजगन्थ प्रऽबाधिता सहसा दैव्येन। स्वसारम् वा कृणवै मा पुनः गाः अप ते गवाम् सुऽभगे भजाम ॥९॥

न अहम् वेद भ्रातृऽत्वम् नो (इति) स्वसृत्वम् इन्द्रः विदुः अङ्गिरसः च घोराः। गोऽकामाः मे अच्छदयन् यत् आयम् अप अतः इत पणयः वरीयः ॥१०॥

दूरम् इत पणयः वरीयः उत् गावः यन्तु मिनतीः ऋतेन। बृहस्पतिः या अविन्दत् निऽगूळ्हाः सोमः ग्रावाणः ऋषयः च विप्राः ॥११॥ ऋग्वेद मं. १० सू. १०८.

पणी म्हणाले, 'सरमे! कोणत्या उद्देशानें तूं येथें आलीस? केवढा लांबचा हा प्रवास, तुला श्रम झाले नाहींत काय? तुला भीति वाटली नाहीं काय? रात्रीं तूं कोठें होतीस? ही रसा नदी कशी अगदीं दुथडी भरून वाहात आहे. तूं ती कशी ओलांडलीस?

त्यावर सरमा म्हणाली. "पणी हो! मी इंद्राची दूती आहे. इंद्र माझें संरक्षण करीत असल्यामुळें मला आजवर कोणाचीहि व कशाचीहि भीति वाटली नाहीं व वाटत नाहीं. अर्थात् मी ही तुमची रसा नदी अगदीं सहज ओलांडून आलें.

पणीः– बरें! तूं ज्याची दूती म्हणवितेस तो इंद्र कसा आहे? तो आमच्या येथें येईल काय? तूं त्याला येथें आणशील काय? त्याची दृष्टि कशी काय आहे?

सरमाः– पणींनो! त्या इंद्राचा महिमा मी तुम्हांला काय सांगूं? खरें विचाराल तर त्याला कोणी मारणारा नाहीं. उलट तो मात्र सर्वांना मारील.

पणीः– आम्हांला सुद्धां तो मारूं शकेल काय?

सरमाः– हो! हो! तुम्ही असे कोण मोठे लागून गेलांत. तुम्हांला सुद्धां तो सहज ठार मारील. अगदीं जमिनीवर लोळवून ठार

मारील. पणींनो! त्याच्याशीं लढण्याची कल्पना कराल तर फुकट मरून पडाल.

पणी– सरमे! ज्या गाई तूं इच्छितेस त्या लढाईवांचून कोण सोडवील? आणि कोण त्या घेऊन जाईल? आमच्या समोर उभें राहण्याची कोणाची काय बिशाद लागून गेली आहे. आम्ही पणींनीं हातांत बांगड्या भरल्या आहेत काय? आमचीं हत्यारें हीं अत्यंत तीक्ष्ण व जलाल आहेत. तुझा इंद्र आमचें काय करणार?

सरमा– वायकासारखी वटवट करण्यांत काय अर्थ? एखाद्या पापी मनुष्याप्रमाणें तुम्ही बडबड चालविली आहे. ऐन प्रसंगीं मात्र पराक्रमशून्य होऊं नका.

पणी– इंद्र इथें येईल तें पाहतां येईल. पण आमची ही रसा नदी तरून जाण्यास इतकी कठीण आहे कीं ती ओलांडून जाण्याची इंद्राची हिंमतच होणार नाहीं.

सरमा– वेड्या पणींनो! तुमचा हा सगळा भ्रम आहे. त्याला तुमची रसा मुळींच अडवूं शकणार नाहीं.

इंद्राचें हें वर्णन ऐकून पणी घाबरले व तिला प्रलोभनानें वश करण्यासाठीं म्हणूं लागले : सरमे! तूं आमचें ऐकशील काय? जर ऐकशील तर आम्ही तुला मोठी भाग्यवती करूं. त्यावर सरमा म्हणाली, "तुम्हीच आधीं माझें पूर्ण ऐकून घ्या." मी म्हणते, "इंद्राचें सख्य पाहिजे असल्यास मुकाट्यानें त्या बृहस्पतीच्या गाई सोडून द्या. पणींनो! शहाणे व्हा, मृत्यूस आमंत्रण देऊं नका. तुमची रसा नदी इंद्राला अडविण्यास अगदीं असमर्थ आहे. तुम्ही त्याच्या गाई जर न सोडल्या तर इंद्र व बृहस्पति दोघेहि येतील आणि तुमची पूर्ण खोडकी जिरवून तुमचें पारिपत्य करतील.

पणी– एक रसा नदीच नाहीं. आमचें हें डोंगरांतील बंदीगृह देखील अत्यंत दुर्भेद्य आहे. त्यांत गाई, घोडे, संपत्ति खचून भरलेली असून भोंवतालीं आमचे शूर पणी हातांत प्रखर शस्त्रें घेऊन जागरूकतेनें या आमच्या निधीचें संरक्षण करीत आहेत. तूं येथें

व्यर्थ आलीस. तुझे इंद्र, बृहस्पति या आमच्या सामर्थ्यासमोर काय करूं शकणार? वैभवसंपन्न आणि सामर्थ्यसंपन्न अशा आमच्या समोर त्यांची डाळ मुळींच शिजणार नाहीं.

सरमा– पापी लोकांना सद्‌बुद्धि सुचत नाहीं हेंच खरें. तुमच्या वटवटींचा इतकाच अर्थ आहे कीं तुमचा विनाशकाळ जवळ आला आहे. तुम्हीं जर गाई न सोडल्या तर सोमपान करून प्रमत्त झालेले अयास्य, अंगिरस व नवग्व येथें येतील व तुमचा फडशा पाडतील. ते गाई सोडवून आपसांत वाटून घेतील."

सरमेची ही जरब ऐकतांच पणी तिला म्हणूं लागले. "तें सगळें राहूं दे. तूं तेथें जाऊन येथें गाई आहेत असें सांगितलें तरच त्यांचा येथें येण्याचा प्रश्न कीं नाहीं? आम्ही कांहीं त्याला घाबरतों असें नाहीं. पण सरमे! तुला होणारे कष्ट आमच्यानें पाहवत नाहींत. एवढे कष्ट सोसून तूं येथें आलीस. पुन्हां परत जाशील या सगळ्या भानगडीपेक्षां आम्ही तुझ्याशीं बहिणीचें नातें जोडून तुलाच येथें ठेवून घेतों. तूं येथें आमच्या जवळच रहा. शहाणी असलीस तर आमचें ऐकशील. इंद्राच्या त्रासानें उगाच जिवाला कष्ट करून घेण्याऐवजीं आमची बहीण म्हणून येथें सुखांत राहणें चांगलें नाहीं काय?

सरमा– काय म्हणतां, तुमची बहीण ?

पणी– हो! हो! तुला व्यर्थ राबविणाऱ्या त्या इंद्रापेक्षां आमची बहीण म्हणून येथेंच सन्मानांत सुखानें व चैनीनें राहणें चांगलें नाहीं काय? तेव्हां तूं आतां परत जाऊंच नकोस.

सरमा– पणींनो! तुमच्या मायावी भाषणाला फसण्यासारखी मी मूर्ख आहे काय? इंद्राची सर तुम्हांला कशी येणार? मी इंद्रालाहि ओळखतें व तुम्हांलाहि ओळखतें.

पणी– अग नुसती बहीणच नव्हे तर आम्ही ज्या गाई आणल्या आहेत त्यांत आम्ही तुला हिस्साहि देतों. तूं व आम्ही त्या वाटून घेऊं.

सरमा– पणींनो! तुम्ही मूर्ख आहांत! ही मी सरमा तुमचा भाऊपणाहि जाणत नाहीं व बहीणपणाहि जाणत नाहीं. इंद्र व

अंगिरस हेच सर्व कांहीं जाणतात. मी तुम्हांला खचित सांगतें कीं मी जेव्हां येथून इंद्रादि देवांजवळ जाईन तेव्हां ते माझे देव तुम्ही चोरून येथें आणून ठेवलेल्या गाई सोडवून परत घेऊन जाण्याकरितां येथें येतील आणि तुमचा फडशा पाडून गाई परत घेऊन जातील. तुम्हांला जर स्वतःचा जीव वांचवावयाचा असेल तर मुकाट्यानें गाई सोडून देऊन येथून पळून जाणें हेंच तुमच्या हिताचें आहे."

या सरमेच्या चरित्राच्या रूपानें कसल्याहि प्रलोभनाला बळी तें पडतां "नाहं वेद भरातृत्वं नो स्वसृत्वं" असें रोखठोक उत्तर देणाऱ्या कर्तव्यदक्ष व निःस्वार्थ मनोवृत्तीचें जें दिग्दर्शन केलें आहे न स्पृहणीय नाहीं असें कोण म्हणेल? नीतितत्त्वाचा आविष्कार आणखी काय असतो? याला जर रानटीपणा म्हणावयाचा असेल तर याहून विपरीत धारणेची सृष्टि निर्माण करूं इच्छिणाऱ्या तथाकथित सुधारणावादाला कोणीहि दुरूनच नमस्कार करील. ऋग्वेदांत ज्याप्रमाणें नीतीचा कडवा पुरस्कार आहे त्याचप्रमाणें आख्यानसूक्तांतून व स्वतंत्रपणेंहि अनैतिक गोष्टींचा आणि व्यसनांचा कडकडीत धिक्कारहि आहे. आख्यानसूक्तांतून तर तो फारच परिणामकारक रीतीनें रंगविलेला आहे. एक जुगारी आपल्या झालेल्या वाताहतीचें द्यूतसूक्तांत जें चित्रण करीत आहे तें या दृष्टीनें मनन करण्यासारखें आहे. ऋग्वेदाच्या दशम मंडलांतील हें चौतिसावें सूक्त पुढीलप्रमाणें आहे--

" प्रावेपाः मा बृहतः मादयन्ति प्र वातेऽजाः इरिणे ववृतानाः। सोमस्यऽऽइव मौजऽवनस्थ भक्षः विऽभीदकः जागृविः मह्यं अच्छान् ।।१

न मा मिमेथ न जिहीळे एषा शिवा सखिऽभ्यः उत मह्यं आसीत् । अक्षस्य अहं एकऽपरस्य हेतोः अनुऽव्रतां अप जायां अरोधम् ।। २

द्वेष्टि श्वश्रूः अप जाया रुणद्धि न नाथितः विन्दते मर्डितारम् । अश्वस्यऽइव जरतः वस्न्यस्य न अहं विन्दामि कितवस्य भोगम् ।।३

अन्ये जायां परिमृशन्ति अस्य अगृधत् वेदने वाजी अक्षः। पिता माता भ्रातरः एनं आहुः न जानीमः नयत बद्धम् एनम् ॥ ४

यत आऽदीध्ये न दविषाणि एभिः परायत्ऽभ्यः अव हीये सखिभ्यः । निऽउत्पाः च बभ्रवः वाचं अक्रत एमि इत् एषां निःऽकृतं जारिणीऽइव ॥५

सभां एति कितवः पृच्छमानः जेष्यामि इति तन्वा शूशुजानः। अक्षासः अस्य वि तिरन्ति कामं प्रतिऽदीव्ने दधतः आकृतानि ॥६

अक्षासः इत् अंकुशिनः निऽतोदिनः निऽकृत्वानः तपनाः तापयिष्णवः । कुमारऽदेष्णाः जयतः पुनःऽहनः मध्वा संऽपृक्ताः कितवस्य वर्हणा ॥७

त्रिऽपञ्चासः क्रीळति व्रातः एषां देवःऽइव सविता सत्यऽधर्मा। उग्रस्य चित् मन्यवे न नमन्ते राजा चित् एभ्यः नमः इत कृणोति ॥८

नीचा वर्तन्ते उपरि स्फुरन्ति अहस्तासः हस्तऽवन्तं सहन्ते। दिव्याः अंगाराः इरिणे निऽउत्पाः शीताः संतः हृदयं निःदहन्ति॥९

जाया तप्यते कितवस्य हीना माता पुत्रस्य चरतः क्व स्वित्। ऋणऽवा बिभ्यत् धनं इच्छमानः अन्येषां अस्तं उप नक्तं एति॥१०

स्त्रियं दृष्ट्वाय कितवं तताप अन्येषां जायां सुऽकृतं च योनिम्। पूर्वाह्णे अश्वान् युयुजे हि बभ्रून् सः अग्नेः अन्ते वृषलः पपाद॥११

यः वः सेनाऽनीः महतः गणस्य राजा व्रातस्य प्रथमः बभूव। तस्मै कृणोभि न धना रुणध्मि दश अहं प्राचीः तत् ऋतं वदामि ॥१२

अक्षैः मा दीव्यः कृषिं इत् कृषस्व वित्ते रमस्व बहु मन्यमानः। तत्र गावः कितव तत्र जाया तत् मे विचष्टे सविता अयं अर्यः॥१३

मित्रं कृणुध्वं खलु मृळत नः माः नः घोरेण चरत अभि धृष्णु। नि वः नु मन्युः विशतां अरातिः अन्यः बभ्रूणां प्रऽसितौ नु अस्तु ॥१४

(१) वाऱ्याच्या सोसाट्यांत पोसलेल्या (झाडाच्या) लाकडापासून बनलेले हे पटावर गरंगळत थै थै नाचणारे फांसे मला बेभान करीत आहेत. हा स्वतः जागरूक राहणारा फासा मात्र

मला मौज पर्वतावरील सोमवल्लीच्या मधु पेयानें गुंग झाल्याप्रमाणें धुंद करून सोडीत आहे.

(२) ही माझी भार्या मला कधीं टाकून बोलली नाहीं किंवा माझ्यावर संतापली नाहीं. माझ्या मित्राशीं आणि माझ्याशीं सुखासमाधानानें वागली. असें असून केवळ ह्या एकच एक जुगारीच्या (व्यसनाच्या) नादीं भरून मी आपल्या आज्ञाधारक स्त्रीला दरडावून दूर लोटून दिलें.

(३) जुगाऱ्याची सासू त्याचा तिटकारा करते. शेवटीं बायकोहि त्याचा निषेध करते. त्यानें पुष्कळ विनवण्या केल्या तरी त्याची कोणाला दया येत नाहीं. (अशी माझी स्थिति आहे.) मोठ्या किंमतीच्या परंतु म्हाताऱ्या घोड्याप्रमाणें माझी दशा झाली आहे. मला जुगारी (पैसा न मिळाल्यानें) चैनसुद्धां भोगावयास मिळाली नाहीं.

(४) तो बलाढ्य फांसा ज्याचें धन जुगारींत पार लुबाडून घेतो, त्याच्या बायकोवरसुद्धां भलतेच लोक हात टाकण्यासहि चुकत नाहींत. त्याचा बाप, आई व भाऊ हे म्हणतात कीं, हा कोण आहे ? तो आम्हीं मुळींच ओळखीत नाहीं. खुशाल त्याच्या मुसक्या बांधून त्याला घेऊन जा.

(५) जेव्हां मी असा निर्धार करतों कीं इतःपर या फाशांनीं खेळणार नाहीं, तेव्हां संगत तुटलेले माझे सोबती आणि फासे माझा धिक्कार करतातच; परंतु एकदां कां ते पिंगट रंगाचे फासे पटावर फेकले जाऊन त्यांचा खुळखुळाट सुरू झाला, म्हणजे एखादी बदकरणी स्त्री संकेतस्थळीं जाते त्याप्रमाणें मीहि त्या जुगाराच्या अड्ड्याकडे धांवतो.

(६) (जुगाऱ्यास येतोस कां म्हणून) विचारलें कीं त्याच्या अंगांत चुरचुरी चढून हा आतां मी जिंकणार असें म्हणून तो अड्ड्यांत जातो आणि प्रतिस्पर्ध्यांशीं त्यानें पैज बांधली कीं फांसे त्याची हाव वाढवूं लागतात.

(७) हे फासे अंकुशधारी आहेत, पराण्या टोचणारे आहेत, चामडी (सोलून ती) कातरणारे आहेत, आपण तापून दुसऱ्यालाहि भाजून काढणारे आहेत. इतकेंहि करून जुगारींत एखादे वेळीं जय झाला म्हणजे जें बक्षिस मिळतें तें मुलांच्या खेळण्याइतक्याहि किमतीचें नसतें. याप्रमाणें ते उन्मादानें जणू काय थबथबणारे फासे जुगाऱ्याला प्रथम फुगवून शेवटीं त्याचा निःपातच करतात.

(८) तीन तीन पन्नास पन्नास अशा संचानें फांशांचा खेळ चालतो. (तो खरेपणाच्या इतक्या ऐटीनें कीं) जणू काय सत्य-स्वरूप सविताच अवतरला आहे. कोणत्याहि भयंकर मनुष्यापुढें ते नम्र होत नाहींत. उलट राजा असला तरी तो देखील यांच्यापुढें नमतो.

(९) हे फासे पडतात खालीं पण फुरफुरतात सर्वांच्या वर. यांना हात नाहींत तरी हात असणाऱ्या पुरुषांना हे दीन करतात. हे पटा-वर टाकले कीं जणू दिव्य लोकचे निखारेच. कारण ते हाताला जरी थंड लागतात तरी काळीजच करपवून टाकीत असतात.

(१०) जुगाऱ्याची बायको दीनवाणी होऊन चरडफत बसते. त्याची आई आपल्या पुत्राला इकडे तिकडे भटकतांना पाहून कळ-वळते. तो स्वतः कर्जबाजारी होऊन भेदरून जातो. आणि पैशा-करितां दुसऱ्याच्या दारीं दिवसरात्र खेपा घालतो.

(११) स्वतःच्या स्त्रीला पाहिलें तर त्याला संताप येतोच, पण दुसऱ्याच्या स्त्रीला पाहिलें किंवा इतरांचें घर शृंगारलेलें दृष्टीस पडलें तरी जुगाऱ्याच्या अंगाची लाही होते. पण करतो काय? सकाळीं धुरकटलेलें घोडें जुंपून (भाड्याकरितां) गाडी हाकावी आणि (रात्रीं) शेकोटी पेटवून तिच्याजवळ त्या गुलामानें पडून राहावें.

(१२) जो तुमच्या बलाढ्य संघाचा सेनापति असेल, तुमच्या पथकाचा अगदीं मुख्य असेल किंवा राजा असेल त्याच्यापुढें मी आपल्या (हाताच्या) दहाहि बोटांच्या ओंजळीनें हात जोडतो आणि सांगतों कीं जुगारीनें मला द्रव्य लुबाडतां आलें नाहीं हें मी खरें, अगदीं खरें बोलत आहे.

(१३) फाशांनीं (जुगार) खेळू नको तर शेती कर आणि मग संपतीमध्यें रममाण हो म्हणजे तूं फार मान्यतेला चढशील. तेथें (शेतींत) गाई मिळतील; आणि बायकोहि मिळून तेथें तुझा संसार होईल. मला ही गोष्ट ह्या भगवान् सूर्यनारायणानें अनुभवास आणून दिली.

(१४) मला आपला मित्र समज. (हे फांशा) खरोखर आमच्यावर दया कर. तुझ्या भयंकर धकाधकीनें मजवर हल्ला चढवूं नको. (फाशांनो) तुमचा क्रोध शांत होवो; आणि दुसरा कोणीतरी म्हणजे अधार्मिक दुष्ट तुम्हां पिंगट फाशांच्या जाळ्यांत अडकून पडो."

जुगार, दारू, व्यभिचारादि व्यसनें व सर्वच प्रकारची अनीति यांचा आर्यांना पूर्ण तिरस्कार आहे. आणि त्यांच्या पापभीरू स्वभावाला अजाणतेपणीं मनाच्या द्वारें होणारें पतनहि सहन होण्यासारखें नाहीं. केवढेंहि प्रलोभन समोर उभें असलें तरी सत्कर्मापासून न चळण्याची त्यांची मनोवृत्ति आहे. हें द्यूतसूक्तांतील वर्णन वाचलें तर कोणीहि आत्मनाशक अनीतीच्या मार्गानें जाऊं नये याची त्यांना केवढी तळमळ लागलेली आहे तें स्पष्ट होतें. अशा या लोकांना रानटी मानून श्री. डांगे यांच्यासारखे बौद्धिक विकृतीच्या रोगाला बळी पडलेले लोक ज्या वेळीं त्यांच्यांत नीतिकल्पनांचा उदयच झाला नव्हता असें प्रतिपादन करूं लागतात व स्वप्नांतील पापांपासूनहि वांचविण्याची देवाला प्रार्थना करणाऱ्या या पापभीरू लोकांना स्त्रीपुरुषांतील विवाहबंधनें व नात्यागोत्याच्या संबंधामुळें उत्पन्न होणारी समाजाच्या विकसितावस्थेंतील नैतिक बंधनें यांची कल्पनाहि नसून त्यांना स्त्रीपुरुष यांचें निसर्गानें निर्मिलेलें एकच नातें माहीत होतें असें जेव्हां प्रतिपादन करूं लागतात व त्यासाठीं ऋग्वेदांतीलच सूक्तें आधार म्हणून पुढें करण्याची धृष्टता दाखवितात त्या वेळीं त्यांच्या दडपेगिरीचें नवल वाटतें. श्री. डांगे म्हणतात :—

Such an organism knew no differentiated kins, entailing defined sex interdictions. But this promiscuity was found to be injurious to the growth of the progeny. Hence the first prohibition that was thought of and applied to, was to relations between parents and offspring and brought into existence the consanguine family. Here the marraiges are arranged by generatons; all grandfathers and grandmothers are mutually husbands and wives; equally their children, the fathers and mothers; in this brother and sister, male and famale cousins are mutually husbands and wives.

The second stage was the creation of a barrier between brother and sister. This progress was much more difficult because of the greater equality of ages of the parties concerned. It was accomplished gradually beginning with the natural sister on the mother's side. How difficult it was can be seen from the fact that late in the Rigveda, Yami, the sister of yama, asks for his love and progeny on her; but he refuses saying that the great watchman of the gods, Varuna, would see and be angry. Yami argues on the contrary that the gods would approve of it. The end of this drama in the Rigveda is lost but even if the conclusion is presumed that yama ultimately refused, it points to the difficulty with which the earlier custom was fought out.

"अशा तऱ्हेच्या गणांतून परस्परभिन्न नातीं व नियंत्रित स्त्री-पुरुषसंबंध यांची ओळखहि नसणें स्वाभाविक होतें. पण त्याचे दुष्परिणाम दिसू लागले व त्यामुळें संभोगाच्या बाबतींत बाप व मुलगी अथवा आई व मुलगा यांच्या संबंधांतलें नियन्त्रण प्रथम अस्तित्वांत येऊन कुटुंबसंस्थेचा पाया घातला जाऊं लागला. या ठिकाणीं सर्वच आजे व आजी हे पति व पत्नी होते आणि त्यामुळें सर्वच आई व वडील अशी दुसरी पिढी होती व त्यामुळें भाऊ व बहिणी, चुलत भाऊ इत्यादि सर्वच सोयीप्रमाणें पतिपत्नींचे संबंध

जोडीत असत. पहिलें बंधन केवळ जन्यजनक संबंधांत उत्पन्न झालें. व दुसरें बहीणभावांच्या संबंधांत उत्पन्न झालें हा विकास अत्यंत मंद गतीनेंच झाला व तो करणें बरेंच जड गेलें. कारण बहीणभावांतील हें नियन्त्रण म्हणजे दोन वयांत आलेल्या स्त्रीपुरुषांवर एक अनोळखी नियन्त्रण लादण्याचा हा प्रकार होता. एका आईच्या पोटचीं दोन मुलें संभोगाला वर्ज्य ठरवावी एवढाच या नियन्त्रणाचा अर्थ होता. पण हें सुद्धां किती कठीण गेलें हें ऋग्वेदांतील यमयमी सूक्तावरून दिसतें. यमी ही यमाची बहीण होती. ती यमाजवळ प्रेमाची व स्वतःच्या ठिकाणीं संतति उत्पन्न करण्याची याचना करीत आहे. व यम तिचें तें म्हणणें नाकारीत देवांचा श्रेष्ठ पहारेकरी वरुण ही गोष्ट पाहील व क्रुद्ध होईल असें सांगत आहे. त्याच्या उलट यमी देवाचे आपल्याला आशीर्वादच मिळतील असें सांगत आहे. या संवादाचा शेवट कसा झाला हें ऋग्वेदांत नाहीं. तरी पण यमानें शेवटीं यमीची प्रार्थना झिडकारली असा जरी निर्णय त्यांतून काढला तरीहि ती जुनी अनिर्बंध लैंगिक संबंधाची रूढि केवढ्या मोठ्या संघर्षानें बाजूस सारावी लागली याची यावरून कल्पना येते."

श्री. डांगे यांनीं Origin of Marriage मधील Engels च्या सूत्रांच्या सांच्यांत वैदिकांचा इतिहास उलगडण्याचा केलेला प्रयत्न चुकीचा आहे. Origin of Family चें Engels चें प्रतिपादन बरोबर आहे असें आम्हांस वाटत नाहीं. पण तें आहे असें "तुष्यतु दुर्जनः" या न्यायानें खरें मानलें तरी ऋग्वेदांत त्याचें प्रतिबिंब आहे असें समजण्याचें कारण नाहीं. मानवसमाजांत डांगे म्हणतात तशी वस्तुस्थिति कधीं काळीं असेलहि व तिचीं वर्णनें मानव जातीच्या विकसनाच्या इतिहासाचा आढावा घेतांना पुराणवाङमयांतूनहि केलेलीं आढळतात. पण ऋग्वेदकालीन समाजाचें चित्र हें मानवजातीच्या रानटी अवस्थेंतील अविकसित स्थितीचें नसून तें जीवन कल्पना सिद्ध झालेल्या विकसित राष्ट्राचें चित्र आहे हें

आम्हीं आतांपर्यंत प्रत्यक्ष ऋग्वेदांतीलच जे उल्लेख उद्धृत केले आहेत त्यांवरून सहजच सिद्ध होतें. दुंदुभि वाजवून राज्य विस्तार करूं इच्छिणारे व स्वप्नांतील पापांपासूनही निष्कलंक राहूं इच्छिणारे ऋग्वेदीय लोक हे विकसित अवस्थेंतील आहेत हें न सांगतांहि समजण्यासारखें आहे. अशा स्थितींत त्यांच्या वाङमयांतील हें वर्णन बारकाईनें पाहिलें तर डांगे यांनीं अकारणच तें विकृत अर्थानें मांडलें आहे असें दिसतें. बृहद्देवतेप्रमाणें या यमयमी संवादाची पार्श्वभूमि अशी आहे कीं, त्वष्टचाला त्रिशिरस नांवाचा मुलगा व सरणि नांवाची मुलगी अशीं दोन अपत्यें झालीं. सरणि उपवर झाल्यावर तिचा विवस्वानाशीं विवाह झाला. पुढें तिला यम व यमी या नांवाचें जुळें झालें. तीं दोन्ही जुळीं बहीणभावंडें एकत्रच वाढलीं व नांदलीं. त्यांचें परस्परांवर निरतिशय प्रेम होतें. यम वडील भाऊ होता व यमी ही धाकटी बहीण होती. "पुलुकामो हि मर्त्यः" मनुष्य हा वासनांचा पुंजका आहे व वासनांच्या तावडींत सांपडल्यावर जिवाचा किती अधःपात होईल हें सांगतां येत नाहीं असें ऋग्वेदाचें म्हणणें आहे. व आजहि समाजस्थितींत आपण या गोष्टींचा भरपूर अनुभव घेतों. यमी चांगली वयांत आल्यावर तिच्या मनांत पुरुषसुखेच्छा उत्पन्न झाली व पुढें ती अनावर झाल्यामुळें एके दिवशीं ती आपल्या भावाजवळ येऊन आपली रतिसुखेच्छा पूर्ण करण्यास त्याला एकन्तांत नेऊन विनवूं लागली. त्या वेळचा झालेला बहीण भावंडांचा संवाद यम यमी सूक्त या नांवानें प्रसिद्ध आहे. या सूक्तावरून वासनांचा उद्रेक मनुष्याला कोणत्या पतितावस्थेपर्यंत नेऊं शकतों हें यमीच्या चित्रणानें दाखविलें आहे. व संयमी आणि दृढनिश्चयी पुरुष अलिप्त राहून मोहापासून आपलें चारित्र्य कसें राखतो हें यमाच्या चित्रणावरून दाखविलें आहे. संसाराच्या वासनामयतेवर विजय मिळविणें दृढनिश्चयी पुरुषाला कसें शक्य आहे याचें या सूक्तावरून उत्कृष्ट उद्बोधन करण्यांत आलें आहे व "उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसाद-

येत्। आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ।।" मनुष्यानें स्वतःच स्वतःचा उद्धार करावा, प्रयत्नपूर्वक दक्ष राहून आपलें अधःपतन कधींही होऊं देऊं नये. वस्तुतः आपणच आपले बन्धु व आपणच आपले शत्रू आहोंत हा गीतेंत सांगितलेला सिद्धान्तच येथें दिग्दर्शित केलेला आहे. आम्ही यमयमी सूक्तच येथें उद्धृत करतों. म्हणजे त्यावरून कल्पना येईल. तें सूक्त असेंः– "ओ (इति) चित् सखायं सख्या ववृत्यां तिरः पुरुचित् अर्णवं जजन्वान्। पितुः नपातं आ दधीत वेधाः अधि क्षमि प्रऽतरमे दीध्यानः ।।१।। न ते सखा सख्यम् वष्टि एतत् सऽलक्ष्मा यत् विषुऽरूपा भवाति। महः पुत्रासः असुरस्य वीराः दिवः धर्तारः उर्विया परि ख्यन् ।।२।। उशन्ति घ ते अमृतासः एतत् एकस्य चित् त्यजसम् मर्त्यस्य। नि ते मनः मनसि धायि अस्मे (इति) जन्युः पतिः तन्वम् आ विविश्यः ।।३।। न यत् पुरा चकृम कत् ह नूनम् ऋताः वदन्तः अनृतम् रपेय। गन्धर्वः अप्ऽसु अप्या च योषा सः नः नाभिः परमम् जामि तत् नौ ।।४।। गर्भे नु नौ जनिता (दम्पती इति) दंऽपती कः देवः त्वष्टा सविता विश्वऽरूपः। नकिः अस्य प्र मिनन्ति व्रतानि वेद नौ अस्य पृथिवी उत द्यौः ।। ५ ।। कः अस्य वेद प्रथमस्य अह्नः कः ईं ददर्श कः इह प्र वोचत् । बृहत् मित्रस्य वरुणस्य धाम कत् ऊं (इति) ब्रवः आहनः वीच्या नृन् ।। ६ ।। यमस्य मा यम्यम् कामः आ अगन् समाने योनौ सहऽशेय्याय । जायाऽइव पत्ये तन्वम् रिरिच्यां विः चित्वृहेव रथ्याऽइव चक्रा ।।७।। न तिष्ठन्ति न नि मिषन्ति एते देवानां स्पशः इह ये चरन्ति। अन्येन मत् आहनः याहि तूयं तेन वि वृह रथ्याऽइव चक्रा ।। ८ ।। रात्रीभिः अस्मै अहऽभिः दशस्येत् सूर्यस्य चक्षुः मुहुः उत मिमीयात् दिवा पृथिव्याः मिथुना (सबन्धू इति) सऽबन्धू यमी यमस्य बिभृयात् अजामि ।।९।। आ घ ता गच्छान् उत्ऽतरा युगानि यत्र जामयः कृणवन् अजामि । उप बर्बृहि वृषभाय बाहुं अन्यं इच्छस्व सुऽभगे पतिं मत् ।।१०।। किं भ्राता असत् यत् अनाथम् भवाति

कि ऊं (इति) स्वसा यत् निःऽऋतिः निऽगच्छात्। कामऽमूता बहु एतत् रपामि तन्वा मे तन्वम् सम् पिपृग्धि ॥ ११ ॥ न वै ऊं (इति) ते तन्वा तन्वम् सं पपृच्यां पापम् आदुः यः स्वसारम् निगच्छात्। अन्येन मत् प्रमुऽदः कल्पयस्व न ते भ्राता सुऽभगे वष्टि एतत् ॥१२॥ बतः बत असि यम न एव ते मनः हृदयं च अविदाम। अन्या किल त्वां कक्ष्याऽइव युक्तं परि स्वजाने लिबुजाऽइव वृक्षम् ॥१३॥ अन्यं ऊं (इति) सु त्वं यमि अन्यः ऊं (इति) त्वां परि स्वजाते लिबुजाऽइव वृक्षम्। तस्य वा त्वं मनः इच्छ सः वा तव अध कृणुष्व संऽविदम् सुऽभद्राम् ॥१४॥

—ऋग्वेद १०-१०-१ ते १४

"यमी :- "मी माझ्या प्रिय सख्याला प्रेमानें खेचून आणीनच. तो ह्या अफाट (प्रेम) समुद्राच्या पार निघून जाण्याच्या जरी बेतांत असला तरी जगाच्या राहटीकडे बारीक लक्ष देणारा ईश्वर ह्याला पुत्र देऊन पित्याचें नातें उत्पन्न करो. ॥१॥

यम :- मी तुझा प्रिय मित्र आहे. पण अशा तऱ्हेच्या मैत्रीची मी इच्छा करीत नाहीं कीं जिच्या योगानें मी मूळचा बन्धुत्वाच्या नात्याचा असतांना नंतर निराळ्याच नात्याचा म्हणजे पति व्हावा. आतां पुत्राविषयीं म्हणशील तरी परमात्मा जो ईश्वर त्याचे वीर्य-शाली पुत्र (दिव्य विबुध) जे या द्युलोकाला धारण करीत आहेत ते तर जिकडे तिकडे दृष्टीला पडतच आहेत. ॥२॥

यमी :- ते जे अमर देव त्यांची वास्तविक हीच इच्छा असते कीं मनुष्य हा एकटा असतो म्हणून त्याला कोणीतरी वाटेकरीण असावी. तुझें मनहि माझ्यावर आहेच तर तूं पुत्रोत्पादक पति होऊन माझ्यामध्यें प्रवेश कर. ॥३॥

यम :- हें पहा कीं जें आपण पूर्वी कधींहि केलेलें नाहीं, तें आतां तरी काय म्हणून करावें ? आजपर्यंत सत्यधर्माच्या लांब लांब गोष्टी सांगून आतां अनीतीची बडबड आपण कां करावी ?

आकाशोदकांत रहाणारा गन्धर्व हा आपला पिता आणि दिव्य उदकरूप जी स्त्री ती आपली जननी असें आपलें उच्च प्रतीचें नातें आहे हें ध्यानांत धर. ।।४।।

यमी :– खरोखर आपण उभयतां गर्भांत असतांनाच जगत्पित्यानें त्वष्टया देवानें सर्व रूपधर सृष्टिकर्त्या सवित्यानें आपणांस पतिपत्नी करून टाकलें आहे, तर त्या देवांच्या आज्ञा कोणी मोडतात काय? आपण पतिपत्नी आहोंत हे आकाशाला आणि पृथ्वीला देखील माहीत आहे. ।।५।।

यम :– त्या अगदीं पहिल्या दिवसाचें ज्ञान आज कोणाला आहे? ही गोष्ट कोणी पाहिली आहे ? आणि आपण पाहिली असें येथें येऊन कोण सांगतो आहे? 'मित्राचें वरुणाचें तेजोभुवन किती महनीय आहे! तर तरुण पुरुषांना मोहजालांनीं हैराण करणाऱ्या स्त्रिये! ही तूं काय बडबड चालविली आहेस? ।।६।।

यमी :– यमाजवळ एकाच जागीं, एकाच शय्येवर शयन करावें अशी मला यमीला प्रबळ वासना झाली आहे; आणि पतीपुढें जशी पत्नी त्याचप्रमाणें मी आपली काया तुजपुढें उघडी करते तर रथाच्या चक्राप्रमाणें आपण एकमेकांकडे धांव घेऊं चला. ।।७।।

यम :– छी! छी! हें पहा! येथें जे देवांचे दूत वावरत आहेत ते एकाच जागीं उभे राहात नाहींत किंवा झोपहि घेत नाहींत. समजलीस हे कामुक स्त्रिये ! तूं आतां झटदिशीं मला सोडून दुसऱ्या कोणाकडे तरी जा. आणि रथाच्या चक्राप्रमाणें धांवत जाऊन त्याला कडकडून भेट. ।।८।।

यमी :– रात्रीच्या रात्री आणि दिवसचे दिवस एकत्र राहतां येईल अशा रीतीनें याला कुणी तरी माझ्या स्वाधीन करील काय ? सूर्याचा नेत्र वारंवार उघडून पाहील का? पहा! आकाश आणि पृथ्वी हीं भांवडें असूनहि पतिपत्नी झालीं आहेत. तशीच ही यमी देखील यमाचे पत्नीपद धारण करील असें घडो. ।।९।।

यम :– भांवडेंही पतिपत्नी होतील असा काळ पुढें येणारच आहे. पण ह्या वेळीं तरी तूं आपल्या बाहूची उशी दुसऱ्या कोणा वीर्यशाली प्रियकराला अर्पण कर. हे भाग्यशालिनी, माझ्याशिवाय दुसरा कोणीतरी पति असावा अशी इच्छा धर. ॥१०॥

यमी :– ज्याच्यामुळें बहीण अनाथ होते तो भाऊ कशाचा ? आणि अशा रीतीनें जी अधोगतीला जाऊन पोहोंचते ती बहीण तरी कशाची ? मी कामविव्हल झाल्यामुळें हें असें पुष्कळच बहकूं लागलें आहे. तर आतां आपल्या शरीरानें माझ्या शरीराला आलिंगन देच. ॥११॥

यम :– चल चालती हो, तुझ्या शरीराशीं मी आपलें शरीर कदापि भिडविणार नाहीं. या पद्धतीनें जो आपल्या भगिनीकडे जातो त्याला अधमाधम असें म्हणतात. हे सुभगे, मी सोडून दुसऱ्या पुरुषापासून आनंद प्राप्त करून घे. मी तुझा भाऊ या गोष्टीची तुझ्यापासून मुळींच इच्छा करीत नाहीं. ॥१२॥

यमी :– हाय! हाय! तूं खरोखरच यम म्हणजे कृतान्त आहेस. तुझें मन म्हणजे हृदय इतकें कठोर असेल हें मला माहीत नव्हतें. पण आतां काय? गळ्याभोंवती जशी माळा किंवा वृक्षाभोंवती जशी लता तशी दुसरी तरी कोणी स्त्री तुला आलिंगन देवो. ॥१३॥

यम :– हे यमी! तूं देखील आतां दुसऱ्या कोणाला तरी मनापासून वर. म्हणजे तोहि तुला कडकडून भेटेल कीं जणूं वृक्ष व लताच. त्याचें मन तूं ओढून घे. तोहि तुझें घेईल. याप्रमाणें त्या पतीबरोबरच तूं सुखानंदपूर्ण विलास कर. म्हणजे तुझें कल्याण होईल. ॥१४॥

या यमयमी सूक्ताचेंच नीट निरीक्षण केलें तर त्यांतील "जायेव पत्यै तन्वं रिरिच्या" या स्पष्ट उल्लेखावरून ऋग्वेदकाळीं परिणत स्वरूपाची विवाहसंस्था होती हें उघडच होतें. एरवीं ही उपमा येण्याची शक्यताच नाहीं. तसेंच जायापतींच्या बाबतींत जें सहज व्यवहाराचें व धर्म्य आहे तें आपल्या संबंधांत मात्र संकेताप्रमाणें

अधर्म्य व अनीतिकारक आहे याचीहि यमीला पूर्ण जाणीव असल्याचें याच उपमेवरून सिद्ध होतें. जर डांगे म्हणतात तशी वस्तुस्थिति असती तर या उपमेऐवजीं नुसतें स्त्रीपुरुष येवढेच शब्द आले असते व यमाच्या तोंडीं रूढ संकेताविरुद्ध नवा धर्म प्रचारांत आणण्याच्या आवेशाचें सूक्ष्म तरी पदचिन्ह असतें. पण तसें कांहीं अल्पांशानें सुद्धां दिसत नाहीं. हा संघर्ष सूक्तांत नसून समाजांत स्त्री व पुरुष हीं दोनच नातीं असावीं असें सांगणाऱ्या भौतिकवादाचा प्रचार करण्याचें कंकण बांधलेल्या त्यांच्या केवळ मनांत हा संघर्ष आहे. या सूक्तांतील "पापमाहुः यः स्वसारं निगच्छात्" "बहिणीशीं संबंध ठेवणारा पापाची खाणच होय" या स्पष्ट शब्दांवरून बहीण, भाऊ इत्यादि नातीं व दैहिक संबंध हे धर्म व नीतीवर आधारलेले होते हें स्पष्ट दिसतें. याच सूक्तांतील " विषुरुपा, सलक्ष्मा " या स्पष्ट शब्दांनीं विवाहाच्या बाबतींत सगोत्रासारखे नियम अस्तित्वांत आलेले दिसत असून ज्यांच्यासाठीं भारताचे कीर्तिदुन्दुभि जगभर गाजले ती स्त्रीपुरुष संबंधाच्या बाबतींतील संयमशील शुचिर्भूतता व कडक नियंत्रणें अस्तित्वांत येऊन दृढमूल झालीं होतीं हेंही उघडच दिसतें. एरवीं इतक्या सहजपणें हे उल्लेख येण्याची शक्यताच नाहीं. दहाव्या ऋचेंतील "न तिष्ठन्ति न निमिषन्त्येते देवानां स्पश इह ये चरन्ति" "देवांचें हेर जे येथें संचार करितात ते कोठेंहि थांबत नाहींत व डोळेझांक अथवा दुर्लक्ष करीत नाहींत" हा उल्लेख आर्य सुधारणेची ऋग्वेदकालीन परिणति किती श्रेष्ठ होती हें स्पष्ट दाखवून मन आश्चर्यचकित करणारा आहे. समाजांतील संपूर्ण पशुत्व नष्ट होऊन कर्तव्यासाठीं कर्तव्य, चारित्र्यासाठीं चारित्र्य व पावित्र्यासाठीं पावित्र्य स्वाभाविकपणें संभाळलें जाईल इतक्या श्रेष्ठ योग्यतेचा समाजांतील सर्व व्यक्तींचा व्यवहार असावा अशी सर्वच परिणत समाजशास्त्रज्ञांची अपेक्षा असते. पण ऋग्वेदानें सांगितलेल्या सिद्धांताप्रमाणें या बाबतींत शेवटीं "पुलुकामो हि मर्त्यः"

मनुष्य हा वासनांचा पुतळा आहे हीच गोष्ट अनुभवास येऊन माणसांतील पशुप्रवृत्ती उचल खातात. कारण पशुप्रवृत्ति हा स्वभाव आहे व संयमशीलता प्रयत्नानें उत्पन्न करावी लागते. त्यामुळें सामाजिक जीवन दोषरहित करण्यासाठीं समाजांत नियंत्रणें व विधिनियम उत्पन्न करून दंडाच्या धाकानें समाजव्यवस्था निर्दुष्ट राखण्याचे प्रयत्न होत असतात. पण जितकीं जितकीं नियमनें अधिक वाढतात तितकी तितकी गुन्हेगारी करण्याची कलाहि वाढत जाते असा समाजनिरीक्षकांचा अनुभव आहे. बाह्य दंडापेक्षां अपराध करण्याच्या प्रवृत्तीविषयीं स्वभावतःच घृणा वाढेल असें मनाचें पावित्र्य निर्माण करणें व त्या दिशेनें विकसन घडवून आणणें हा एकच यावरील खरा उपाय आहे. पण ही गोष्ट सर्व सामान्य जीवनांत कशी यावी? भारतीय द्रष्टयांनीं यासंबंधांत श्रद्धेचा व ईश्वरनिष्ठेचा विलक्षण तोडगा उत्पन्न करून ही परिस्थिति सामान्य जीवनांतहि शक्य कोटींत आणून दाखविली. जळीं स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं वेगवेगळ्या रूपांनीं सर्वसाक्षी परमेश्वर आपल्या प्रत्येक कृत्याकडे जागरूकतेनें पहात उभा आहे व त्याच्या पासून अज्ञात कांहींहि नसून पित्याची दक्षता व गुरूचें मार्गदर्शन, आईची वत्सलता व प्रभुसत्तेचें अपार सामर्थ्य त्याच्या ठिकाणीं एकवटलेलें आहे ही सश्रद्ध हिंदू अंतःकरणाची तीव्र जाणीव अंधाऱ्या एकांतांतसुद्धां सर्वप्रकारच्या पापापासून व क्षुद्रतेपासून मनुष्याला वांचवून चारित्र्यसंपन्न जीवन हा त्याचा स्वभाव बनवून टाकते. दिवसा एकांतांत, रात्रीच्या घनान्धकारांत कोठेंहि कोणतेंहि कृत्य केलें तरी त्या त्या स्थळकाळांच्या अभिमानी देवतांच्या रूपानें मनुष्यजीवाच्या कल्याणासाठीं सदैव बद्धपरिकर असलेल्या परमेश्वराचा मनुष्यावर जागता पहारा आहे ही जाणीव जशी मनुष्याला सर्वतोपरी शुद्ध राखूं शकते अशी जगाची कोणतीहि दंडशक्ति व कायद्यांचीं पुस्तकें त्याला शुद्ध राखूं शकत नाहींत. म्हणूनच महाभारतकारांनीं म्हटलें आहे. "अहश्च रात्रिश्च उभेच सन्ध्ये धर्मश्च जानाति नरस्य वृत्तम् ॥" दिवसांच्या, रात्रींच्या

उभय काळांतील सन्ध्यांच्या अभिमानी देवता व धर्म म्हणजे मनुष्याच्या प्रत्येक क्रियेच्या मागें असलेली आधिदैविक क्षेत्रांतील अदृश्य देवता मनुष्याचें प्रत्येक कृत्य ओळखून त्याची साक्षीदार बनते. श्रीमद्भागवतांत असा एक प्रसंग आला आहे कीं ऋषि कश्यपाच्या संध्याकाळच्या ऐन संध्यावंदनाच्या वेळीं त्याची पत्नी दिति कामोद्रेकानें त्यांना कुकुर्म करावयास प्रवृत्त करूं लागली. त्या वेळीं त्यांनीं तिला असें उत्तर दिलें कीं, "देवस्त्रिभिः पश्यति देवरस्ते" तुझे दीर भगवान शंकर आपल्या तिन्ही डोळ्यांनीं प्रत्येक मानवी कृत्याकडे पहात संचार करीत आहेत. याची नीट जाणीव मनांत ठेव. ही जी भारतीय संस्कृतीच्या परिणतावस्थेंतील श्रेष्ठ धारणा, तीच ऋग्वेदकालीन आर्य जीवनाचेंहि नियंत्रण करीत होती हें 'न तिष्ठन्ति न निमिषन्त्येते देवानां स्पश इह ये चरन्ति' या शब्दांनीं स्पष्ट होतें. मानवी जीवनाला निर्मळ करणाऱ्या या सांस्कृतिक संकेताचा प्रादुर्भाव ज्या समाजजीवनांत झाला होता, त्या समाजाचें या सूक्तांतील चित्रण याप्रमाणें उघड उघड दिसत असतां डांग्यांच्या साम्यवादी कावीळ झालेल्या दृष्टीला हें दिसूं नये हें आश्चर्य आहे. अथवा आश्चर्य तरी कशाचें? प्रचाराचा होडगा पिऊन तर्र झालेल्या त्यांच्या बुद्धीला तें ग्रहण करावयाचें नाहीं हेंच खरें आहे.

प्रत्यक्ष यमयमी सूक्तावरून काय सिद्ध होतें हें आपण पाहिलें. ऋग्वेदांतील विवाहसंस्था सिद्ध करावयास अवान्तर पुरावे तर कितीतरी आहेत. प्रत्यक्ष द्यूतसूक्तांतील श्वश्रू, जाया, पिता, माता; भ्रातर इत्यादि स्पष्ट शब्दांवरून व "अन्ये जायां परिमृशन्ति" या स्वतःच्या दैन्याच्या द्यूतकारानें केलेल्या करुणास्पद वर्णनावरून आजच्या भारतीय संस्कृतींतील कौटुंबिक नीतिसंकेतांची व सामाजिक नीतिसंकेतांची स्त्रीपुरुषसंबंधाच्या भारतीय संस्कृतीच्या परिणतावस्थेंतील कल्पनांची व सिद्धान्तांची निर्मिति ऋग्वेदकाळाच्या शतावधि वर्षें पूर्वींच झाली असून ऋग्वेदीय

जीवन या सिद्ध धारणांच्या वातावरणांतच वावरत होतें हें उघड होतें. ऋग्वेदांतील विवाहसूक्त पाहण्यासारखें आहे. पतिपत्नी संबंध, एका घरांतून दुसऱ्या घरीं जाणें व मातृत्वांत स्त्रीजीवनाची परिणति असणें या कल्पनांबरोबरच प्रत्यक्ष पाणिग्रहणाचा विधि आणि विवाह हा केवळ शरीरसुखासाठीं नसून गार्हपत्यासाठीं आहे व योग्यकाळीं त्यांतून निवृत्त होऊन जीवनाचें श्रेष्ठ ध्येय हस्तगत करण्यासाठीं वैराग्य धारण करणें व प्रत्यक्ष पतीलाहि कामगन्धहीन वात्सल्यानें संभाळण्यांतच अंतरंगाची परिणति होणें ह्यांतच स्त्रीजीवनाचें खरें साफल्य आहे हेहि आर्य विवाहसंस्थेचे श्रेष्ठ सिद्धान्त ऋग्वेदांत स्पष्ट शब्दांत आढळतात. पुढील कांहीं प्रत्यक्ष मन्त्रच पहा. नवपरिणीत दांपत्याला आशीर्वाद देतांना ऋग्वेद म्हणतो (मंडळ १० सूक्त ८५ ):—

"इह प्रियं प्रजया ते समृध्यतामस्मिन्गृहे गार्हपत्याय जागृहि। एना पत्या तन्वं संसृजस्वाधाजिव्री विदथमावदाथः ॥२७॥

"हे वधू! येथें तुला संतति होऊन तुझें प्रिय होवो. सदैव जागरूक राहून गार्हपत्याग्नीचें संरक्षण करणें हें तुझें कर्तव्य आहे. या पतीबरोबर तूं शरीरानें एक हो. तुम्ही दोघे जण वृद्धपणींहि या घरांत एकमेकाशीं मिळून रहा व प्रेमानें बोला."

वधूवरांची वरात चालली असतांना आजच्याप्रमाणेंच त्यावेळींहि प्रेक्षक जमत. असा एक प्रेक्षक आपल्या बरोबरीच्या लोकांस म्हणतो आहे:-

"सुमंगलीरियं वधूरिमां समेत पश्यत। सौभाग्यमस्मै दत्त्वा-याथास्तं वि परेतन॥ ३३ ॥

ही सुमंगल वधू हिला येऊन पहा. व हिला सौभाग्याचा आशीर्वाद देऊन आपापल्या घरीं जा.

पाणिग्रहण करतांना पतीच्या तोंडी ऋग्वेदानें जे उद्गार घातले आहेत त्यावरून विवाहाविषयीं केवढ्या उदात्त कल्पना ऋग्वेदीय जीवनांत आढळतात याची कल्पना येते.

"गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या जरदष्टिर्यथासः । भगो अर्यमा सविता पुरन्धिर्मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवाः ॥३६॥

"मी तुझ्या हस्ताचें सौभाग्यासाठीं ग्रहण करतों. मज पतीबरोबर तूं वृद्ध होईपर्यंत अस. भग, अर्यमा, सविता, पुरन्धि (उषा) या देवतांनी मला गार्हपत्य प्राप्त व्हावें म्हणून तुला माझ्या स्वाधीन केली आहे.

नवपरिणीत दांपत्यानें गृहप्रवेश केल्यानंतर त्यांचें स्वागत पुढील शब्दांनीं केलें जातें:–

इहैव स्तं मा वियौष्टं विश्वमायुर्व्यश्नूतम् । क्रीळन्तौ पुत्रैर्नप्तृभिः मोदमानौ स्वे गृहे ॥ ४२ ॥

तुम्हीं दोघेजण येथें असा. तुमचा वियोग न होवो. तुम्ही दीर्घायू व्हा आणि पुत्रपौत्रांसह आपल्या घरीं आनंदानें क्रीडा करा.

वधूला देण्यांत येणारा हा आशीर्वाद पहा:––

"इमां त्वमिन्द्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु । दशास्यां पुत्रानाधेहि पतिमेकादशं कृधि । (ऋ. १०. ८५–४५)

हे इन्द्रा, तूं हिला पुत्रवती आणि भाग्यवती कर. दहा पुत्र झाल्यावर ही आपल्या पतीलाच अकरावा पुत्र मानील असें कर.

आदर्श गृहजीवन कसें असावें याचे अथर्ववेदांतील वर्णन विचार करण्यासारखें आहे. या वर्णनाइतकी उदात्त कल्पना व कौटुंबिक जीवनाचें याहून अधिक हृदयंगम वर्णन जगांतील कोणत्याहि वाङमयांत दाखविता येण्यासारखें नाहीं. अथर्ववेदाच्या तिसऱ्या कांडांतील तिसाव्या सूक्तांतील पहिल्याच या ऋचा या दृष्टीनें पहाण्यासारख्या आहेत. त्या अशा:–

अनुव्रतः पितुः पुत्रो मात्रा भवतु संमनाः ॥
जाया पत्ये मधुमतीं वाचं वदतु शन्तिवाम् ॥२
मा भ्राता भ्रातरं द्विक्षन्मा स्वसारमुत स्वसा ।
सम्यञ्चः सव्रता भूत्वा वाचं वदत भद्रया ॥३

सहृदयं सांमनस्यमविद्वेषं कृणोमि वः ।
अन्यो अन्यमभि हर्यत वत्सं जातमिवाघ्न्या ॥१॥

" पित्याला अनुव्रत (अनुकूल) व मातेशीं समानमनस्क असा पुत्र असूं दे. भार्या पतीशीं मधुर सुखदायक अशा वाणीनें बोलूं दे. २.

भावानें भावाचा द्वेष करूं नये, त्याचप्रमाणें बहिणीनें बहिणीशीं दावा मांडूं नये, त्या सर्वांनीं एकामेकांशीं संमन व सव्रत होऊन चांगलें गोड (भद्र) बोलावें. ३.

मी तुम्हाला अविद्वेषी, समानचित्तवृत्ति व प्रीतियुक्त असें करतों. गाय जशी आपल्या वत्सावर प्रीति करते, त्याप्रमाणें तुम्हीं एकामेकांवर प्रीति करीत जा. १.

या वर्णनावरून आर्यांची विवाहसंस्था, ऋग्वेद काळींच परिणतावस्थेस पोचली होती व आजची आदर्श भारतीय विवाह संस्था हा तिचाच आविष्कार होय हें दिसून येईल. अशा या श्रेष्ठ विवाह संस्थेचें अस्तित्व असलेल्या लोकांच्या जीवनाचा विचार करतांना त्यांच्या वाङ्मयाविषयीं सिद्धांत बांधण्याच्या प्रांजल दृष्टीचाच अंगीकार करणें किती अवश्य आहे हें स्पष्ट होतें.

कॉ. डांगे यांच्या हास्यास्पद उपपत्ति त्यांच्या अंगलट येणाऱ्या आहेत. मार्क्सच्या इतिहासप्रक्रियेच्या साच्यांत मी सारा इतिहास बसवून दाखवितों असें म्हणून ग्रंथलेखनासाठीं ते बद्धपरिकर झाले. त्यासाठीं खोटे पुरावे तयार करणें, नसत्या गोष्टींची दडपेगिरी करणें, वचनांची फिरवाफिरव करणें, संदर्भहीन उतारे देऊन भरपूर प्रमाणें दिल्याचा आभास निर्माण करणें, ठोकून देतो ऐसा जे च्या स्वरूपाचीं विधानें जोरदारपणें करणें इत्यादि सर्व प्रकारच्या साम्यवादानें पुरस्कारिलेल्या वाममार्गांचा अवलंब करून त्यांनीं आपला "India from Primitive Communism to Slavery" हा ग्रंथ लिहिला. पण भारतीय इतिहासच इतका तेजस्वी आहे व मार्क्सची इतिहासप्रक्रियाच इतकी एकांतिक, मानवी भावनांचा अपमान करणारी व मिथ्या आहे कीं डांगे यांचा प्रयत्न पूर्णपणें

फसला. माझ्या महाभारत व श्रीकृष्णावरील या पूर्वीच्या ग्रंथांतून मी त्यांच्या सर्व मतांचें उत्तर देऊन त्यांची विकृत व दडपेगिरीची प्रवृत्ति विस्तारपूर्वक दाखवून दिली आहे. केवळ वेदाशीं संबद्ध अशा त्यांच्या खोट्या व निरर्गल प्रतिपादनाचें स्वरूप मला त्या ग्रंथामधून, त्यांतील प्रतिपाद्य विषयांच्या भिन्नतेमुळें दाखवितां आलें नाहीं. प्रस्तुत ग्रंथ वेदावरीलच असल्यामुळें तें राहिलेलें मी येथें या विवेचनानें पूर्ण केलें आहे. डांगे हे या बाबतींत पूर्ण फसले. लेनिन व स्टॅलिनचे आत्मे जर स्वर्गांत गेले असतील ( ते स्वराष्ट्रोद्धारक असल्यामुळें स्वर्गांतच गेले असतील यांत मला संशय नाहीं, पण डांगे कांहीं स्वर्ग मानीत नाहींत) तर तेथून आपल्या या एकनिष्ठ अनुयायाचा हा कीलोत्पाटी प्रयत्न (Save me from my friends) असें त्यांना खात्रीनें म्हणावयास लावील. हल्ली रशियन भाषेंत भारतीय वाङ्मयाचे अनुवाद करण्याचे प्रयत्न चालू आहेत त्यावरून भारतीय वाङ्मयाविषयींची योग्य ती कल्पना घेऊन आपल्या प्रचारकानें उगाच भारतीय इतिहासाच्या हिमाचलाशीं टक्कर घेऊन आपल्या इतिहासप्रक्रियेचेच वाभाडे काढले आहेत हें रशियन तत्त्वज्ञांच्याहि ध्यानांत आल्याशिवाय राहाणार नाहीं.

वेद व संस्कृत वाङ्मयाचे तज्ज्ञ म्हणून डांगे यांचें स्थान मुळींच महत्त्वाचें नसतांना मी त्यांना इतकें महत्त्व कां देतो अथवा आतांपर्यंत दिलें आहे असें माझ्या पुष्कळ मित्रांनीं व माझ्या व्याख्यानमालेच्या कांहीं विचक्षण श्रोत्यांनीं व ग्रंथांच्या वाचकांनीं मला वारंवार विचारलें आहे. पण डांगे हे कोणी मोठे तज्ज्ञ आहेत म्हणून मी त्यांच्याविषयीं एवढा प्रपंच मुळींच केला नाहीं. भारतांतील एका संघटित राजकीय पक्षाचे ते अधिकृत नेते आहेत. त्या पक्षाच्या अभ्यासमंडळांतून त्यांच्या या पुस्तकाचा व त्यांतील प्रतिपादनाचा पद्धतशीर अभ्यास व प्रचार होतो व मुळांत भारतीय वाङ्मयाचा अभ्यास नसलेले पण भारतीय संस्कृतीचे व राष्ट्रवादाचे अभिमानी अशांची अशा प्रचारकांशीं गांठ पडली कीं ते संभ्रमांत

सांपडतात याचा मला माझ्या भारतांतील ठिकठिकाणच्या दौऱ्यांत नेहमींच अनुभव येतो. त्यामुळें "जितं मया" ही साम्यवादी रग कशी फसफशीत आहे हें दाखविणें आवश्यक ठरतें. बुद्धिपुरस्सर चालू असलेल्या या हल्ल्याची ही विषदिग्धता ध्यानांत घेऊन त्याकडे दुर्लक्ष करणें अनुचित व विघातक ठरतें. म्हणूनच मी त्यांचा हल्ला व प्रतिपादन यांचें भोंगळ, मिथ्या दुष्ट व विकृत स्वरूप स्पष्ट केलें आहे.

यमयमी सूक्तांतील यमाचें हें दृढनिश्चयी व शीलसंपन्न चित्र पाहिलें कीं स्वर्गीय उर्वशीला नाकारणाऱ्या व स्वर्गहि आपल्या शीलसौन्दर्यानें प्रकाशित करणाऱ्या महाभारतांतील धनुर्धर अर्जुनाची आठवण झाल्याविना रहात नाहीं. यमाच्या पावित्र्याचें स्मरण व त्यानें आपल्या बहिणीशीं केलेल्या वर्तनांतून दिग्दर्शित होणारा बहीणभावांचा सुमधुर संबंध याची आठवण आजहि आपण भाऊबीजेच्या रूपानें करीत असतों. वैदिक जीवनाचें नैतिक स्वरूप हें असें आहे.

वैदिकांचा तेजस्वी जीवनवाद व त्यांची ही नैतिक धारणा यांचा विचार केला तर रसिक पण संयमी, सौन्दर्याचा आस्वाद घेणारे पण स्वाधीनतेनें सर्व उपभोगप्रवृत्ती स्वतःच्या नियंत्रणाधीन ठेवणारे, शूर, शीलधन, विजिगीषु, नीतिसंपन्न, ईश्वरभक्त कोणासमोरहि न वाकणारे पण स्वप्नांतहि पावित्र्याची कास न सोडणारे अशा प्रकारचे श्रेष्ठ व अंतःकरणांतूनच पापाची घृणा असलेले सदाचारसंपन्न असे ते लोक होते असें प्रत्ययास येतें. बुद्ध व जैनांच्या भारतीय संस्कृतींत उत्पन्न झालेल्या विकृतीनंतर दोन अतिरेकी प्रवृत्ति समाजजीवनांत उत्पन्न झाल्या व त्या आजहि तशाच नांदत आहेत. त्या प्रवृत्ति म्हणजे एक भोगप्रधान पशुत्ववृत्ति कीं जिच्या वासनांना अविषय असा नाहींच. व वैयक्तिक भीतीविना दुसरें कसलेंहि नियंत्रण असें नाहींच. व दुसरी प्रवृत्ति म्हणजे जीवन म्हणजे एक महान् संकट असून तें

कसें तरी कष्टांत संपविणें व निराशावादानें सर्व जगाकडे पहात जगांतील सर्व सरस सौंदर्याचा तिटकारा करीत सुटणें. या दोन्हीहि एकेका टोकाच्या विकृतीच होत. भारतीयांचें आदर्श सांस्कृतिक जीवन म्हणजे इहलौकिक व पारलौकिक आध्यात्मिक व बाह्य अशा सर्व प्रवृत्तींना पुरवून व स्वाधीनतेनें जगाच्या व्यवहारांत राहूनहि "पद्मपत्रमिवाम्भसा" असें स्वतःला टिकवून धरणें होय. वैराग्य व सौंदर्यवाद, नीति व उपभोग या दोहोंचेहि आदर्श भारतीय जीवनांत उत्कृष्ट संमीलित झाले आहेत. रामायणांतील प्रजांच्या जीवनाचें जें हृदयंगम वर्णन महर्षि वाल्मीकींनीं केलेलें आहे तेंच जसेंच्या तसें वैदिक जीवनालाहि लागू पडते हें आर्यांचा जीवनवाद व त्यांच्या नैतिक धारणा यांचें येथें जें विशदीकरण केलेलें आहे त्यावरून आढळून येईल. तें वर्णन असें:–

" तस्मिन्पुरवरे दृष्टाः धर्मात्मानो बहुश्रुताः ।
नरास्तुष्टाः धनैः स्वैः स्वैरलुब्धाः सत्यवादिनः ॥ ३ ॥
नाल्पसन्निचयः कश्चिदासीत्तस्मिन्पुरोत्तमे ।
कुटुम्बीयो ह्यसिद्धार्थो गवाश्वधनधान्यवान् ॥ ७ ॥
कामी वा न कदर्यो वा नृशंसः पुरुषः क्वचित् ।
द्रष्टुं शक्यमयोध्यायां नाविद्वान् न च नास्तिकः ॥ ८ ॥
सर्वे नराश्च नार्यश्च धर्मशीलाः सुसंयताः ॥
मुदिताः शीलवृत्ताभ्यां महर्षय इवामलाः ॥ ९ ॥
नाकुण्डली नामुकुटी नास्रग्वी नाल्पभोगवान् ।
नामृष्टो न नलिप्तांगो नासुगंधश्च विद्यते ॥ १० ॥
नामृष्टभोजी नादाता नाप्यनंगदनिष्कधृक् ।
नाहस्ताभरणो वापि दृश्यते नाप्यनात्मवान् ॥ ११ ॥
नानाहिताग्निर्नायज्वा न क्षुद्रो वा न तस्करः ।
कश्चिदासीदयोध्यायां न चावृत्तो न संकरः ॥ १२ ॥
स्वकर्मनिरता नित्यं ब्राह्मणा विजितेन्द्रियाः
दानाध्ययनशीलाश्च संयताश्च प्रतिग्रहे ॥ १३ ॥

नास्तिको नानृती वापि न कश्चिदबहुश्रुतः ।
नासूयको नचाशक्तो नाविद्वान् विद्यते क्वचित् ।। १४।।
नाषडंगविदत्रास्ति नाव्रतो नाबहुश्रुतः ।
न दीनः क्षिप्तचित्तो वा व्यथितो वापि कश्चन ।। १५ ।।
कश्चिन्नरो न नारी वा नाश्रीमान् नाप्यरूपवान् ।
द्रष्टुं शक्यमयोध्यायां नापि राजन्यभक्तिमान् ।। १६ ।।
वर्णेष्वग्रचचतुर्थेषु देवतातिथिपूजकाः ।
कृतज्ञाश्च वदान्याश्च शूरा विक्रमसंयुताः ।। १७ ।।
दीर्घायुषो नराः सर्वे धर्मं सत्यं च संश्रिताः ।
सहिताः पुत्रपौत्रैश्च नित्यं स्त्रीभिः पुरोत्तमे ।। १८ ।।

वा. रामायण, बालकाण्ड स. ६

त्या नगरींत आनंदी, धर्मात्मे, बहुश्रुत, आपल्या धनावर संतुष्ट असलेले, दुसऱ्याच्या धनाचा यत्किंचितहि लोभ अंतःकरणांत नसलेले, सत्यवादी असे लोक नांदत होते. ज्याचा धनसंग्रह कमी आहे व ज्याच्या आकांक्षा सफळ झालेल्या नाहींत असा तेथें कोणीहि नव्हता. सर्वांचेंच कौटुंबिक जीवन गाई, अश्व, धनधान्य यांनीं संपन्न होतें. तेथें कोणीहि वासनांचा गुलाम, कवडीचुंबक, नृशंस, नास्तिक व मूर्ख पहावयासहि मिळूं शकत नव्हता. सर्वच स्त्रीपुरुष धर्मशील, संयमी, आनंदी, शीलचारित्र्यसंपन्न असून त्यांच्या विशुद्ध जीवनाला महर्षींच्या विशुद्ध जीवनाचीच उपमा शोभली असती. कुंडलें धारण न करणारा, मस्तकावर मुकुट न ल्यालेला, गळ्यांत सुगंधी पुष्पांची माळ नसलेला, अल्प भोग मिळत असलेला, पोटभर खायला न मिळणारा, अंगराग अंगाला न लावणारा, सुंगधी द्रव्यांचा वापर करीत नसलेला, हातांत वा अंगावर सुवर्णालंकार नसणारा, दानप्रवृत्ति नसलेला व मन ताब्यांत नसलेला, विहित अग्निपूजा न करणारा, यज्ञ न करणारा, क्षुद्र मनोवृत्तीचा, चोर, लुबरा व जीवनांत संकर असलेला असा पुरुष तेथें दृष्टीसहि पडणें अशक्य होतें. तेथील ब्राह्मण स्वकर्मांत रमलेले, जितेंद्रिय,

दानी, ज्ञानोपासनेंत निमग्न व संयमशील प्रवृत्तीचे होते. नास्तिक, मिथ्याभाषी, मत्सरी, अशक्त, षडंग वेदांचें ज्ञान नसलेला, व्रताचरण न करणारा, दीन, चंचल मनोवृत्तीचा, दुःखी शोभिवंत न वाटणारा, ओंगळ चेहऱ्याचा तेथें कोणीहि नव्हता. सारे लोक सश्रद्ध अंतःकरणाचे, देवता व अतिथींचे पूजक असणारे, कृतज्ञ, दानशूर, पराक्रमसंपन्न, दीर्घायुषी, सत्यनिष्ठ, धर्मनिष्ठ असे असून त्यांचें पुत्रपौत्रांनीं भरलेलें जीवन मोठें आकर्षक असे."

हें रामायणांतील वर्णन जसेंच्या तसें ऋग्वेदांतील जीवनाला लागू पडतें. मनस्तत्त्वाच्या विकसनानें, धार्मिक जाणिवेच्या प्रखर दीप्तीनें व परमेश्वराविषयींच्या प्रगाढ श्रद्धेनें भौतिक सुखवादाला नियंत्रित करावयाचें व जीवनाविषयींच्या कलात्मक आसक्तीनें, विकृत आध्यात्मिकतेला थारा द्यावयाचा नाहीं असें हें वैदिक लोकजीवनाचें सुंदर स्वरूप आहे. संपूर्ण जग चैतन्यानें रसरसलेलें आहे अशी त्यांची धारणा असल्यामुळें त्यांचें जीवन धर्मबुद्धीच्या वैराग्याची गंगा व कलात्मक जीवनोपभोगाची यमुना यांचें हृदयंगम संगमस्थान बनलें आहे. जीवनांतील हें मनोहर संतुलन, संस्कारित व्यक्तिजीवन निर्माण झाल्याशिवाय होऊं शकत नाहीं. व हें संस्कारित जीवन विकसितशिक्षणप्रणालीविना निर्माण होणें शक्य नसल्यामुळें वैदिक राष्ट्राची शिक्षणप्रणालि काय होती तें पाहणें अवश्य आहे सामाजिक व वैयक्तिक जीवनाचा स्तर श्रेष्ठ करून आदर्श अशा या द्विविध जीवनमंदिराची उभारणी उत्कृष्ट शिक्षणप्रणालीच्या द्वारें या मंदिराची भक्कम पायाभरणी केल्याविना निर्माण होण्याची शक्यताच नाहीं. ती कशी होती तें पुढच्या व्याख्यानांत पाहूं.

## व्याख्यान नववें

# वैदिक राष्ट्राची शिक्षणपद्धति

विश्वाचें गुरुत्व संपादन केलेल्या भारताची पहिल्यापासून शीलासाठीं प्रसिद्धि आहे. आमच्या पूर्वजांना आपल्या राष्ट्रांतील नेतृत्वाच्या चारित्र्यासंबंधीं प्रथमपासूनच इतका दृढ विश्वास व आत्मप्रत्यय आहे कीं देशासंबंधीं गौरवास्पद उद्गार काढतांना मनूनें म्हटलें आहे :-

एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः।
स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः॥

(जगांतील सर्व मानवांनीं या देशांत उत्पन्न झालेल्या नेत्यांचें जीवन पाहून स्वतःचें जीवन तसेंच चारित्र्यसंपन्न व आदर्श बनवावें.) वेदांतील उद्गारांवरून वेदकालीन राष्ट्राचें चारित्र्य व नीतिमत्ता कशी होती याचा आपण मागोवा घेतला आहे. वैदिक लोकांच्या या आकांक्षा असल्या तरी प्रत्यक्षांत तशी वस्तुस्थिति होती याला पुरावा काय असा एक प्रश्न विचारण्यांत येण्याची शक्यता आहे. पण त्याला माझें उत्तर असें आहे कीं वैदिक वस्तुस्थितीचें ज्ञान करून घ्यावयास वेदांवांचून दुसरा कोणताहि पुरावा असण्याची शक्यताच नाहीं. व तोच सर्वश्रेष्ठ पुरावा वैदिकांचा हीनपणा दाखविण्यासाठीं हृदयशून्यपणें उपयोगांत आणण्यांत येतो तर वैदिक राष्ट्राची श्रेष्ठता ही निर्विवादपणें त्या पुराव्यावरूनच सिद्ध होत असतां ती ग्रहण न करण्याचा न्यूनगंड कां दर्शवावा? भारतवर्षाच्या पुढच्या इतिहासांत बाहेरून या देशांत आलेल्या प्रवाशांचे भारतासंबंधीं उद्गार पाहिले तर देदीप्यमान चारित्र्य-संपन्नता या देशांत नांदत होती असें सिद्ध होतें. हे बाहेरचे व स्वाभाविक शत्रू असणारे प्रवासी ज्या लोकांच्या आदर्श जीवनावर

मुग्ध झाले ते सारे वेदावर आत्यंतिक श्रद्धा ठेवणारे लोक होते. त्यांच्या जीवनाची घडण वेदानेंच बनविलेली होती व म्हणून प्रत्यक्ष वेदांत यासंबंधीं जे तळमळीचे उद्‌गार आढळतात त्यावरून तें राष्ट्र व तदुत्तरकालीन भारतीय राष्ट्राप्रमाणेंच देदीप्यमान चारित्र्याचें व तेजस्वी शीलाचें होतें हें स्पष्ट आहे. चौदाव्या शतकापर्यंत परकीय प्रवाशांच्या साक्षी जर पाहिल्या तर मन अभिमानानें भरून आल्याशिवाय राहात नाहीं. भारतांत पांडित्यापेक्षां व शौर्य, संपत्ति इत्यादि सर्वच गोष्टीपेक्षां शीलाला अतोनात महत्त्व असे. मनूनें म्हटलें आहे, कीं–

"सावित्रीमात्रसारोऽपि वरं विप्रः सुयन्त्रितः।
नायंत्रितस्त्रिवेदोऽपि सर्वाशी सर्वविक्रयी॥

–( मनुस्मृति २-११८ )

(केवळ गायत्री मंत्र शिकलेला सच्छील ब्राह्मण संपूर्ण वेदविद्येंत पारंगत असलेल्या दुराचारी ब्राह्मणापेक्षां शतपटीनें श्रेष्ठ होय.) मनूनें तर शेवटीं असेंही बजाविलें आहे कीं शीलभ्रष्ट माणसास वेदाध्ययन, यज्ञयाग, दानधर्म वगैरेचा काडीमात्र उपयोग नसून चारित्र्य व सद्वर्तन यांनींच मोक्ष मिळतो. भारत काय होतें यासंबंधीं परकीय लोकांच्या साक्षी या दृष्टीनें पाहण्यासारख्या आहेत.

### भारतीय शीलाबद्दल परकीयांच्या साक्षी

भारतासंबंधीं लिहिणाऱ्या परकीय लेखकांत चंद्रगुप्त मौर्याच्या राजसभेंत ग्रीकांचा वकील म्हणून नांदलेला मेगॅस्थेनीस सर्वांत प्राचीन होय. हा मेगॅस्थेनीस ज्या वेळीं चंद्रगुप्त मौर्याच्या दरबारीं होता त्या वेळीं ग्रीक व हिंदु यांचे संबंध मोठेसे चांगले नसून ग्रीक हे हिंदूंचे वैरी व प्रतिस्पर्धी होते. त्यामुळें शत्रुराष्ट्राच्या प्रतिनिधींची साक्ष या नात्यानें मेगॅस्थेनीसच्या म्हणण्याला विशेष महत्त्व आहे. हिंदूंच्या चारित्र्यासंबंधीं लिहितांना तो म्हणतो : "सत्य व सद्‌गुण यांचे हिंदू लोक मोठे चाहते आहेत. एकाहि हिंदूला

खोटें बोलण्याबद्दल शिक्षा झालेली नाहीं. कज्जेदलाली हिंदुस्थानांत बिलकूल नाहीं. विश्वासानें ठेव ठेवतेवेळीं साक्षीदार व मोहोर यांची आवश्यकता नसते. कारण एकमेकांचा एकमेकावर चांगला विश्वास असतो. हिंदुलोक घरांनाही सामान्यतः कडीकुलपें लावीत नाहींत." यानंतर सातव्या शतकांत भारतांत आलेल्या युवान चोआंग या चिनी प्रवाशानें हिंदुस्थानांतल्या लोकांसंबंधीं काढलेले उद्‌गार पाहण्यासारखे आहेत. तो निरनिराळ्या प्रांतांत स्वतः हिंडला होता. व निरनिराळ्या प्रांतांतील लोकांच्या बारीकसारीक गुणदोषांचेंहि त्यानें उत्तम निरीक्षण केलें होतें. हिंदुस्थानांतील हिंदु लोक वैदिक धर्माचे म्हणजे युवान् च्वांगच्या धर्माचे प्रतिपक्षी होते. तरीहि त्यांच्यासंबंधीं तो म्हणतो "हिंदु लोक स्वभावानें चंचल पण चारित्र्यानें सच्छील आहेत. अन्यायानें ते कशाचाच अपहार करीत नाहींत. योग्य असेल त्यापेक्षां अधिकच ते आपल्या प्रतिपक्षीयांस देतात. कपटानें ते कधींहि वागत नाहींत. व आपलें वचन ते नेहमी पाळतात." नवव्या शतकांत हिंदुस्थानांत आलेला एक अरबी व्यापारी "अल् इद् रिसी" यानें हिंदु लोकांसंबंधीं असें म्हटलें आहे कीं "न्यायानें वागण्याची हिंदु लोकांची स्वाभाविक प्रवृत्ति असते. व त्यांची वर्तणूक तदनुसार असते. सद्धेतु व प्रामाणिकपणा याबद्दल त्यांची फार प्रसिद्धि आहे. त्यामुळें व्यापाराकरितां त्यांच्या देशामध्यें चोहोंकडले लोक येतात व त्यांची भरभराट होते." तेराव्या शतकांतील हिंदुस्थानच्या स्थितीबद्दल मार्कोपोलो नांवाच्या इटालियन प्रवाशानें असे उद्‌गार काढले आहेत कीं, "या ब्राह्मण व्यापाऱ्यांसारखी नीति व सचोटी इतर कोठेंहि सांपडण्याची शक्यता नाहीं. कारण कशाचेंहि आमिष दाखविलें तरी ते कधींच खोटें बोलत नाहींत. जर एखाद्या परदेशी व्यापाऱ्यानें त्यांच्याजवळ आपला माल विक्रीस ठेवला तर ते त्यास शक्य तितका फायदा होईल अशी काळजी घेऊन तो विकून टाकतात. व आलेले पैसे त्याचे त्यास परत करतात. आपलें कमिशनही ते आपण होऊन मागत नाहींत. तो स्वखुषीनें जें

कांहीं देईल त्यावर ते संतुष्ट असतात." चौदाव्या शतकांतील "इब्न बतूता" नांवाच्या व्यापाऱ्यानेंहि भारतीय लोकांसंबंधीं या पद्धतीची माहिती दिली आहे.

या पद्धतीचें चारित्र्यसंपन्न राष्ट्र निर्माण व्हावयास त्या राष्ट्रावर शतकांनुशतकें श्रेष्ठ जीवनाचे संस्कार होण्याची आवश्यकता असते. भारतीय द्रष्टयांनीं भारतीय जीवनाची मांडणी आश्रम-पद्धतीनें केलेली असून श्रेष्ठ संस्कार उमटविणारें शिक्षण पहिल्या आश्रमांत देण्याची व्यवस्था असे. भारतीय मनुष्य अथवा वैदिक मनुष्य हा यज्ञप्रकृतिक आहे. जीवन हा एक महान यज्ञ असून विश्व-रूप होण्याची श्रेष्ठ धारणा निर्माण होण्यासाठीं जीवन व त्यांतील सर्व कांहीं समर्पण करावयाचें आहे अशा धारणेनेंच त्या जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन निर्माण करण्यांत येई. शंभर वर्षांच्या आयुष्यापैकीं पहिला भाग या समर्पणासाठीं आवश्यक तो जीवन-विकास घडवून आणण्यासाठीं खर्ची करण्यांत येत असे. यालाच ब्रह्मचर्याश्रम असें म्हणतात. यानंतर आयुष्याचा दुसरा भाग गृहस्थाश्रमाचा असे व तो आश्रम समाजधारणेला आवश्यक अशा दृष्टिकोनानें उभारलेला आहे. तिसरा भाग वानप्रस्थाश्रम असून त्यांत जीवनाचें ध्येय प्राप्त करून घेण्यासाठीं आवश्यक ती शारीरिक व मानसिक सिद्धता तपश्चर्येच्या द्वारें करावयाची असे. व चौथा भाग श्रेष्ठ ब्रह्मधारणा निर्माण करून जीवनाची इतिकर्तव्यता अनुभविण्याचा असे. या जीवनाच्या चारहि विभागांपैकीं श्रेष्ठ जीवनाचा पाया घालण्याच्या दृष्टीनें पहिल्या भागाचें अतोनात महत्त्व आहे. चौदाव्या शतकापर्यंत ज्याचें कीर्तिगान त्याचीं शत्रु-राष्ट्रेंहि मुक्तकंठानें गात त्या राष्ट्राच्या श्रेष्ठ जीवनाचा पाया या पहिल्या भागांतच संस्कारसंपन्न शिक्षणपद्धतीनें सिद्ध होत असे. राष्ट्र चारित्र्यसंपन्न व श्रेष्ठ धारणेचें निर्माण करावयाचें म्हणजे त्यांतील प्रत्येक व्यक्ति ही त्या पद्धतीची बनवावयाची असाच त्याचा खरा अर्थ आहे. जर व्यक्तिविकसन व व्यक्ति निर्माण करण्याचीं सूत्रें सोडलीं तर श्रेष्ठ धारणेचें राष्ट्र प्रत्यक्षांत कधींहि निर्माण होऊं

शकत नाहीं. वैदिक शिक्षणशास्त्रज्ञांच्या ध्यानांत ही गोष्ट केव्हांच आली होती व त्या दिशेनेंच त्यांनीं आपली शिक्षणपद्धति उभारली होती. शिक्षण घेण्याच्या ह्या काळालाच ब्रह्मचर्याश्रम असें म्हणतात. शीलसंवर्धन, उत्तम गुणांचा परिपोष, व्यक्तित्वाचें विकसन (Development of personatity) कर्तव्यासाठीं कर्तव्य या भावनेची जोपासना अथवा कर्तव्यपरायणता व प्राचीन संस्कृतीचें संरक्षण हीं प्राचीन शिक्षणपद्धतीचीं अथवा वैदिक शिक्षणपद्धतीचीं उद्दिष्टें होत. शिक्षण व संस्कार करणें हा भाग इतर देशांतील शिक्षणपद्धतींतून अथवा इतर समाजांतील समाजशास्त्रज्ञांकडून केवळ व्यावहारिक व सामाजिक स्वरूपाचा मानण्यांत येतो. फक्त अतीन्द्रिय सृष्टीशीं संबंध ठेवणाऱ्या तंत्रांनाच ते धर्म असें समजतात. पण वैदिक पद्धतींत जीवन हाच एक यज्ञ समजत असल्यामुळें जीवनाच्या पहिल्या श्वासापासून तों अंतिम श्वासापर्यंत प्रत्येक गोष्ट येथें धर्माच्या नियंत्रणानें नियंत्रित व परमेश्वरी सामर्थ्याच्या जाणीवेनें भारलेली आहे. त्यामुळें पूर्वींच्या वैदिक व नंतरच्या भारतीय समाजव्यवस्थेमध्यें शिक्षण ही एक सामाजिक गोष्ट मानलेली नसून तो एक संस्कार अथवा धार्मिक स्वरूपाचा आचार मानलेला आहे. मनुष्यप्राणी सामान्यतः परमेश्वराला विसरतो व उच्छृंखलतेकडे त्याची स्वाभाविक प्रवृत्ति असते; याची जाणीव वैदिक धर्मप्रवर्तकांना पूर्णपणें असल्यामुळें मनुष्यानें परमेश्वराचें वारंवार कृतज्ञतापूर्वक स्मरण करावें व कर्तव्यबुद्धीनेंच जीवन घडविणारे संस्कार, अंतःकरणाचीं सारीं दारें उघडून स्वतःवर घडवून घ्यावे यासाठीं त्यांनीं त्याला शुद्ध धार्मिक स्वरूप दिलें. ब्रह्मचर्याश्रमाचा प्रारंभ म्हणजेच शिक्षण घेण्याच्या कार्यक्रमाचा प्रारंभ, म्हणून उपनयन संस्काराच्या धार्मिक विधीनें होत असे. उपनयन म्हणजे गुरूच्या जवळ नेणें. गुरूच्या जवळ विद्यार्थी गेल्यावर त्याच्या आज्ञेनें आपल्या हातांतील समिधेचा अग्नीमध्यें होम करून शिष्य ब्रह्मचर्य व्रताची दीक्षा घेई. विद्या ग्रहण करतांना शीलाची इतकी

अपेक्षा असे कीं उपनयन कोणाचें करावें हें सांगतांना आपस्तंवानें म्हटलें आहे, ' अदुष्टकर्मणां उपनयनम् , ( आपस्तंब गृहसूत्र-१-१-५ ) निरुक्त ग्रंथांतहि विद्यादेवतेच्या तोंडीं पुढील महत्त्वाचें वाक्य घातलें आहे. " विद्या ह वै ब्राह्मणमाजगाम गोपाय मा शेवधिष्टेऽहमस्मि । असूयकाया नृजवेऽयताय न मा ब्रूयः वीर्यवती यथा स्याम् ।। ( निरुक्त अ. २ खं. ४ श्लो. १ ) (असें म्हणतात कीं, विद्या ब्राह्मणाकडे आली आणि म्हणाली कीं, मी तुझा सर्वश्रेष्ठ निधि आहे म्हणून माझें रक्षण कर. जो ज्ञानाची असूया म्हणजे हेटाळणी करतो, सरळ मार्गानें न जातां वाकड्या मार्गानें जो जातो व इंद्रियें ज्याच्या ताब्यांत नाहींत अशा माणसाला तूं मला देऊं नकोस. असें केल्यानेंच माझें सामर्थ्य कायम राहील. ) उपनयन संस्कारापासून शिक्षणाला प्रारभ होत असल्यामुळें संस्कारित शिक्षण घेणें हें धार्मिक कर्तव्य ठरलें. तें घेण्याच्या कालाला ब्रह्मचर्याश्रम असें म्हणतात. सर्व तऱ्हेनें पवित्र राहून व गुरूच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं राहून व्रत म्हणून या काळांत एकाग्र मनानें विद्येचें ग्रहण करावयाचें असे. पुढच्या स्मृती व गृह्यसूत्रें या ग्रंथांतून असलेलें ब्रह्मचर्याचें स्वरूप आम्ही वेदांच्या माथीं चिकटवीत आहोंत असें समजण्याचें कारण नाहीं. प्रत्यक्ष वेदांतच ब्रह्मचर्याचें अतोनात महत्त्व वर्णन केलेलें आहे. ऋग्वेदांत ब्रह्मचाऱ्याचा उल्लेख येतो तो असा : " ब्रह्मऽचारी चरति वेविषत् विषः सः देवानाम् भवति एकम् अङगम् " " जो ब्रह्मचर्यानें वागतो ( म्हणजे प्रार्थना आणि तप यांत निमग्न राहतो ) तो सर्वव्यापी कर्तव्यांत गढून गेलेला असतो. तो देवांपैकींच एक होतो. " ब्रह्मचारी देवांचें अंग होतो या ऋग्वेदांतील शब्दानें ऋग्वेदीय ऋषी ब्रह्मचर्याश्रमाला कोणत्या दृष्टिकोनांतून पाहात हें उत्कृष्ट रीतीनें व्यक्त होतें. मानवी जीवनांतून पशुत्वाचें संपूर्ण निखंदन करून टाकून विशुद्ध देवजीवन निर्माण करण्याचें सामर्थ्य ज्या काळांत मिळवावयाचें असेल तो काळ म्हणजे ब्रह्मचर्य होय. ही या विद्या संपादन करण्याच्या व संस्कार मिळविण्याच्या

काळाकडे पाहाण्याची त्यांची दृष्टि होती. अथर्ववेदांत तर ब्रह्मचर्याश्रमाचें फारच बहारीचें वर्णन आढळतें व त्यावरून ब्रह्मचर्याश्रमांतील पुढील गृह्यसूत्रादि ग्रंथांतून सांगितलेले विधि वेदकालांतच सिद्ध झाले होते याची खात्री पटते. अथर्ववेदांत म्हटलें आहे:–

ब्रह्मचारीष्णंश्चरति रोदसी उभे तस्मिन् देवाः संमनसो भवन्ति।
स दाधार पृथिवीं दिवं च स आचार्यं तपसा पिपर्ति ॥ १
ब्रह्मचारिणं पितरो देवजनाः पृथग् देवा अनुसंयन्ति सर्वे।
गन्धर्वा एनमन्वायन् त्रयस्त्रिंशत् त्रिशता षट्सहस्राः सर्वान्त्स देवांस्तपसा पिपर्ति ॥ २ ॥
आचार्य उपनयमानो ब्रह्मचारिणं कृणुते गर्भमन्तः।
तं रात्रीस्तिस्र उदरे बिभर्ति तं जातं द्रष्टुमभिसंयन्ति देवाः ॥ ३
इयं समित् पृथिवी द्यौर्द्वितीयोतान्तरिक्षं समिधा पृणाति।
ब्रह्मचारी समिधा मेखलया श्रमेण लोकांस्तपसा पिपर्ति ॥ ४
पूर्वो जातो ब्रह्मणो ब्रह्मचारी धर्मं वसानस्तपसोदतिष्ठत्।
तस्माज्जातं ब्राह्मणं ब्रह्म ज्येष्ठं देवाश्च सर्वे अमृतेन साकम् ॥ ५
ब्रह्मचार्येति समिधा समिद्धः कार्ष्णं वसानो दीक्षितो दीर्घश्मश्रुः।
स सद्य एति पूर्वस्मादुत्तरं समुद्रं लोकान्त्संगृभ्य मुहुराचरिक्रत् ॥ ६
ब्रह्मचारी जनयन् ब्रह्मापो लोकं प्रजापतिं परमेष्ठिनं विराजम्।
गर्भो भूत्वामृतस्य योनाविन्द्रो ह भूत्वासुरांस्ततर्ह ॥ ७
आचार्यस्ततक्ष नभसी उभे इमे उर्वी गम्भीरे पृथिवीं दिवं च।
ते रक्षति तपसा ब्रह्मचारी तस्मिन् देवाः संमनसो भवन्ति ॥ ८
इमां भूमिं पृथिवीं ब्रह्मचारी भिक्षामा जभार प्रथमो दिवं च।
ते कृत्वा समिधावुपास्ते तयोरार्पिता भुवनानि विश्वा ॥ ९
अर्वागन्यः परो अन्यो दिवस्पृष्ठाद् गुहा निधी निहितो ब्राह्मणस्य।
तौ रक्षति तपसा ब्रह्मचारी तत् केवलं कृणुते ब्रह्म विद्वान् ॥ १०
अर्वागन्य इतो अन्यः पृथिव्या अग्नी समेतो नभसी अन्तरेमे।
तयोः श्रयन्ते रश्मयोधि दृढास्ताना तिष्ठति तपसा ब्रह्मचारी ॥ ११
अभिक्रन्दन् स्तनयन्नरुणः शितिङ्गो बृहच्छेपोनु भूमौ जभार।
ब्रह्मचारी सिञ्चति सानौ रेतः पृथिव्यां तेन जीवन्ति प्रदिशश्चतस्रः ॥

अग्नौ सूर्ये चन्द्रमसि मातरिश्वन् ब्रह्मचार्यप्सु समिधमा दधाति ।
तासामर्चींषि पृथगभ्रे चरन्ति तासामाज्यं पुरुषो वर्षमापः ।। १३
आचार्यो मृत्युर्वरुणः सोम औषधयः पयः ।
जीमूता आसन्त्सत्वानस्तैरिदं स्वराभृतम् ।। १४
अमा घृतं कृणुते केवलमाचार्यो भूत्वा वरुणो यद्यदैच्छत् प्रजापतौ ।
तद् ब्रह्मचारी प्रायच्छत् स्वान् मित्रो अध्यात्मनः ।। १५
आचार्यो ब्रह्मचारी ब्रह्मचारी प्रजापतिः ।
प्रजापतिर्वि राजति विराडिन्द्रोभवद् वशी ।। १६
ब्रह्मचर्येण तपसा राजा राष्ट्रं वि रक्षति ।
आचार्यो ब्रह्मचर्येण ब्रह्मचारिणमिच्छते ।। १७
ब्रह्मचर्येण कन्या युवानं विन्दते पतिम् ।
अनड्वान् ब्रह्मचर्येणाश्वो घासं जिगीषति ।। १८
ब्रह्मचर्येण तपसा देवा मृत्युमपाघ्नत ।
इन्द्रो ह ब्रह्मचर्येण देवेभ्यः स्वराभरत् ।। १९
ओषधयो भूतभव्यमहोरात्रे वनस्पतिः ।
संवत्सरः सहर्तुभिस्ते जाता ब्रह्मचारिणः ।। २०
पार्थिवा दिव्याः पशव आरण्या ग्राम्याश्च ये ।
अपक्षाः पक्षिणश्च ये ते जाता ब्रह्मचारिणः ।। २१
पृथक् सर्वे प्राजापत्याः प्राणानात्मसु बिभ्रति ।
तान्त्सर्वान् ब्रह्म रक्षति ब्रह्मचारिण्याभृतम् ।। २२
देवानामेतत् परिषूतमनभ्यारूढं चरति रोचमानम् ।
तस्माज्जातं ब्राह्मणं ब्रह्म ज्येष्ठं देवाश्च सर्वे अमृतेन साकम् ।। २३
ब्रह्मचारी ब्रह्मभ्राजद् बिभर्ति तस्मिन् देवा अधि विश्वे समोताः ।
प्राणापानौ जनयन्नाद् व्यानं वाचं मनो हृदयं ब्रह्ममेधाम् ।। २४
चक्षुः श्रोत्रं यशो अस्मासु धेह्यन्नं रेतो लोहितमुदरम् ।। २५
तानि कल्पद् ब्रह्मचारी सलिलस्य पृष्ठे तपोतिष्ठत् तप्यमानः समुद्रे ।
स स्नातो बभ्रुः पिङ्गलः पृथिव्यां बहु रोचते ।। २३

अथर्ववेदकांड ११ सू. १-२-३

ब्रह्मचारी स्वतःच्या तपःसामर्थ्यानें द्यावापृथिवींना व्यापून आपल्या तपश्चर्चेंत निमग्न असतो. सर्व इन्द्रादि देव त्याच्यावर अनुग्रह करण्यासाठीं प्रसन्न असतात. आपल्या तपश्चर्येनें पृथ्वी व स्वर्ग यांचें धारण करून तो आपल्या गुरूचें परिपालन करतो. ('शिष्यपापं गुरोरपि' या म्हणीप्रमाणें शिष्याचें पाप गुरूला चिकटत असल्यामुळें ब्रह्मचारी इतका कर्तव्यदक्ष असतो कीं तो गुरूला आपल्या वर्तनानें कांहींहि पाप चिकटूं देत नाहीं असा तो गुरूचें पालन करतो या वाक्याचा अर्थ आहे.) ॥१

पितृगण, देवांचे संघ व इंद्रादिक श्रेष्ठ देव, तसेंच तेहतीस देव, गंधर्व, अंतरिक्षांत संचार करणाऱ्या इतर सर्व विभूति ब्रह्मचाऱ्याचें आपल्या सामर्थ्यानें संरक्षण करतात. व ब्रह्मचर्यच देव मनुष्यादिरूपानें सर्व जगाचें धारण करतें. ॥२

अथर्ववेदकाळीं उपनयनादिक संस्कार सिद्ध झाले होते असें अथर्ववेदाचें बारकाईनें निरीक्षण करणाऱ्यास आढळून येतें व वेदांत पौर्वापर्य ठरविण्यास कांहींच साधन नसल्याचें आम्हीं मागेंच सांगितल्याप्रमाणें व ऋग्वेदांतील देवत्वाचा ब्रह्मचर्याशीं संबंध येथें स्पष्टच दाखविल्यामुळें वेदकाळीं भारतीय शिक्षणप्रणालि परिणतावस्थेस पोहोचली होती हें उघडच दिसतें. तिसऱ्या ऋचेंत म्हटलें आहे, "उपनयन करणारा आचार्य आपल्या विद्याशरीराच्या गर्भांत तीन दिवसपर्यंत त्याला ठेवतो व चौथ्या दिवशीं त्या विद्यामय शरीरांतून उत्पन्न झालेल्या म्हणजेच दुसरा जन्म घेतलेल्या ब्रह्मचाऱ्याला देव पाहण्यासाठीं येतात." ॥३

त्रैवर्णिकांना द्विज अशी संज्ञा आहे हें प्रसिद्धच आहे. त्यांचे पहिले जन्म आईबापांपासून होतात व दुसरे जन्म उपनयन संस्कारानें होतात. उपनयनसंस्कारानंतरच हें द्विजत्व म्हणजेच दोन जन्म घेणें सिद्ध होतें. ही कल्पना धर्मसूत्रादि ग्रंथांतून आहेच. आपस्तंब धर्मसूत्रांत म्हटलें आहे " स हि विद्यातः तं जनयति ता श्रेष्ठं जन्म शरीरमेव मातापितरौ जनयतः" (आपस्तंब ध. सू. १.१.१५,१७) ही आपस्तंब धर्मसूत्रांतील धारणा वेदकाळींच सिद्ध झाली होती असें अथर्ववेदाच्या वरील उल्लेखावरून स्पष्ट होईल. ब्रह्मचाऱ्याच्या

कर्तव्यांत समिधेनें अग्नीचा होम करणें व मौंजीबंधन म्हणजे मुंज नांवाच्या गवताची मेखला धारण करणें हे विधि अथर्ववेदकाळापासूनच आहेत असें स्पष्ट होतें. उपनयन हा शारीरिक संस्कार असल्यामुळें तो सर्वच त्रैवर्णिकांना आवश्यक होता. शुद्ध शीलचारित्र्याच्या व्यक्तीचें उपनयन करावें हें जरी खरें असलें तरी प्रत्येक अशुद्ध असलेल्या व्यक्तीलाहि संस्कारांचा प्रभाव व ब्रह्मचर्याश्रमांतील पवित्र वातावरण यांमुळें सद्वर्तनी बनवितां येईल अशा खात्रीनेंच उपनयन हा शारीरिक म्हणजेच आवश्यक संस्कार करण्यांत आला. ज्याचें उपनयन झालेलें नाहीं त्याच्याशीं कोणताहि व्यवहार करूं नये व त्याला विवाहादि पुढच्या संस्कारांचा बिलकूल अधिकार नाहीं इत्यादि नियम हे उपनयन शारीरिक संस्कार असल्याचेंच द्योतक होत. उपनयन शारीरिक संस्कार झाल्यामुळें वेदरक्षणास साऱ्या समाजाचेंहि साह्य मिळण्याची व्यवस्था झाली. पुढच्या काळांत कांहीं चमत्कारिक प्रकारहि रूढ झाले. पण "अत्याचारस्तु मूर्खता"च्या प्रकारांत ते जातात. जसें म्हैसूर संस्थानांतील मठवल्ली तालुक्यामध्यें सांपडलेल्या इ. स. १३५८ च्या एका शिलालेखावरून असें दिसतें कीं एका ब्राह्मणानें एका देवस्थानास एक बाग दान केली असतां तिच्या चारी कोपऱ्यांत चार पिंपळाचीं झाडें लावलीं, व अश्वत्थवृक्ष मूळचाच पवित्र असूनसुद्धां त्याचें पावित्र्य आणखी वाढविण्याच्या विचित्र कल्पनेनें त्या चारहि पिंपळांचा उपनयन संस्कार केला !

हें उपनयन पांचव्या, सातव्या किंवा नवव्या वर्षी होत असे. पांचव्या वर्षापासून शिक्षणास प्रारंभ करावा हें तत्त्व अलीकडच्याहि शिक्षणशास्त्रज्ञांना मान्य असेंच आहे. क्षत्रिय, वैश्य इत्यादि लोकांचें उपनयन उशीरा होत असे. ब्राह्मणांचें लवकर व त्यांचें उशिरा यांत ब्राह्मणी कावा कांहीं लोकांना दिसतो. पण तें चुकीचें आहे. उपनयन संस्कारांत सावित्री मंत्राचें अथवा गायत्रीमंत्राचें उच्चारण ही एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. हें उच्चारण स्पष्टपणें करतां यावें एवढ्यासाठींच ब्राह्मणांनाहि नवव्या वर्षापर्यंत उपनयनाची मुभा ठेवण्यांत आली आहे. क्षत्रिय व वैश्य यांच्या बाबतींत अधिक

ाढतीं वयें घेण्याचें कारण ब्राह्मणांचा सावित्री मंत्र, गायत्री वृत्ताचा ्हणजे दर चरणास आठ अक्षरांचा आहे.क्षत्रियांचा त्रिष्टुभ् वृत्ताचा ्हणजे दर चरणास अकरा अक्षरांचा आहे व वैश्यांचा जगती ृत्ताचा म्हणजे दर चरणास बारा अक्षरांचा आहे. उच्चारण-ौकर्य व इतर सोयी याच दृष्टीनें हे काळ ठरविलेले आहेत. पण ोळाव्या वर्षाच्या आंत मौंजीबंधन झालें पाहिजे असें सामान्यतः ढमत होतें. शिक्षणसंस्काराच्या दृष्टीनें तेंच आवश्यकहि ोतें. जैमिनी गृह्यसूत्रांत असें म्हटलें आहे कीं "नातिषोडश-र्षमुपनयीत प्रसृष्टवृषणो ह्येष वृषलीभूतो भवति" (सोळाव्या र्षानंतर उपनयन करूं नये. कारण त्या वयानंतर कामविकारादि उद्भवून मनुष्य पातित्याकडे झुकतो.) पुढें क्षत्रियवैश्यांचें विद्ये-विजीं व्यवसायाकडे अधिक लक्ष्य लागल्यामुळें केवळ शारीरिक ंस्कार एवढेंच त्यांच्या बाबतींत उपनयनसंस्काराचें स्वरूप राहिलें. ा म्हणून त्यांना बावीस ते तेहत्तीस व चोवीस ते छत्तीस या अनु-क्रमें सवलती मिळाल्या.

उपनयन संस्कारापूर्वी प्रथम मातृभोजन व नंतर स्नान अशा ीतीचा एक संस्कार आहे. उच्छृंखलता संपली असल्याची ाणीव देण्यासाठीं हें स्नानापूर्वीचें भोजन आहे. यानंतर उपनयन ंस्काराच्या वेळीं वपन व स्नान झाल्यावर ब्रह्मचाऱ्याच्या मरेभोंवतीं एक मेखला व त्याला घालावयास लंगोटी देत. ह्मचाऱ्याची मेखला तीन घेरे विणून केलेली असे. आतां ापणांस तीन वेदांच्या अध्ययनामध्यें मग्न होऊन रहावयाचें ाहे असा त्या मेखलाधारणाचा अर्थ आहे. सहाव्या कांडांत थर्ववेदानें "श्रद्धाया दुहिता" इत्यादि मंत्र या प्रसंगासाठीं दिला ाहे. आपल्या शरीरावर अष्टौप्रहर राहणारी मेखला पावित्र्याचें क्षण करून आपलें नैतिक व शारीरिक सामर्थ्य वाढविण्यास दत करील अशा रीतीची भावना या मेखलाधारणामध्यें माविष्ट केलेली आहे. या मेखलाधारणाच्या व समिधेंत अग्नीचें तन करून त्याचें पूजन करण्याच्या क्रियेचें माहात्म्य वर्णन रतांना येथें उद्धृत केलेल्या अथर्ववेदाच्या अकराव्या कांडांतील

प्रथमसूक्ताच्या चवथ्या ऋचेंत म्हटलें आहे, "अग्नीमध्यें अर्पण करावयाच्या तीन समिधा असें द्योतित करतात कीं ही दिसणारी पृथ्वी पहिली समिध असून द्युलोक ही दुसरी समिध होय. व त्यांचा अग्नींत होम केल्यावर द्यावापृथिवीचें पालन होतें. मेखला धारणानें व त्यानंतर करावयाच्या तपस्येनें ब्रह्मचारी सर्व लोकांचें पोषण करतो. ॥४

या सर्व सत्यज्ञानादि लक्षणांवरून परब्रह्म, हेंच जगाचें आदिकारण आहे ही गोष्ट स्पष्ट आहे. या परब्रह्मापासून तेजस्वी, वस्त्र धारण करणारा, तपस्वी ब्रह्मचारी पहिल्याप्रथम उत्पन्न झाला. त्याच्यापासून ब्रह्म म्हणजे वेद आविष्कृत झाले व त्यापासून देवादि सर्व सृष्टि प्रकाशांत आली. त्यामुळें ब्रह्मचारी सर्वश्रेष्ठ होय. ॥५

मौंजीबंधनाच्या वेळीं सुरू झालेला होम ब्रह्मचर्याश्रमांत रोज करावयाचा असे. मेखला धारण करून ब्रह्मचारी कृष्णाजिन पांघरीत असे. तो शिरोभागी जटाभार धारण करी व रोज अग्नीमध्यें समिधांचें हवन करी. अग्नीमध्यें हवन करणें हें ब्रह्मचाऱ्याचें अत्यंत महत्त्वाचें कर्तव्य समजलें जात असे. गुरूकडे जातांना तो समिधा हातांत घेऊन जाण्यांत मी तें कर्तव्य पार पाडावयास सिद्ध आहे, असेंच दर्शवितो. उपनयनाच्या प्रसंगीं हरिणाचें कातडें पांघरण्याचा विधि आहे. हें हरिणाचें कातडें कां पांघरावें हें सांगतांना गोपथ ब्राह्मणांत म्हटलें आहे, "स यन्मृगाजिनानि वस्ते तेन तद् ब्रह्मवर्चसमवरुन्धे" मनोहर व चकचकीत दिसणारें हरिणाजिन हें ब्रह्मवर्चसाचें द्योतक असल्यामुळें तें आपणांस मिळवावयाचें आहे हें या ब्रह्मचाऱ्यानें ध्यानांत ठेवावें असा या म्हणण्याचा आशय आहे. हेंच उत्तरीय पुढें कापडाचें झालें व नंतर त्याचें आजचें यज्ञोपवीत झालें. मेखला, कौपीन व हें यज्ञोपवीत धारण केल्यावर ब्रह्मचारी समिधेनें अग्नींत होम करून त्याच्याजवळून तेजाची अपेक्षा करी. अथर्ववेदानें वर्णन केलें आहे कीं, "समिधेनें सकाळीं व संध्याकाळीं अग्नीमध्यें होम करून त्यापासून उत्पन्न होणाऱ्या तेजानें देदीप्यमान दिसणारा ब्रह्मचारी दीक्षित कृष्णाजिन धारण करणारा, दीर्घ जटाभार

वाढलेला, आपल्या तपाच्या महिम्यानें उभय समुद्रामधील अंतर भारुन टाकतो. ॥६॥ तो आपल्या ब्रह्मचर्याच्या महिम्यानें गंगादि नद्या, आदि ब्रह्म इत्यादिकांना साहाय्य पोंचवितो. ब्रह्मचानें सृष्टि निर्माण केली ती ब्रह्मचर्याच्याच महिम्यानें. इंद्र ब्रह्मचर्याच्या तपोबलानें असुरांना ठार मारतो. ॥७॥ आचार्य आपल्या नियंत्रणाखालीं ज्याच्याकडून सर्व नियमांचें पालन करून घेतात त्या ब्रह्मचाऱ्यावर देवहि कृपा करतात. ॥ ८ ॥ भिक्षेच्या द्वारें ब्रह्मचारी द्युलोक व पृथ्वी यांना आपल्याकडे आकर्षित करून घेतो. व दोन समिधांच्या अर्पणानें द्यावापृथिवींचें पोषण करतो. ॥९॥ वेदरूपी एक महान् निधि आचार्यांच्या हृदयरूपी गुहेंत सुरक्षित ठेवलेला असून दुसरा असाच निधि ( म्हणजे वेदप्रतिपादित आधिदैविक क्षेत्रांतील देवतारूपी शक्ति ) वरच्या गुप्त ठिकाणीं ठेवलेला आहे. ब्रह्मचारी आपल्या तपस्येनें व अध्ययनानें या दोन्ही निधींचें रक्षण करतो. व त्यांचें रहस्य जें परब्रह्म त्याचा साक्षात्कार करून घेतो. ॥ १० ॥ या पृथ्वीच्या खालीं एक अग्नि आहे. ( अनुदित सूर्य ) व पृथ्वीवर दुसरा लौकिकाग्नि आहे. सूर्योदय झाला म्हणजे अग्नींत होम करतांना ब्रह्मचारी या दोन्ही अग्नींच्या किरणांचें संमीलन घडवून आणतो व त्यायोगें द्यावापृथिवी संबंधित होऊन त्यांना आपल्या तपानें ब्रह्मचारी सुस्थिरता प्राप्त करवून देतो. ब्रह्मचाऱ्याच्याच सामर्थ्यानें मेघांतून गर्जना करीत वरुण आपलें वीर्य पृथ्वीवर सिंचन करतो. व योग्य वेळीं झालेल्या त्या सिंचनानें चारहि दिशा खुलून धनधान्याचें उत्पादन होऊन जगाचें जीवन चालतें. ( सायणाचार्यांनीं ब्रह्मचाऱ्याचें ऊर्ध्वरेतस्कत्व अथवा कडक ब्रह्मचर्यव्रत यावरून सूचित होतें असें या ऋचेवरील आपल्या भाष्यांत म्हटलें आहे. "एतेन सर्वजगदुत्पादनार्थं ऊर्ध्वरेतस्कत्व ब्रह्मचारिणः सूचितं भवति वारुणमेव रेतः सिंचति न स्वकीयं इत्यर्थस्य अवगमात्) ज्या राष्ट्रांत ब्रह्मचारी राहतो तेथें योग्य काळीं व योग्यच स्वरूपाची वृष्टि होऊन राष्ट्राचें जीवन सुव्यवस्थित चालतें असा याचा अर्थ आहे. ब्रह्मचारी अग्नि, सूर्य, चंद्रमा, वायू व आप् यांना

एकेकाच्या अभावीं दुसऱ्या दुसऱ्याला याप्रमाणें समिधा अर्पण करतो. त्यांच्या योगानें यथाक्रम धन, धान्य, पशु, पुत्रपौत्रादिक सर्व गोष्टींची समृद्धि होऊन प्रजांचें जीवन सुखी व आनंदित होतें ॥१३॥ आचार्यच मारणारा मृत्यु आहे. (गंभीर अपराध केल्यास) आचार्यच दुरित निवारण करणारा वरुणदेव होय. व सर्वथा आल्हाद देण्यानें आचार्य चंद्रहि असून सर्व समृद्धि त्याच्यामुळेंच होते. ॥ १४ ॥ वरुण देवानें आचार्य होऊन उदकरूपानें पृथ्वीचें पोषण केलें. आपला जनक जो प्रजापति त्याला वरुणानें सर्वस्व समर्पण केलें. व तें करतांना आपल्या शरीराकडे न पाहतां ब्रह्मचर्य व्रताचरण केलें. (त्याचप्रमाणें कोणत्याहि ब्रह्मचर्य व्रत धारण करणाऱ्या शिष्यानें विद्येचा उपदेश करणाऱ्या गुरूला त्याचें सर्व अपेक्षित गुरुदक्षिणारूपानें द्यावें.) ॥ १५ ॥ आचार्य सर्व देवतात्मक असून त्याचें माहात्म्य कोण वर्णन करूं शकतो? ॥ १६ ॥ राजा ब्रह्मचर्यानेंच राष्ट्राचें संरक्षण करतो. (ज्याच्या राज्यांत सुखानें ब्रह्मचर्यव्रताची दीक्षा घेऊन विद्यार्थी तयार होतात अथवा स्वतः यथावत् ब्रह्मचर्यव्रताचें पालन करून स्व-कर्तव्याची पूर्ण जाणीव ज्याला उत्पन्न झाली आहे असा राजा असें दोन्हीहि अर्थ या ठिकाणीं संभवनीय आहेत.) विशुद्ध ब्रह्मचर्यव्रताचें आचरण करणाऱ्या विद्यार्थ्यालाच आचार्य सर्वस्व दान करतात. ॥ १७ ॥ ब्रह्मचर्य व्रतानेंच कन्येला उत्कृष्ट पति मिळतो. फार काय पण बैल, अश्व, इत्यादि पशूंनाहि उपजीवन त्यामुळेंच मिळतें. ॥ १८ ॥ ब्रह्मचर्यानेंच देव अमर झाले व इंद्र स्वर्गाचा सम्राट् झाला. ॥ १९ ॥ ओषधि जगांतील जीवन-व्यापार, अहोरात्री व ऋतुचक्र ब्रह्मचर्याच्या तपस्येनें चालतात ॥ २० ॥ सर्व स्थावर जंगमात्मक जगत् व प्राणिमात्र प्रजापतीच्या ब्रह्मचर्यप्रभावानेंच उत्पन्न झाले आहेत. ॥ २१ ॥ ब्रह्मचारी आचार्यांच्या मुखानें वेदांचें रक्षण करीत असतो. व त्या वेदांच्या सामर्थ्यानेंच जगताचें प्राणसंरक्षण होतें ॥ २२ ॥ (येथें वेद-रक्षणाचें जें माहात्म्य सूचित केलें आहे त्याला दृढता आणण्या-साठीं वेदांचें माहात्म्य सांगतात.) प्रत्यक्ष परब्रह्मापासून वेदांची

उत्पत्ति झालेली असून वेदापासूनच आपापल्या शक्तीसहित देवता उत्पन्न झालेल्या आहेत. ॥२३॥ ब्रह्मचारी अत्यंत तेजस्वी असें ब्रह्म म्हणजे वेद धारण करीत असल्यामुळें तो देवता, इंद्रियें व सृष्टि यांचा आश्रय होऊन राहतो. ॥ २४ ॥ तसेंच तो सर्व ज्ञानेंद्रियें, अन्न व रेत यांचाहि आश्रय होऊन राहतो. ॥२५॥ हें ब्रह्मचर्यात्मक ब्रह्मा, तूं आम्हाला ज्ञानेंद्रियांची संपन्नता दे. तसेंच पुत्रपौत्र धन-धान्यादिकांची समृद्धि दे. नित्य स्नानानें पवित्र होणारा तपस्वी ब्रह्मचारी अतिशय शोभतो. ॥ २६ ॥

अथर्ववेदांतील हे ब्रह्मचाऱ्याचे नियम व वर्णन वाचलें म्हणजे संस्कारित विद्याध्ययनाच्या या काळाचें वैदिकांना केवढें विलक्षण महत्त्व वाटत होतें व त्यांतील प्रत्येक लहानसहान संस्कारसुद्धां शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनें कसा विचारपूर्वक बसविलेला आहे याची कल्पना येते. ब्रह्मचर्य हें व्रत आहे अशी धारणा प्रथम-पासूनच उत्पन्न करण्याचा वैदिकांनीं प्रयत्न केलेला असून शतपथ ब्राह्मणानें म्हटलें आहे : "यथा ह वा अग्निः समिद्धो रोचते एवं ह वै स स्नात्वा रोचते ब्रह्मचर्यं चरति ।" अग्नि नारायण चांगला प्रज्वलित झाला म्हणजे जसा तो तेजस्वी दिसतो, तद्वत् जो ब्रह्मचारी ब्रह्मचर्याचा दिव्य प्रभाव जाणून त्या प्रमाणें व्रतोपासना करतो तो विद्या शिकून व्रतस्नात झाला म्हणजे त्या तेजस्वी अग्निनारायणाप्रमाणें ब्रह्मवर्चस तेजानें तळपूं लागतो.) मेखला, कौपीन, व यज्ञोपवीत धारण करण्यासंबंधीचें उपनयन संस्काराचें वर्णन आपण पाहिलें. आणखी हें व्रत धारण करतांना काय करण्यांत येई हें पाहणें हें आर्यांची शिक्षणपद्धति समजावून घेण्याच्या दृष्टीनें उपयुक्त ठरेल.

## ब्रह्मचर्य दीक्षाग्रहण

प्रथम बटूकडून अग्नीमध्यें समिधांचें हवन करण्यांत येई व अग्नीनें स्वतःप्रमाणेंच बटूलाहि तेजस्वी बनवावें अशा रीतीची प्रार्थना त्याच्याकडून करविण्यांत येई. रोज अग्नीची प्रार्थना ब्रह्मचारी जी करी ती किती उत्कृष्ट व मनांत तेजस्वी धारणा

निर्माण करणारी आहे ती पाहाण्यासारखी आहे. ती प्रार्थना पुढीलप्रमाणें :–

"अग्नये समिधमाहार्षं बृहते जातवेदसे । यथा त्वमग्ने समिधा समिध्यसे एवमहमायुषा मेधया वर्चसा पशुभिर्ब्रह्मवर्चसेन समिन्धे जीवपुत्रो ममाचार्यो मेधाव्यहमसान्येनिराकरिष्णुर्यशस्वो तेजस्वी ब्रह्मवर्चस्यन्नादो भूयासम्ऽस्वाहा" (मी या अग्निदेवा-प्रीत्यर्थ समिधा आणली आहे. हे अग्निदेवा ज्याप्रमाणें या समिधेनें तूं प्रज्वलित होऊन सुतेजस्वी होतोस, त्याचप्रमाणें मीहि तुझ्या कृपाप्रसादानें आयुष्यमान्, बुद्धिमान्, कांतिमान्, प्रज्ञाशाली व प्रतिभाशाली व्हावें. माझ्या गुरुदेवाचे पुत्र दीर्घकाल जगोत. आणि मीहि ज्ञानी होईन. आचार्य देवांनीं शिकविलेली विद्या अंतःकरणांत मी जपून ठेवीन. माझ्या कार्यांत मी यशस्वी होईन. मी जगांत प्रभावशाली होईन. प्रतिभातेजानें चमकूं लागेन. अन्नाचा उत्तम भोक्ता होईन.) ब्रह्मचर्याच्या काळांत रोज अग्निनारायणासमोर ही प्रार्थना करण्यांत केवढें औचित्य सांठविलेलें आहे हें डोळसदृष्टीच्या शिक्षणशास्त्रज्ञांना तरी सांगण्याची आवश्यकता नाहीं. चारित्र्य-संपन्न व मार्गदर्शक गुरूच्या प्रेमळ नियन्त्रणाखालीं असलेला, कुसंस्कार होण्याइतका जगाचा संबंधच न आलेला, आठ वर्षांचा तेजस्वी वैदिक बालक उगवत्या सूर्यनारायणाच्या साक्षीनें अग्नि प्रज्वलित करून त्या तेजासमोर जेव्हां जीवनाच्या या रसरशीत ध्येयवादाचा रोज उच्चार करीत असे, व तोहि सकाळ संध्याकाळ करीत असे, त्या वेळीं अकारण उपदेशाचे घुटके न घेतांहि त्याचें अंतःकरण आपोआपच केवढें श्रद्धाशील, महत्त्वाकांक्षी, निष्पाप, उत्साही व पवित्र बनत जात असे ही कल्पना कोणाहि सहृदय अंतःकरणाच्या विचारवंताच्या सहज लक्षांत येईल. आज भारतीय विद्यार्थ्यांचें स्वैराचारी व उच्छृंखल वर्तन पाहून त्याचें निदान करतांना उपराष्ट्रपति डॉ. राधाकृष्णन् यांनीं श्रद्धाहीनता वाढत असल्याचे करुणास्पद उद्‌गार काढले होते. राष्ट्रपति डॉ. राजेंद्रप्रसाद यांनींहि वारंवार हेच उद्‌गार काढले आहेत. भारताच्या वेदकालापासून तर चौदाव्या शतकापर्यंतच्या द्रष्टयांना असे करुण

आक्रन्दन करण्याची कधींहि पाळी आली नाहीं याचें कारण त्यांच्या तेजस्वी राष्ट्रांत हें करंटेपण नव्हतें हेंच होय. शिक्षणप्रणालि उभारतांनाच व्यक्तित्वविकासाचा त्यांनीं पूर्ण विचार केला होता. त्यांच्या या साध्या अग्निपूजेच्या प्रार्थनेचा विचार केला तर श्रद्धामय, तेजस्वी, कर्तव्यपरायण व चारित्र्यसंपन्न राष्ट्राची पायाभरणी त्यांनीं किती कुशलतेनें केली होती याची खात्री पटते. अग्नीप्रमाणें बटूलाहि तेजस्वी व बलवान् होतां यावें म्हणून करण्यांत यावयाच्या या प्रार्थनेंत ब्रह्मचर्य हा शिक्षणाप्रमाणेंच धार्मिक व सांस्कृतिक योग्यता अंगीं बाणविण्याच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा काल आहे हें विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न होत असे. यानंतर "देव सवितः एष ते ब्रह्मचारी समामृत" अशी प्रार्थना करून ब्रह्मचाऱ्यास सविता, भग, यम, अर्यमा इत्यादि देवतांच्या स्वाधीन करण्यांत येई. त्या योगें जोंपर्यंत आपण ब्रह्मचर्यव्रताचें पालन करीत आहोंत तोंपर्यंत राष्ट्र, समाज, व धर्म यांच्यासाठीं जीवन खर्ची घालावयास्तव तें योग्य असें बनविण्याच्या या कार्यांत परमेश्वर आपला पाठीराखा आहे असा आत्मविश्वास विद्यार्थ्यांच्या मनांत बिंबत असे. मग ब्रह्मचाऱ्यास विचारावयाचा एक मजेशीर प्रश्न व त्याचीं उत्तरें स्मृतिचंद्रिकेमध्यें फार उत्कृष्ट तऱ्हेनें वर्णन केलेलीं आहेत. गुरु ब्रह्मचाऱ्यास असें विचारी कीं "तूं कोणाचा ब्रह्मचारी आहेस? तो स्वाभाविकपणेंच असें उत्तर देई कीं मी तुमचा विद्यार्थी आहे. हें ऐकल्यावर गुरु त्याला समजावून सांगत असे कीं तूं चुकलास. तूं माझा ब्रह्मचारी नसून सर्व देवांमध्यें महाप्रतापी जो इन्द्र व अत्यंत तेजस्वी असा जो अग्नि त्यांचा तूं ब्रह्मचारी आहेस. मी त्यांचा प्रतिनिधि असून त्यांच्याच आज्ञेनें तुला आज शिकविण्यास प्रारंभ करणार आहे." विद्यार्जनाच्या व धर्माच्या संरक्षणाचें कार्य हें इतकें पवित्र आहे कीं, त्यामध्यें देवदेवता आपल्याला साह्यकारी आहेत अशी श्रद्धा बालविद्यार्थ्यांच्या मनांत उमटविण्यासाठींच हा संवाद आहे हें उघड आहे.

शिक्षण म्हटलें कीं तेथें गुरुशिष्यसंबंध आलाच. हे गुरु व शिष्य यांचे संबंध जितके ऋजु व प्रेमाचे राहतील तितकें विद्यार्जन

सुव्यवस्थित होतें. हें दर्शविण्यासाठीं एक हृदयस्पर्शनाचा विधि करावयाचा असे. आपल्या शिष्याच्या हृदयावर हात ठेवून आपणां दोघांमध्यें चिरकाल प्रेम व विश्वास नांदो अशा अर्थाच्या मंत्राचा जप त्या वेळीं गुरु करी. त्यानंतर अश्मारोहणाचा विधि झाला कीं उपनयन संस्कार पूर्ण होई. हा विधि म्हणजे गुरूनें शिष्यास दगडावर उभें करावयाचें व तूं शरीरानें व निश्चयानें या पाषाणासारखा दृढ हो असें गुरूनें म्हणावयाचें. धार्मिकतेच्या आवरणांत बालविद्यार्थ्यांच्या अंतःकरणांत या सर्व भावना निर्माण करावयाच्या यांत केवढा अर्थ भरलेला आहे, हें चोखंदळ शिक्षण शास्त्रज्ञांना तरी सांगावयास नको. याप्रमाणें वेदविद्येच्या आधीं हा उपनयन संस्कार पूर्ण झाल्यावर मग सावित्रीमंत्रग्रहणपूर्वक वेदविद्येच्या अध्ययनास प्रारंभ होत असे.

सूर्य व अग्नि या वैदिक धर्माच्या सर्वश्रेष्ठ देवता असून त्रैवर्णिकांना त्यांचीच उपासना आहे. सावित्री मंत्र म्हणजे गगनमंडलांत अखंड प्रकाशमान असणारा अग्नि जो सूर्यनारायण त्याच्या उपासनेचा मंत्र. तो गायत्रीवृत्तांत असल्यामुळें त्याचें गायत्री मंत्र हें नांव पुढें रूढ झालें. वस्तुतः तो सवित्याचा मंत्र असल्यामुळें सावित्री मंत्र हें त्याचें खरें नांव आहे. ब्राह्मणांचा सावित्री मंत्र अथवा गायत्री मंत्र प्रसिद्धच आहे. तो मंत्र म्हणजे 'तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात्' (ऋ. ३,६२,१०) "अखिल चराचराला प्रेरणा देणारा देव जो सविता नारायण त्याचें सर्वांना अत्यंत प्रिय असें जें एक सर्वश्रेष्ठ अवर्णनीय तेज आहे त्याचें ध्यान करणें हें आमचें कर्तव्य आहे. तोच भगवान् आमच्या बुद्धीला आणि ध्यानभक्तीला उत्तम रीतीनें प्रेरणा करो." सूर्याच्या तेजापासून स्थिरचर सृष्टीला जीवनरसाची प्राप्ति होते त्या तेजाची उपासना करून त्यानें सद्बुद्धीला प्रेरणा करावी अशी या मंत्रानें रोज सूर्याची प्रार्थना करण्यांत येई. क्षत्रिय व वैश्य यांचे सावित्री मंत्र वेगवेगळे, पण ऋग्वेदांतीलच आहेत. क्षत्रियांचा मंत्र त्रिष्टुभ् वृत्ताचा असून वैश्यांचा जगतीवृत्ताचा आहे. मनुस्मृतीचा विख्यात टीकाकार मेधातिथि याच्या मताप्रमाणें क्षत्रियांचा सावित्री मंत्र

पुढीलप्रमाणें आहे : "आ कृष्णेन रजसा वर्तमानो विवेशयन् अमृतं मर्त्यं च । हिरण्ययेन सविता रथेना देवो याति भुवनानि पश्यन् ॥" ( ऋ. १,३५,२ ) 'कृष्णवर्ण अंतरिक्षांतून मार्ग आक्रमण करीत आणि अमर्त्य व मर्त्य या सर्वांना आपापल्या उद्योगास प्रवृत्त करीत सर्व भुवनांचें अवलोकन करणारा सविता हा आपल्या सुवर्णमय रथांत बसून आगमन करीत आहे.' याच्या ऐवजीं सांख्यायन गृह्यसूत्रावरील टीकाकार जो नारायण त्याच्या मतें पुढील मंत्र हा क्षत्रियांचा गायत्री मंत्र होय. "हिरण्यपाणिः सविता विचर्षणिः उभे द्यावापृथिवी अन्तरीयते। अपामीवां बाधते वे ति सूर्य अभि कृष्णेन रजसा द्यां ऋणोति (ऋ. १,३५.९) 'सुवर्ण रश्मिमान् आणि सर्वसंचारी सवितादेव स्वर्ग आणि पृथ्वी यांच्यामधून आपला मार्ग आक्रमण करीत असतो. तो रोगांचें निर्मूलन करतो. तो सूर्याचें रूप धारण करतो आणि कृष्णवर्ण अशा रजोलोकांतून द्युलोकापर्यंत जाऊन भिडतो.' क्षत्रियाप्रमाणेंच वैश्य वर्णाच्या बाबतींतहि असाच मतभेद आहे. मेधातिथि, श्यातातप व लौगाक्षि यांच्या मतें वैश्यांचा गायत्रीमंत्र पुढीलप्रमाणें आहे : 'विश्वारूपाणि प्रति मुंचते कविः प्र असावीत् भद्रं द्विऽपदे चतुष्पदे । वि नाकं अख्यत् सविता वरेण्यः अनु प्रऽयानं उषसः वि राजति ॥ ( ऋ.५,८१,२ ) जगतांत जे निरनिराळे पदार्थ आहेत त्या सर्व पदार्थांचे आकार तोच ज्ञानी कवि सविता बनवीत असतो. पशु, पक्षी आणि मनुष्यें यांना कल्याणप्रद अशा ज्या गोष्टी आहेत त्याहि त्यानेंच उत्पन्न केल्या आहेत. सर्वोत्तम सवित्यानें गगनमंडळाच्या मध्यस्थलावर आपली दृष्टि फेकली आणि उषेच्या मार्गानेंच तिच्या मागोमाग तो सुप्रकाशित झाला.' याच्या ऐवजीं आश्वलायन गृह्यसूत्र व वाराह गृह्यसूत्राच्या मतें याच सूक्तांतील पहिला मंत्र हा वैश्यांचा गायत्री मंत्र म्हणून सांगितलेला आहे. तो असा 'युञ्जते मनः उत युञ्जते धियः विप्राः विप्रस्य बृहतः विपःऽचितः । विहोत्राः दधे वयुनऽवित् एकः इत् मही देवस्य सवितुः परिऽस्तुतिः (ऋ. ५,८१,१) 'स्फूर्ति देणारा अत्यंत विचक्षण असा जो जगत्प्रेरक सविता त्याचे ज्ञानी उपासक आपलें मन आणि ध्यान हीं सर्व त्याच्या सेवेंतच गुंतवून

टाकतात. सदाचारांचें ज्ञान फक्त त्यालाच असतें. हौत्रकर्म कसें करावें याचें विधान तोच करतो. खरोखर त्या जगत्प्रेरक देवाची स्तुति सर्वश्रेष्ठ होय.' सांख्यायन गृह्यसूत्राचा टीकाकार जो नारायण त्याच्या मतें वैश्यांचा गायत्री मंत्र पुढीलप्रमाणें आहे : "हंसः शुचिऽसत् वसुः अन्तरिक्षऽसत् होता वेदिऽसत् अतिथिः दुरोणऽसत्। नृऽसत् वरऽसत् ऋतऽसत् व्योमऽसत् अप्ऽजाः गोऽजाः ऋतऽजाः अद्रिऽजाः ऋतम् बृहत्।। हा निष्कलंक तेजाच्या ठिकाणीं अधिष्ठित होणारा हंस आहे. अंतरिक्षांत विराजमान होणारा दिव्यनिधि आहे. वेदीवर आरोहण करणारा अग्निरूप होता आहे. आणि यजमानाच्या घरीं वास करणारा अतिथि आहे. हा शूरांच्या समाजांत वावरतो. अत्युच्च लोकीं नांदतो आणि सद्धर्मांत भरून राहून पुन्हां हा आकाशांतहि स्थानापन्न होतो तो दिव्योदकांत प्रकट होतो. प्रकाशापासून आविर्भूत होतो. सद्धर्मापासून आणि पर्वतापासूनहि प्रकट होतो. याप्रमाणें तो धर्मरूपच आहे." या गायत्री मंत्राच्या उपदेशाच्या दीक्षेनंतर ब्रह्मचाऱ्याच्या हातीं दंड देण्यांत येई. ही प्रवासाची खूण आहे. जणूं मी ज्ञान व बलसंपादनाच्या मार्गावरील प्रवासी आहे ही भावना ब्रह्मचाऱ्याच्या मनांत यायोगें सतत जागृत असावी ही इच्छाच आचार्य व्यक्त करी. दंडधारणानंतर मग ब्रह्मचाऱ्याला भिक्षेसाठीं बाहेर पडावें लागे. अर्थातच हें पहिल्या दिवशींचें उपनयन संस्कारांगभूत भिक्षाटन नाममात्रच असावयाचें. कारण आई व तत्सम व्यक्तींच्या कडेच ही पहिल्या दिवसाची भिक्षा मागावयाची असे. उपनयनानंतर तिसऱ्या दिवशीं 'मेधाजनन' नांवाचा बुद्धि तीव्र होण्याचा संस्कार झाला म्हणजे हा उपनयन संस्कार समाप्त होत असे.

उपनयनसंस्कारांतील या सर्व विधींचें सूक्ष्मतेनें निरीक्षण केलें तर केवढे उदात्त भाव उत्पन्न करण्यासाठीं यांतील बारीक सारीक विधिविधानांची रचना झालेली आहे याची कल्पना येईल. स्वावलंबन, स्वाभिमान व नियंत्रित असें संयमपूर्ण जीवन यांच्या मधुर मीलनाचा उदात्त रम्य काळ आतां सुरू होणार आहे. ज्ञानार्जन व सामर्थ्यसंपादन हें कार्य अतिशय कष्टसाध्य असलें तरी निश्चय-

पूर्वक आपण प्रयत्नशील राहिलों तर आपणांस यश मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. ह्या संस्काराच्या योगानें या पवित्र कार्यांत परमेश्वर आपला पाठीराखा झालेला आहे; आपण इंद्राप्रमाणें पराक्रमी, सूर्याप्रमाणें रसरशीत जीवनाचे व अग्नीप्रमाणें तेजस्वी होऊं, मग आपणांस अशक्य तें काय राहील? आपल्या आश्रमधर्माचें आपण यथावत् परिपालन केलें तर मृत्यूलाहि आपणांस स्पर्श करण्याची छाती होणार नाहीं. अशा तऱ्हेची भावना या संस्कारानंतर विद्यार्थ्यांच्या मनांत उत्पन्न होई. आपल्या वाङमयानेंहि प्रत्येक आश्रमधर्माच्या मुळाशीं याच तऱ्हेच्या भावनांचें पोषण होईल अशा रीतीची वारंवार खटपट केली आहे. ब्रह्मचाऱ्यानें रोज सायंप्रातः हवन कां करावें हें सांगताना गोपथ ब्राह्मणांत म्हटलें आहे कीं, " ब्रह्म ह वै प्रजा मृत्यवे संप्रायच्छत् ब्रह्मचारिणमेव न संप्रददौ, स होवाचास्यामस्मिन्निति किमिति यां रात्रिं समिधमनाहृत्य वसेत् तां आयुषः अवरुन्धीयेति, तस्मात् ब्रह्मचारी अहरहः समिधामाहृत्य सायंप्रातः अग्निं परिचरेत्। (गो. ब्रा. पूर्वभाग, द्वितीय प्रपाठक, ६)

"परमेश्वरानें प्रजांना मृत्यूच्या स्वाधीन केलें. केवळ ब्रह्मचाऱ्यालाच तेवढें मृत्यूच्या स्वाधीन केलें नाहीं. परमेश्वरानें मृत्यूला सांगितलें कीं, ज्या रात्रीं हा अग्नींत समिधेचें हवन करणार नाहीं त्या रात्रीं हा तुझ्या ताब्यांत आहे. त्यामुळें ब्रह्मचाऱ्यानें न चुकतां प्रत्येक दिवशीं सकाळीं व संध्याकाळीं अग्नींत समिधेचें हवन करून अग्निपरिचर्या करावी." आयुष्याच्या उषःकाळीं तेजाची उपासना देणें व त्यामुळें मृत्यूवरसुद्धां विजय संपादन करतां येईल असा दृढ आत्मविश्वास बालमनांत उत्पन्न करणें या गोष्टीचा जीवन टवटवीत व तेजस्वी आकांक्षांनीं परिपूर्ण करण्याच्या दृष्टीनें केवढा मोठा उपयोग आहे! या पहिल्या उपनयन संस्कारानंतर ब्रह्मचाऱ्याला कांहीं विशेष शिकण्यासाठीं विशेष प्रकारचें व्रत करावें लागे. अनधिकाऱ्याला हव्या त्या विद्येचें संप्रदान करावयाचें नाहीं; हा वैदिक शिक्षणपद्धतीचा प्रधान दंडक होता. त्यामुळेंच त्यांचें विद्याप्रदान प्रत्यक्ष जीवन घडविण्याच्या दृष्टीनें उपयोगी ठरलें. शिक्षणमंदिरांतील त्या त्या दालनांत, प्रवेश करतांना व्रताच्या या प्रवेशिकेची

आवश्यकता असे. उदाहरणार्थ अश्वमेध शिकण्याच्या वेळीं आश्वमैधिक व्रत, आरण्यकें शिकण्याच्या वेळीं व्रातिक व्रत, व उपनिषदें शिकण्याच्या वेळीं रहस्यव्रत याप्रमाणें व्रतें करावीं लागत.

आपण प्रथम संस्कारांची पाहणी करून नंतर शिक्षणाच्या मंदिराच्या एकंदर उभारणीचा विचार करूं. उपनयन संस्कारानंतर उपाकर्म हा महत्त्वाचा संस्कार आहे. उपाकर्म म्हणजे श्रावणी पण श्रावणी म्हणजे पञ्चगव्य प्राशन करून जानवें अथवा यज्ञोपवीत कसेंबसें बदलविणें हें त्याचें हल्लीं जें स्वरूप आहे तें विकृत आहे. उपाकर्म संस्कार म्हणजे जानवें बदलविणें नव्हे. वैदिक धर्मीयांच्या बहुतेक व्रतांच्या व संस्कारांच्या वेळीं यज्ञोपवीत, अजिन, दंड जुने टाकून नवे घ्यावे लागत, तसें केवळ उपाकर्माचें अंग म्हणून जानवें बदलविणें आहे. पण श्रावणी अथवा उपाकर्म जानवें बदलविण्यासाठीं नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. प्रत्येक वर्षीं वेदाध्ययनास प्रारंभ करण्याच्या वेळीं विद्यार्थ्यांनीं आपल्या अध्यापकासहित करावयाचा हा एक सुटसुटीत व शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्वाचा असा विधि आहे. विवाहाच्या वरातीच्या वेळीं वधूला नवें व उत्कृष्ट पातळ नेसवितात म्हणून पातळ नेसविणें हेंच वरातीचें प्रयोजन आहे असें म्हणणें हें जसें हास्यास्पद ठरतें तसें जानवें बदलविण्यासाठीं उपाकर्म आहे असें म्हणणेंहि हास्यापद व चुकीचें ठरतें. "समारब्धेषु अन्त्येवासिषु उपाकर्म कुर्वीत"। (बौधायन गृह्यसूत्र ३–१–३) "अध्येष्यमाण: अध्याप्यैरन्वारब्ध: उपाकर्म करोति। (आ. गृ. सू ३,४,१०) हीं गृह्यसूत्रांतील विधानें व पारस्कर गृह्यसूत्राचा टीकाकार हरिहर यानें केलेलें "अत: अध्यापयत: अपि निरग्ने: साग्ने: अपि अनध्यापयत: उपाकर्मणि नाधिकार:।" हें जेंस्पष्टीकरण केलें आहे त्यावरूनहि उपाकर्म म्हणजे काय हें स्पष्ट होतें. श्रावणी अथवा उपाकर्म म्हणजे वेद शिकविणाऱ्या आश्रमांतील अथवा शिक्षण संस्थेंतील वार्षिक अधिवेशन सुरू होण्याच्या वेळीं करावयाचा विधि होय. हा विधि झाल्यावर पावसाळ्याचे चार महिने सर्व स्नातकांनीं प्रतिवर्षीं वेदांची व विद्येची सर्व उजळणी करावयाची अशी अपेक्षा असे. जर हा विधि केवळ अध्यापक व शिष्य यांच्यापुरता

मर्यादित आहे तर हल्लीं व पूर्वीहि गुरुशिष्यांव्यतिरिक्त, ब्रह्मचर्य संपविलेल्या व वेगवेगळ्या उद्योगव्यवसायांत निमग्न असणाऱ्या गृहस्थाश्रमी लोकांनाहि हा विधि सक्तीचा कां अशी स्वाभाविकच शंका येईल. परंतु ही शास्त्रकारांनीं पूर्ण विचार करून मूळच्या विधींत केलेली इष्ट सुधारणा आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. एकदां पदवीधर होऊन महाविद्यालयांतून बाहेर पडल्यावर व व्यावसायिक जीवन सुरू झाल्यावर बहुतेक सर्व लोक शिकलेली विद्या पूर्णपणें विसरतात ही जी आज स्थिति आहे तिच्याहून वेगळें कांहीं प्राचीन काळीं असण्याची कल्पना करण्याचें. कारण नाहीं. अशा स्थितींत एक मात्र मोठाच फरक पडलेला आहे व तो म्हणजे हल्लीच्या व प्राचीन विद्येंतील स्वरूपासंबंधीचा होय. हल्लीच्या विद्येंत शिकलेल्या विषयांचीं स्थूल प्रमेयें माहीत असलीं म्हणजे सुशिक्षित पदवीधरांना तात्पुरती वेळ मारून नेतां येणें शक्य होतें; पण वेदाध्ययन करणारा स्नातक हा कांहीं वेदविद्येच्या बाबतींत अशी बतावणी करूं शकत नाहीं. वेद म्हटले कीं स्वर वर्ण वगैरेच्या बाबतींत अल्पहि चूक खपत नाहीं, म्हणूनच पंचमहा-यज्ञांत गृहस्थाश्रमी व्यक्तीनेंहि रोज थोडा तरी वेळ स्वाध्यायांत घालवावा अशी बुद्धिपूर्वक योजना केलेली आहे. पण दैनंदिन जीवनांत या स्वाध्यायाचीहि इतकी गळचेपी होते व त्याचें स्वरूपहि इतकें नाममात्रच राहातें कीं, विद्या सतेज राखण्याच्या दृष्टीनें त्याचा आवश्यक तो उपयोग होऊं शकत नाहीं. तेवढ्या-साठीं शिकलेले वेदमंत्र विसरूं नयेत आणि यातयामता निरासार्थ म्हणजे विद्येवर दीर्घकाल उजळणी न करण्यामुळें स्वाभाविकपणें येणारा शिळेपणा काढून टाकण्यासाठीं कांहींतरी वेगळी व्यवस्था करणें आवश्यक होतें. व तेवढ्यासाठीं कृषिप्रधान भारतवर्षांत विशेष व्यावसायिक काम नसलेल्या पावसाळ्यांत चार महिने सर्व स्नातकांनीं दर वर्षीं वेदांची पुन्हां उजळणी करावी अशा हेतूनें श्रावणी अथवा उपाकर्म सर्वांनाच सक्तीचें करण्यांत आलें. श्वेतकेतु ऋषीनें तर सर्व विवाहित मनुष्यांनींहि या काळांत दोन महिने तरी गुरुगृहीं राहावें असें आपलें मत

प्रतिपादन केलें आहे. (आपस्तंबधर्मसूत्र) पण दरवर्षी गृहस्थाश्रमांतील आवश्यक कर्तव्य सोडून ब्रह्मचाऱ्याप्रमाणें दोन महिने गुरुगृहीं राहणें सर्वांनाच शक्य होणार नाहीं हें ओळखून आपस्तंब ऋषींनीं श्वेतकेतूंना आपला विरोध दर्शविला व शेवटीं अशी तडजोड निघाली कीं गुरुगृहीं जाण्याची सक्ती न करतां उपाकर्म मात्र सर्वांना सक्तीचें करावें व श्रावणीनंतर सर्वांनीं चार महिने आपल्या घरीं राहूनच पण अधिक वेळ देऊन विशेष लक्षपूर्वक वेदांची आवृत्ति करून, त्यांतील यातयामता अथवा शिळेपणा काढून टाकावा. मुळांत केवळ अध्यापन करणारा गुरु व अध्ययन करणारा शिष्य यांच्याचसाठीं असलेलें उपाकर्म जें सर्वांना सक्तीचें करण्यांत आलें त्याचें कारण हें असें आहे.

या उपाकर्माला श्रावणी म्हणण्याचेंहि एक महत्त्वाचें कारण आहे. आषाढ, श्रावण किंवा भाद्रपद पौर्णिमेला पाऊस पडून शेतें उगवूं लागलीं म्हणजे उपाकर्माला सुरुवात करावयाची असे. कृषिप्रधान भारतांत निरनिराळ्या प्रांतांतून आषाढ ते भाद्रपदापर्यंत केव्हांतरी पावसाळा सुरू होतो. हीच वेळ सर्वांना सोयीची खरी; पण पावसाच्या या वेगवेगळ्या वेळांमुळें उपाकर्माच्या कालाबद्दलहि विकल्प आढळतो. पण सामान्यतः श्रावण महिना बहुसंख्य लोकांना अधिक सोयीचा असल्यामुळें उपाकर्म श्रावण महिन्यांत करण्यांत येऊं लागलें. वेदाध्ययनाचाहि ज्योतिष शास्त्राच्या दृष्टीनें या श्रावण महिन्याशीं विशेष संबंध आहे. श्रावण महिन्यांतील हस्तनक्षत्राची देवता सविता ही आहे. व वेदांतील सर्वश्रेष्ठ मंत्र जो गायत्री त्याचीहि देवता सविता हीच आहे. त्यामुळें प्रतिवार्षिक वेदाध्ययनाचा हा सामुदायिक कार्यक्रम श्रावण महिन्यांतील हस्तनक्षत्राच्या दिवशीं म्हणजे श्रावण शुद्ध पंचमीला करावा अशीहि एक प्रथा पडली आहे. कांहीं लोकांच्या मतें श्रावण महिन्यांतील श्रवण नक्षत्राचा दिवस वेदाध्ययनास चांगला अशा कल्पनेनें श्रावणी पौर्णिमा ही उपाकर्मासाठीं योग्य मानण्यांत आली. उपाकर्मास श्रावणी हें नांव पडण्याचें कारण हें असें आहे.

वैदिक काळीं वेद हाच अध्ययनाचा प्रधान विषय असल्यामुळें ऋग्वेद्यांकडून करावयाच्या उपाकर्माच्या वेळीं वैदिक देवतांच्यासाठीं हवन करून बुद्धि व धारणाशक्ति वाढविण्याविषयीं त्या देवतांची वारंवार प्रार्थना करण्यांत येई. ज्यांनीं वेदमंत्रांचें प्रत्यक्ष दर्शन घेऊन लोककल्याणासाठीं त्यांचें प्रकटीकरण केलें त्या मंत्रद्रष्टया ऋषींचेंहि कृतज्ञतापूर्वक स्मरण करून व त्यांना हवनादि अर्पण करून विनम्र प्रणाम करण्यांत येई. वेदांच्या निरनिराळ्या शाखा असल्यामुळें द्रष्टे व देवता यांची भिन्नता उत्पन्न होऊन प्रत्येक शाखेचें वेगवेगळें उपाकर्म असे. ऋग्वेदाच्या उपाकर्मांत सविता, श्रद्धा, मेधा, प्रज्ञा इ. देवतांना हविर्भाग समर्पण करून ऋग्वेदाच्या दहा मंडलांच्या पहिल्या व शेवटच्या ऋचा म्हणून त्यांतील देवतांना व द्रष्टयांना हविर्भाग समर्पण करण्यांत येत. यजुर्वेद हा यज्ञप्रधान असल्यामुळें यजुर्वेदी लोक उपाकर्माच्या वेळीं प्रथम याज्ञिक व नंतर संहितांच्या देवतांना हविर्भाग समर्पण करतात व मग यजुर्वेद संहितेच्या निरनिराळ्या कांडांच्या मंत्रद्रष्टया ऋषींची प्रार्थना करतात. नंतर ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद व इतिहासपुराण हा पांचवा वेद यांना हविर्भाग समर्पण करतात. नंतर यज्ञविषयक वाङमयामध्यें ग्रन्थ व टीका लिहून ज्यांनीं ज्यांनीं श्रेष्ठ भर टाकली आहे त्या कृष्णद्वैपायन, वैशंपायन, तित्तिरी, आत्रेय, कौंडिण्य, बोधायन, आपस्तंब, सत्याषाढ, याज्ञवल्क्य, भारद्वाज, अग्निवेश्य इत्यादि ग्रंथकारांना कृतज्ञतापूर्वक प्रणिपात करण्यांत येतो. सामवेदाच्या उपाकर्मामध्यें तर जैमिनी, तवल्कार, राणायनि, भागुरी, इत्यादि सामवेदीय ग्रंथकारांना हविर्भाग समर्पण करण्यांत येई. यानंतर गुरु व शिष्य हे दोघेहि आपल्या हातून अध्ययनकार्य एकांतिक निष्ठेनें व्हावें अशी प्रार्थना करून अध्ययनास प्रारंभ करीत. उपाकर्मांतील मुख्य कल्पना सर्व विद्येची उजळणी करणें ही तर विद्योपासनेच्या दृष्टीनें महत्त्वाची आहेच, पण त्याचबरोबर ज्या श्रेष्ठ ग्रंथकारांनीं ज्ञानसंपत्तींत भर घातली व ज्यांच्या वाङम-

याचें आपणांस अध्ययन व अध्यापन करावयाचें आहे त्यांचें कृतज्ञतापूर्वक स्मरण करण्याची कल्पना केवढी तरी उदात्त आणि श्रेष्ठ आहे ! आजहि वेगळ्या पद्धतीनें ही कल्पना व विद्या सतेज करण्यासाठीं म्हणून करावयाच्या उजळणीची ही प्रथा धर्माच्या अथवा कर्तव्यकर्माच्या पायावर उभारण्यांत आली तर त्यानें केवढें ईप्सित साधलें जाईल ?

उपाकर्मानंतरचा ब्रह्मचर्याश्रमांतील महत्त्वाचा संस्कार म्हणजे उत्सर्जन हा होय. उजळणीचें वार्षिक अधिवेशन संपण्याच्या वेळीं हा संस्कार करण्यांत येई. उत्सर्जन संस्काराचा विधि उपाकर्माच्या विधीसारखाच आहे. देवता व ग्रंथकार यांचें कृतज्ञतापूर्वक स्मरण ज्याप्रमाणें या अधिवेशनाच्या आरंभीं करण्यांत येत असे, त्याप्रमाणेंच उत्सर्जनाच्या संस्काराच्या रूपानें तें, अधिवेशन बंद व्हावयाच्या वेळीं करण्यांत येत असे. आज या संकारांचें केवळ नाममात्र स्वरूप शिल्लक राहिलें असल्यामुळें व मूळ वेदाध्ययन व अध्ययनाची उजळणी यांचा आजच्या उपाकर्म संस्काराशीं कांहीं संबंध राहिला नसल्यामुळें केवळ प्रथा जिवंत ठेवण्याच्या दृष्टीनें उपाकर्म व उत्सर्जन हे दोन्ही संस्कार एकाच दिवशीं कसेबसे उरकून घेण्यांत येतात.

यानंतरचा ब्रह्मचर्याश्रमांतील सर्वांत महत्त्वाचा व शेवटचा संस्कार म्हणजे समावर्तन संस्कार होय. वेदाध्ययन संपवून व सर्व विद्या पारंगत होऊन सद्‌गुरूच्या आश्रमांतून शिष्य आपल्या घरीं जाण्यास निघाला ( समावर्तन ) म्हणजे हा समावर्तन संस्कार करण्यांत येऊन त्या द्वारें त्याला निरोप देण्यांत येत असे. समावर्तन म्हणजे हल्लीं ज्याला सोडमुंज म्हणतात तो संस्कार होय. आज अज्ञानामुळें त्याचें स्वरूप केवळ विदूषकी मूर्खपणाच्या थाटाचें राहिलें असून ज्याच्याशिवाय लग्न होणें शक्य नसल्यामुळें जो करणें आवश्यकच आहे असा एक संस्कार अशी त्याच्याविषयींची समजूत समजांत प्रचलित आहे. पण पूर्वीं हवें त्याचें समावर्तन करीत नसत. हल्लीच्या पदवीदान समारंभासारखाच पण धार्मिक

पायावर उभारलेला समावर्तन हा संस्कार आहे. हल्लीं ज्याप्रमाणें विशिष्ट पदवी मिळाल्यावर पदवीदान समारंभांत भाग घेतां येतो व ती ज्यानें मिळविलेली नाहीं त्याला तेथें जातां येत नाहीं, त्याचप्रमाणें वैदिक काळीं ज्याचें वेदाध्ययन पूर्ण झालेलें आहे त्याचेंच केवळ समावर्तन करण्यांत येत असे. एका गृह्यसूत्रकारानें तर असें म्हटलें आहे कीं संपूर्ण वेद पाठ करून केवळ वेदपाठी बनण्यानें समावर्तनाचा अधिकार प्राप्त होत नसून संपूर्ण वेदाचा अर्थ सांगण्याची पात्रता ब्रह्मचाऱ्याच्या अंगीं आली म्हणजेच त्याचें समावर्तन करावें. त्यानंतरच्या काळांत उपनयनाप्रमाणें समावर्तन हाहि एक शारीरिक संस्कार ठरला व सर्वांचेंच समावर्तन होऊं लागलें. तरी पण या बाबतींत स्मृतिकारांनीं काढलेले पर्याय पाहिले म्हणजे समावर्तनाचें खरें स्वरूप ध्यानांत आल्याविना रहात नाहीं. संपूर्ण वेदाचा अर्थ सांगण्याची पात्रता नसली तर निदान वेदपाठाची तरी पात्रता असावी. तीही नसली तर निदान अंशतः तरी वेद पाठ असावा व तेंहि नसलें तर विद्यार्थ्यानें ब्रह्मचर्यनियमांचें पालपा तरी केलेलें असावें अशी स्मृतिकारांनीं अपेक्षा व्यक्त केली आहे व या गोष्टी ब्रह्मचर्याश्रमांतीलच असल्यामुळें व यानंतरचा आश्रम गृहस्थाश्रम व संस्कार विवाह संस्कार हाच असल्यामुळें विवाहापूर्वीं करावयाचा आवश्यक शारीरिक संस्कार असें त्याला स्वरूप आलें. समावर्तनाचा संस्कार अध्ययन परिपूर्ण झाल्यानंतर करावयाचा असल्यामुळें व अध्ययन परिपूर्ण होणें हें प्रत्येकाच्या कमी अधिक धारणाशक्तीवर अवलंबून असल्यामुळें अमक्याच वर्षीं समावर्तन करावें असा नियम नसे व असूं शकतहि नव्हता. सामान्यतः वीस ते चोवीस वर्षांच्या वयांत या संस्काराची पाळी येत असे. अर्थातच या तरुण ब्रह्मचाऱ्याची दाढी वाढलेली असे. बारा वर्षें तरी ब्रह्मचर्य पाळावें अशी कमींत कमी अपेक्षा शास्त्रकारांनीं केलेली आहे. "गोदान" नांवाचा संस्कार करून त्या ब्रह्मचाऱ्याची दाढी काढण्यांत येई. नंतर खास समावर्तनाच्या वेळीं करावयाचे वेगवेगळे विधि असत. विद्यार्जन व विद्येची महती भारतीय

द्रष्टयांना केवढी विलक्षण वाटत असे हें समावर्तनाच्या दिवशींच्या अगदीं प्रारंभींच्या विधीवरून दृष्टोत्पत्तीस येतें. समावर्तनाच्या दिवशीं मध्यान्ह काळापर्यंत ब्रह्मचाऱ्याला त्याच्या खोलींतच ठेवण्यांत येई व मध्यान्हाच्या वेळीं त्याला खोलीच्या बाहेर काढण्यांत येई. तपस्येचा पुञ्ज व कृतविद्य असलेला हा ब्रह्मचारी केवढा महत्त्वाचा आहे, हें आश्रमांतील अजून अध्ययनाचा काळ न संपलेल्या वटूंच्या मनावर बिंबविण्याची ही एक युक्ति होती. भारद्वाज गृह्यसूत्रांत म्हटलें आहे कीं "एत ह स्नातानाम् अ वा एष एतत्तेजसा तपति तस्मादेनमेतदहनाभिनपेत्." सकाळच्या वेळीं सूर्यनारायणाचें तेज मंद असतें त्यामुळें विद्या व तपस्येच्या उग्र प्रकाशाचा पुञ्ज असलेला हा तेजस्वी स्नातक जर मंद प्रकाशयुक्त सविता देवाकडे गेला तर तो एक प्रकारें सविता देवाचा अपमान होईल म्हणून त्यानें तसें करूं नये" असा या खोलीबाहेर न पडण्याचा आशय आहे. तपस्तेजाच्या महतीची केवढी ही उच्च धारणा! माध्यान्ह काळीं खोलीबाहेर पडल्यावर मुखमार्जनादि विधि आटोपून त्या कृतविद्य ब्रह्मचाऱ्यानें यथाविधि मेखला, अजिन, दंड वगैरे ब्रह्मचर्य व्रत धारणाचीं जीं चिन्हें त्यांचा विधिपूर्वक परित्याग करावयाचा असे. आतां कृतविद्य झाल्यामुळें त्याचें तें असिधाराव्रत, व माला, अलंकार, छत्री इत्यादि गोष्टी न वापरण्याचा त्याचा जो उग्र नियम त्या सर्वांचाच ह्या वेळीं समारोप होई. ज्या गुरूनें ब्रह्मचर्यव्रतधारणाच्या वेळीं सुगंधित उष्ण पाणी न वापरण्याचा त्याच्या बाबतींत कटाक्ष ठेवला तो आचार्य स्वतःच समावर्तनाच्या वेळीं या कृतविद्य ब्रह्मचाऱ्याला उष्ण सुगंधी पाण्यानें स्वतः स्नान घाली. त्यानंतर नवीन वेष, अलंकार, पुष्पमाला, जोडा व छत्री हे आजवर वर्ज्य ठरविलेले पदार्थ स्वतः गुरुच शिष्याला वापरावयास देई. नंतर अग्नीमध्यें होम करून या स्नातकानें गुरूचें अध्यापनकार्य पुढें चालवावें अशी अपेक्षा करून त्याला पुष्कळ विद्यार्थी मिळोत अशी प्रार्थना करण्यांत येई. त्याच वेळीं स्नातकाला मधुपर्क अर्पण करण्यांत येत असे. नूतन वस्त्रें परिधान

केलेल्या व मालादिकांनीं विभूषित झालेल्या स्नातकाला नंतर रथांत किंवा हत्तीवर बसवून स्वतः गुरु त्यास पंडितपरिषदेमध्यें नेई. कृतविद्य व आपल्या बरोबरीचा पंडित म्हणून त्याची पंडितपरिषदेंत इतर पंडितांशीं ओळख करून देण्यांत येई व ही परिषद संपंत असे. ही केवळ परिचयात्मक अशा स्वरूपाचीच बैठक असे.

वेदाध्ययनाप्रमाणेंच धनुर्वेद व आयुर्वेद यांच्या बाबतींतहि वेगवेगळे उपनयन संस्कार असत व तें तें अध्ययन संपलें म्हणजे त्या संबंधाचाहि समावर्तन संस्कार होत असे. धनुर्वेदाच्या म्हणजेच लष्करी शिक्षणाच्या समारंभांत करावयाच्या उपनयनाच्या वेळीं विद्यार्थी ब्राह्मण असला तर त्याला धनुष्य, क्षत्रिय असला तर त्याला खड्ग, वैश्य असला तर त्याला भाला व शूद्र असला तर त्याला गदा देण्यांत येत असे. वेदाध्ययनाचा अधिकार जरी केवळ त्रैवर्णिकांनाच असला तरी धनुर्वेद व आयुर्वेद यांच्या अध्यापनाचा व म्हणूनच त्या बाबतींतील उपनयनाचा अधिकार चारहि वर्णांना म्हणजेच सर्व समाजाला होता. या संबंधांत एक उदात्त गोष्ट सांगण्यासारखी आहे. या प्रत्येक अध्ययनाच्या वेळीं गुरु शिष्याला सांगत असे कीं मला माहीत असलेलें सर्व कांहीं मी तुला शिकवीन, कांहीं मागें ठेवणार नाहीं. " जिनने पाई उनने छिपाई " अशासारख्या कोत्या मनोवृत्तींचें प्रदर्शन करणारा प्रकार मुळींच नव्हता. हें सैनिकी अथवा धनुर्वेदाचें शिक्षण संपलें म्हणजेहि असेंच समावर्तन करण्यांत येत असे व त्याला छुरिका बंधन असें म्हणत असत. सैनिकी शिक्षण संपलें म्हणजे एका शुभ दिवशीं इष्ट देवतांचें पूजन करून गुरु विद्यार्थ्याच्या कटीला एक तलवार लटकावी व हें खड्गबन्धन झालें म्हणजे त्याचें शिक्षण संपलें असें समजण्यांत येत असे. एकोणिसाव्या शतकापर्यंत राजपुतान्यांतील सर्व कुलीन रजपूत घराण्यांतून हा संस्कार प्रचारांत होता. राजपुतान्यांत तेथील लोकभाषेंत या संस्कारास "खरगबन्धाई" असें म्हणत असत व तो विवाहाच्या पूर्वींच शिक्षण संपल्यावर करावयाचा असल्यामुळें तो समावर्तन संस्कारच होय हें उघड दिसतें. एक प्रश्न असा

उत्पन्न होईल कीं ऋग्वेदकाळीं अशा रीतीचें लष्करी शिक्षण होतें काय ? जर वेदकाळीं हें लष्करी शिक्षण नसेल तर वेदांतीलच अनेक गोष्टींची उपपत्ति लागत नाहीं ही गोष्ट ऋग्वेदाचेंच वाचन केलें तरी समजून येण्यासारखी आहे. सैनिक लोक अंगांत अंगरखा घालून त्यावर आवश्यक तेव्हां चिलखत व डोक्यावर शिरस्त्राणें घालीत, इतकेंच नव्हे तर सैनिकांचें प्रयाण अथवा कूच होत असतां हल्लीच्या कवाइती पद्धतीप्रमाणें पायदळासाठीं व्यवस्थितपणें पावलें टाकण्याची कांहीं तरी पद्धति होती हें मरुतांच्या सैन्याचें खांद्यावर भाले टाकून एका व्यवस्थेनें कूच करण्याचें ऋग्वेदांतील वर्णन वाचलें म्हणजे उघड होतें. अर्थातच विद्येंत जर सैनिकी शिक्षणाचा अंतर्भाव होता तर असें समावर्तनासारखे संस्कार असणें ही कांहीं मोठी आश्चर्याची गोष्ट मानण्याचें कारण नाहीं.

याप्रमाणें ब्रह्मचर्याश्रमांतील प्रमुख संस्कारांचें शिक्षणशास्त्रदृष्टचा स्वरूप पाहिल्यावर एकंदर ब्रह्मचर्याश्रमांतील त्याचे नियम, त्याची राहण्याची पद्धति, त्याच्या अभ्यासाचे विषय इत्यादि गोष्टीहि पाहणें अवश्य आहे. ब्रह्मचर्य बारा वर्षे पाळावें असा सामान्यतः संकेत-असून श्वेतकेतूनें बारा वर्षे ब्रह्मचर्याचें पालन केलें होतें असें छांदोग्योपनिषदांत वर्णन आहे. दीर्घकालीन ब्रह्मचर्य पाळणारे अथवा सदाचेंच ब्रह्मचर्य पाळणारे नैष्ठिक ब्रह्मचारी कांहीं असत. पण सर्वसामान्य जीवनक्रम ज्यांना पत्करावयाचा आहे त्यांनीं बारा वर्षे ब्रह्मचर्य पाळावें व अकारण ब्रह्मचर्याचा काळ वाढवून कौटुंबिक दायित्वाकडे दुर्लक्ष करणें योग्य नाहीं अशीच वैदिक लोकांची धारणा होती. जन्माला आलेला मनुष्य ऋषिऋण, पितृऋण व देवऋण अंगावर घेऊनच जन्मास येत असतो. त्यापैकीं ब्रह्मचर्यानें ऋषिऋण जसें अध्ययनानें फेडावयाचें असतें, त्याचप्रमाणें पितृऋण विवाह करून संततीच्या द्वारें फेडावयाचें असतें. तीसचाळीस वर्षे ब्रह्मचर्याश्रमांत राहून पुढें पितृऋण फेडावयाच्या खटपटींत राहणें हास्यास्पद व शुक्राचार्यांच्या मताप्रमाणें तर दंडार्हहि आहे. अग्निहोत्र केव्हां घ्यावें यासंबंधीं वेदांत असें सांगितलें आहे कीं, " जातपुत्रः कृष्णकेशः अग्निनादधीत" पुत्र झाल्यावर व केस काळे असतांना अग्निहोत्र

घ्यावें. अग्निहोत्र ही वैदिक धर्मप्रमाणें इतकी महत्त्वाची संस्था आहे कीं अग्निहोत्राशिवाय सप्तसोम संस्थेचा व देवऋण फेडण्यासाठीं अवश्य असलेल्या यज्ञयागादिकांचा अधिकारच प्राप्त होऊं शकत नाहीं. या दृष्टीनें विचार केला तर 'जातपुत्रः' आणि 'कृष्णकेशः या शब्दांवरून चोविसाव्या किंवा पंचविसाव्या वर्षी सर्वसामान्यपणें ब्रह्मचर्याचा काल संपत असला पाहिजे ही गोष्ट उघड होते. ज्यांना संसाराबद्दल अंतःकरणापासून खरी व पूर्ण विरक्ति असेल असे कांहीं श्रेष्ठ पुरुष मात्र जन्मभर ब्रह्मचर्य पाळून अध्ययन, अध्यापन संशोधन, धर्माचरण व तत्त्वचिंतन यांत आपलें संपूर्ण जीवन घालवीत. त्यांना नैष्ठिक ब्रह्मचारी असें म्हणत. निष्ठा म्हणजे मरण व नैष्ठिक ब्रह्मचर्य म्हणजे आमरणान्त ब्रह्मचर्य पाळणें. कांहीं लोकांनीं अशी चमत्कारिक समजूत करून घेतलेली आहे कीं वेदकालामध्यें नैष्ठिक ब्रह्मचर्य रूढ नव्हतें व त्याला श्रेष्ठहि मानीत नसत. "वीरहा वैष भवति यः अग्निमुत्सादयति" जो विवाह करून अग्निपरिचर्येत जीवन घालवीत नाहीं त्याला वीरहत्त्येचें पातक लागतें, अशासारख्या वेदवचनावरून विवाह करून अग्निपरिचर्येत आयुष्य घालविणें हाच पुरुषार्थ समजणाऱ्या वैदिक लोकांना नैष्ठिक ब्रह्मचर्य पसंत पडणें कधींहि शक्य नव्हतें अशी त्यांनीं आपली सोईस्कर समजूत करून घेतलेली आहे. पण येथें विवाहावर कटाक्ष नसून सर्वसामान्य जीवनांत असलेला विवाह अग्निपरिचर्यायुक्तच असावा हा खरा कटाक्ष आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. उत्तरकालीन वाङ्मयांतून नैष्ठिक ब्रह्मचर्यासंबंधीं चमत्कारिक विधानें आढळतात. तीं अशीं—

"पङ्ग्वादीनामनंशत्वादसामर्थ्याच्च शास्त्रतः ।
नियतं नैष्ठिकत्वं स्यात् स्वकर्मस्वनधिकारतः ॥
कुब्जवामनजात्यंधक्लीवपङ्ग्वार्तरोगिणाम् ।
व्रतचर्या भवेत्तेषां यावज्जीवमनंशतः ॥

"मुके, अंधळे, बहिरे, क्लीब, खुजे इत्यादि लोकांच्या असामर्थ्यामुळें व त्यांच्या विवाहाची शक्यताच नसल्यामुळें

त्यांनीं नैष्ठिक ब्रह्मचर्य पाळावें. पण या सुभाषितवजा संस्कृत वचनांना धर्मशास्त्राच्या दृष्टीनें व वैदिक संस्कृतीच्या दृष्टीनें कांहींच महत्त्व नसून त्यावरून फक्त लेखकांची कामलंपटता व वैदिक धर्माच्या रचनेविषयीं अज्ञता मात्र प्रकट होते. दरिद्र्याच्या उपासाप्रमाणेंच क्लीबाच्या व अंधाच्या ब्रह्मचर्याला कांहीं अर्थ नाहीं व त्याला कोणी नैष्ठिक ब्रह्मचारी म्हणतहि नाहीं. "यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत्" । ज्या दिवशीं वैराग्य उत्पन्न होईल त्या दिवशीं ब्रह्मचर्याश्रमांतूनहि संन्यास घ्यावा असें वैदिक संस्कृतीचें म्हणणें असून विवाह व गृहस्थजीवन हेंहि एक व्रतच आहे अशी वैदिक धर्माची धारणा आहे. गृहस्थाश्रमाच्या वातावरणांत जाणें म्हणजे किल्ल्यांत राहून शत्रूशीं लढणें आहे असें श्री रामकृष्ण परमहंस म्हणत असत. उघड्या मैदानावर शत्रूशीं लढणें कठीण असेल व त्या मानानें किल्ल्यांत राहून लढणें कमींत कमी धोक्याचें व सुरक्षिततेचेंहि असेल; पण उघड्यावर राहण्याचा धोका पत्करून जो त्यांत विजयी ठरतो, त्याचा कोणी उपहास करील कीं त्याच्याविषयीं अधिक आदर दाखवील? जगद्‌गुरु श्री शंकराचार्यांपासून, त्यांच्याहिपूर्वी देवव्रत भीष्मापासून तो स्वामी विवेकानंदापर्यंत नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याची जी श्रेष्ठ परंपरा वैदिक धर्मांत आढळते ती काय दर्शविते? बहुतेक ऋषि हे नैष्ठिक ब्रह्मचारी असल्याचेंच पुराण व ऐतिहासिक वाङ्मयावरून सिद्ध होतें. या वेडपट सुभाषितकाराला त्या परंपरेची दखल नाहीं एवढेंच. नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याचें ध्येय संन्याशाप्रमाणेंच मोक्ष हेंच असे. नैष्ठिक ब्रह्मचारी ध्यानधारणादिकांच्या साधनाबरोबरच वैदिक अध्ययन व अध्यापन हेंहि साधन म्हणूनच करीत. नैष्ठिक ब्रह्मचारी शेवटपर्यंत गुरूजवळ अथवा गुरु मरण पावला तर गुरुपुत्राजवळ राहात व कधीं कधीं कण्व, वाल्मीकीप्रमाणें आश्रमरूपी विद्यापीठांचे संचालक बनून तपस्येंत व विद्याध्ययनांत जीवन घालवीत. यु आन च्वांग नांवाच्या चिनी प्रवाशानें भारतांतील या नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यांविषयीं असें लिहिलें आहे कीं, "समाज त्यांना अतिशय पूज्य मानी; पण ते

कांहीं समाजांत फारसे मिसळत नसत. कोणी स्तुति केली तरी वा कोणी हवी तेवढी निंदा केली तरी ते त्यांच्या गांवीं नसे. यासंबंधांत ते अगदीं स्थितप्रज्ञ असत. अखंड ज्ञानोपासना हें एकच त्यांचें ध्येय असे. आवश्यक असलें तर महत्त्वाची माहिती मिळविण्यासाठीं अथवा ज्ञानार्जनास्तव दोन दोनशें मैलांचा प्रवासहि ते आनंदानें पायींच करीत. नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यांपैकीं पुष्कळ जण श्रीमंत कुलांतीलहि असत. पण ते स्वखुषीनें संपत्तीचा त्याग करून भिक्षावृत्तीचा अंगीकार करीत. खुषीनें पत्करलेलें निष्कांचनत्व हें ते दूषण न मानतां भूषणच मानीत असत. तत्त्वज्ञानापुढें त्यांना कशाचीच पर्वा नसे." अशा प्रकारच्या अखंड ज्ञानोपासक, नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यांच्या परिश्रमामुळेंच तत्त्वज्ञान आदि निरनिराळ्या ज्ञानविज्ञानांच्या शाखांमध्यें विश्वाचे गुरु ठरण्याची त्या काळीं भारताची पात्रता जशी सिद्ध झाली तसेंच प्रत्यक्ष सांस्कृतिक मूल्यांचें व तत्त्वज्ञानाच्या मूल्यांचें जीवन जगणारे आदर्श पुरुष राष्ट्रांत उत्पन्न होऊन लोकांच्या शीलचारित्र्याचा स्तर यामुळेंच परकीयांनीं व शत्रूंनींहि मुक्त कंठानें प्रशंसा करण्याइतका श्रेष्ठ राहूं शकला.

ब्रह्मचर्याश्रमांत राहणारे विद्यार्थी बाह्म मुहूर्तावर उठत. शौचमुखमार्जनादि विधि झाल्यावर प्रातःस्नान करून अग्निपरिचर्येस लागणें हें त्यांचें दररोजचें प्रातःकाळचें महत्त्वाचें कार्य होतें. अग्निहोत्रें सर्वत्रच रूढ असत. व सायंप्रातः म्हणजे सकाळीं व संध्याकाळीं अग्निपरिचर्या करणें हा जीवनाचा आवश्यक भाग होता. यासंबंधीं गोपथ ब्राह्मणांतील वचनाचा मागें उल्लेख केलाच आहे. होमसंध्यादि धार्मिक कृत्यें आटोपलीं म्हणजे मध्यान्हाची भोजनाची वेळ होईपर्यंत अखंड अध्ययन चाले. त्यानंतर थोडा वेळ विश्रांति घेऊन संध्याकाळपर्यंत पुनरूच अध्ययन चालत असे. नंतर वेद व उपनिषत्काळांतील हे तपस्वी विद्यार्थी अरण्यामध्यें सर्व मिळून समिधा आणावयास्तव जात. अर्थातच या समवयस्क विद्यार्थ्यांमध्यें थट्टामस्करी होणें स्वाभाविकच होतें. अस्तमानानंतर संध्यावंदन होऊन व अग्निपरिचर्या

होऊन भोजनोत्तर चिंतनिका करून हे विद्यार्थी विश्रांति घेत. असा कांहींसा त्यांचा दिनक्रम असावा असें पुढच्या बौद्धजातकादि ग्रंथांवरून दिसतें. वेदकाळीं यांत कांहीं . वेगळेपणा असण्याचें व त्यानंतर त्यांत मागाहून कांहीं मोठा फरक घडून आला असें मानण्याचें कारण दिसत नाहीं. ऋषींच्या आश्रमांत सर्वसाधारणपणें हीच दिनचर्या असली पाहिजे.

ऋषींच्या आश्रमांत राजापासून रंकापर्यंत सर्वांचींच मुलें शिकावयास येत. व त्यामुळें सर्वांनाच समानतेच्या वातावरणांत रहावयास सांपडून अंतःकरणावर समानतेचे उत्कृष्ट संस्कार उमटत. आपापल्या घरीं कोणी मोठ्या राजाचा वा रंकाचा, धनिक वैश्याचा वा सद्‌गृहस्थाचा मुलगा कोणत्याहि अवस्थेंत राहात असला तरी सद्‌गुरूच्या आश्रमांत त्यांची राहणी एका पद्धतीचीच ठेवण्याचा कटाक्ष असल्यामुळें भौतिकतेवर आधारलेल्या वैषम्याच्या संस्कारांना तेथें मुळींच जागा नसून सर्वांनाच सारख्या पद्धतीचें व सारखेंच नियंत्रित आणि संयमित जीवन घालवावें लागे. अर्थात्च त्यांच्यांत बंधुत्वाचें एकच नातें, एकच कांटेकोर शिस्तबद्ध व पवित्र जीवनक्रम, आणि समान आदर्श असत. गुरूगृहीं आश्रमांत राहण्यावर कटाक्ष असल्यामुळें व तेथील पद्धतीनेंच कांटेकोर जीवन व्यतीत करावें लागत असल्यामुळें इतर कोणत्याहि कुसंस्कारांचा संभव नव्हता. उदरभरणासाठीं सर्वच लोकांनीं मधुकरी मागून भिक्षाचरण करावें असा नियम होता. अथर्ववेदांतील यासंबंधींचा उल्लेख मागें अथर्ववेदांतील ब्रह्मचाऱ्याच्या वर्णनांत आलेलाच आहे. गोपथ ब्राह्मणांतहि ब्रह्मचाऱ्यानें भिक्षा मागावी असेंच सांगितलें आहे. गोपथ ब्राह्मण म्हणतें, "ते देवा अब्रुवन् ब्राह्मणो वा अयं ब्रह्मचर्यं चरिष्यति ब्रूतास्मै भिक्षा इति।" "देवांनीं सांगितलें कीं हा ब्राह्मण ब्रह्मचर्य व्रतानें राहील तर त्याला भिक्षा मागावयास सांगावें." पुढच्या मनुस्मृति इत्यादि ग्रंथांतून, इतकेंच नव्हे तर त्या मानानें अर्वाचीन असलेल्या भागवतादि पुराण ग्रंथांतूनहि हे भिक्षाचरणाचे नियम आढळतात.

अत्रि ऋषीनें तर असें सांगितलें आहे कीं "शाकभक्षाः पयोभक्षा ये चान्ये यावशाकिनः । ते सर्वे भैक्ष्यभिक्षस्य कलां नार्हन्ति षोडशीम् ॥" (एकाच भाजीवर राहणें अथवा दूध पिऊन राहणें अथवा अन्य कोणतेहि खाण्यापिण्याचे नियम करणें या सर्वांपेक्षां भिक्षान्न सर्वश्रेष्ठ असून त्याच्या सोळाव्या कलेची सुद्धां बरोबरी इतर खाण्यापिण्याचे नियम करूं शकत नाहींत.) आठवड्यांतून जो एक दिवस सुद्धां मधुकरी मागत नाहीं त्या विद्यार्थ्यास गोपथ ब्राह्मण व बौधायन धर्मसूत्रांतून प्रायश्चित्त सांगितलेलें आहे. अगदीं बालक ब्रह्मचाऱ्यास गुरुगृहीं भोजन मिळे. वयाला बारावें वर्ष उलटून गेलें म्हणजे भैक्ष्यचर्या करावी लागे. पुढच्या गृह्यसूत्रांतील उल्लेखांवरून व मनुस्मृतीवरूनहि धनिक आईबापांकडून गुरूच्या घरीं आधींच साह्य पोंचविलें जाई. व पुष्कळ विद्यार्थी आचार्यांच्या घरींहि भोजन करीत. भैक्ष्यचर्येच्या ह्या पद्धतीमध्यें गरीब विद्यार्थ्यांची फार मोठी सोय होत असे. भारतीय शिक्षणपद्धतींत दारिद्र्यामुळें कोणाचें शिक्षण अडणें हें अत्यंत कमीपणाचें मानलें जात असे. शिक्षण विनामूल्य असे. पैसे घेऊन शिक्षण देणें हें कमीपणाचें मानलें जात असे, किंबहुना निंदास्पद समजलें जाई. अत्यंत गरीब विद्यार्थ्यांनाहि दारिद्र्यामुळें आहाराची सोय होऊं शकत नाहीं म्हणून शिक्षणांत अडथळा उत्पन्न होण्याची परिस्थिति उद्भवूं नये एवढ्यासाठीं मधुकरी मागणें हें कर्तव्य म्हणून प्राचीय भारतीय शिक्षणशास्त्रज्ञांनीं ठरविलें आहे. तसेंच धनिक विद्यार्थ्यांनाहि गरिबीची कल्पना यावी व विद्येची महती गुरुदक्षिणेनें फिटणारी नाहीं हें नीट कळावें एवढ्यासाठींच श्रीमंत विद्यार्थ्यांना देखील आठवड्यांतून एकदां धर्मकर्तव्य म्हणून भिक्षाटनास पाठवीत असत. आर्थिक मदतीपेक्षां भिक्षाटन पुरविणें हें समाजाच्याहि दृष्टीनें अत्यंत सोईचें होतें. धनापेक्षां आपण खात असलेल्या अन्नांतून विद्यार्जनासारख्या पवित्र कार्यासाठीं जीवन देत असलेल्या विद्यार्थ्याला तुकडा देणें सर्वांनाच सहजसाध्य व परवडणारें होतें. केवळ पैशासाठीं शिक्षणाची संधि हुषार व प्रतिभासंपन्न

विद्यार्थ्यांना न मिळणें राष्ट्राच्या दृष्टीनेंच हानिकारक होतें. विद्यार्थ्यांनीं भिक्षाचरण करण्यांत समाजाचेंहि स्वकर्तव्याकडे लक्ष वेधण्याचा हेतु साधला जात असे. आपल्या घरीं दुपारीं अनायासेंच तयार असलेल्या अन्नांतून विद्यार्थ्यास कांहीं देण्यांत वस्तुतः पोटास कसलाहि चिमटा बसत नसतांना सुद्धां तें जो नाकारतो त्याचें सर्व पुण्य नष्ट होतें असें धर्मशास्त्रकारांनीं सर्वांना बजावलें आहे. "स्त्रीणां प्रत्याचक्षाणां समादितो ब्रह्मचारी इष्टं दत्तं हुतं प्रजां पशुं ब्रह्मवर्चसं अन्नाद्यं वृङ्क्ते" (आ. ध. सू. १.१.३.२४.) "ब्रह्मचारी भिक्षाटणार्थ गेला असतां ज्या घरांतील स्त्रिया त्याला भिक्षा न देतां झिडकारून लावतात त्यांचे घरून ब्रह्मचारी त्यांचें इष्ट, दान, हवनादि कर्मांनीं प्राप्त झालेलें पुण्य आणि प्रजा, पशु व ब्रह्मवर्चस अपहरण करून घेऊन जातो." गोपथ ब्राह्मणानें तर "गृहपतिर्ब्रूत बहुचारी गृहपत्न्या इति किमस्या वृञ्जोता ददत्या इति इष्टापूर्तं सुकृतद्रविणमवरुन्ध्यादिति तस्माद् ब्रह्मचारिणे अहरहः भिक्षां दद्यात् गृहिणी मामेयुरिष्टापूर्तं सुकृतद्रविणमवरुन्ध्यादिति" गृहपतीनें (गृहिणीला सांगावें कीं हा ब्रह्मचारी जर असाच परत गेला तर आपलें सर्व पुण्य घेऊन जाईल व म्हणून त्याला भिक्षा घालणें व त्या द्वारें स्वतःचें कल्याण करून घेणें हें आपलें कर्तव्य आहे. आवश्यकतेपेक्षां अधिक मधुकरी ब्रह्मचाऱ्यानेंहि मागूं नये असा नियम असे. मनूनें म्हटलें आहे–

"आहारादधिकं वर्णी न क्वचित् भैक्ष्यमाचरेत् ।
युज्यते स्तेयदोषेण कामतोऽधिकमाहरन् ॥

"आपल्याला आवश्यक त्यापेक्षां अधिक भिक्षा ब्रह्मचाऱ्यानें मागूं नये. तसें केलें तर तो चोरीच्या पापाचा वाटेकरी होतो." ब्रह्मचर्याचा व विद्याध्ययनाचा काळ संपला कीं, मग त्याला भिक्षा मागण्याचा कांहींहि अधिकार नसून त्यानें स्वतःच्याच पायावर उभे राहिलें पाहिजे असा दंडक होता. दारिद्र्यामुळें विद्यार्जन करण्याच्या कामांत अडथळा उत्पन्न होऊं नये म्हणून ज्याप्रमाणें

भिक्षा मागणें हा जसा दंडक होता त्याप्रमाणें विद्यार्जन संपल्यावर स्वतःच्या पायावर उभें राहणें हाहि दंडक होता. म्हणूनच बोधायनानें म्हटलें आहे कीं "समावृत्तस्य भिक्षा अशुचिकरा" (ज्याचें समावर्तन झालें आहे त्यानें जर भिक्षा मागितली तर ती त्याचें पावित्र्य नष्ट करील.) ब्रह्मचाऱ्यानें पाळावयाचे नियम अथर्ववेदांत उल्लेखिले असल्याचें आपण पाहिलेंच आहे. गोपथ ब्राह्मणामध्यें त्यासंबंधीं असें म्हटलें आहे कीं, "नोपरिशायी स्यान्नगायनो न नर्तनो नसरणो न निष्ठीवेत्।" याच नियमांचा विस्तार मनु याज्ञवल्क्यादिकापासून तर पुराणादिकापर्यंत केलेला आढळतो. गुरुजन, मातापितरें, वृद्ध व श्रेष्ठ लोक यांच्याशीं त्यानें नम्रपणानें वागून त्यांना देवाप्रमाणें मान द्यावयाचा असे. खोटें बोलणें, चारित्र्य विघडविणें, चहाडखोरपणा करणें, वाईट संगति धरणें इत्यादिकांपासून अलिप्त असण्यावर जोर देण्यांत येत असून साध्या राहणीचें महत्त्व विद्यार्थ्याच्या मनावर बिंबविण्याचा विशेष कटाक्ष असे. दागिने इत्यादि शारीरिक चोचले त्यानें कटाक्षानें टाळावयाचे असत. व गोड पदार्थ, मांस व रज-तमाला उत्पन्न करणारे जिभेचे चोचले यांपासून त्यानें स्वतःला अलिप्त राखलें पाहिजे असा कटाक्ष असे. त्याचें शरीर कोणत्याहि परिस्थितींत टिकणारे व शीतोष्णादि ऋतुमानांतील फेरफार सहन करणारें सुक्षम व्हावें म्हणून जोडा, छत्री इत्यादि वस्तू त्यानें वापरूं नयेत असाहि नियम होता. पण सर्वांत अधिक कटाक्ष पावित्र्य, सत्यनिष्ठा व चारित्र्य वाढविण्यावरच खरा असे. या गोष्टींची रचना करण्यांत मनावर व्हावयाच्या संस्कारांच्या दृष्टीनें फार मोठा विचार केला आहे. मनु याज्ञवल्क्य इत्यादिकांनीं ब्रह्मचाऱ्याच्या दैनंदिन जीवनाचें रेखाटलेलें चित्र व अथर्ववेदादि वाङ्मयांतून आढळणारें चित्र यांत भिन्नता नाहीं. वेदांत जें खुणेनें आढळतें त्याचाच विस्तार मनु याज्ञवल्क्यांनीं केला असल्यामुळें त्यांचें चित्रण अधिकृत वैदिक संस्कृतीचेंच आहे. तें चित्रण असें :—

ब्रह्मचाऱ्यानें वेळच्या वेळीं संध्योपासना व अग्निकार्य करावें. नंतर गुरु व सर्व श्रेष्ठांना आपलें नांव सांगून वंदन करावें. अध्ययनासाठीं नेहमीं सावधान असावें. गुरूंनीं हांक मारतांच अध्ययनास जातां येईल अशा तयारीनें असावें. त्यांनीं आज्ञा केली म्हणजे अध्ययनास प्रारंभ करावा. आपण स्वत: होऊन आम्हांस पाठ सांगा असें म्हणू नये. आपण जें अध्ययन केलें असेल तें त्यांना निवेदन करावें व मन, वाणी आणि शरीर त्यांच्या हिताप्रीत्यर्थ राबवावें. केलेले उपकार न विसरणारा, दयाळू, ग्रंथांचें ग्रहण व धारण करण्यास समर्थ, शरीरानें व मनानें पवित्र, शारीरिक पीडा व मानसिक व्यथा यांनीं रहित, दुसऱ्याचे दोष तोंडावाटे न काढतां गुण मात्र प्रकट करणारा, आचारसंपन्न व आपलें कर्तव्यकर्म करण्यास व अनुशासनबद्ध राहण्यास समर्थ अशा शिष्यास गुरूनें विद्या शिकवावी. दंड, अजिन, उपवीत, मेखला हीं चिन्हें ब्रह्मचाऱ्यानें नित्य धारण करावीं व शुद्धाचरणीं लोकांच्याच घरीं भिक्षा मागावी. आपण स्वत: आचार्य, आचार्यपत्नी व आचार्यपुत्र यांच्यावांचून दुसऱ्या कोणाहीसाठीं ब्रह्मचाऱ्यानें भिक्षा मागूं नये. भिक्षा आणल्यावर ती गुरूंना निवेदन करावी व त्यांची आज्ञा झाल्यावर मौन धारण करून, अन्नाचा सत्कार करून, त्याची निंदा न करतां आपोषणपूर्वक भोजन करावें. ब्रह्मचर्याश्रमांत असलेल्या व्यक्तीनें रोगपीडित नसतां एकाच्याच घरचें अन्न खाऊं नये. श्राद्धास जाण्याचा प्रसंग आल्यास मधु व मांस वर्ज करून भोजन करावें. हिंसायुक्त, उच्छिष्ट व मांसभोजन करूं नये. निष्ठुर, स्त्रीविषयक, हिंसाप्रवृत्तीला उत्तेजन देणारें, दुसऱ्यांच्या दोषवर्णनानें भरलेलें, अश्लील, असत्य इत्यादि भाषण करूं नये. अंगास उटी लावणें, शरीर सजविणें, जोडा व छत्री यांचा उपयोग करणें, काम क्रोध इत्यादि षड्विकारांच्या तावडींत असणें, संगीत वाद्यवादनाचा नाद, नृत्यादिकांत मशगूल होऊन राहणें इत्यादि गोष्टी ब्रह्मचाऱ्यानें वर्ज्य समजाव्या." अर्थातच यांत स्वच्छतेसाठीं, रुक्षता घालविण्यासाठीं आचार्य विद्यार्थ्यांना तेलादिकांचा प्रसंगीं उपयोग करूं देत व आवश्यकतेनुरूप जोडा व छत्रीहि वाप-

ावयास सांगत. पण ब्रह्मचाऱ्याचें जीवन या गोष्टींच्या आधीन सूं नये यावरच खरा कटाक्ष होता. पण यामुळें हिंदु विद्यार्थ्यांची ीवनदशा म्हणजे खडतर वनवास असे इत्यादि जे तारे "हिस्टरी ऑफ एज्युकेशन् इन् इंडिया" यासारख्या ग्रंथांतून तोडलेले आहेत केवळ अविवेकीपणाचे आहेत. "देशकालानुरूप करावयाच्या ेरफारासंबंधीं सर्व स्मृतिकारांनीं विवेचन केलेलें नाहीं. नियमा-क्षां अपवादाकडेच त्यामुळें विद्यार्थ्यांचें लक्ष वेधेल असें त्यांना दाचित वाटलें असावें. पण एकंदरींत उपलब्ध असणाऱ्या सर्व ुराव्याचा विचार केला म्हणजे ब्रह्मचाऱ्यास चैनीनें राहतां येत सलें, तरी समाधानानें व आनंदानें ब्रह्मचर्याचा काल घालवितां ईल अशी परिस्थिति होती हें दिसून येईल असें जें या बाबतींत ा. अ. स. आळतेकर यांनीं म्हटलें आहे तें अत्यंत सत्यपूर्ण आहे.

मनाबरोबरच ब्रह्मचर्यावस्थेंत शरीर कसदार व काटक, भर-ार व सामर्थ्यसंपन्न बनवावें यावर कटाक्ष होता. घरीं येणारा ह्मचारी पाहिला कीं विद्यार्जनासाठीं आश्रमांत गेलेला आपलाहि ुलगा या वेळीं असाच कोठें तरी भिक्षाटनासाठीं गेलेला असेल शी कल्पना व त्याची भावमूर्ति प्रत्येक माउलीच्या मनांत उभी ाही, व ती कळवळ्यानेंच त्याला भरपूर भिक्षा घाली. या बाब-ींत येवढ्याचकरितां इतर आश्रमाप्रमाणें कोणताहि नियम न ालतां ब्रह्मचाऱ्यानें जितकें पचेल तितकें खावें असा शास्त्रकारांनीं ियम सांगितलेला आहे. बौधायन धर्मसूत्रांत म्हटलें आहे:—

"अष्टौ ग्रासा मुनेर्भक्ष्या षोडशारण्यवासिनः ।
द्वात्रिंशतं गृहस्थानाममितं ब्रह्मचारिणाम् ।।
गृहस्थो ब्रह्मचारी च योऽनश्नंस्तु तपश्चरेत् ।
प्राणाग्निहोत्रलोपेन अवकीर्णी भवेत्तु सः ।।

ंन्याशानें आठ घास खावे. वानप्रस्थानें सोळा घास खावे. गृह-थानें बत्तीस घास भक्षण करावे. ब्रह्मचाऱ्यानें मात्र त्याला आव-यक असेल तितकें खावें. त्याच्या संबंधांत कोणताहि नियम नाहीं. ो ब्रह्मचारी व गृहस्थ निराहार राहून तपश्चर्या करतो त्याला ाणरूपी अग्निहोत्राचा लोप केल्याचें पाप मात्र लागतें."

वैदिक शिक्षणपद्धतींत गुरूच्या आश्रमांत राहूनच विद्यार्थ्यानें आपलें शिक्षण संपविलें पाहिजे असा दंडक होता व चंद्रगुप्त मौर्याच्या काळापर्यंत तरी या दंडकाचें प्रत्यक्ष पालन होत होतें. हे आश्रम जनसंमर्दापासून दूर अशा अरण्यांत असत. त्यामुळें जीवन घडवावयास्तव सद्गुरूच्या आधीन असलेल्या विद्यार्थ्यांच्या जीवनावर नागर जीवनांतील विलासी वातावरणांतले कोणतेहि कुसंस्कार होण्याची शक्यताच नसे. तसेंच नागर जीवनांतील भावनोद्दीपक संघर्षाच्या प्रवाहापासूनहि तें जीवन सर्वथा निर्लेप राहूं शके. निष्पाप व श्रेष्ठ धारणेचें जीवन उत्पन्न करण्याच्या दृष्टीनें या वातावरणाचा केवढा उपयोग होत असला पाहिजे हें शिक्षणशास्त्रज्ञांना सांगावयाला नकोच. कण्व, वाल्मीकि या कुलपतींच्या रम्य आश्रमांचें वर्णन पुराणवाङमयांतून आढळतें. बाणभट्टानें आपल्या कादंबरींत जाबालि मुनींच्या आश्रमाचें जें काव्यमय वर्णन केलें आहे त्यांतील वातावरण अशा आश्रमांतून बव्हंशानें प्रत्यक्षांत नांदत होतें अशी पौराणिक पुराव्यावरून खात्री पटते. जनसंमर्दापासून दूर अशा या आश्रमांतील पवित्र वातावरणांतच खरें श्रेष्ठजीवन घडूं शकतें हें ओळखूनच कौटिल्यानें आपल्या अर्थशास्त्रामध्यें ब्राह्मणांच्या आश्रमांकरितां राजानें जागा ठेवावी असें म्हटलें आहे. विद्यार्थ्यानें या आश्रमांत राहूनच शिक्षण घेण्याच्या नियमामुळें त्याच्यासमोर चारित्र्यसंपन्न गुरूचा जसा सदैव आदर्श राही, त्याचप्रमाणें त्याच्या बारीकसारीक गोष्टींवरहि गुरूचें पूर्ण लक्ष असल्यामुळें उच्छृंखलता व स्वैराचार यांना पूर्ण आळा बसून सारें जीवन अनुशासनबद्ध होत असे. राजापासून रंकापर्यंत सर्वांनाच अशा आश्रमांतून शिक्षण घ्यावें लागे. हें द्रोण व द्रुपद, श्रीकृष्ण व सुदामा या उत्तरकालीन उदाहरणांवरूनहि स्पष्ट होतें. शिक्षण शास्त्राचा हा दंडक लक्षांत घेतला म्हणजे वैदिक शिक्षणपद्धतींत गुरूचें स्थान किती दायित्वपूर्ण व महत्त्वाचें होतें याची कल्पना येते. गुरु व शिष्य यांचे संबंध काय असत हें पाहणें या दृष्टीनें मोठेंच उद्बोधक ठरेल. त्याकडे व वैदिक शिक्षणपद्धतींतील आणखी कांहीं महत्त्वपूर्ण गोष्टींकडे पुढील व्याख्यानांत वळूं.

व्याख्यान दहावें

# वेदकालीन गुरु, शिष्य व शिक्षण

वैदिक शिक्षणपद्धतींत गुरूचें स्थान अनन्यसामान्य असून मागच्या व्याख्यानांत सांगितलेल्या अथर्ववेदांतील उल्लेखांवरून गुरूला शिष्याचा आध्यात्मिक पिता मानीत असत ही गोष्ट स्पष्ट होईल. अज्ञानांधकारांतून प्रकाश दाखविणारा मार्गदर्शक वेदांनीं जन्म देणाऱ्या मातापित्यांहून श्रेष्ठ मानलेला असून त्याच्या नुसत्या चिंतनानेंहि न शिकलेल्या विद्येंत प्रथम श्रेणीचें प्रावीण्य संपादन करतां येतें अशी भारतीय मनाची श्रद्धा असल्याचें महाभारतांतील सुप्रसिद्ध एकलव्याची कथा सांगते. तो वन्य जातीचा असल्यामुळें महाभारतकालीन विख्यात धनुर्वेदाचार्य द्रोण यांनीं त्याला धनुर्वेद शिकविण्याचें नाकारलें. पण त्यानें द्रोणांच्या अचेतन पार्थिव प्रतिकृतीलाच गुरु करून अरण्यांत धनुर्विद्येच्या अभ्यासास प्रारंभ केला, व लवकरच त्यांत तो इतका प्रवीण झाला कीं द्रोणांचा पट्टशिष्य अर्जुनहि संधानक्रियेंत त्याच्यापेक्षां कमी ठरल्याचें महाभारतांत वर्णन आहे. गुरूच्या महिम्याचा हा केवढा काव्यपूर्ण आविष्कार! वैदिकधर्मांतील या गुरुविषयक धारणेनें भारतांत नंतर उत्पन्न झालेल्या पंथोपपंथांवरहि केवढा प्रभाव गाजविलेला आहे हें बौद्धजैनादि सम्प्रदायांतील आचारविचारांवरून दिसून येतें. गुरुपौर्णिमा हा दिवस सर्व हिंदुमात्राला सारखाच पवित्र असून श्रीज्ञानेश्वर, समर्थ, तुलसीदास, एकनाथ इत्यादि प्रतिभासम्राटांनीं गुरुच्या पादपद्मीं वाहिलेलीं भावपुष्पें भारतीय संस्कृतीला सदा सुगंधित करीत आहेत. श्रीमदाद्यशंकराचार्यांनीं शतश्लोकींत असे उद्गारकाढले आहेत कीं:–

दृष्टान्तो नैव दृष्टः त्रिभुवनजठरे सद्गुरोर्ज्ञानशत्रुः
स्पर्शश्चेत्तत्रकल्प्यः स नयति यदहो स्वर्णतामश्मसारं
न स्पर्शत्वं तथापि श्रितचरणयुगे सद्गुरुः स्वीयशिष्ये
स्वीयं साम्यं विधत्ते भवति निरुपमः तेन वा लौकिकोऽपि ॥

थवा श्रीतुकाराममहाराजांनीं हाच आशय व्यक्त करतांना
प्रदगुरुवांचोनी सांपडेना सोय । धरावें ते पाय आधीं आधीं ॥
ोहपरिसाची न साहे उपमा । सदगुरु महिमा अगाध तो ॥"
सें जें म्हटलें आहे त्यांतून व्यक्त होणारी धारणा भारतीय स्कृतीचें एक अविभाज्य व अंगभूत लक्षणच आहे असें म्हणतां ईल. "तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिःश्रोत्रियं ब्रह्मनि-ःम्" (परमेश्वरी तत्त्वाचें आकलन व्हावें अशी इच्छा असली तर ासाठीं समिध हातांत घेऊन श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ गुरूकडेच लें पाहिजे) असें श्रुतीचेंच वचन आहे. व केवळ अध्यात्म, मंत्र-ास्त्र, योग इत्यादि गूढ विद्याच नव्हे तर लौकिक विद्यादेखील ्यक्ष गुरूच्या जवळ अध्ययन केल्याविना नुसतें स्वतःचें बुद्धि-ामर्थ्य खर्च करून ग्रंथ लावण्याचा प्रयत्न केला तर प्राप्त होऊं कत नाहीं असा भारतीयांचा संकेत आहे. एक सुभाषितकार लंकारिक पद्धतीनें म्हणतोः–

पुस्तकप्रत्ययाधीतं नाधीतं गुरुसन्निधौ ।
भ्राजते न सभामध्ये जारगर्भ इव स्त्रियः ॥

केवळ स्वतःच्या प्रतिभेनें ग्रंथ लावून मिळविलेलें व गुरूपाशीं अध्य-न केल्याचा संस्कार नसलेलें पांडित्य जारापासून गर्भवती अस-ल्या स्त्रीप्रमाणेंच सभेमध्यें शोभत नाहीं.)

या महत्पदाला प्राप्त होण्याच्या योग्यतेची गुरुसंस्था भारतांत ाती म्हणूनच शतकें-सहस्रकें उलटलीं तरी तिचें स्थान ध्रुवा-ारखें अढळच राहिलें. वैदिक राष्ट्रांतील गुरूंचा अत्यंत महत्त्वाचा ेशेष म्हणजे त्यांच्या बुद्धीचा व मनाचा प्रांजलपणा व प्रामाणिक-ाा होय. विद्यादान व विद्याग्रहणाच्या संबंधांत मानापमानाच्या कीच्या कल्पना आणि ज्ञानाचा खोटा दंभ त्या आश्रमस्थ

आचार्यांच्या वागणुकींत तिळमात्रहि नसे. गोपथ ब्राह्मणामध्यें या संबंधांत एक अतिशय उद्बोधक गोष्ट दिलेली आहे. मौद्गल्य व मैत्रेय या नांवाचे दोन आचार्य होते. त्यांच्यांत एकदां वाद-विवाद झाला असतां त्यांत मैत्रेय हरला. त्याला गायत्री विद्येचें रहस्य माहीत नव्हतें असें दिसून आलें. पण हरल्याबरोबर मैत्रेयानें काय केलें असेल? जोंपर्यंत आपलें स्वतःचें ज्ञान अपुरें व ऐन वेळीं दगा देणारें आहे तोंपर्यंत आपणांस दुसऱ्यांना शिकविण्याचा कांहीं एक अधिकार नाहीं असें त्या प्रामाणिक गुरूला वाटलें. व त्यानें आपली पाठशाळा बंद करून मौद्गल्याचें शिष्यत्व पत्करलें. हल्लींच्या महाविद्यालयांतील अध्यापक, प्राध्यापक, प्राचार्यांनीं मनन करण्यासारखीच ही गोष्ट नाहीं काय? हा वैदिक राष्ट्राचा बौद्धिक प्रामाणिकपणा मोंगलांच्या राजवटीपर्यंत या देशांत नांदत होता असें इतिहास सांगतो. विख्यात मीमांसक मंडनमिश्र व भगवत् पूज्यपाद श्रीमत् आद्य शंकराचार्य यांच्या वादविवादाच्या वेळीं मंडनमिश्राच्या पत्नीला न्यायपदावर बसवितांना श्रीशंकराचार्यांना त्यांत कोणतेंहि वैषम्य वाटलें नाहीं. मंडनमिश्राच्या पत्नीनें वादांत आपला पति हरला हें घोषित करतांना त्यांत कमीपणा मानला नाहीं. व त्यानंतर संन्यासग्रहण करून श्रीशंकराचार्यांचें शिष्यत्व पत्करण्यांत स्वतः मंडनमिश्राला कर्तव्यपूर्तीचेंच समाधान लाभलें हा इतिहास काय सिद्ध करतो? शहाजहान बादशहाच्या वेळीं दक्षिणेंत अप्पय्या दीक्षित या नांवाचे एक प्रतिभासंपन्न पंडित नांदत होते. अप्पय्या दीक्षित हे द्वैत मताचे अनुयायी होते. एकदां विख्यात शृंगेरी मठाच्या एका अद्वैतवादी पंडिताशीं झालेल्या शास्त्रार्थांत अप्पय्या दीक्षित हरले. त्याबरोबर त्यांनीं तात्काळ संन्यास ग्रहण करून पुढें आमरणान्त अद्वैत मताचाच पुरस्कार व प्रचार केला. विद्या व बुद्धीच्या क्षेत्रांतील प्रामाणिकपणाची परंपरा वेदकाळापासून यावनी पारतंत्र्याच्या काळापर्यंत ज्यांच्या राष्ट्रांत अखंडितपणें आढळते त्यांचें राष्ट्रजीवन केवढें उज्ज्वल म्हटलें पाहिजे!

या प्रामाणिकपणाबरोबरच विद्यादान करतांना गुरु शिष्याला सर्वस्वार्पण करी. आयुर्वेदाच्या उपनयनाचा उल्लेख करतांना गुरूचें या अर्थाचें वाक्यच आपण पाहिलें आहे. हल्लींप्रमाणें त्या काळीं शिक्षक थोडे व विद्यार्थी असंख्यात अशी परिस्थिति नसल्यामुळें व विद्यार्थ्यांना विद्याध्ययन संपेपर्यंत गुरुगृहींच रहावें लागत असल्यामुळें गुरूला प्रत्येक विद्यार्थ्यावर लक्ष ठेवणें सुलभ जाई. व सर्वांचेंच राहणें एकत्र असल्यामुळें आपण गुरूजवळ केलेल्या अध्ययनाची चिन्तनिका आपल्यापेक्षां अधिक प्रतिभासंपन्न व प्रौढ विद्यार्थ्यांजवळ करण्याची सोय असे. किंबहुना शिक्षणपद्धतींतच या गोष्टीचा समावेश असल्यामुळें ज्याप्रमाणें प्रत्येक अधीत विषयावर प्रभुत्व मिळविणें विद्यार्थ्याला शक्य होई, त्याचप्रमाणें चिंतनिका म्हणजे एकप्रकारचा पाठच असल्यामुळें शिकविण्याच्या कलेंतहि आपोआपच प्रावीण्य संपादन करतां येत असे. म्हणूनच तर शिक्षण संपल्याबरोबर स्नातकाचें समावर्तन करतांना गुरु शिष्याला "तुला पुष्कळ विद्यार्थी मिळोत" असा आशीर्वाद देत असे. हा नुसता पोकळ आशीर्वाद नसून कृतविद्य होऊन आश्रमाबाहेर जाणारा स्नातक आतां स्वतःच विद्यादानाचें व्रत चालविण्याइतका समर्थ झाला असल्याचा गुरूचा आत्मप्रत्ययच या आशीर्वादांतून व्यक्त होतो. या विशिष्ट शिक्षणतंत्राच्या अवलंबामुळें आज शिक्षकांच्या प्रशिक्षणाची जीं महाविद्यालयें असतात तशा तऱ्हेच्या सोईची आवश्यकता नव्हती. प्रश्नोपनिषदांतील एका गोष्टींत मोठें बोधप्रद तत्त्व सांगितलेलें आहे. एक ऋषि म्हणतो; "हिरण्यनाभः कौसल्यो राजपुत्राः मामुपेत्य एनं प्रश्नमपृच्छम्। षोडश कलं भारद्वाज पुरुषं वेत्थ तमहं कुमारमब्रुवम् नाहमिमं वेद। यद्यहमिमम-वेदिषत् कथं ते नावक्ष्यमिति समूलो वा एष परिशुष्यति योऽनृतमभिवदति तस्मान्नार्हाम्यनृतं वक्तुम्। स तूष्णीम् रथमारुह्य प्रवव्राज। ( प्रश्नोपनिषद् षष्ठ प्रश्न १ )" हिरण्यनाभ या नांवाचा कोसल देशाचा राजपुत्र माझ्याकडे येऊन असें विचारूं लागला कीं हे भारद्वाज, तूं ज्याला सोळा कला आहेत अशा पुरुषाला जाणतोस

काय? मी त्या कुमाराला म्हटलें, मी त्याला जाणत नाहीं. जर मी त्याला जाणत असतों तर मी तुला त्याची माहिती सांगितली नसती काय? ज्ञान मिळविण्याच्या इच्छेनें आपल्याकडे येणाऱ्या व्यक्तीशीं जो अनृत भाषण करतो त्याचा समूळ नाश होतो. म्हणून या संबंधांत मी खोटें बोलूंच शकत नाहीं. हें ऐकल्यावर तो मुकाट्यानें आपल्या रथावर बसून निघून गेला.

आश्रमांत जे विद्यार्थी घेत ते पात्रता पाहून घेत याचा उल्लेख मागें केलाच आहे. शिक्षण देण्याचें काम करणाऱ्यांनीं आपला एक विशिष्ट वर्ग बनवून तो व्यवसाय आपल्याकडे राखून घेतला होता अशी जे लोक वैदिक राष्ट्राच्या शिक्षणपद्धतीवर टीका करतात त्यांना भारतांतील गुरुपरंपरेविषयीं कांहींहि माहीत नाहीं एवढाच त्यांच्या त्या टीकेचा अर्थ आहे. विनामूल्य शिक्षण असल्यामुळें शिक्षणांतून आर्थिक लाभाची कोणतीहि अपेक्षा नसे. पराक्रम करून सरदारी मिळविणें अगर व्यवसाय करून इतर धंद्यांतून पैसा मिळविणें हे सर्व मार्ग दुसऱ्या लोकांसाठीं ठेवून सारा जन्म केवळ ज्ञानदानांत व तोहि विनामूल्य ज्ञानदानांत खर्च करावयाचा हें व्रत ज्यांनीं अंगीकारलें त्यांच्या त्या कर्मांत स्वार्थाचा केवळ होमच होता हें सहज लक्षांत येऊं शकेल. आश्रमांना राजे लोक साह्य करीत; पण खरें म्हणजे विद्यार्थ्याचें अध्ययन संपल्यानंतर त्याच्याकडून इच्छेनुरूप मिळणारी गुरुदक्षिणा हेंच काय तें गुरूला मिळणारें धन असे. गुरुदक्षिणेचा कोणताहि करार नसे. असा करार करणाऱ्या व्यक्तीची सर्व धर्मग्रंथांतून निंदा केलेली आहे. कालिदास तर म्हणतो, "यस्यागमः केवल जीविकायै तं ज्ञानपण्यं वणिजं वदन्ति।" (ज्याच्या विद्येचा उपयोग केवळ पोट जाळण्यासाठीं आहे तो ब्राह्मण नसून ज्ञानाचें दुकान घालणारा वाणी आहे.) सद्वर्तनी व ज्या विषयांत शिकावयास आला असेल तेथें बुद्धीची गति असलेला विद्यार्थी कोणीहि असला तरी त्याला नाकारतां येत नसे. वेद सोडून इतर सर्व विद्या त्रैवर्णिकांच्या बाहेरच्या समाजालाहि शिकविण्यांत

येत. पण त्यांतहि त्रैवर्णिकाविषयीं विशेष प्रेम व इतरांविषयीं द्वेष अशी भावना मुळींच नव्हती. वेद हे मंत्र असल्यामुळें त्यांच्या उच्चारणाच्या शास्त्राशीं मनुष्याच्या जीविताच्या कल्पनांचा व विश्वाचा विशेष प्रकारचा संबंध असल्याची श्रद्धा असल्यामुळें त्या श्रद्धेच्या मुळाशीं असलेल्या शास्त्रीय संकेतानुरूप तेवढ्या बाबतींत त्रैवर्णिकांहून वेगळ्या असलेल्या लोकांना त्यांच्याच कल्याणासाठीं वगळण्यांत आलें होतें. कांटेकोर ध्वनिशास्त्राशीं ज्यांचा संबंध नाहीं अशा सर्व विद्या सर्वांना शिकविण्यांत येत. वेदासंबंधीचें शास्त्रीय संकेत काय होते याचें विवेचन वेदांचें अपौरुषेयत्व या सहाव्या व्याख्यानांत केलें असल्यामुळें येथें त्याचा ऊहापोह करण्याचें कारण नाहीं. पण त्याचेंहि ज्ञान व त्यांतील इतर सर्व गोष्टी सर्व लोकांना समजाव्या यासंबंधांची त्यांना इतकी तळमळ होती कीं तेवढ्यासाठींच इतर पुराणादि वाङमयाची निर्मिति झाली आहे. आजसुद्धां संस्कृत व वेदपाठशाळा म्हटली कीं गुरु दारिद्र्यांत दिवस काढीत असतांना सुद्धां तेथील शिक्षण विनामूल्य होत असतें. व पंडितराज राजेश्वरशास्त्री द्रविडांसारखे आदर्श ब्राह्मण्याचे थोर पुरुष घरीं उपवास पडले तरी मी भृतकाध्ययन करणार नाहीं (पैसे घेऊन शिकविणार नाहीं) अशा उग्र निश्चयानें आजहि जीवन घालवितांना आढळतात. यावरून वैदिक परंपरेचीं सूत्रें आजसुद्धां आदर्श भारतीयांच्या कशीं हाडींमाशीं खिळलेलीं आहेत याची कल्पना येते. गुरूनें बोलाविल्याशिवाय विद्यार्थ्यानें मला शिकवा असें म्हणून पाठीस लागूं नये हा जसा नियम आहे त्याचबरोबर विद्यार्थी वर्षभर घरीं राहिल्यावरहि त्याला न शिकविणाऱ्या गुरूला त्याचें पाप लागतें असाहि धर्मशास्त्राचा स्पष्ट संकेत आहे. एकदां विद्यार्थी आश्रमांत येऊन दाखल झाल्यावर तो सद्वर्तनी व शीलसंपन्न आहे कीं नाहीं हें पाहण्यासाठीं केवळ एक वर्षभर काय ती वाट पाहतां येई. कूर्म पुराणामध्यें असें सांगितलें आहे कीं,–

"संवत्सरोषिते शिष्ये गुरुर्ज्ञानमनिर्दिशन्।
हरते दुष्कृतं तस्य शिष्यस्य वसतो गुरुः॥"

एक वर्षभर शिष्य घरीं राहिल्यावरहि गुरु जर त्याला शिकविणार नाहीं तर शिष्याचें सर्व पाप गुरूला लागतें. स्मृतिकौस्तुभामध्यें तर विद्यार्थ्यांना तत्परतेनें न शिकविल्यामुळें त्याला आम्रवृक्षाच्या जन्मास जावें लागलें असें सांगितलें आहे. त्यामुळें असे संकेत ज्या समाजांत आहेत त्या समाजांत विद्येसंबंधानें केवढ्या श्रेष्ठ धारणा असल्या पाहिजेत हें उघडच होतें. पण असें असलें तरी शिक्षकालाही मध्यान्हकालीं पोटांत कांहीं घालावेंच लागतें म्हणून शास्त्रकारांनीं शिष्यांच्याहि अन्तःकरणांत कृतज्ञतेचा भाव उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला असून शिष्यानें ऐपतीप्रमाणें भरपूर गुरुदक्षिणा द्यावी असें सांगितलें आहे. पण या श्रेष्ठ भूमिकेवरून नवे तेजस्वी ज्ञानमय जीवन उत्पन्न करणाऱ्या गुरूला कांहींहि दिलें तरी त्याच्या उपकारांतून शिष्य उतराई होऊंच शकत नाहीं अशी गुरुपदाविषयीं श्रेष्ठ व उचित भावना शास्त्रकारांनीं व्यक्त केली आहे. शिक्षण संपूर्ण झाल्याशिवाय गुरुदक्षिणा घेऊं नये असा संकेत असे. बृहदारण्यकोपनिषदांत या संबंधानें मोठा उद्बोधक संवाद आलेला आहे. उपनिषदांत म्हटलें आहे कीं, "जनको ह वैदेह आसांचक्रे अथ ह याज्ञवल्क्य आवव्राज। तं होवाच याज्ञवल्क्य किमर्थमचारीः पशूनिच्छन्नण्वंतानीत्युभयमेव सम्राडिति होवाच।" "वैदेह जनकानें आपल्या भेटीस येणाऱ्या श्रेष्ठ ब्रह्मज्ञ लोकांसाठीं एक स्थळ व विशिष्ट समय ठरविला. एकदां त्याच्याकडे याज्ञवल्क्य महामुनि आले. त्याबरोबर जनकानें याज्ञवल्क्याला असें विचारलें कीं आपण माझ्याकडे कशास्तव आलात? बोधन इत्यादि मिळविण्यासाठीं अथवा मला सूक्ष्म वस्तूचा बोध होईपर्यंत माझ्या प्रश्नाचीं उत्तरें देत ज्ञानदान करण्यासाठीं? त्यावर याज्ञवल्क्यानें जनकाला सांगितलें कीं मी दोन्ही गोष्टीसाठीं आलों आहे." यानंतर जिज्ञासूच्या भूमिकेवरून जनक व ज्ञानदात्याच्या भूमिकेवरून याज्ञवल्क्य यांचीं प्रश्नोत्तरें

प्रारंभ झाली. तीं कांहीं वेळ चालल्यावर प्रसन्न होऊन जनक याज्ञवल्क्यांना ते मागतील ती संपत्ति द्यावयास सिद्ध झाला. त्या वेळीं याज्ञवल्क्यानें दिलेलें बाणेदार उत्तर पहाण्यासारखें आहे. " हस्तिऋषभसहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः स होवाच याज्ञवल्क्यः पिता मे अमन्यत न अननुशिष्यं हरेत् इति। " जनक म्हणाला 'मी एक सहस्र बैल व हत्ती आपणास देतों. ते स्वीकारावे.' त्याबरोबर याज्ञवल्क्य म्हणाले, 'शिष्याला संपूर्ण ज्ञानदान करून त्याला पूर्णपणें कृतार्थ केल्यावांचून त्यानें दिलेली दक्षिणा घेऊं नये अशी मला माझ्या पित्याची शिकवण आहे.' पण विद्या एकदां घेतल्यावर गुरूनें दक्षिणाग्रहण न केलें तर शिष्याचें जीवन सफळ होत नाहीं अशी समजूत होती. असा शिष्य मोठा दुर्दैवी समजला जाई. कांहीं कांहीं वेळां तर गुरुवत्सल शिष्य आणि शिष्यप्रेमी गुरु यांचा मोठा मजेदार प्रेमकलह चालत असे. व त्यांमधून मजेशीर विपत्तीहि निर्माण होई. रघुवंशांत कालिदासानें राजा रघूच्या वेळीं असलेला विख्यात मंत्रवादी कौत्स याच्या अशा विपत्तीचें अतिशय हृदयंगम वर्णन केलें आहे. कौत्स हा वरतंतु नांवाच्या ऋषीचा शिष्य होता. विद्याग्रहण संपल्यावर त्यानें आपल्या गुरूला गुरुदक्षिणा घेण्याचा खूप आग्रह केला. त्याची स्थिति ओळखून त्याच्या निरिच्छ गुरूनें त्याला असें सांगितलें कीं मला कांहींच नको. तुला तें बरेंच वाटत नसेल तर तुला शक्य असेल तें मला आणून दे व कृतार्थ हो. पण तारुण्याच्या भरांत असलेल्या कौत्साला तें बरें न वाटून तुम्हांला जें हवें असेल तें तुम्हींच मला सांगा व मागा असा आपल्या गुरूला त्यानें वारंवार आग्रह केला. तो इतका कीं त्यामुळें त्या शांतिब्रह्म गुरूला या शिष्याच्या कर्तृत्वशक्तीची घमेंड जिरवावी असें वाटून वरतंतूनें चौदा कोटी सुवर्णाच्या नाण्यांची मागणी केली. ती ऐकल्यावर मात्र कौत्साचे डोळे उघडले. पण तरीहि न हरतां त्यानें राजा रघूकडून तितकें धन आणून आपली गुरुदक्षिणा पूर्ण केलीच. अशा कामासाठीं शिष्याला साह्य करणें हें समाजा-

तील श्रेष्ठ लोक व राजे लोकहि आपलें कर्तव्य समजत. इतकेंच नव्हे तर असें साहृय न करणें हेंच तिरस्करणीय समजलें जात असे. कौत्स ज्या वेळीं रघूकडे आला त्या वेळीं विश्वजित् यज्ञांत सर्वस्वदान केल्यामुळें रघूजवळ कांहींहि शिल्लक नव्हतें. पण ही रघूची स्थिति लक्षांत घेऊन कौत्स जेव्हां दुसरीकडे कुठें जाण्याची गोष्ट काढूं लागला तेव्हां रघूनें त्याला असें उत्तर दिलें आहे कीं—

गुर्वर्थमर्थी श्रुतपारदृश्वा रघोः सकाशादनवाप्यकामम् ।
गतो वदान्यान्तरमित्ययं मे मा भूत् परीवादनवावतारः ॥
(रघुवंश सर्ग ५ श्लो. २४)

"कृतविद्य होऊन गुरुदक्षिणेसाठीं रघूकडे आलेला विद्यार्थी त्याची मागणी परिपूर्ण न झाल्यामुळें दुसऱ्या दात्याकडे गेला असा माझ्या निंदेचा नवा विषय कोणाला द्यावा अशी माझी इच्छा नाहीं." उत्तंक नांवाच्या अशाच एका गरजू शिष्याला गुरुदक्षिणेसाठीं एका राजानें आपल्या राणीचीं सुवर्णकुंडलें काढून दिलीं होतीं असें महाभारताच्या आदिपर्वांत वर्णन आहे. गुरु शिष्याची आईबापांहूनहि अधिक काळजी घेई. व शिष्यहि गुरूवर सर्वांत अधिक प्रेम करी. केवळ विद्या दिली म्हणजे संपलें असें नसून शिष्याचें जीवन घडविणें हें गुरूचें खरें काम होतें. गुरुगृहीं आपली सामाजिक योग्यता वगैरे बाजूस ठेवून शिष्य सर्व काम करी. मथुरामंडलांत आपल्या कर्तृत्वानें महान् राज्यक्रांति करून एका राज्याचे स्वामी झालेल्या भगवान् श्रीकृष्णानें उज्जयिनीस सांदीपनि गुरूच्या घरीं पडतील तीं सर्व कामें केलीं असें वर्णन आहे. गोपथ ब्राह्मणामध्यें तर गुरूच्या घरीं हौसेनें काम करतांना अंगांतून घामाच्या धारा लागलेल्या शिष्याचें उद्बोधक वर्णन आहे. पण अशा शिष्याला काम सांगतांना त्याच्या अभ्यासाची हेळसांड होणार नाहीं अशा पद्धतीनेंच तें सांगावें असा संकेत होता. जर गुरूचें काम करतांना शिष्याला मृत्यु आला तर गुरूला कठोर प्रायश्चित्त करावें लागे. शिष्याला मारण्याचा गुरूला अधिकार होता कीं नाहीं या बाबतींत मतभेद आहे. शिष्य अनु-

शासनाबाहेर जाऊं लागला तर त्याला थंड पाण्याच्या स्नानाची, उपवासाची, गुरुगृहत्यागाची शिक्षा द्यावी; पण शारीरिक दंडाची शिक्षा देऊं नये असें आपस्तंब ऋषीचें मत आहे. जर तो फारच अनावर झाला तर बारीक वेताच्या छडीनें त्याच्या पाठीवर मारावयास हरकत नाहीं असें मनु व गौतम यांचें मत आहे ही शिक्षा देतांना रंक व राजपुत्र यांच्याहि बाबतींत समानताच पाळली जात असे असें दिसतें. बौद्धजातकांतून असें वर्णन आहे कीं बनारसच्या राजपुत्राची चोरी करण्याची संवय जावी म्हणून गुरूनें त्याला चांगला खरपूस छड्यांचा प्रसाद दिला. वैदिक राष्ट्रांतील ऋषीहि इतके न्यायनिष्ठुर असले पाहिजेत असें मनुस्मृति व धर्मसूत्र वाङमय यांवरून दिसतें. देवाप्रमाणें आपलें जीवन निरपेक्षबुद्धीनें घडविणाऱ्या गुरूला शिष्य मान देत. गुरु येतांच त्यांना उत्थापन देऊन नमस्कार करावा, त्यांना उच्चासन द्यावें, त्यांहून अधिक थाटाचा पोशाख करूं नये हे शिष्टाचाराचे नियम तर होतेच; पण गुरूची निंदा करणें अथवा ती कोणी केलेली ऐकणें सर्वांहून भयानक पातक मानण्यांत येत असे. पण याचा अर्थ नीति व धर्म सोडून वागणाऱ्या गुरूची सुलतानी चालूं द्यावी असा मात्र नव्हता. आपस्तंबानें म्हटलें आहे "प्रमादानाचार्यस्य बुद्धिपूर्वकं वा नियमातिक्रमं रहसि बोधयेत्" "गुरूनें अजाणतां प्रमाद केला असेल तर अथवा बुद्धिपूर्वक धर्मनियमांचें व नीति नियमांचें उल्लंघन केलें असेल तर शिष्यानें एकांतांत विनयपूर्वक त्या गोष्टीची गुरूला जाणीव द्यावी" पांचवा वेद असणाऱ्या महाभारतांत तर असें सांगितलें आहे कीं:—

गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।
उत्पथप्रतिपन्नस्य परित्यागो विधीयते ॥

"कार्याकार्याचा विवेक न उरल्यामुळें हवें तसें मदांध वर्तन करणाऱ्या उन्मार्गगामी व उन्मत्त गुरूचा परित्याग करावा." व याच

न्यायास अनुसरून भीष्मांनीं परशुरामाशीं घनघोर युद्ध केलें तर मर्यादा पुरुषोत्तम श्रीरामचंद्रांनीं वनवास सोडून अयोध्येंत परतण्याची स्वतःच्या पुत्रधर्माच्या आड येणारी गुरुराज वसिष्ठांची आज्ञा पाळली नाहीं. परवांपर्यंत पोप (धर्मगुरु) चूक करूंच शकत नाहीं असें म्हणणारा ख्रिश्चन युरोप, व गुरूला देवाचें स्थान देऊनहि त्याच्या बाबतींत डोळस असणारे आमचे वैदिक पूर्वज यांच्यांतील हा धारणेचा भेद लक्षांत ठेवला पाहिजे. आश्रमसंस्था व गुरुगृहवास या दोन विशेषांमुळें प्रत्येक गुरूजवळ थोडे विद्यार्थी असत. त्यांची रोजच परीक्षा होऊन नंतरच योग्यतेप्रमाणें पुढचा पाठ मिळत असल्यामुळें आळशी खुशालचेंडू विद्यार्थी लवकर ताळ्यावर येत व बुद्धिमान् विद्यार्थ्यांच्या शिक्षणाचें गाडें या विद्यार्थ्यांसाठीं अडून रहात नसे. जर आळशी व विलासी प्रवृत्तीचा विद्यार्थि आपल्या जीवनक्रमामध्यें योग्य तो बदल घडवीत नसला तर गुरु त्याची खरडपट्टी काढीत व तेवढ्यानें तो ताळ्यावर न आला तर एका किडक्या आंब्याच्या संसर्गानें सारे आंबे बिघडूं नयेत म्हणून गुरु त्याची आश्रमांतून हकालपट्टी करीत असे. युआनच्वांग या चिनी प्रवाशानें तर आपला अनुभव असा लिहिला आहे कीं, "बुद्धिमान् विद्यार्थ्यांचा आळस व कामचुकारपणा घालविण्यांत भारतीय गुरूचा हातखंडा आहे." शिष्याच्या प्रश्नांतूनच अनेक उपप्रश्न काढून त्याच्या बुद्धीचा व धारणाशक्तीचा विकास करीत करीत कलात्मक पद्धतीनें हे आचार्य कसें शिक्षण देत याचें उपनिषदांतून उत्कृष्ट प्रत्यंतर पहावयास मिळतें. पदव्या व त्यासाठीं वार्षिक परीक्षांची पद्धति होती असें दिसत नाहीं. त्यामुळें समाजास आपली योग्यता वारंवार पटवून देण्यासाठीं व विद्वज्जनसभेंतील आपली प्रतिष्ठा टिकविण्यासाठीं आपली विद्या सदैव सतेज राखणें हा एकच मार्ग होता. ज्ञानाच्या दृष्टीनें हीच पद्धति योग्य व हितपरिणामी होती हें कोणीहि शिक्षणशास्त्रज्ञ मान्य करील.

वाङ्मयशिक्षणाबरोबरच वेगवेगळ्या अन्य शास्त्रांचें व व्यवसायांचें शिक्षण त्या काळीं देण्यांत येत असे असें वेदवाङ्मयांतील

उल्लेखांवरून सिद्ध होतें. (१) वेदविद्या (२) इतिहास व पुराण (३) नाराशंसी गाथा (४) छंदःशास्त्र (५) याज्ञिक कर्म (६) भूमिति (७) ज्योतिष (८) सैनिकी शिक्षण (९) गायन कला (१०) गूढ विद्या (११) सुतारकी (१२) गवंडी काम (१३) धनुर्विद्या (१४) रथकर्म (१५) अश्वसारथ्य (१६) वैद्यक (१७) लोहारकी (१८) खनिविद्या (१९) सर्पविद्या (२०) गरुडविद्या इतक्या विद्यांचे तर प्रत्यक्ष वेदवाङ्मयांतच उल्लेख आढळतात.

विद्येचें महत्त्व प्राचीन भारतीयांच्या अंतःकरणांत किती ठसलें होतें यावर प्रकाश पाडणारे उल्लेख प्रत्यक्ष ऋग्वेदांतूनहि आहेत. उदाहरणार्थ ऋग्वेदांतील हीं वचनें पहा :–

"यज्ञेन वाचः पदऽवीयं आयन् तां अनु अविदत् ऋषिषु प्रऽविष्टाम्।' यज्ञाच्या योगानें सत्पुरुष ज्ञानरूप वाणीच्या मार्गाला लागले व ती दिव्य वाणी त्या पुरुषांना ऋषींच्या अंतःकरणांत प्रविष्ट झालेली आढळली." उतत्वस्मै तन्वं विसस्रे जायेव पत्ये उशती सुवासाः।" "कोणी एखादा असा प्रतिभाशाली पुरुष निघतो कीं ज्याला ती दिव्य वाणी अलंकृत व उत्कंठित पतिव्रता स्त्रीनें आपल्या पतीजवळ व्यक्त करावी त्याप्रमाणें ती दिव्य वाणी नाना प्रकारें आपलें गूढ रहस्य प्रकट करते. अथर्ववेदानें तर "इन्द्रो वै ब्रह्मचर्येण देवेभ्यः स्वराभवत्" "इंद्राला देवामधील श्रेष्ठ स्थान केवळ ब्रह्मचर्यानें म्हणजे वेदाध्ययनासाठीं तपश्चर्या केल्यानें प्राप्त झालेलें आहे. वैदिक संस्कृतींतील तीन ऋणांची कल्पना व्यक्त करून त्यांपैकीं जीवमात्रावर असलेलें ऋषींचें ऋण केवळ विद्याध्ययनानेंच फेडतां येतें असें तैत्तिरीय संहितेनें स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे. काठक संहितेनें ब्राह्मण्य हे जन्मावर अवलंबून नसून ज्ञानावर अवलंबून आहे असें स्पष्ट सांगितलें असून तैत्तिरीय संहितेनें तर "एष वै ब्राह्मणऋषिः आर्षेयः यः सुश्रुवान्" "जो वेदविद्येंत पंडित आहे तीच खरा ब्राह्मणऋषि होय या शब्दांनीं काठक संहितेला दुजोरा दिला आहे. उपनिषद वाङमयांत एक अशी मजेदार गोष्ट आली आहे कीं, एका तरुण

गृहस्थाकडे समाजांतील कांहीं वृद्ध शिकावयास गेले असतां त्यानें त्यांना उद्देशून शिकविण्याच्या वेळीं पुत्रकाः असा शब्द-प्रयोग केला. एका तरुण गृहस्थानें वृद्धांचा हा अपमान केला असें समजून त्या वृद्धांनीं देवांकडे त्याची कागाळी केली, तेव्हां देवांनीं विचार करून त्यांना आपला असा निर्णय सांगितला कीं,

न तेन वृद्धो भवति येनास्य पलितं शिरः ।
यो वै युवाऽप्यधीयानः तं देवा स्थविरं विदुः ॥

—मनुस्मृति २–१५६

केवळ केस पिकल्यामुळें कोणी म्हातारा होत नाहीं व श्रेष्ठहि ठरत नाहीं. तरुण असूनहि जो विद्येंत निष्णात आहे त्यालाच देव श्रेष्ठ समजतात." या उपनिषदांतील अभिप्रायाचेंच व्यक्ती-करण करतांना राजर्षि मनूनें म्हटलें आहे.

न हायनैः न पलितैः न वित्तेन न बंधुभिः ।
ऋषयः चक्रिरे धर्मं योऽनूचानः स नो महान् ॥

—मनुस्मृति २–१५४

"केवळ केस पिकल्यानें, वय खूप वाढल्यामुळें, पैसे खूप झाल्यामुळें अथवा मोठमोठे नातलग असल्यामुळें कोणीहि श्रेष्ठ ठरूं शकत नाहीं. ऋषींनीं असा निर्णय सांगितला आहे कीं, जो विद्वान् आहे तोच आमच्या दृष्टीनें खरा श्रेष्ठ होय. येवढ्याचसाठीं पुत्रप्राप्तीचें फार मोठें महत्त्व समजणाऱ्या वैदिकांनीं विवाहसंस्कार हा आवश्यक शारीरिक संस्कार ठरविलेला नसून विद्याग्रहणाचा उपनयन संस्कार मात्र तसा ठरविलेला आहे हें पाहण्यासारखें आहे. सर्व संस्कारांत उपनयन संस्कार हाच खरा आवश्यक संस्कार असून विवाहादि इतर संस्कार न केले तरी त्यामुळें मनुष्य पतित होत नाहीं. पण उपनयन संस्कार न केला तर मात्र त्याचें आर्यत्व नष्ट होऊन तो पतित होतो असा वैदिक धर्मानें आपला निर्णय सांगितलेला आहे. यावरून विद्येचें महत्त्व वैदिक राष्ट्राला किती वाटत होतें याची कल्पना येते. मागच्या व्याख्यानांत समावर्तन संस्काराचें वर्णन केलेंच आहे. सूर्यपेक्षां-

सुद्धां स्नातकाचें तेज अधिक असें धर्मसूत्रकारांनीं वर्णन केलें आहे. या समावर्तनाच्या वेळीं स्वतः गुरु शिष्याला रथावरून अथवा हत्तीवरून मिरवीत नेत असे. कोणी अतिथि घरीं आला तर त्याला वर्षांतून एकदांच मधुपर्क देण्याची चाल होती. पण स्नातकाला मात्र तो येईल तितके वेळा मधुपर्क द्यावयाचा असे. हा मान स्नातक सोडून वैदिक समाजरचनेंत केवळ राजाचाच आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. रस्त्यावरून राजाची स्वारी जावयाची असली व स्नातकालाहि त्याच वाटेनें जावयाचें असलें तर राजानें त्या स्नातकाला प्रथम वाट द्यावी लागे. शिक्षण-कार्यांत व्यत्यय येऊं नये म्हणून दहादहा दिवसांचें जननाशौच व मरणाशौच ब्रह्मचाऱ्याला लागू नाहीं असा नियम होता. पुत्रोत्पत्तीनें मनुष्य पितृऋणांतून मुक्त होतो असें आपल्या धर्मशास्त्रानें म्हटलें आहे. पण केवळ पुत्र जन्माला आला म्हणजे पिता पितृऋणांतून मुक्त होतो असें नसून बृहदारण्यकोपनिषदानें म्हटलें आहे "तस्मात् पुत्रं अनुशिष्टं लोक्यमाहुः तस्मात् एनं अनुशास्ति।" मुलगा जर कृतविद्य असेल तरच पितृऋणांतून पित्याची सुटका होत असल्यामुळें खरा पिता पुत्राच्या शिक्षणाची काळजी घेत असतो. माधवाचार्यांनीं तर आपल्या धर्मशास्त्राच्या या संकेताचें स्पष्टीकरण करतांना असें म्हटलें आहे कीं,

"न हि पुत्रजननमात्रेण पितुः आनृण्यं। किं तर्हि? सम्यगनुशिष्टेन पुत्रेण शास्त्रीयेषु कर्मसु सम्यगनुष्ठितेषु पश्चात् आनृण्यं संपद्यते।" "मुलगा केवळ जन्माला आला म्हणजे पिता ऋणांतून मुक्त होत नाहीं तर मुलानें योग्य तऱ्हेनें विद्या संपादन करून शास्त्रीय कर्मांचें योग्य आचरण केलें तरच पिता पितृऋणां-तून खऱ्या अर्थानें मुक्त होतो." विद्येच्या संबंधाच्या या प्राचीन धार्मिक आदराचा पगडा इ. स. १८४८ पर्यंत भारतीय मनावर किती होता याचें प्रत्यंतर इ.स.१८४८च्या पंजाबांतील शिक्षणाच्या परिस्थितीचा आढावा घेतांना डॉ. लैटनरनें जे उद्गार काढले आहेत त्यावरून मिळतें. तो म्हणतो :-

"परकीयांच्या स्वाऱ्या व आपसांतील यादवी यांनीं देशांत बजबजपुरी माजली असतांहि पंजाबांत शिक्षणसंस्था वाढतच होत्या. उलटय़ा काळजाचे संस्थानिक, लोभी व हावरे सावकार, फारतर काय पण दरवडेखोरसुद्धां आपल्या पापाचें क्षालन व्हावें व मनास शांति लाभावी म्हणून धर्मशिक्षणसंस्थांना साह्य करीत व विद्वानांचा उत्तम परामर्श घेत. असें एकहि देवालय अथवा धर्मशाळा नव्हती कीं जेथें धार्मिक शिक्षणाकरितां शेकडो मुलें जमत नसत. असे फार थोडे संपन्न लोक होते कीं, जे आपल्या मुलांना व त्याचबरोबर आपल्या स्नेह्यांच्या व नातलगांच्या मुलांना शिकविण्याकरितां आपल्याजवळ पंडित व गुरु यांना ठेवीत नसत. असे शतावधि साधु लोक होते कीं, जे आपल्या धर्मबांधवांना व त्याबरोबर कधीं कधीं विधर्मीयांनासुद्धां आपलें कर्तव्य म्हणून कसल्याहि प्रकारचा मोबदला न घेतां फुकट शिक्षण देत असत. असा एकहि गांवकरी नसे कीं जो आपल्या उत्पन्नापैकीं कांहीं भाग आपल्या गांवांतील धर्मशिक्षण देणाऱ्या गुरूला देण्यांत धन्यता मानीत नसे." भारतीय समाजाची श्रद्धा वेदांनीं निर्माण केलेली आहे. व आमच्या श्रद्धापरंपरा या वेदकाळापासून आजपर्यंत अव्याहत चालू आहेत याचें हें प्रत्यंतरच नव्हे काय? डॉ. लैटनरनें हें जें पंजाबसंबंधीं म्हटलें आहे तेंच सर्व प्रांतांना कसें लागू होतें हें पं. सुंदरलाल यांनीं आपल्या 'भारतमें अंग्रेजी राज' या ग्रंथांत उत्कृष्ट रीतीनें दाखवून दिलें आहे. सर्व दानांत विद्यादान हें अत्यंत श्रेष्ठ मानलेलें असून ज्याच्या राज्यांत विद्वानांचा परामर्ष होत नाहीं त्या राजाला पतित समजण्यांत येत असे. विद्वानांचा योगक्षेम चालविणें हें राजाच्या कर्तव्यांतील एक अत्यंत प्रधान कर्तव्य मानण्यांत आलें आहे. महाभारताच्या अनुशासन पर्वांत (अ. ५९) भीष्मांनीं युधिष्ठिराला असें म्हटलें आहे कीं,

विद्यास्नाता व्रतस्नाता ये व्यपाश्रित्य जीविनः ।
गूढस्वाध्यायतपसो ब्राह्मणा संशितव्रताः ।।१७
तेषु शुद्धेषु दान्त्येषु स्वदारपरितोषिपु ।
यत्करिष्यसि कल्याणं तेन लोके युधांपते ।।१८

"विद्येंत ज्यांनीं स्नान केलेलें आहे, व्रताचरणांत जे गढून गेलेले आहेत, उपजीवनासाठीं कोणाचेहि आश्रित होऊन राहण्याची ज्यांची प्रवृत्ति नाहीं, गंभीर स्वाध्याय व तपस्या यांत जे गढून गेले आहेत अशा शुद्ध एकपत्नीव्रतधारी व इंद्रियें स्वाधीन असलेल्या लोकांचा योगक्षेम नीट चालावा म्हणून तूं जें जें कांहीं करशील तें तें अंतीं तुझ्या कल्याणाचेंच ठरेल." अथर्ववेदापासून तर कौटिलीय अर्थशास्त्रापर्यंत सर्व भारतीय वाङमयांत राजांच्या प्रधान कर्तव्यांत तपस्वी विद्यावंतांचा परामर्ष व विद्याप्रसारास साह्य या गोष्टींचा अंतर्भाव केलेला आहे. उपनिषद् वाङमयांत प्रसिद्धीस आलेले जनक व अजातशत्रु हे राजे, नंतरच्या काळांतील कनिष्क व चंद्रगुप्त विक्रमादित्य, हर्ष व यशोवर्मा, धर्मपाल व मुंज इत्यादि या कर्तव्यांत अग्रेसर ठरणारे राजे प्राचीन भारताचा यशोगौरव वाढवीत होते व पुढें पेशवाईपर्यंत भारतीय सत्ताधिपांनीं ती परंपरा चालविली. विद्वान् ब्राह्मणांना वेगवेगळ्या प्रकारांनीं बहुमान देण्यांत येत असे. भूमिगत द्रव्याच्या कायद्यांत त्यांना सवलत होती. एखाद्या श्रोत्रियास भूमिगत मोहोरांचा हंडा सांपडला तर त्यावर त्याचा संपूर्ण हक्क असे. दुसऱ्या कोणास सांपडला तर मात्र त्यांना सोळा टक्के कर असे. राजाहि याला अपवाद नव्हता. राजाला जर तो हंडा सांपडला तर त्यानें त्यांतील निम्में धन ब्राह्मणांना वाटून द्यावयाचें असे. मुदतीच्या कायद्याची सामान्य मुदत तीस वर्षांची असूनसुद्धां गुरुगृहीं विद्यार्जनासाठीं राहिलेल्या ब्रह्मचाऱ्यास अन्यायानें अपहार केलेली संपत्ति परत मिळण्याकरतां पन्नास वर्षांत केव्हांहि दावा करतां येत असे.

वैदिक शिक्षण पद्धतींतील सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही होती कीं, येथें विद्यामंदिर राजसत्तेचें गुलाम नसून विद्वान् व तपस्वी हेच त्याचे सर्वश्रेष्ठ नियंत्रक होते. ज्यांचा शिक्षणाशीं अर्थाअर्थी संबंध नाहीं असे शिक्षणमंत्री, प्रशिक्षणाधिकारी इत्यादि उपऱ्या नात्यांनीं विद्यामंदिराच्या कजाग सासूची भूमिका करणाऱ्या लोकांचा वैदिक राष्ट्रांत उपद्रव नव्हता. प्रत्यक्ष राजांनासुद्धां "विनीतवेषेण नाम प्रवेष्टव्यानि तपोवनानि" तपोवनांत विनयानें व सभ्यपणानेंच

प्रवेश केला पाहिजे असें ऋषिकुमार सांगूं शकत. मुलानें बापास द्यावा असा राजानें श्रोत्रियास मान द्यावयाचा असे. एका श्रेष्ठ राष्ट्राची घडण वैदिक शिक्षणपद्धति घडवूं शकली याचें कारण ती राजसत्तेची कधीं दास नव्हती, तर ऋषींच्या नियंत्रणांत ती होती हेंच आहे.

वैदिक शिक्षणपद्धतीचें हें स्वरूप पाहिल्यावर काळाच्या प्रभावामुळें जीं कांहीं स्थित्यंतरें आज घडून आलीं आहेत तीं सोडून दिलीं तर काळालाहि पुरून उरणारे व प्रत्येक कालखंडांत हितपरिणामीं ठरूं शकणारे असे कांहीं सिद्धांत वैदिक शिक्षणपद्धतींत आहेत असें आढळून येईल. भारतांत राष्ट्रपुनर्घटनेचें व तदनुषंगानें जीवनांतील इतर क्षेत्रांच्या पुनर्घटनेचें जें हल्लीं मंथन चालू आहे त्या दृष्टीनें वैदिक शिक्षणपद्धति भारतीय शैक्षणिक पुनर्घटनेला तत्त्वांच्या दृष्टीनें आजहि मार्गदर्शन करूं शकते असें आढळून येईल. गेल्या दीडशे वर्षांतील पारतंत्र्यामुळें व या पारतंत्र्याच्या काळांत करण्यांत आलेल्या विशिष्ट प्रकारच्या संस्कारांमुळें भारताच्या बौद्धिक क्षेत्रांत पाश्चात्यांची वैचारिक दासता निर्माण झाली. या दासतेमुळें राष्ट्रजीवनाच्या विविध क्षेत्रावर जे कांहीं परिणाम घडून आले त्यांतील सर्वांत भयंकर परिणाम म्हणजे भारतीय शिक्षण पाश्चात्य शिक्षणपद्धतीचा अनुकार ठरलें हा होय. आजहि ती स्थिति बदललेली नाहीं. त्यामुळें पाश्चात्य पद्धतीचे दोषहि आपल्यांत प्रभावी आहेत. किंबहुना असें म्हणतां येईल कीं, त्यांच्या दोषांचें फक्त आपण वाटेकरी झालों व गुणांशीं आपला फारसा संबंध परिस्थितीमुळें आलाच नाहीं. पाश्चात्य राष्ट्रांतील आज सर्वश्रेष्ठ असणाऱ्या अमेरिका व रशिया या देशांतील शिक्षणप्रणालींची तपासणी केली तर त्यांच्यांत कांहीं मूलभूत स्वरूपाचे दोष शिरले असल्याचें आढळून येईल व अंधानुकरणामुळें हळूहळू त्या मूलभूत दोषांचा आजच्या भारतीय शिक्षण प्रणालींतही अंतर्भाव होऊं लागला आहे. अमेरिकन शिक्षणप्रणालींत कांहीं गोष्टी फारच चांगल्या आहेत. इंग्लंडमध्यें अजूनहि अशी समजूत आहे कीं, शिक्षणदान हें

जनतेचें कर्तव्य असून सरकारची भूमिका आवश्यकच असेल तेथें साहाय्यकाची राहील. इंग्लंडपासून फुटून निघाल्यानंतर अमेरिकेनें मात्र शिक्षण हें सरकारचेंच कर्तव्य आहे असें ठरवून आपल्या राष्ट्राची शैक्षणिक प्रगति झपाट्यानें घडवून आणली. शिक्षणाच्या क्षेत्रांत श्रीमंत गरीब हाहि भेद नष्ट करून प्रत्येक व्यक्तीला शिक्षणाच्या संधीचें समान स्वातंत्र्य ( equality of opportunity ) दिलें. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्राचीन भारताचें अनुकरण करून संपूर्ण शिक्षण विनामूल्य केलें. पण. . . . . . ?

## पाश्चात्य पद्धतींतील दोष

अमेरिकन व सर्वच पाश्चात्य पद्धतींत जीवन घडविणाऱ्या आध्यात्मिक दृष्टिकोनाचा पूर्ण अभाव हा मोठाच दोष आहे. व्यक्तिजीवनाचा व समाजजीवनाचा मूलभूत स्वरूपाचा कोणताहि उलगडा त्यांच्याजवळ नाहीं व त्या दृष्टीनें आंतरिक जीवन विकसित करण्याची कोणतीहि प्रक्रिया त्यांच्याजवळ नाहीं. त्याचें महत्त्वहि त्यांच्या लक्षांत आलेलें नाहीं. जीवनाच्या आध्यात्मिक धारणेमुळें उत्पन्न होणारे वैयक्तिक व सामाजिक सद्गुण अमेरिकेला हवे आहेत. पण या गुणांना आधारभूत असा आध्यात्मिक तत्त्वज्ञानाचा दृष्टिकोन जर नसेल तर त्या भक्कम आधारावांचून कोणत्याहि सदाचाराला व नैतिक व्यवहाराला शाश्वती नाहीं ही गोष्ट निश्चित आहे. सर्वधर्मपंथभेदातीत अशा आध्यात्मिक पायाचा पूर्ण अभाव जीवनांत त्याचप्रमाणें शिक्षणाच्याहि क्षेत्रांत सर्वच युरोपांत आहे. ज्याचा पायाच अनिश्चित, अशा सदाचाराची व नीतिमूल्यांची यामुळेंच शिक्षणक्षेत्रांत या ठिकाणीं खरी प्रतिष्ठा असूं शकत नाहीं. अमेरिकन शिक्षणप्रणालींत ध्येयशून्यता हा दुसराहि विलक्षण दोष आहे. व तो हल्लीं अमेरिकन शिक्षणशास्त्रज्ञांना पटूंहि लागलेला आहे. बहुजनसमाज शिक्षित करणें हें शिक्षणाचें ध्येय ठरविल्यामुळें निवडक बुद्धिमान् मुलांची कुचंबणा होऊन श्रेष्ठांना अतिश्रेष्ठ होण्याची या शिक्षण-

प्रणालींत विशेष सोय नाहीं. हल्ली ती करण्याचे प्रयत्न चालू आहेत. रशियांत तर शिक्षण जरी सार्वत्रिक आणि खूप मोठ्या प्रमाणावर देण्यांत येत असलें तरी एका साच्याचीं घडीव माणसें घडविण्याचें तंत्र अवलंबिण्यांत आल्यामुळें एका प्रणालीचे दास निर्माण करण्याचा कारखाना हें तेथील शिक्षणाचें स्वरूप आहे. इतिहास व समाजशास्त्रच नव्हे तर संशोधन संस्थांतूनसुद्धां कम्युनिस्ट छापाचा अतिरेकी प्रचार होतो. रशियांत तर शिक्षणाच्या बाबतींत पक्षपातहि आहे. प्रथम कम्युनिस्ट पंथाचे अनुयायी, नंतर कामगारवर्ग व त्यानंतर सोय असल्यास इतर असा तेथें पक्षपात आहे. सारी पिढी एका साच्यांतून काढण्याच्या या खटाटोपामुळें केवळ बौद्धिक दास निर्माण होतील. सर्वच पाश्चात्य राष्ट्रांतून प्रचलित असलेल्या शिक्षणपद्धतींत सर्वांत मोठा दोष हा आहे कीं, शिक्षणाचें पवित्र मंदिर राजसत्तांचें गुलाम झालें आहे. तेथें ज्ञानानें सत्तेचें दास्य स्वीकारलें व अध्यापक राजाचे गुलाम झाले. भारताच्या इतिहासांत असें कधींहि घडलें नव्हतें. तसेंच शिक्षण एखाद्या कारखान्यासारखें झाल्यामुळें तें व्यक्तित्वाला पूर्ण पारखें झालें आहे. संस्कार हें शिक्षणाचें ध्येय जाऊन आर्थिक दर्जा प्राप्त करून देणें हें उद्दिष्ट ठरल्यामुळें शिक्षणाला व्यापारी स्वरूप प्राप्त झालें आहे. व शिक्षकाचा उच्च भाव नष्ट होऊन द्रव्य देणाऱ्याची सेवा करणारा एक सामान्य नोकर यापलीकडे त्याचें महत्त्व व स्थान उरलेलें नाहीं. प्रस्थापित सत्ता चिरस्थायी करणें येवढेंच शिक्षणयंत्राचें आज तरी उद्दिष्ट झालेलें आहे. अशा स्थितींत भारतीय शिक्षणयंत्रहि याच गतीनें फिरत असल्यामुळें हे दोष त्याच्यांतहि दृढमूल होऊं लागलेले आहेत. आजच्या या अवस्थेंत सर्वांनाच व विशेषतः भारताला मार्गदर्शक असणारे वैदिक शिक्षणपद्धतींतील सिद्धांत गंभीरपणें चिंतन करण्याच्या योग्यतेचे वाटतात. आतांपर्यंत वैदिक राष्ट्राच्या शिक्षणप्रणालीचें जें दिग्दर्शन केलें आहे त्यावरून निघणारे कांहीं निष्कर्ष व सिद्धांत पुढीलप्रमाणें :—

(१) जीवनाचा विश्वात्म धारणेचा दृष्टिकोन वैदिक समाजरचनेंत सिद्ध असल्यामुळें आध्यत्मिक दृष्टिकोनाचा वैदिक शिक्षणप्रणालींत नुसता अंतर्भावच नव्हता, तर तिच्या उभारणीचा तो पायाच होता.

(२) आध्यात्मिक दृष्टीनें देवजीवन उत्पन्न झालेला व भौतिक दृष्टीनें जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत अग्रेसर असणारा सामर्थ्यसंपन्न व वैभवसंपन्न समाज निर्माण करणें हें शिक्षणप्रणालीचें ध्येय होतें.

(३) आदर्श समाज याचा अर्थ समाजांतील प्रत्येक व्यक्तिजीवन आदर्श असलें पाहिजे असा उघडच असल्यामुळें व्यक्तित्व विकसन (Development of personality) व आदर्श व्यक्तिजीवन घडविणें हें शिक्षणपद्धतीचें लक्ष्य होतें.

(४) शील संवर्धन, उत्तम गुणांचा पद्धतशीर परिपोष व स्वकर्तव्य परायणता निर्माण करणें हें व्यक्तित्वविकसनाचें स्वरूप होतें.

(५) आश्रमसंस्थेच्या द्वारें नागर जीवनांतील विलासी वातारणापासून विद्यार्थिजीवन पूर्णपणें अलिप्त राखलें जात असे. तसेंच नागरजीवनांतील संघर्षाचाहि विद्यार्थिजीवनावर परिणाम न होतां तें शुद्ध संस्कारांत रहावयास योग्य असें वातावरण नेहमीं टिकून राही.

(६) आश्रमांतील अथवा गुरुकुलांतील जीवनांत सर्वांना समान वागणूक मिळत असल्यामुळें, व वेष आणि व्यवहार यांच्या बाबतींत कमालीचा साधेपणा व समानता कटाक्षानें राखली जात असल्यामुळें वैषम्याचे कोणतेहि संस्कार मनावर उमटत नसत.

(७) आर्थिक परिस्थिति व शिक्षण यांच्यांत आज दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या अविभाज्य संबंधाचा वैदिक पद्धतींत मागमूसहि नव्हता. भैक्ष्यचर्या ब्रह्मचर्याश्रमांत अनिवार्य केल्यामुळें विद्यार्थिजीवन स्वावलंबी व आर्थिक परिस्थितिनिरपेक्ष राहून कोणालाच कमीजास्तपणाची भावना निर्माण होण्याची शक्यता नव्हती.

(८) आश्रमांत व गुरुकुलांत राहणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या थोडी असल्यामुळें वैयक्तिक संस्कार करणें सुलभ होतें. आजच्या शिक्षणयंत्राला जें एखाद्या निर्जीव कारखान्याचें स्वरूप आलें आहे तें तसें त्या काळीं येण्याची शक्यताच नव्हती.

(९) शिक्षण विनामूल्य होतें. त्यामुळें तें जसें सर्वांनाच घेण्याची संधि होती, त्याचप्रमाणें विद्येच्या महत्त्वाचा संस्कार सदोदित मनावर ठसविण्यामुळें शिक्षणाकडे केवळ अर्थोपार्जनाचें एक साधन हा पाहण्याचा दृष्टिकोन न राहतां श्रेष्ठ जीवन घडविणारी अमृत संजीवनी म्हणूनच पाहिलें जाई.

(१०) श्रेष्ठजीवन जगणाऱ्या आचार्यांच्या प्रत्यक्ष अनुशासनाखालीं सदोदित राहात असल्यामुळें व त्यांचेंच जीवन आदर्श म्हणून सदैव डोळ्यांसमोर राहात असल्यामुळें विद्यार्थिजीवन बिघडण्याची अथवा त्यांत उच्छृंखलता व स्वैरता निर्माण होण्याची शक्यताच नसे.

(११) शिक्षण हा धार्मिक संस्कार केल्यामुळें व ब्रह्मचर्यव्रताची त्याच्याशीं सांगड घातल्यामुळें सर्व शक्तींचा विकास त्यांत एका पवित्र भावनेनें घडून येत असे. ब्रह्मचर्याश्रमांत निरनिराळे निर्बंध असत. पण स्वाभाविक शक्ति व मनोवृत्ति यांना दडपून अथवा खुरटवून टाकण्यासाठीं म्हणून ते नसून त्यांना योग्य वळण लावावें व त्यांच्यांतून अधिक सामर्थ्य प्रकट व्हावें हा हेतु होता. ब्रह्मचाऱ्यानें उपास न करतां भरपूर खावें; पण त्याचा आहार रजोगुणी अथवा तमोगुणी नसावा. त्यानें आत्मसंयम करून आपल्या शारीरिक व बौद्धिक शक्तींचा संपूर्ण परिपोष व विकास करावा असें सांगणें असे. त्यानें पुढें सुखानें गृहस्थाश्रम करावा व समाज आणि देवत्व यांच्यासाठीं जीवन खर्च करण्यास आवश्यक ती योग्यता अंगीं आणावी हाच या निर्बंधांचा व तपस्यामय जीवनाचा हेतु होता.

(१२) या प्राचीन भारतीय शिक्षणप्रणालीवर असा एक आक्षेप घेण्यांत येतो कीं ती एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न

करणारी नव्हती. पण हें विधान अनैतिहासिक व चुकीचें आहे. हिंदुस्थानासारख्या खंडप्राय देशांत विभिन्न भाषांच्या व प्रांतांच्या भेदांना उल्लंघून एका समान श्रद्धाकेन्द्रांच्या सूत्रांत कोटयवधि लोकांचा हिंदुसमाज आणणें व सहस्रावधि वर्षें टिकविणें ही गोष्ट ज्या शिक्षणप्रणालीनें घडविली तिला एकराष्ट्रीयत्वाची कल्पना नव्हती असें म्हणणें हें केवढें धाष्टर्य आहे! आज सहस्रावधि वर्षांपासून भारतीय संस्कृतीचें स्वरूप भाषाभेद, वंशभेद व प्रांत-भेद यांना पोटांत घालून जें समानच दिसतें, समान धार्मिक आचार, समान श्रद्धाकेन्द्रें, समान नैतिक कल्पना, समान तत्त्वज्ञान-विषयक परंपरा, समान बंधुभाव, देशाच्या पावित्र्याची व त्याच्या विषयींच्या आत्मीयतेची समान उत्कट जाणीव, या एकराष्ट्रीयत्व निर्माण करणाऱ्या सर्व गोष्टी या शिक्षणप्रणालीनेंच या खंडप्राय देशांत निर्माण केल्या व सहस्रावधि वर्षें टिकवून धरल्या यावरूनच या आरोपाचा फोलपणा सिद्ध होतो.

(१३) धनासाठीं विद्यादान करणें तिरस्करणीय समजणारे, तपस्यामय व ज्ञानमय जीवन व्यतीत करणारे ऋषि हे भारतीय विद्यापीठांचे आचार्य असून तेच वैदिकराष्ट्राच्या शिक्षणाचे सर्व-तंत्रस्वतंत्र सर्वाधिकारी होते.

(१४) वैदिक राष्ट्राचें विद्यामंदिर राजसत्तेचें कधींहि गुलाम नसून राजेलोकच स्वतःला त्याचे सेवक मानीत. राजपुत्रालाहि चोप देण्याचा नैतिक अधिकार प्रसंगीं विद्यापीठांचे आचार्य बजा-वीत. राजे धर्म म्हणून विनाशर्त विद्यादानाच्या कार्यास साहय करीत. ते विद्यामंदिरांत प्रवेश करतांना विनयानेंच करीत. विद्यामंदिर आणि शिक्षणप्रणालि यांवर धन व सत्ता यांचें नियंत्रण व अधिकार मुळींच नसून तें संपूर्णपणें स्वतंत्र होतें.

वैदिकराष्ट्राच्या शिक्षणप्रणालींत असलेल्या या तत्त्वांचा विचार केला तर वैदिक राष्ट्राचें श्रेष्ठजीवन कां निर्माण झालें व तें निर्माण करण्याचा किती कसोशीचा प्रयत्न होत असे याची कल्पना येते. आज शैक्षणिक पुनर्घटनेचा प्रश्न सोडवितांना या निकषांचा वापर केला, निदान त्यांतील (१) राजसत्तेचें दास्य न

पत्करणें (२) व्यक्तिगुण विकास व संस्कार आणि (३) आध्यात्मिक दृष्टिकोन हे तीन निकप जरी स्वीकारले तरी भारत पुन्हां आपल्या प्राचीन तेजानें तळपून उठल्याविना राहणार नाहीं. राष्ट्रपति राजेन्द्रप्रसादांनीं अशा अर्थाचे विचार व्यक्त केले आहेत खरे; पण आजचे खरे सत्ताधारी या मार्गाकडे वळतील निदान या स्वरूपाचा मूलभूत विचार करावयास लागतील, तो सुदिन!

असो. अशा या श्रेष्ठ संस्कारांच्या भट्टींतून राष्ट्रजीवनाचा योग्य घटक म्हणून तयार झालेल्या विद्यार्थ्याला समावर्तन संस्कारानंतर प्रत्यक्ष समाजजीवनांत सोडतांना वैदिक आचार्य जो उपदेश करीत तो प्रत्येक व्यक्तीनें हृदयावर कोरून ठेवण्यासारखा स्फूर्तिशाली आहे. तो उपदेश असा :–

"वेदमनूच्याचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति। सत्यं वद। धर्मं चर। स्वाध्यायान्मा प्रमदः। आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः। सत्यान्न प्रमदितव्यम्। धर्मान्न प्रमदितव्यम्। कुशलान्न प्रमदितव्यम्। भूत्यै न प्रमदितव्यम्। स्वाधायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम्। देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् ॥१॥ मातृदेवो भव। पितृदेवो भव। आचार्यदेवो भव। अतिथिदेवो भव ॥२॥ यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि। यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि । ये के चास्मच्छ्रेयांसो ब्राह्मणास्तेषां त्वयासनेन प्रश्वसितव्यम्। श्रद्धया देयम् । अश्रद्धयाऽदेयम् । श्रिया देयम्। ह्रिया देयम्। भिया देयम्। संविदा देयम् । अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा स्यात् ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः युक्ता आयुक्ता अलूक्षा धर्मकामाः स्युः यथा ते तत्र वर्तेरन् तथा तत्र वर्तेथाः ॥" (तैत्तिरीय उपनिपद शिक्षाध्याय)

(वेदाध्ययन संपल्यावर निरोप देण्याच्या वेळीं आचार्य शिष्याला पुढीलप्रमाणें उपदेश करतात :– 'खरें बोल, आपलें कर्तव्य ओळखून धर्माप्रमाणें वाग. शिकलेली विद्या प्रमत्तपणानें विसरूं नकोस. आचार्यांना त्यांच्या आवडीप्रमाणें गुरुदक्षिणा देऊन गृहस्थाश्रमाचा स्वीकार कर. प्रजारूपी सूत्र तोडण्यास तूं

कारणीभूत होऊं नकोस. प्रमादानें सत्य विसरूं नकोस. धर्माकडे दुर्लक्ष करूं नकोस. आपल्या भौतिक कल्याणाकडे दुर्लक्ष करून तें साधून देणाऱ्या गोष्टींविषयीं उपेक्षाबुद्धि धरूं नकोस. आपल्या कल्याणमार्गापासून चळूं नकोस. केलेल्या अध्ययनाची उजळणी करून तें लखलखीत राखणें व अध्ययन करणें हें तुझें कर्तव्य आहे हें विसरूं नकोस. धर्मप्रमाणें सांगितलेलीं देवकार्यें व पितृकार्यें कधींहि टाळूं नकोस. मातृपरायण हो. पितृपरायण हो. आचार्यपरायण हो व अतिथिपरायण हो. कारण कीं तें तुझें कर्तव्य आहे. अंवतीं भंवतीं मोठीं माणसें असलीं तरी त्यांच्या हातून जीं निर्दुष्ट व चांगलीं कर्में होतील त्यांचेंच अनुकरण कर. त्यांच्या वाईट गोष्टींचें अनुकरण करूं नकोस. (कारण कीं माणसाच्या मोठेपणावर त्याच्या कृत्याचा चांगुलपणा अवलंबून नाहीं.) आम्ही तुझे गुरु असलों तरी जें आमचें चांगलें आचरण आहे त्यांचेंच तूं अनुकरण कर. इतर गोष्टींचें अनुकरण करूं नकोस. जे श्रेष्ठ व गुरुतुल्य थोर पुरुष, ते कधीं उपस्थित झाल्यास आसन देऊन त्यांचा सन्मान करणें हें तुझें कर्तव्य आहे. द्यावयाचें दान नेहमी श्रद्धेनें द्यावें. अश्रद्धेनें देऊं नये. आपल्या वैभवानुरूप द्यावें. उगाच कद्रूपणा दाखवूं नये. द्यावयाचें तें विनयानें समर्पण करावें. धर्म व ईश्वर यांची मनांत भीति बाळगून त्यांचें अतिक्रमण होणार नाहीं अशा पद्धतीनें दान दे. दान नेहमी ज्ञानपूर्वकच दे. व्यवहारांत व समाजजीवनांत वागतांना कर्म कोणतें व अकर्म कोणतें आणि कोणत्या प्रसंगीं कसें वागावें यासंबंधांत तुला संशय उत्पन्न झाला तर त्या बाबतींत जे समदर्शी, योग्य विचार करणारे कर्मनिष्ठ, लोभ इत्यादि विकारांच्या अतीत असलेले व कर्तव्यासाठीं कर्तव्य अशा भावनेनें वागणारे धर्मपरायण ब्राह्मण त्या त्या प्रसंगीं जसें वर्तन करीत असतील अथवा त्यांनीं जसें वर्तन केलें असेल तसेंच तूंहि वाग.")

वैदिक राष्ट्राचा विद्यार्थी राष्ट्रजीवनांत प्रवेश करतांना त्याच्या जीवनाची घडण कशी होत असे, त्याचे गुरू कोणत्या योग्यतेचे

असत व तो व्यहार कोणत्या पद्धतीनें करी या गोष्टींचें स्पष्ट चित्र वरील उताऱ्यांत चित्रित झालें आहे. याहून अधिक श्रेष्ठ प्रतीचा उपदेश जगाच्या शिक्षणविषयक वाङ्मयांत आढळण्याची शक्यता नाहीं.

असा प्रश्न स्वाभाविकच या चर्चेच्या अनुषंगानें उत्पन्न होण्याचा संभव आहे कीं वैदिक शिक्षणपद्धतींत स्त्रियांना कांहीं स्थान होतें कीं नाहीं? व असलें तर काय होतें? व त्याच्या अनुषंगानेंच निर्माण होणारा दुसरा प्रश्न म्हणजे वैदिक राष्ट्रजीवनांत स्त्रियांचें स्थान काय होतें हा आहे. या दोन्ही प्रश्नांचीं उत्तरें पुढील व्याख्यानांत देऊं.

## व्याख्यान अकरावें

# वैदिक स्त्री

वेदांत स्त्रियांचा अधिकार गृहजीवनांत पुरुषांच्या बरोबरीचा मानलेला असून सर्व वैदिक वाङमयांत या तऱ्हेचीं वचनें आढळतात. "अर्धो ह वा एष आत्मनो यत् जाया" स्त्री ही आपला अर्ध भाग होय हें शतपथ ब्राह्मणांतील वचन वेदस्त्रियांची योग्यता स्पष्ट करतें. त्यांच्यावर धार्मिक अपात्रतेचा शिक्का मुळींच मारलेला नसून उलट पुरुष जर विवाह करण्याचें नाकारतील तर त्यांच्यावर मात्र असा अपात्रतेचा शिक्का मारतां येत असे. "अयज्ञीयः वा एष यः अपत्नीकः" जो विवाह करीत नाहीं त्याला अयज्ञीय म्हणजे यज्ञकर्मांत अपात्र असा शिक्का शतपथ ब्राह्मणानें मारलेला असून पत्नी या शब्दानेंच यज्ञकर्मांत स्त्रीचें पुरुषांच्या बरोबरीचें स्थान असल्याचें उघडच दिसतें. तैत्तिरीय ब्राह्मण व व शतपथ ब्राह्मणावरून यज्ञाच्या वेळीं स्त्रीचें व्रतोपनयन होत असे व नवऱ्याबरोबर तिलाहि यज्ञदीक्षा मिळत असे असें स्पष्ट दिसतें. ऋग्वेदांत पतिपत्नींनीं यज्ञामध्यें अशीं बरोबरीनें कामें केल्याचें वर्णन आहे. उदाहरणार्थ ऋग्वेदांतील पुढील वर्णन पाहा :—

या दंपती समनसा सुनुतः आ च धावतः ।
देवासो नित्ययाऽऽशिरा ॥५
इति प्राशव्यान् इतः सम्यञ्चा बर्हिर् आशाते ।
न ता वाजेषु वायतः ॥६
न देवानां अपि ऱ्हुतः सुमतिं न जुघुक्षतः ।
श्रवो बृहत् विवासतः ॥७
पुत्रिणा ता कुमारिणा विश्वं आयुर्वि अश्नुतः ।
उभा हिरण्यपेशसा ॥८ (ऋग्वेद ८–३१

"जे पतिपत्नी अगदीं मनःपूर्वक सोमरस पिळून सिद्ध करतात, आणि हे देवांनो, तो रस निर्भेळ दुधाच्या हवीशीं मिश्रित करून गाळून स्वच्छ करतात, त्या उभयतांना उत्तम अन्न प्राप्त होतें. त्यांचा एक विचार निश्चल राहतो, आणि यज्ञ शेवटास जातो. सामर्थ्यांत त्यांना कधींच उणीव पडत नाहीं. ते देवाशीं प्रतारणा करीत नाहींत. किंवा त्यांचा प्रेमळपणा झाकूनहि ठेवीत नाहींत. त्यामुळें ते फारच प्रख्यातीस पावतात. ते उभयतां पुत्रयुक्त आणि कन्यायुक्त होऊन आणि सुवर्णाप्रमाणें अंगकांति राखून आपलें सर्व आयुष्य उत्तमरीतीनें उपभोगतात." अर्थातच यज्ञप्रकृतिक आर्यांच्या यज्ञकर्मांत पुरुषांच्या बरोबरीनें भाग घेणाऱ्या स्त्रिया गृहजीवनांतहि श्रेष्ठ मानल्या जात होत्या हें कांहीं सांगावयास नको. ऋग्वेदानें तर स्त्रियांसंबंधीं असे उद्गार काढले आहेत कीं, "जायेदस्तं" (ऋ. ३, ५३, ४) पत्नी म्हणजेच गृह होय, व याचेंच विशदीकरण करतांना "न गृहं गृहमित्याहुः गृहिणी गृहमुच्यते" नुसतें घर हें घर नसून गृहिणी हेंच खरें घर होय असें मनूनें म्हटलें आहे. बृहदारण्यकोपनिषदांत यासंबंधीं अतिशय उत्कृष्ट वर्णन आढळतें व त्याच वर्णनाचा अनुवाद नंतरच्या पुराणादि वाङ्मयांतून आलेला असून त्यावरून आर्यांची स्त्रीविषयींची श्रेष्ठ धारणा व्यक्त होते. स्त्रीजीवन व पुरुषजीवन या दोहोंच्या संयोगांतच खरें पूर्ण जीवन आहे हा वैदिक संस्कृतीचा सिद्धांत आहे. व या सिद्धांताचें जो कोणी बारकाईनें निरीक्षण करील त्याला हल्लींच्या जडवादी दृष्टिकोनांतून केवळ एक भोग्य वस्तु या नात्यानें स्त्रीकडे पाहण्याच्या ज्या विकृत दृष्टिकोनाचा प्रसर झालेला आहे व केवळ याच दृष्टिकोनांतून मासिकांच्या मुखपृष्ठापासून तो कथाकादंबऱ्या व चित्रपटांच्या जाहिरातीपर्यंत स्त्रीशरीराचें प्रदर्शन करण्यांत येऊन वर स्त्रीस्वातंत्र्याच्या व औदार्याच्या कल्पनांचा जो ढोंगी आविष्कार होत आहे त्याचा तिरस्कार वाटल्याविना राहणार नाहीं. बृहदारण्यकोपनिषदांत (१-४-३) म्हटलें आहे," स वै नैव रेमे तस्मात् एकाकी न रमते स द्वितीयमैच्छत् स हैतावानास यथा स्त्रीपुमांसौ

संपरिष्वक्तौ स इममेवात्मानं द्वेधा पातयत् ततः पतिश्च पत्नी चाभवताम् तस्मादिदं अर्धवृगलमिव स्व इति ह स्माह याज्ञवल्क्यः तस्मादयमाकाशः स्त्रिया पूर्यते एव तां समभवत् ततो मनुष्या अजायन्त" (परमेश्वर एकटाच स्वतःशीं रममाण होऊं शकला नाहीं. त्याला दोन व्हावें अथवा अनेक प्रकारें होऊन राहावें असें वाटलें. त्याप्रमाणेंच मनुष्यहि एकटाच रममाण होऊं शकत नाहीं. त्याला दुकटें व्हावेसें वाटल्यावर त्यानें आपले स्वतःचे दोन भाग केले. ते म्हणजेच पति व पत्नी होत. स्त्रीपुरुषांचें मीलन म्हणजेच पूर्ण जीवन होय. त्यांतील कोणतेंहि एक जीवन हें अपूर्ण जीवन होय. पुरुषाच्या जीवनांतील अपूर्ण भाग स्त्रीमुळेंच पूर्ण होतो. स्त्री हीच पुरुषजीवनांतील पोकळी भरून काढते. तिच्यापासूनच मनुष्यांची उत्पत्ति आहे.) बृहदारण्यकांतील याच सिद्धांताचा वाजसनेय ब्राह्मणांत पुढीलप्रमाणें आविष्कार केला आहे : "अर्धो ह वा एष आत्मनः तस्मात् यत् जायां न विन्दते नैतावत् प्रजायते असर्वो हि तावत् भवति अथ यदैवं जायां विन्दतेऽथ प्रजायते तर्हि सर्वो भवति" (स्त्री ही पुरुषाचें अर्ध होय. जोंपर्यंत जायेचा लाभ होत नाहीं; तोंपर्यंत जीवन अपूर्ण राहतें. ज्या वेळीं जायेचा लाभ होतो त्यावेळीं स्वतःच पति तिच्या ठिकाणीं उत्पन्न होत असल्यामुळें जीवनाच्या पूर्णतेचा त्याला लाभ होतो.) संस्कृतांतील जाया शब्दाची व्युत्पत्ति याच अर्थाची आहे. हा वेदवाङमयांत दिलेला सृष्टिक्रम अनुवादित करतांना भागवत पुराणानें असें सांगितलें आहे कीं, ब्रह्मदेव अथवा आद्य प्रजापति समाधींत निमग्न असतां त्याच्या शरीराचे दोन समान भाग झाले. त्यांतील एक पुरुषरूप विभाग म्हणजे मनु असून स्त्रीरूप विभाग म्हणजे शतरूपा होय. हेच मानवांचे आदिपूर्वज असून यांच्यापासूनच पुढें सर्व प्रजा उत्पन्न झाली.

कस्य रूपमभूद् द्वेधा यत्कायमभिचक्षते ।
ताभ्यां रूपविभागाभ्यां मिथुनं समपद्यत ।। ५२
यस्तु तत्र पुमान् सोऽभूत् मनुः स्वायंभुवः स्वराट् ।
स्त्री याऽऽसीत् शतरूपाख्या महिष्यस्य महात्मनः ।। ५३
तदा मिथुनधर्मेण प्रजा ह्येधां बभूविरे ।

—( श्रीमद्भागवत ३—१२ )

एका मराठी कवीनें या घटनेचें पुढीलप्रमाणें मनोरम वर्णन केलें आहे. — " समाधींत त्या जगत्पित्याची दुभंग झाली तनू । एक भाग तो शतरूपा हो दुजा जाहला मनू । " यावरून पूर्ण जीवनाच्या भारतीय कल्पनेंत स्त्रीचें स्थान केवढें श्रेष्ठ आहे व त्यांच्याकडे पाहण्याचा वैदिक दृष्टिकोन कोणत्या स्वरूपाचा आहे याची कल्पना येते. म्हणूनच यज्ञप्रकृतिक आर्यांनीं यज्ञक्रियेंत स्त्रियांना बरोबरीचें स्थान दिलें आहे. यज्ञक्रियेंत भाग घ्यावयाचा म्हणजे स्त्रियांना उपनयन संस्काराची आवश्यकता आलीच. व वेदकाळीं स्त्रियांचें उपनयन होत असे, इतकेंच नव्हे तर त्यानंतर अध्ययन व ब्रह्मचर्य व्रताचरण यांत त्यांचा कांहीं काळ जात असे ही गोष्ट अथर्ववेदांतील " ब्रह्मचर्येण कन्या युवानं विन्दते पतिं" ब्रह्मचर्यव्रतामुळें कन्येला अनुरूप वराची प्राप्ति होते यासारख्या उल्लेखावरून दिसतें. अर्थातच सर्वच स्त्रिया पुरुषाइतकें दीर्घ काळ तें पाळीत असें समजण्याचें कारण नाहीं. प्रत्येक वस्तूची श्रेष्ठता तिच्या क्षेत्रांतील तिच्या उपयुक्ततेवरून ठरते. जीवनाच्या व्यवहारांत स्त्रीचें जें विशिष्ट कर्तव्यक्षेत्र आहे तदनुरूपच सृष्टिकर्त्यानें तिला शरीर व स्वभावविशेष दिले आहेत हें ओळखून तिच्या जीवनाचा परिपोष होईल व ती आपल्या कर्तव्यक्षेत्रांत प्रभावीपणानें तळपून उठेल अशीच शिक्षणाची व संस्कारांची मांडणी असणें आवश्यक आहे. वैदिक राष्ट्राच्या प्रणेत्यांनीं ही गोष्ट ओळखूनच स्त्रीजीवनाची उभारणी केलेली आहे. व स्त्रीचें स्त्रीत्व मारून तिला पुरुषी बनविणें सर्व तऱ्हेनें विघातक आहे, हें अलीकडच्या जपानसारख्या पौरस्त्य राष्ट्रांना यापूर्वींच पटलेलें असून पाश्चात्य

विचारवंतहि आतां याच वळणावर येत आहेत. तरीपण विशिष्ट मनोरचनेच्या कांहीं स्त्रिया स्वतःला केवळ विद्योपासनेला वाहून घेत असल्या तर वैदिक राष्ट्रांत त्यांना त्या बाबतींत बंदी नव्हती. असें घोषा, लोपामुद्रा इत्यादि स्त्रियांचा वेदमंत्राच्या द्रष्टयांत जो अंतर्भाव झालेला आहे त्यावरून स्पष्ट दिसतें. पुढें स्मृतिकाळीं कांहीं कारणांनीं स्त्रियांचें उपनयन बंद झालें व यज्ञकर्मांतील त्यांचा भाग केवळ औपचारिक ठरला. केवळ पतीच्या हाताला हात लावला कीं काम झालें हें त्या यज्ञाधिकाराला जें स्वरूप आलें त्याचीं कारणें कांहींहि असलीं तरी तें वेदकाळांत नव्हतें असें स्पष्ट दिसतें. दैनंदिन जीवनांत आवश्यक असलेल्या वैदिक मंत्रांचें ज्ञान व दैनंदिन जीवनांतील विहित वैदिक विधि करण्याची पात्रता वैदिक स्त्रियांत होती. गृह्याग्नि अथवा स्मार्ताग्नींतील रात्रीचा होम पत्नीनेंच करावयाचा असे. व इच्छा असली तर प्रातर्होमहि तिला करतां येई असें गृह्यसूत्रांवरून दिसतें. गोभिल गृह्यसूत्रांत असें म्हटलें आहे कीं "कामं गृह्ये अग्नौ पत्नीः जुहुयात् प्रातर्होमौ" ( गोभिल गृह्यसूत्र १ , ३ ) " रात्रीं होम तर पत्नीनें करावाच पण इच्छा असल्यास प्रातर्होमहि तिनें करावा. सुगीच्या वेळीं करावयाचा 'सीतायज्ञ' तर बायकांनींच करावा अशी रूढि असे. इतिहासवाङ्मयांतहि स्त्रिया अग्निकार्य इत्यादि करीत. त्या मंत्रवेत्त्या होत्या असें सिद्ध करणारे पुष्कळ उल्लेख आढळतात. मर्यादापुरुषोत्तम श्रीरामचंद्र हे वनवासास जावयास निघाले असतां माता कौसल्येचा निरोप घेण्यासाठीं तिच्या महालांत आले. त्या वेळीं कौसल्येचें वर्णन करतांना महर्षि वाल्मीकि लिहितात, –

सा क्षौमवसना हृष्टा नित्यं व्रतपरायणा ।
अग्निं जुहोति स्म तदा मंत्रवित् कृतमंगला ।। १५

– ( वाल्मीकि रामायण अयोध्या कांड अ. २० )

कौसल्येनें रेशमी वस्त्र परिधान केलें होतें. रामचंद्राला राज्याभिषेक होणार म्हणून तिच्या चेहऱ्यावर समाधान विलसत होतें.

नेहमीच व्रतपरायण असणारी व स्वतः मंत्रवेत्ती असणारी कौसल्या त्यावेळीं मंगल करून होम करीत बसली होती. स्त्रिया संध्योपासना करीत असत असेंहि रामायणावरून दिसतें. पुष्कळ शोध करूनहि श्रीमारुतींना जेव्हां लंकेंत सीता आढळली नाहीं, तेव्हां तेथील एका नदीवर येऊन त्यांनीं तेथेंच तिची संध्याकाळपर्यंत वाट पहावयाचें ठरविलें. त्यांची अशी खात्री होती कीं, संध्याकाळीं संध्यावंदनासाठीं जानकी या नदीतीरावर आल्याविना निश्चित राहणार नाहीं. मारुती म्हणतात,

संध्याकालमनाः श्यामा ध्रुवमेष्यति जानकी ।
नदीं चेमां शुभजलां संध्यार्थं वरवर्णिनी ।। ४८

( वाल्मीकि रामायण सुंदरकांड अ. १५ )

(ती वरवर्णिनी लावण्यमयी जानकी संध्याकाळ झाली आहे असें पाहून या नदीवर संध्योपासनेसाठीं आल्याविना निश्चितपणें राहणार नाहीं.) अर्थातच स्त्रियांचें उपनयन होत असलें पाहिजे हें यावरून उघडच होतें. हारीतानें तर सद्योद्वाहा व ब्रह्मवादिनी असे स्त्रियांचे दोन वर्ग करून कांहीं मुली उपनयनानंतर थोड्याच काळांत विवाह करीत, तर कांहीं मात्र तसें न करतां वेदाध्ययनादि अध्ययनांत काळ घालवीत असें म्हटलें आहे. ज्या लवकर लग्न करीत त्यांना सद्योद्वाहा असें म्हणत. व ज्या अध्ययनांत काळ घालवीत त्यांना ब्रह्मवादिनी असें म्हणत. या ब्रह्मवादिनींच्या कर्तव्याचें वर्णन करतांना हारीतानें म्हटलें आहे : "तत्र ब्रह्मवादिनीनां अग्नींधनं वेदाध्ययनं स्वगृहे च भैक्ष्यचर्या" ब्रह्मवादिनी स्त्रियांना अग्नीमध्यें हवन करणें, वेदांचें अध्ययन व भैक्ष्यचर्या हे तिन्हीहि ब्रह्मचर्याचे नियम लागू होते. फक्त त्यांनीं ही भिक्षा बाहेर कोठें मागावयाची नसून आपल्या घरींच कुटुंबीयांजवळ ती मागावयाची असे. अशा तऱ्हेनें विवाह न करतां चिरकाल ब्रह्मचर्य पाळून राहणाऱ्या स्त्रियांकडे तत्कालीन समाज आजच्याप्रमाणें अथवा मधल्या काळांतल्याप्रमाणें उपहासानें व वाईट दृष्टीनें पहात असे असेंहि दिसत नाहीं. किंबहुना आपल्या मुली चांगल्या पंडित निघाव्या, व त्या

ब्रह्मवादिनी असाव्या म्हणून तीळ व तांदूळ एकत्र शिजवून त्यांचा होम करून आईबाप त्यासाठीं परमेश्वराची आराधना करीत असें प्रत्यक्ष वेदवाङ्मयांतच म्हटलें आहे. बृहदारण्यकोपनिषदांत या विधीचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे :– "अथ य इच्छेद् दुहिता मे पंडिता जायेत सर्वमायुरियादिति तिलौदनं पाचयित्वा सर्पिष्मंतं अश्नीयातां ईश्वरौ जनयितवै" ( बृह. ६-४-१७ ) वेदकाळीं व त्यानंतरच्याहि काळांत अशा महान् वेदविद्या-व्रतस्नात ब्रह्मवादिनी समाजांत मान्यता पावलेल्या दिसून येतात. राजा जनकाकडे योगविद्येंत निष्णात असणारी अशी एक ब्रह्मवादिनी आल्याचें प्रसिद्ध आहे. श्रीयाज्ञवल्क्यांची पत्नी मैत्रेयी ही विवाहित असूनहि केवढ्या आध्यात्मिक योग्यतेची ब्रह्मवादिनी होती हें याज्ञवल्यांशीं तिच्या झालेल्या बृहदारण्यकोपनिषदांतील संवादावरून चांगलेंच स्पष्ट होतें. राजा जनकाच्या सभेंत असलेल्या ब्रह्मवादी लोकांत वाचक्नवी गार्गी या विदुषीला महत्त्व-पूर्ण स्थान होतें व याज्ञवल्क्य ब्रह्मवेत्ता आहे कीं नाहीं याची खरी कसून परीक्षा तिनेंच घेतली असें बृहदारण्यकोपनिषदांतील यासंबंधींच्या संवादावरून स्पष्टपणें दिसून येतें. पतंजलींच्या महा-भाष्यांत उपाध्यायिनी व उपाध्याया असे दोन शब्द आले आहेत. यांपैकीं उपाध्यायिनी हा शब्द उपाध्याय म्हणजे जो शिकविणारा आचार्य असेल त्याच्या पत्नीला लावावा व उपाध्याया हा शब्द जी स्वतः अध्यापनाचें कार्य करते तिला लावावा असें सांगितलें आहे. यावरून मध्ययुगीन काळांतल्याप्रमाणें स्त्रियांचें शिक्षण बंद नसून वैदिक राष्ट्रांतील स्त्रिया अध्यापन करण्याइतक्या विद्या-पारंगत होत्या असें स्पष्ट दिसतें. भवभूतीच्या उत्तररामचरितांत अध्ययनासाठीं स्थानांतर करीत असलेल्या एका विद्यार्थिनीचा उल्लेख प्रसिद्धच आहे. पुढें स्त्रियांचा हा अधिकार गेला. बादरायण, जैमिनि इत्यादि आचार्य तो हक्क असावा अशा मताचे असूनहि समाजस्थितींतील परिवर्तनांत तो राहूं शकला नाहीं व नंतर तर सोईस्कर रीतीनें ती एक पुराकल्पांतील गोष्ट होती असें कांहीं

स्मृतिकार उल्लेखूं लागले. पण पुराकल्पाच्या गोष्टी म्हणून कां होईना, या स्मृतिकारांनीं जो उल्लेख केला आहे त्यावरून जुनी वस्तुस्थिति काय होती याचा इतिहास उलगडूं शकतो. यमस्मृतींत म्हटलें आहे :—

पुराकल्पे तु नारीणां मौंजीबंधनमिष्यते ।
अध्यापनं च वेदानां सावित्रीवचनं तथा ।।
पिता पितृव्यो भ्राता वा नैनामध्यापयेत् परः ।
स्वगृहे चैव कन्यायाः भैक्ष्यचर्या विधीयते ।।

"पूर्वीच्या कल्पांमध्यें स्त्रियांचा मौंजीबंधन संस्कार होत असे. त्यांना वेदविद्या शिकवण्यांत येत होती. व गायत्रीमंत्रहि त्यांना शिकवण्यांत येत असे. मात्र यासंबंधांत असा नियम होता कीं, पिता, चुलता अथवा वडील भाऊ यांनींच त्यांना विद्या शिकवाव्या. इतर कोणींहि शिकवूं नये. तसेंच त्यांचें भिक्षाचरण घराच्या मर्यादेंतच होत होतें." अध्ययनांतून उत्पन्न होणारे सावळे गोंधळ टाळण्यासाठीं प्राचीन लोक कशी दक्षता घेत व अध्ययनाचें कार्यहि कसें चालू ठेवीत हें यावरून स्पष्ट होतें. मध्ययुगीन काळांत स्त्रियांचें हें जें उपनयन व वेदाध्ययन बंद पडलें व त्यांना शूद्राप्रमाणेंच वेदाधिकार नाहीं असें जें ठरविण्यांत आलें त्याचीं कारणें इतिहाससंशोधक अनेकप्रकारचीं सांगत असतात. वास्तविक जैमिनि बादरायणासारख्या थोर धर्मवेत्त्यांनीं स्त्रियांचे हे अधिकार काढून घेऊं नयेत असें आपलें मत व्यक्त केलें असतांना देखील तत्कालीन लोकसमाजाला व लोकनेत्यांना ते अधिकार काढून घेणेंच इष्ट वाटलें. असें कां व्हावें? इतिहाससंशोधक याच्या भिन्नभिन्न उपपत्ति सांगतात. अलीकडच्या कांहीं पाश्चात्य पद्धतीच्या स्त्रियांच्या कैवाऱ्यांचें असें म्हणणें आहे कीं, पुरुष जातीनें स्त्रियांवर ही गुलामगिरी लादण्यासाठीं त्यांना वेदाध्ययनापासून वंचित ठेवण्याचा कट केला. पण या बिनबुडी व प्रचारकी विधानाचा आपणांस येथें विचार करावयाचा नाहीं. इतर कांहीं लोकांचें असें म्हणणें आहे कीं, शक, पार्थियन, कुशान इत्यादि रानटी राज्य-

कर्त्यांचें भारतावर वर्चस्व लादलें गेलें व या राज्यकर्त्यांच्या रानटी चालीरीतींचा समाजांत शिरकाव होऊन त्यांच्यामुळें समाजाचा स्त्रीविषयक दृष्टिकोन बदलला. पण मला या बाबतींत बनारसच्या हिंदु विश्वविद्यालयांतील प्राध्यापक डॉ. अनंत सदाशिव अळतेकर यांचा दृष्टिकोन अधिक बरोबर वाटतो. ते म्हणतात. "हीं रानटी राजकुळें इ. स. पूर्व १०० च्या सुमारास उदयास आलीं व त्यांचें अधिकारक्षेत्र पंजाबच्या बाहेर फारसें दीर्घकालपर्यंत नव्हतें. स्त्रिया ह्या शूद्रासम आहेत हें मत पतंजलीच्या पूर्वींच म्हणजे इ. स. पूर्व तिसऱ्या शतकापूर्वींच समाजांत रूढ होऊं लागलें होतें. स्त्रियांच्या अवनतीचें खरें कारण आर्येतर स्त्रियांशीं विवाह करण्याची पद्धत होय, असें प्रस्तुत लेखकास वाटतें. वेदकालीं त्रैवर्णिकामध्यें परस्परविवाह होत. पण आर्यांचे दासांशीं, शूद्रांशीं किंवा अनार्यांशीं विवाह झाल्याचे दाखले फारसे सांपडत नाहींत. पुढें अनार्य स्त्रियांशीं विवाह करण्याची प्रथा समाजांत पडूं लागली. भीम-अर्जुनादिकांचीं हिडिंबा उडुपी इत्यादिकांशीं झालेलीं लग्नें याच प्रकारचीं होत. प्रथमप्रथम या चालीस कोणी फारसा विरोध केला नाहीं. पण तिचे दुष्परिणाम जसे दिसूं लागले तसे आर्यांनीं आपआपसांत वाटल्यास अनुलोम लग्नें करावींत; पण अनार्य किंवा शूद्र स्त्रियांशीं विवाह कधींच करूं नयेत असें धर्मशास्त्रकार प्रतिपादूं लागले. कांहीं लोक हा निषेध मानीत तर कांहीं मानीत नसत. उलट तो धाब्यावर बसवीत. अनार्य बायका आर्यगृहांत आल्यानें आर्यस्त्रियांचा दर्जाहि कमी होऊं लागला. अनार्य स्त्रियांना संस्कृत येत नसे. आलें तर फारच थोडें येई. त्यामुळें त्यांना यज्ञाधिकार किंवा वेदाधिकार देणें शक्य नव्हतें. पुष्कळदां अनार्य स्त्रियाच आपल्या पतीच्या लाडक्या असत. त्यामुळें आर्य स्त्रियांना बाजूस सारून अनार्य स्त्रियांस त्यांचे पति धर्मकार्यांतहि सहभागी करीत असावे. त्यामुळें बराच बखेडा व अनाचार वाढूं लागला. हा अनाचार टाळावा म्हणून 'ऐतिशायन' कंपूनें स्त्रियांचा वेदाधिकार काढून घेण्याचें योजिलें. जैमिनि, बादरायण वगैरेंनीं त्या कंपूस कसून विरोध केला.

पण त्यांना यश आलें नाहीं. स्त्रियांचे विवाह या वेळीं तेराव्या अथवा चौदाव्या वर्षींच होत होते. त्यामुळें उपनयनानंतर फारसें वेदाध्ययन न होतांच लवकरच लग्नें होत. उपनयन हा त्यामुळें एक निरर्थक संस्कार बनत चालला होता. तो ठेवून तरी काय उपयोग असें समाजास वाटूं लागलें व त्यामुळें स्त्रियांचें उपनयन करूं नये, त्यांना वेद शिकवूं नयेत वगैरे मतें समाजांत दिवसेंदिवस जास्त लोकप्रिय होऊं लागलीं. क्रमशःच ही रूढि पडली. मनु स्त्रियांचें उपनयन करावें पण ते वेदमंत्र न म्हणतां करावें असें म्हणतो. उपनयन म्हणजे एक शारीरिक संस्कार असें ते मानीत. त्यामुळें स्त्रियांना वेदाधिकार नसला तरी त्यांचें उपनयन करण्यास हरकत नाहीं असें मनूचें मत झालें असावें. वेदाध्ययन होत नसल्यामुळें स्त्रियांचें उपनयन म्हणजे एक फार्सच बनलें होतें. तेव्हां तें बंद केलेलेंच बरें असें तिसऱ्या चौथ्या शतकांतील समाजधुरीणांस वाटूं लागलें. त्यामुळें याज्ञवल्क्य स्मृतींत स्त्रियांचें वेदमंत्रहीन उपनयन देखील करूं नये असें मत डोकावूं लागले. या कालखंडांतील यमासारख्या कांहीं स्मृतिकारांना पूर्वीं स्त्रियांचें उपनयन होत असे हें माहीत होतें. पण ती चाल हल्लीच्या काळास सोईस्कर किंवा अनुरूप नाहीं असें त्यांनीं आपलें मत नमूद करून ठेवलें आहे. स्वतः मनूचेंहि मत स्त्रियांचें उपनयन व्हावें असें नव्हतें हें सिद्ध करण्याचा मनुस्मृतीचा आठव्या शतकांतील टीकाकार मेधातिथि यानें बराच अट्टाहास केला आहे...." पुढच्या काळांत हें कांहीं झालें असलें तरी वेदकाळांत स्त्रियांचें उपनयन होत होतें व सर्व दृष्टींनीं त्यांना विद्यामंदिरांत प्रवेश करतां येत असे हें उघडच दिसतें.

वर दाखविल्याप्रमाणें कांहीं स्त्रिया जरी तपस्या व अध्ययनांत सारा जन्म घालवीत असल्या तरी बहुतेक स्त्रिया गृहजीवनांत प्रवेश करून गृहिणीपदावर अधिष्ठित होत. स्त्री हा भारतीय गृहजीवनाचा पाया आहे म्हणून तिचें महत्त्व या दृष्टीनें ऋग्वेदांतहि गाइलेलें आढळतें. कॉमरेड डांगेसारख्या लेखकांनीं वैदिक

राष्ट्रांत विवाहसंस्था नसल्याचें सिद्ध करण्याचा जो प्रयत्न केला तो कसा चुकीचा आहे हें मागें दाखविलेंच असून वेदांतून सिद्ध कुटुंबसंस्थेचें व परिणत विवाहसंस्थेचें स्वरूप कसें दृष्टीस पडतें हें थोडक्यांत दाखविलें आहे. ऋग्वेदकाळ सर्वांत जुना म्हणून मानावयाचाच असला तर त्याच्यांतील विवाहविषयक उल्लेख वैदिक राष्ट्रांतील विवाहसंस्था कशी परिणत होती व इतिहासाच्या कालखंडांतील भारतीय संस्कृतीच्या सुवर्णयुगांत ती ज्या अवस्थेंत होती त्याच अवस्थेंत ती ऋग्वेदकाळींही होती असें दाखवितां येतें. पतिपत्नीसंबंध हा वैदिक काळीं संस्कार मानण्यांत येत असे. करार व इहलौकिक जीवनापुरती व्यावहारिक सोय या दृष्टीनें विवाहाकडे पाहण्याइतकें हिंदू मन वैदिक काळींहि हीन नव्हतें. दोन जीवांच्या अनंत जन्मींच्या संस्कारित सहजीवनाची विचारप्रणालि वैदिक विवाहाच्या मुळाशीं असून पाणिग्रहण संस्कारानें जे दोन जीव एकत्र आले तेच पतिपत्नी मानले जात. सख्य हें स्त्रीजीवनाचें ध्येय नसून मातृत्वाच्या कामगंधहीन आविष्कारानें साऱ्या संसाराला वात्सल्यरसानें न्हाऊन टाकणें हें स्त्रीजीवनाचें उदात्त ध्येय होतें. सुमंगल जीवन व गार्हपत्याची आराधना हे विवाहाचे हेतु होते. पाणिग्रहण संस्कार ही एक प्रकारें संस्कारदीक्षा होती. पत्नीचें पाणिग्रहण करतांना पतीच्या तोंडीं ऋग्वेदानें जीं वाक्यें घातलेलीं आहेत तीं पाहिलीं म्हणजे गृहजीवन, सौमंगल्य व दांपत्यजीवनाच्या वैदिकांच्या आकांक्षा अत्यंत उत्कृष्ट रीतीनें व्यक्त होतात. उदाहरणार्थ, ऋग्वेदांतील कांहीं मंत्रच पहा :—

गृभ्णामि ते सौभगऽत्वाय हस्तं मया पत्या जरत्ऽअष्टिः यथा असः।
भगः अर्यमा सविता पुरंऽधिः मह्यं त्वा अदुः गार्हऽपत्याय देवाः॥
(ऋ. १०, ८५, ३६)

"हा तुझा हात मी तुझ्या सौभाग्याकरतां आपल्या हातीं धरतों तर मी जो तुझा पति त्याच्यासह तूं वृद्ध हो. पहा कीं, भाग्याधिपति, अर्यमा, सविता, पुरंधी ह्या सर्व दिव्य विबुधांनीं मी गृहस्थधर्म आचरावा म्हणून तुला माझ्या हातीं दिलें आहे."

इह प्रियं प्रऽजया ते सं ऋध्यतां अस्मिन्गृहे गार्हऽपत्याय जागृहि ।
एना पत्या तन्वं सं सृजस्व अपजिव्री (इति) विदथं आवदाथः ॥२७
नीलऽलोहितं भवति कृत्या आसक्तिः वि अज्यते ।
एधन्ते अस्याः ज्ञातयः पतिः बंधेषु बध्यते ॥२८
परा देहि शामुल्यं ब्रह्मऽभ्यः वि भज वसु ।
कृत्या एषा पत्ऽवती भूत्वी आ जाया विशते पतिम् ॥२९
अश्रीरा तनूः भवति रुशती पापया अमुया ।
पतिः यत् वध्वः वाससा स्वं अंगं अभिऽधित्सते ॥३०

—(ऋग्वेद दशममंडल सूक्त ८५)

"येथें तुला जें आवडत असेल त्याची तुझ्या मुलाबाळांच्या योगानें अभिवृद्धि होवो. आणि गृहस्थधर्म उत्तम रीतीनें पाळला जावा म्हणून तूं या घरांत दक्ष रहा. या पतीबरोबर तूं एकरूप हो आणि वृद्ध होऊन इतर मंडळींना असाच उपदेश करीत जा. (२७) कैदाशीण किंवा हडळ म्हणतात, तिचा वर्ण निळा तांबडा असतो. जिची लसलस स्पष्ट दिसते तीच कैदाशीण. तिची जात हां हां म्हणतां वाढते. पण तिचा जो पति होतो तो मात्र संसाराच्या फाशांत सांपडतो. (२८) म्हणून तूं गरिबांना वस्त्र देत जा. आणि विद्वानांना श्रोत्रियांना द्रव्य देत जा. नाहींतर हाव हीच जी हडळ तिला पाय फुटून तीच पत्नी होऊन तुझ्या पतीच्या बोकांडीं बसेल. (२९) पति जेव्हा लोभीपणानें स्त्रीच्या वस्त्रानें अर्थात् तिच्या पैशानें आपलें शरीर झाकतो तेव्हां अशाच तीव्र पापबुद्धीमुळें त्याचें शरीर निस्तेज होतें. (३०)"

सोमः प्रथमः विविदे गंधर्वः विविदे उत्ऽतरः ।
तृतीयः अग्निः ते पतिः तुरीयः ते मनुष्यऽजाः ॥ ४०
सोमः ददत् गंधर्वाय गंधर्वः ददत् अग्नये ।
रयिं च पुत्रान् च अदात् अग्निः मह्यं अथो (इति) इमाम् ॥ ४१
इह एव स्तम् मा वि यौष्टं विश्वं आयुः वि अश्नुतम् ।
क्रीळन्तौ पुत्रैः नप्तृभिःऽमोदमानौ स्वे गृहे ॥ (४२)

आ नः प्रऽजां जनयतु प्रजाऽपतिः आऽजरसाय सं अनक्तु अर्यमा ।
अदुःऽमंगलीः पतिऽलोकं आ विश शं नः भव द्विऽपदे शं चतुःऽपदे ।। ४३
अघोरऽचक्षुः अपतिऽघ्नी एधि शिवा पशुऽभ्यः सुऽमनाः सुऽवर्चाः ।
वीरऽसूः देवऽकामा स्योना शं नः भव द्विऽपदे शं चतुःऽपदे ।। ४४
इमां त्वं इंद्र मीढ्वः सुऽपुत्रां सुऽभगां कृणु ।
दश अस्यां पुत्रान् आ धेहि पतिं एकादशं कृधि ।। ४५
संऽराज्ञी श्वशुरे भव संऽराज्ञी श्वश्र्वां भव ।
ननांदरि संऽराज्ञी भव संऽराज्ञी अधिदेवृषु ।। ४६
सं अंजन्तु विश्वेदेवाः सं आपः हृदयानि नौ ।
सं मातारिश्वा सं धाता सं ऊं( इति ) देष्ट्रि दधातु नौ ।। ( ४७ )
—( ऋग्वेद १०-८५ )

" प्रथम सोमानें हिचें पालन केलें. त्यानंतर गंधर्वानें पालन केलें. नंतर तिसऱ्यानें तुझें पालन अग्नीनें केलें. आतां चौथ्यानें तुझा जो मानवी पति तो करील. ( ४० ) म्हणूनच सोमानें गंधर्वाकडे हिला दिली. गंधर्वानें अग्नीकडे दिली. आणि अग्नीनें हिला माझ्या हातीं देऊन वैभव आणि पुत्रहि दिले. ( ४१ ) तर आतां तुम्हीं येथेंच रहा. परस्परांपासून वियुक्त होऊं नका. संपूर्ण आयुष्याचा लाभ घ्या. आणि पुत्रपौत्रांसह आनंदानें हसत खेळत आपल्या घरांत नांदा. ( ४२ ) संततीचा दाता जो ईश्वर तो आम्हांकडून संतति उत्पन्न करो. तो आर्यजनांना प्रेमळ असा आर्यमा आम्हांला अगदीं वार्धक्य येईपर्यंत धटधाकट ठेवो. सर्वांना कल्याणप्रदच होणारी तूं आतां पतीच्या मंदिरांत गमन कर. आणि आम्हां मनुष्यांना मंगलदायक व पशूंनाहि मंगलदायक हो. ( ४३ ) तुझी दृष्टि मंगलकारक असो व आपल्या पतीला आयुष्यभर जिवंत राखणारी पवित्र मनाची आणि तेजस्विनी अशी होऊन पशूवर देखील माया करणारी हो. तूं ईश्वरभक्त हो. तुझ्या पोटीं शूर वीर पुत्र जन्मास येवोत. आणि कल्याणरूपा अशी तूं आमच्या मनुष्यांना आणि पशूंनाहि मंगलदायक हो. ( ४४ ) हे ईश्वरा इंद्रा, हे कामनावर्षका, हिला तूं उत्तम पुत्रवती आणि सौभाग्यवती

कर. हिला दहा पुत्र होऊं दे. म्हणजे हिचा पति हाच त्यानंतर अकरावा शोभेल असें कर. ( ४५ ) तूं घरची राणी आहेस असें सासऱ्याला वाटूं दे. तूं घरची मालकीण आहेस असें सासूला वाटूं दे. आणि दिरांनाहि तूं घरांतील मुख्य कारभारीण आहेस असें वाटेल अशा पद्धतीनें वाग. ( ४६ ) सकल दिव्यविबुध आम्हांला उत्कृष्ट स्थितीमध्यें ठेवोत. आपोदेवी आमचीं अंतःकरणें एकत्र करो. विश्वजीवन वायु आणि सृष्टिनिर्माता ईश्वर हा आम्हांला सुव्यवस्थित ठेवो. आणि फलदायी भाग्यदेवता देखील आमचा वास नेहमी एकत्र होईल असें करो. ( ४७ )

दांपत्यजीवनांतील आकांक्षांचे व वैदिक आर्यांना गृहिणीपासून काय अपेक्षित होतें या गोष्टीचें अत्यंत उत्कृष्ट चित्रण वरील उद्गारां-तून आढळून येतें. घरांत नवीन येणाऱ्या गृहिणीनें सासू, सासरे, नणंदा व दीर यांच्या मनांत आपल्याविषयीं स्वतःच्या प्रेमळ व सर्वसंग्राहक वागणुकीनें कोणतें श्रेष्ठ स्थान निर्माण करावें हें स्पष्ट सांगणाऱ्या ऋग्वेदीय लोकांना दांपत्यजीवन व गृहसंस्था यांची माहिती नव्हती असें सांगणारे लोक एकतर मूर्ख तरी आहेत किंवा धूर्त तरी आहेत असेंच म्हटलें पाहिजे. वैदिक राष्ट्रां-तील लोकांना गार्हपत्यासाठीं विवाह हवा होता. पुत्रपौत्रांनीं नांदतें घर व जीवनाच्या अंतिम क्षणापर्यंत प्रेमळ सहजीवन त्यांना हवें होतें. यमयमी सूक्तांतील विशुरूपा व ‘ पापमाहुः यः स्वसारं निगच्छात् ” यासारख्या उल्लेखांवरून कोणामध्यें विवाह व्हावा यासंबंधांत सगोत्रासारखे कांहीं नियम त्यांच्यांत असलेच पाहिजेत हें स्पष्टच होतें. एकमेकांविषयींच्या एकनिष्ठेवांचून खरें सुखी जीवन असूं शकत नाहीं. परस्परांतील द्वैत समूळ नष्ट करून एकात्म प्रेम उत्पन्न करण्याबरोबरच इंद्रियनिग्रह व कर्तव्य-निष्ठा, दक्षता आणि स्वार्थत्याग याहि गोष्टींची कुटुंबसंस्थेस आवश्यकता आहे याची त्यांना पूर्ण जाणीव होती. लग्न म्हणजे केवळ राजाराणींचा संसार ही संकुचित भावना त्यांच्या ठिकाणीं नसून नव्या येणाऱ्या गृहिणीनें कुटुंबसंस्थेंतील सासूसासरा, दीर,

नणंद, नोकरचाकर, अतिथि अभ्यागत इतकेंच नव्हे तर घरचे पशू ह्यांच्या हृदयांतसुद्धां आपल्याविषयीं उत्कट प्रेमाचें व श्रद्धेचें स्थान निर्माण केलें पाहिजे अशी आकांक्षा त्यांनीं व्यक्त केलेली आहे. जेथें कामसंतृप्ति आहे पण स्वैराचार नाहीं असें ऋग्वेदांतील कामप्रवृत्तीचें चित्रण आढळतें. औरस संततीची त्यांना इच्छा आहे. वंशवेल विस्तरावी म्हणून मातृत्वाच्या पदवीनें गृहिणी-जीवन सफल होतें हेंहि त्यांनीं व्यक्त केलें आहे. पण सर्वांत श्रेष्ठ अशी जी भावना त्यांनीं 'पतिमेकादशं कृधि' या शब्दांतून व्यक्त केली आहे, तिला जगाच्या स्त्रीविषयक वाङमयांत तोड नाहीं. या शब्दांनीं त्यांनीं गृहस्थाश्रमाच्या किल्ल्यांत राहून विषय-निवृत्ति आणि इंद्रियजय कसा मिळवितां येतो हें भारतीय संस्कृतीचें तत्त्व स्पष्टपणें उल्लेखिलें आहे. पतिपत्नींचें सहजीवन कधींहि न संपो अशी इच्छा व्यक्त करीत असतांनाच दंपतिजीवनाची परिणति शेवटीं कामगंधहीनतेंत होऊन स्त्रीनें आपल्या वात्सल्याच्या शुद्ध पखरणीखालीं पतीलाहि घ्यावें व विश्वाकडे तिची पाहण्याची दृष्टि हीच वात्सल्यमय असावी अशा रीतीनें ऋग्वेदानें स्त्रीविषयक श्रेष्ठ धारणा व्यक्त केली आहे. वैदिक लोकांना एकनिष्ठेची किती विलक्षण चाड आहे हें ऋग्वेदकालीन पिता आपल्या कन्येच्या विवाहाच्या वेळीं जें म्हणत असे त्यावरून व्यक्त होण्यासारखें आहे. तो म्हणतो:—

"प्र इतः मुञ्चामि न अमुतः सुबद्धां अमुतः करम् । यथा इयं इंद्र मीढ्वः सुऽपुत्रा सुऽभगा असति" (ऋ. १०,८५,२५)

(ह्या ठिकाणापासून म्हणजे ह्या पितृगृहापासून मी तुझी मुक्तता करतों. परंतु त्या दुसऱ्या ठिकाणांतून मात्र तुला सोडीत नाहीं. पतिगृहाशीं मी तुला बळकट बांधून ठेवतों. आणि हे इंद्रा, पर-मेश्वरा, हे मनोरथकर्षका, ही वधू सुपुत्रवती आणि सौभाग्यवती होईल असें कर.) पाणिग्रहण संस्कारपूर्वक गृहिणीच्या जीवनांत प्रवेश करणारी वधू या दिव्यत्वाच्या आकांक्षेनें त्या नवजीवनांत पदन्यास करीत असल्यामुळेंच वैदिक राष्ट्रांतील ऋषि आपल्या

मित्रांना बोलावून तिला आशीर्वाद देतांना म्हणतात : "सुमंगलीरियं वधूः इमां समेत पश्यत। सौभाग्यं अस्यै दत्वाय अथ अस्तं वि परा इतन"। (ऋ, १०-८५-३३) "ही वधू उत्तम दैवाची आहे. या. जवळ या. हिला पहा. आणि ही सौभाग्यवती होवो असा आशीर्वाद देऊन मग आपापाल्या घरीं परत जा."

ऋग्वेदांतील व एकंदरच वैदिक वाङमयांतील संकेत पाहिला तर विवाह हा धर्म, प्रजा आणि रति यांसाठीं त्यांना हवा आहे. त्यांना संतति हवी आहे खरी, पण ती असामान्य कर्तृत्व दाखविणारी व देवत्वाच्या मार्गाचें अनुगमन करणारी (देवानां एति पाथ:) अशी हवी आहे. आपल्या संततीकडे पाहतांना ते अग्नीला म्हणतात : "प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्याम्" (ऋ.५-४-१०) "प्रजेच्या द्वारें आम्ही अमर होऊं असें कर." वैदिक गृहिणीनें अथर्ववेदांतून आपली आकांक्षा पुढीलप्रमाणें व्यक्त केली आहे.

मम पुत्राः शत्रुहणोऽथो मे दुहिता विराट्।
उताहमस्मि संजया पत्यौ मे श्लोक उत्तमः॥

(माझीं मुलें शत्रूचा निःपात करणारीं व तेजस्वी होवोत. माझी मुलगी अतिशय तेजस्वी असावी. मी विजयशाली व्हावें. व पतीची कीर्ति सर्वत्र पसरावी.) वैदिक राष्ट्रांतील स्त्री अशा आकांक्षेची असूनहि ती पुरुषी होती असें दिसत नाहीं. स्त्रीस्वभावसुलभ शालीनता तिच्या प्रत्येक गोष्टींत दिसून येत असे असें ऐतरेय ब्राह्मणांतील "स्नुषा श्वशुरा लज्जमाना निलीयमाना एति" श्वशुरासमोरून सून आपलें अंगप्रत्यंग झाकून लाजत शालीनतेनें जात आहे यासारख्या उद्‌गारावरून स्पष्ट होतें. स्त्री म्हटली कीं, तिच्यांतून सर्वांना मातृत्वाचा साक्षात्कार झाला पाहिजे ही वैदिक राष्ट्राची स्त्रीविषयक श्रेष्ठ धारणा आहे. अथर्ववेदानें मंगलमय स्त्रीजीवनाचें स्वरूप सांगतांना म्हटलें आहे कीं "शिवा भव पुरुषेभ्यो गोभ्यो अश्वभ्यः शिवा। शिवास्मै सर्वस्मै क्षेत्राय शिवा न इहैधि।" (पुरुषांना, गाईंना, अश्वांना, जमिनीला, व यच्चयावत् सर्वांनाच तूं मंगलमय होऊन आम्हांला मांगल्य प्राप्त करून दे.)

अशा स्त्रीजीवनानें सारा संसार "अवघाचि सुखाचा" होईल यांत काय नवल? उत्कृष्ट कुटंब कसें असतें याचें चित्र रेखाटतांना अथर्ववेद म्हणतो:-

सहृदयं सांमनस्यं अविद्वेषं कृणोमि वः ।
अन्यो अन्यं अभिहर्यत वत्सं जात निवाघ्न्या ।। १
अनुव्रतः पितुः पुत्रो मात्रा भवतु संमनाः ।
जाया पत्ये मधुमतीं वाचं वदतु शंतिवाम् ॥ २
मा भ्राता भ्रातरं द्विक्षन् मा स्वसारमुत स्वसा ।
संम्यञ्चा सव्रता भूत्वा वाचं वदत भद्रया ॥ ३
(अथर्ववेद ३,३०)

"मी तुम्हांला अविद्वेषी, समानचित्तवृत्ति व प्रीतियुक्त असें करतों. गाय जशी आपल्या वत्सावर प्रीति करते त्याप्रमाणें तुम्ही एकमेकांवर प्रीति करीत जा. (१) पित्याला अनुकूल व मातेशीं समानमनस्क असा पुत्र असू दे. भार्या पतीशीं मधुर व सुखदायक अशा वाणीनें बोलूं दे. (२) भावानें भावाचा द्वेष करूं नये. त्याचप्रमाणें बहिणीनें बहिणीशीं दावा मांडूं नये. त्या सर्वांनीं एकमेकांशीं संमत व सव्रत होऊन चांगलें गोड बोलावें. (३)"

वैदिक राष्ट्रांतील स्त्रिया जशा उत्कृष्ट गृहिणी तशाच श्रद्धाळू व भक्तिमती होत्या. त्या ब्रह्मवादिनी होत्या हें आपण पाहिलेंच आहे. पण मुद्गलानी व विश्पला यांच्या ऋग्वेदांतील वर्णनावरून त्या शस्त्रास्त्रविद्येंत निपुण, शूर व धैर्यशील असून प्रसंगविशेषीं रणांगणहि गाजवीत असें दिसतें. मुद्गलानी व विश्पला यांच्या नांवावर ऋग्वेदांत असलेलीं सूक्तें त्यांच्या पराक्रमाच्या दृष्टीनें पाहण्यासारखीं आहेत. मुद्गलानी ही भम्यांश्वाचा पुत्र जो मुद्गल त्याची बायको. हिचा पति मुद्गल संपन्न असून त्याच्याजवळ पुष्कळशीं दुभत्यां गाईचीं खिल्लारें व बैल होते. संधि साधून एकदां चोरांनीं त्याचें गोधन लुटून नेलें. मुद्गल त्यांचा पाठलाग करावयास सिद्ध झाला. पण त्याचे सर्व गाई, घोडे, बैल इत्यादि चोरांनीं चोरून नेल्यामुळें रथास जुंपावयास कांहींच नव्हतें.

एक म्हातारा बैल काय तो गोठ्यांत होता. तेवढाच रथास जुंपून तो चोरांचा पाठलाग करावयास निघाला. त्या वेळीं त्याची बायको मुद्‌गलानी ही त्याचें सारथ्य करीत होती. तिनें मोठ्या कुशलतेनें तोच बैल असा पिटाळला कीं तिचें धैर्य आणि सारथ्यकौशल्य यांची ऋग्वेदसूक्ताच्या द्रष्ट्यालाहि मोहिनी पडली. मुद्‌गलानीच्याच भरंवशावर मुद्‌गलानें चोरांना पिटाळून लावून आपलें गोधन परत आणलें. तिचें वर्णन करतांना ऋग्वेदांत म्हटलें आहेः—

उत् स्म वातः वहति वासः अस्याः अधिऽरथं यत् अजयत् सहस्रम् ।
रथीः अभूत् मुद्‌गलानी गोऽइष्टौ भरे कृतं वि अचेत् इंद्रऽसेना ॥२
उत प्रऽधिं उत् अहन् अस्य विद्वान् उप अयुनक् वंसगं अत्र शिक्षन् ।
इन्द्रः उत् आवत् पतिं अघ्न्यानां अरंहत पद्याभिः ककुत्ऽमान् ॥७
परिवृक्ताऽइव पतिऽविद्यं आनट् पीप्याना कूचक्रेणऽइव सिंचन् ।
एषऽएष्या चित् रथ्या जयेम सुऽमंगलं सिनऽवत् अस्तु सातम् ॥११

(ऋ. दशम मंडल, सूक्त १०२)

"प्रख्यात योद्धा जो मुद्‌गल त्याची स्त्री मुद्‌गलानी ही त्याच्या जवळच रथांत बसली असतां वाऱ्यानें तिचा पदर सारखा उडत होता. पण मुद्‌गलानीनें तिकडे लक्ष न देतां भूमि आणि धेनु यांच्यासाठीं चाललेल्या युद्धांत रथी होऊन व पुढें सरून तिनें हजारो सैनिकांचा पाडाव केला. तेव्हां इंद्रानेंच युद्धामध्यें आपल्या साह्यासाठीं सेना पाठविली होती हें तिला कळलें. (२) ती मोठ्यानें ओरडून तो गाडा जोरानें पुढें पळवीत चालली. तेव्हां तो बैलच बेफाम होऊन जुंपलेला गाडा ओढीत भलतीकडे भडकला. तेव्हां त्याच्या खुरांनीं उधळलेल्या धुळीनें मुद्‌गलानीचें अंग अगदीं भरून गेलें. (७) एखाद्या टाकलेल्या स्त्रीला तिचा पति अचानक लाभावा किंवा पुष्ट पयोधरभारानें ताठरल्यामुळें स्त्रीला पान्हा फुटून दूध वाहूं लागावें किंवा चाकानें पाणी ओढून टंच फुगलेल्या मोटेंतून पाणी रिचवावें त्याप्रमाणें हें झालें. ईर्षेनें कार्य करणाऱ्या ह्या मुद्‌गलानीच्या प्रमुखत्वानेंहि आपण जय मिळवूं असें सैनिकांना

वाटूं लागलें. म्हणून त्यांचें यश चंद्राप्रमाणें निष्कलंक आणि मंगलप्रद असो. (११)"

विश्पलेचें चरित्र तर याहीपेक्षां अद्‌भुत आहे. विश्पला ही विदुषी म्हणून प्रसिद्ध होती. शौर्य आणि पांडित्य या दोहोंचाहि तिच्या ठिकाणीं प्रकर्ष झाला होता. ही खेल नांवाच्या राजाची पत्नी होती. एकदां राजावर युद्धाचा प्रसंग आला. त्यावेळीं आपल्या पतीबरोबर सहभागी होऊन युद्धांत तिनें भाग घेतला. शत्रूंनीं तिला घेरून जी हाणामार सुरू केली त्यांत तिचा पाय तुटला. तरी ती कंपित झाली नाहीं. तिनें अश्विनीकुमारांचा संकटांत साह्य करण्याविषयीं धावा सुरू केला. तेव्हां त्यांनीं मोठ्या कौशल्यानें दुसरा कृत्रिम पाय तिला बसवून दिला व तिनें दुसऱ्या दिवशीं शत्रूवर चढाई करून विजय मिळविला. ऋग्वेदांत दोन मंत्रांतून विश्पलेचें वर्णन येतें. ते मंत्र असे :—

याभिर्विश्पलां धनसां अथर्व्यं सहस्रमीळ्हे आजौ अजिन्वतम् ।
याभिर्वशं अश्व्यं प्रेणिं आवतं ताभिः ऊ षु ऊतिभिः अश्विना गतम् ॥

(ऋ. १-११२-१०)

अथर्व्याच्या कुळांत उत्पन्न झालेल्या धनवान् विश्पलेचा ज्या आपल्या भक्तरक्षक सामर्थ्यानें तुम्ही हजारो माणसें लढत असतां युद्धांत बचाव केला आणि तुमच्यावर निष्ठा ठेवणाऱ्या अश्वकुळांतील वंशाचें तुम्ही रक्षण केलें तीं आपलीं सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही इकडे आगमन करा.

चरित्रं हि वेर् इवाच्छेदि पर्णं आजा खेलस्य परितक्म्यायाम् ।
सद्यो जंघां आयसीं विश्पलायै धने हिते सर्तवे प्रति अधत्तम् ।

( ऋ. १-११६-१५ )

(एखाद्या पक्ष्याचा ज्याप्रमाणें पंख तुटावा त्याप्रमाणें खेलाच्या युद्धांत रात्रीच्या वेळेस विश्पलेचा पाय तुटला. पण लढाई सुरू झाल्याबरोबर तिला समरांगणावर वाटेल तेथें जातां यावें म्हणून

तुम्ही तिला लगेच लोखंडाचा पाय बसविला.) शूर व ब्रह्मवादिनी स्त्रियांबरोबरच भक्तिमती स्त्रियाहि वैदिक राष्ट्रांत आढळतात. या दृष्टीनें अपालेची कथा मोठी विलक्षण आहे. रामायणांतील शबरीप्रमाणेंच ती देवेंद्राची मोठी भक्त होती. व भगवान् श्री रामचंद्रांनीं ज्याप्रमाणें शबरीचीं उष्टीं बोरें खाण्यांत आनंद मानला त्याचप्रमाणें हिनें आपल्या दातांनीं सोमवल्ली कुटून तिचा रस देवेंद्राला दिला आणि देवेंद्रानें भक्तिविव्हल अंतःकरणानें तो ग्रहण केला.

या प्रमाणें ब्रह्मवादिनी, शूर, भक्तिमती, जीवनांत देवत्व उत्पन्न करूं इच्छिणारी व आपल्या संस्कारित जीवनांतून मातृत्वाच्या वात्सल्याचा अविरत वर्षाव करणारी आर्य स्त्री आपणांस वैदिक वाङमयांत आढळते. तिच्या जीवनांतून आजचे भारतीय स्त्रीजीवनाचे आदर्श निर्माण झाले आहेत. आतांपर्यंत आपण वैदिक राष्ट्राचें जें अंतरंगजीवन पाहिलें त्यावरून त्यांच्या नैतिक दृष्टिकोनाची व समाजजीवनांतील संकेतांची उभारणी ज्यांना आध्यात्मिक म्हणतां येईल अशा प्रकारच्या अंतर्जीवनाच्या कांहींतरी शाश्वत तत्त्वावर झाली असली पाहिजे हें चाणाक्ष व्यक्तींच्या सहजच ध्यानांत येईल. वैदिकांचें आध्यात्मिक अंतरंग खरोखरी इतकें विकसित झालें होतें काय ? हा अलीकडे विवाद्य होऊन बसलेला प्रश्न आहे. व श्री. रानडे ह्यांच्यासारखे श्रेष्ठ तत्त्वज्ञ सुद्धां या संबंधांत किंचित् संशयांत असल्यासारखे दिसतात. आधुनिक संशोधकांत लोकमान्य टिळक मात्र यासंबंधांत पूर्णपणें निःशंक आहेत असें गीतारहस्यांतील अध्यात्म प्रकरणावरून तरी दिसतें. वेदवाङमयाच्या मंदिराच्या या दालनांत प्रत्यक्ष प्रवेश करून आपणहि वैदिक राष्ट्राचें आध्यात्मिक अंतरंग पाहण्याचा पुढील व्याख्यानांत प्रयत्न करूं.

## व्याख्यान बारावें

# वैदिकांचें आध्यात्मिक अंतरंग

आतांपर्यंतच्या विवेचनावरून ही गोष्ट ध्यानांत आली असेल कीं पाप, पुण्य, चारित्र्यसंस्कार यासंबंधींच्या सिद्ध कल्पना ज्या समाजांत होत्या अशा समाजाचें आपणांस वेदांतून दर्शन घडतें. भौतिक विश्व व इहलौकिक जीवन यांच्या मर्यादेपलीकडे असणारें एक कांहींतरी अज्ञात व अनंत अस्तित्व आहे व त्याच्याशीं आपलें जीवन संबद्ध आहे; तसेंच इहलोकींच्या मृत्यूनें आपलें अस्तित्व खरोखरीं संपत नसून मृत्यूनंतरहि तें वेगळ्या स्वरूपांत असतेंच अशा स्वरूपाची निश्चित धारणा असल्यावांचून कोणत्याहि समाजांत या कल्पनांचा वैदिक समाजांतल्यासारखा आविष्कार असूं शकत नाहीं हें स्पष्टच आहे. नीतिसंकेत, धार्मिक व सामाजिक स्वरूपाचा आदर्श समजण्यांत येणारा आचार, व पापपुण्यांचे संकेत निश्चित स्वरूपाच्या आध्यात्मिक अधिष्ठानावांचून अथवा पायावांचून स्थिरपद होऊंच शकत नाहींत. वैदिक समाजांतील या सर्व गोष्टींना केवढें स्थैर्य लाभलें याचा विचार केला तर मन आश्चर्यानें थक्क होतें. चिरंतन, सनातन अथवा शाश्वत या शब्दांनींच त्यांच्या स्थिरपदतेचें यथार्थ वर्णन होऊं शकेल. उपनयन, विवाह व त्यांच्याशीं संबद्ध असे आनुषंगिक संस्कार यांचें वेद-वाङमयांत दृष्टोत्पत्तीस येणारें स्वरूप आपण मागच्या दोन व्याख्या-नांतून पाहिलें. आजहि या संस्कारांसंबंधीं हिंदूंची जी धारणा आहे ती व वैदिकधारणा यांत मूलभूत स्वरूपाचा कोणताहि भेद नाहीं. साधें जेवणापूर्वी घ्यावयाचें आचमन व जेवणानंतर घ्यावयाचें आचमन अथवा आपोष्णी यांच्यासुद्धां परंपरा छांदोग्योपनिषदांपासून आजपर्यंत अव्याहतपणें चालत आलेल्या

आढळून येतात; व यावरून ही गोष्ट सहजच सिद्ध होते कीं या परंपरांच्या पाठीशीं असलेलें तत्त्वज्ञान परिपूर्ण स्वरूपाचें असून त्या तत्त्वज्ञानाच्या भक्कम पायावरच या सगळया परंपरा उभ्या राहिलेल्या आहेत. कोणत्याहि समाजांतील सदाचार म्हटलेल्या आचारपरंपरेंत जीवनाचें तत्त्वज्ञान व सृष्टीकडे पाहण्याची निश्चित स्वरूपाची दृष्टि यांचीं सूत्रें असतातच. या इहलौकिक जीवना-पलीकडे कांहीं एक वेगळें जीवन आहे व त्या जीवनावर इहलोकींच्या आपल्या हातून होणाऱ्या क्रियांपासून विशिष्ट प्रकारचे परिणाम होतात अशी पक्की जाणीव असल्यावांचून वैदिकांचें संस्कारशास्त्र उत्पन्न झालेलें नाहीं. या लोकांची आध्यात्मिक धारणा काय होती हें आपण विकसनाच्या अवस्थेंतील भारतीय संस्कृतीच्या प्रमेयांशीं ऋग्वेदांतील व इतर संहितांतील वचनांवरून प्रत्यक्ष ताडूनच पाहूं. अर्थात् ऋग्वेद व इतर वेदसंहिता हे संग्रहग्रंथ आहेत हें पुन्हां एकदां येथें उल्लेखिणें आवश्यकच वाटतें.

मनुष्याचा सृष्टीशीं संबंध आल्यानंतर या सृष्टीचें स्वरूप काय असावें ? आपलें स्वतःचें स्वरूप काय आहे व या दोहोंचा संबंध काय असावा यासंबंधांत बुद्धिमान् मनुष्य जो विचार करूं लागतो, त्या विचाराच्या मंथनांतूनच तत्त्वज्ञानाचा उदय होत असतो. माणसानें कशासाठीं जगावयाचें व जगून मिळवावयाचें तरी काय हे प्रश्न नेहमींच अनादि कालापासून मनुष्यासमोर उभे राहिलेले आहेत. व आपण स्वतः कोण आहोंत आणि आपल्या जीवनाचें स्वरूप तरी काय आहे यासंबंधीं विचार केल्यावांचून कशासाठीं जगावयाचें व काय मिळवावयाचें या प्रश्नाचा खरोखरी निर्णय लागू शकत नाहीं. माणसाच्या ठिकाणीं स्वाभाविक असलेल्या बुद्धिशक्तीनें हें विश्व काय आहे हा प्रश्न जसा त्याच्यासमोर उभा केला आहे त्याचप्रमाणें आपण स्वतः कोण आहोंत हाहि प्रश्न त्याच्यासमोर उभा केलाच आहे. जन्मल्यापासून इंद्रियांच्या द्वारें ज्या जगाचा मनुष्याशीं संबंध येतो त्याच्या व आपल्या संबंधांतील स्वरूपाची कल्पना लक्षांत घेतली तर विश्व काय आहे या

प्रश्नापेक्षांहि आपण कोण आहोंत हाच प्रश्न सर्वप्रथम महत्त्वाचा ठरतो. विश्व किंवा जग व त्यांतील सर्व वस्तुजात हें उपभोग्य असून आपण स्वतः उपभोक्ते आहोंत ही जाणीव सर्वांच्या अनुभवाला येणारी आहे. यांपैकीं उपभोक्ता हा चेतन असून उपभोग्य वस्तुजात जड आहे व जडाचा प्रवाह चेतनाच्या लाभासाठीं प्रवृत्त होत असून चेतन त्यापासून स्वतःचा विविध प्रकारें लाभ करून घेतें. लाभ करून घेणारा जो चेतन तो "मी" च असल्यामुळें या मीपासूनच विचाराचा खरा आरंभ होत असतो. म्हणून भारतीयांनीं या मीला अथवा अस्मितेला जगतांतील यच्चयावत् सर्व विचारांचा, क्रियांचा व आंदोलनांचा आरंभबिन्दु ठरविलें आहे. संपूर्ण विश्वाच्या सर्व गुणवैशिष्ट्यांचा अल्प प्रमाणांत कां होईना पण मनुष्यशरीरांत अंतर्भाव झालेला असल्यामुळें मनुष्यशरीर हें विश्वाचें एक प्रकारें प्रतिनिधिभूत आहे. त्यामुळें विश्वविचारांत पहिलें स्थान मनुष्यशरीराला असून या सजीव मनुष्यशरीराच्या विचारांतून बाहेर पडणारे सिद्धांतच विश्वाच्याहि उलगडयाला व्यापक स्वरूपांत भारतीय तत्त्वज्ञ लागू करीत असतात. मनुष्यशरीराच्या या विचाराला पिंडविचार म्हणतात व जें जें पिंडीं तें तें ब्रह्मांडीं ही म्हण सुप्रसिद्धच आहे.

मनुष्यशरीराचा हा विचार मनांत आला कीं मनुष्यशरीर हें एक यंत्र असून त्या यंत्रांत आजच्या एखाद्या बाहेरच्या कारखान्याप्रमाणें विविध स्वरूपाचीं कामें चालू असतात हें दृष्टोत्पत्तीस येतें. या शरीररूपी यंत्रांत जगांतील बाह्य पदार्थांची ओळख करून घेणारीं कांहीं साधनें असतात. त्यांना ज्ञानेंद्रियें असें म्हणतात. हीं पांच प्रकारचीं असतात. त्यांनीं येणारी जगाची शब्द स्पर्श रूप रसगंधात्मक प्रतीति हेंच जगाचें आपणांला होणारें ज्ञान होय. या बरोबरच देहाचे व्यवहार अथवा व्यापार चालविण्यासाठीं पांच साधनें देहांत असतात. त्यांना कर्मेंद्रियें असें म्हणतात. नाक, कान, डोळे, जीभ व त्वचा हीं पांच ज्ञानेंद्रियें असून हात, पाय, वाणी, गुद व उपस्थ हीं पांच कर्मेंद्रियें होत. या दहांच्या समुदायाला

इंद्रियसंघात असें म्हणतात. कर्मेंद्रियें फक्त शरीराचे संस्कार चालवितात व ज्ञानेंद्रियें आपापल्या विषयांचे संस्कार उचलतात. पण या संस्कारांचें एकत्रीकरण करून त्यांची व्यवस्था लावण्याचें काम दुसऱ्या कोणाला तरी करावें लागतें. त्याशिवाय कोणत्याहि संस्कारांचा उपयोग होत नाहीं. ज्ञानेंद्रियांच्या साहृयानें होणाऱ्या संस्कारांचें एकीकरण करून व्यवस्था लावणें व बऱ्या वाईटाचा निर्णय करून ग्राहृयाग्राहृय ठरविणें अशीं दोन कामें करणारें जें इंद्रिय त्यालाच अन्तःकरण असें म्हणतात. व त्याच्या पहिल्या कामाला मन व दुसऱ्या व्यवहाराला बुद्धि असें नांव आहे. एकाच अन्तःकरणाचे त्याच्या कामानुरूप पाडलेले हे भाग होत. पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें, मन व बुद्धि यांच्याशिवाय आणखी एक गोष्ट शरीरांत असते. ती गोष्ट म्हणजे स्पंदन किंवा जिवंतपणाचा व्यवहार होय. हीच प्राणशक्ति. प्राणशक्तीची क्रिया अथवा हालचालच नसेल तर बाकी सगळें असूनहि नसल्यासारखें आहे. हिलाच चेतना असें भगवद्गीतेंत स्वतंत्र नांव दिलेलें असून ही आपल्या शरीरांतील एक महत्त्वाची शक्ति होय. या चेतनेबरोबरच स्वतःची स्वतःला असलेली जाणीव व हें आपलें अथवा आपल्याला हवें असलेलें व हें दुसऱ्याचें अशा प्रकारची एक प्रवृत्ति शरीरांत कार्यकारी असलेली दिसून येते. तिलाच अहंकार असें म्हणतात. या संपूर्ण शरीरांतील वेगवेगळ्या पदार्थांचें जें घटकद्रव्य त्याला प्रकृति असें म्हणतात. हीं सर्व तत्त्वें ज्या शक्तीनें आपापल्या ठिकाणीं स्थिर राहून काम करतात, त्या शक्तीला धृति असें म्हणतात. मानवी पिंडाचा विचार केला म्हणजे त्यांत या इतक्या गोष्टी कोणासहि अनुभवास येतात. उपनिषदांच्या काळानंतर उत्पन्न झालेल्या भारतीय तत्त्वज्ञानाचा श्रेष्ठ व उत्कृष्ट ग्रन्थ म्हणून जगानें शिरोधार्य मानलेल्या श्रीमद्भगवद्गीतेनें या सर्व विशेषांसहित असलेल्या पिंडाला अथवा मानवी शरीराला क्षेत्र असें नांव दिलें आहे. भगवद्गीता म्हणते :—

महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।
इंद्रियाणि दशैकं च पंच चेन्द्रियगोचराः ॥
इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातः चेतना धृतिः ।
एतत् क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥

भगवद्गीता अ. १३ श्लो. ५ व ६

"हे कौंतेया, या शरीरालाच क्षेत्र असें म्हणतात. पृथ्वी, आप्, तेज, वायु, आकाश हीं पंचमहाभूतें, अहंकार, बुद्धि, प्रकृति (अव्यक्त) दहा इंन्द्रियें, अन्तःकरण, (मन) पांच ज्ञानेंद्रियांचे शब्द, स्पर्श, रूप, रस व गन्ध हे पांच विषय, इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात, चेतना आणि धृति या एकतीस तत्त्वांच्या समुदायाला सविकार क्षेत्र असें म्हणतात. केवळ क्षेत्राचा विचार हा केवळ एकांगी विचार होय. आजच्या भौतिक शास्त्रज्ञांनीं केवळ या एकांगी विचारावरच भर दिला असून त्यांच्यापासून स्फूर्ति घेणाऱ्या जडवाद्यांनीं यापलीकडे विचार करावयाचा नाहीं असें म्हणून आपल्या डोळ्यावरे घट्ट पडदे ओढून घेतले होते. आतां ते दूर सारण्याचे विचार प्रभावी होत आहेत. हें क्षेत्र पूर्ण तपासल्यावर एक महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो कीं या क्षेत्राचा अथवा शेताचा धनी कोण? कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें ज्याच्यासाठीं आपापलीं कामें करतात, मन ज्याच्यासाठीं जुळवाजुळव करतें व ज्याच्या प्रेरकतेनें प्रेरणा देतें, बुद्धि ज्याच्या सुखदुःखाच्या व इष्टानिष्टतेच्या केन्द्राभोंवतीं आपल्या निश्चयाचें जाळें विणतें, ज्याच्यासाठीं चेतना चालू आहे तो या संघातावर अहंममतेचा अभिमान ठेवणारा याचा खरा स्वामी कोण? कारण तेवढाच एक पदार्थ काय तो चेतन अथवा ज्ञानशक्तियुक्त असून त्याच्या इच्छाशक्तीनेंच जड पदार्थांचे व्यापार चालू असतात. आपलें स्थूल शरीर व अवयवांचा संघात यांचा हे सर्व व्यापार करणें हा स्वभाव आहे, असें म्हणून भागणार नाहीं. कारण देहाचे व्यापार कोणत्या तरी इच्छाशक्तीच्या नियंत्रणानुसार होत असतात. त्या व्यापारामुळें उद्भवणाऱ्या सुखदुःखांचे प्रत्यय कोणाला तरी येत असतात.

कोणतें तरी इष्ट घडवावयाचें आहे व कोणतें तरी अनिष्ट टाळावयाचें आहे असा या व्यापारांच्या मुळाशीं हेतु असतो. हें सर्वांच्याच अनुभवास येणारें आहे. इतकेंच नव्हे तर मरणानन्तर सर्व अवयवांचा संघात असतांनासुद्धां कोणतेहि व्यापार होत नाहींत. हें सर्व लक्षांत घेतलें म्हणजे व्यापार करणें हा स्थूल शरीराचा अथवा अवयवसंघाताचा स्वभाव नसून त्याच्या मुळाशीं ज्याच्या इच्छाशक्तीची प्रेरणा आहे तो कोणीतरी याहून वेगळा असाच आहे हें स्पष्ट होतें. बाल्य, तारुण्य, वार्धक्य या तिन्ही अवस्थांत शरीर बदलत असूनसुद्धां न बदलणारा असा कोणी तरी आहे व त्यालाच आपण आपलें स्वत:चें खरें स्वरूप समजतों असा दृष्टान्त जुने लोक देत. आतां यापेक्षांहि अधिक शास्त्रीय दृष्टीनें हें म्हणणें सिद्ध होतें. आधुनिक शास्त्राप्रमाणें आपल्या शरीरांतील सर्व घटकावयव कणश: रोज जुने संपून त्या जागीं कणश: नवे येत असतात. शरीरांतील प्रत्येक कण याप्रमाणें बदलत असतां त्या प्रतिक्षणीं परिवर्तनीय असणाऱ्या नानात्वांतून अपरिवर्तनीय अशी एकत्वाची प्रतीति अखंड रोज येत असते. देह व अवयवसंघात हें केवळ परिवर्तनीय नानात्व असून एक अविकारी व अपरिवर्तनीय स्वरूपाचा कोणीतरी त्याचा नियंत्रक आहे हें यावरूनहि सहज सिद्ध होतें. प्राणशक्ति म्हणजे तो नव्हे हें स्पष्टच आहे. कारण गाढ झोपेंत प्राणशक्तीचे श्वासोच्छ्वास, रुधिराभिसरण इत्यादि सर्व व्यापार चालू असतात तरी त्या अवस्थेंत स्वत:चें स्वत:ला ज्ञान मात्र नसतें. जीवनाचे हे सारे व्यापार व व्यवहार याप्रमाणें ज्याच्या अस्तित्वाच्या भरंवशावर चालू असतात व ज्याच्या अस्तित्वाच्या प्रत्ययानें सारा जीवनमार्ग उजळतो त्यालाच नाकारावयाचें, या हटवादांत कांहीं अर्थ नाहीं. इंद्रियांनीं तो जाणला जाऊं शकत नसेल व प्रयोगशाळांतून त्याला ओळखतां येत नसेल तर त्याचा अर्थ एवढाच आहे कीं, त्याला होणाऱ्या ज्ञानाचीं तीं साधनें असून ज्ञाता हा कधींहि ज्ञेय होऊं शकत नसल्यामुळें त्याच्या प्रतीतीचे मार्ग, ज्याला आपण ज्ञेय म्हणून समजतों त्यांच्या

ज्ञानाच्या मार्गाहून खात्रीनें वेगळे आहेत. म्हणूनच बृहदारण्यकोपनिषदांत म्हटलें आहे कीं,– 'विज्ञातारमरे केन विजानीयात्' हें जें सर्व शरीरांत अनुस्यूत असलेलें आत्मतत्त्व त्यालाच भगवद्गीतेंत क्षेत्रज्ञ असें नांव दिलें असून त्याचें ज्ञान क्षेत्राच्या ज्ञानाबरोबरच अत्यंत आवश्यक आहे. त्याच्या संकल्पशक्तीनेंच वस्तुत: त्याच्या गरजेसाठीं क्षेत्रांतील विविध पदार्थांचा पसारा निर्माण होत असतो हें अलीकडचे शास्त्रज्ञहि सांगू लागले आहेत. वूईल ड्यूरँड आपल्या मॅन्शन्स् ऑफ फिलॉसफी या ग्रंथांत म्हणतो, It was energy of living substance that specialised and moulded organs, nerves and brains. Now we can think because we have brains; but, once life made the brain by trying to think. It is this desire which creates organ after organ and slowly moulds the body in the image of the will. (शरीरांत इंद्रियें, स्नायू व मेंदू हे जीवात्म्याच्या इच्छाशक्तीनें उत्पन्न केलेले आहेत. आज आम्ही विचार करतों, कारण कीं, आम्हांला मेंदू आहे. पण मुळांत जीवशक्तीनें स्वत:च्या विचारासाठीं चालविलेल्या प्रयत्नांतून तिच्या संकल्पशक्तीनें मेंदू उत्पन्न केला. इच्छाशक्तीच्या योगानेंच प्रथम इंद्रियें एकामागून एक गरज व संकल्प यांच्या अनुसार निर्माण झालीं. व नंतर हळूहळू शरीराचा संपूर्ण सांगाडा तयार झाला.) तात्पर्य, क्षेत्रज्ञानें क्षेत्रांत यदृच्छया प्रवेश केला नसून क्षेत्र क्षेत्रज्ञाच्या संकल्पशक्तीनेंच तयार झालेलें आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे क्षेत्रज्ञाचें महत्त्व ध्यानांत येतें. हा क्षेत्रज्ञ म्हणजेच वस्तुत: परब्रह्म होय असें आपल्या तत्त्वज्ञांचें म्हणणें आहे. पण तूर्त आपण पुढची गोष्ट न पाहतां आध्यात्मिक अंतरंगाच्या परिचयाची पहिली पायरी म्हणून केवळ क्षेत्रक्षेत्रज्ञविचाराकडेच पाहूं. नित्य परिवर्तनशील क्षेत्र व तें ज्याच्या संकल्पानें तयार होतें असें अविकारी अपरिवर्तनीय, अविनाशी असें त्या पिंडाचें खरें तत्त्व अथवा क्षेत्रज्ञ यांचें जें ज्ञान तेंच खरें ज्ञान होय असें श्रीमद्भगवद्गीतेचें म्हणणें आहे. गीताकार म्हणतात :–

इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते ।
एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ।।
क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।
क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ।। गीता अ. १३,१-२.

(हे कौन्तेया, ह्या शरीरासच क्षेत्र असें म्हटलें आहे. हें शरीर जो जाणतो त्यास क्षेत्रज्ञ असें या शास्त्रांतील ज्ञाते पुरुष म्हणतात. यच्चयावत् सर्व शरीरांतील क्षेत्रज्ञ म्हणजे मीच होय. आणि क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें जें ज्ञान तेंच खरें ज्ञान होय.) श्रीमद्‌भगवद्‌गीता भारतीय तत्त्वज्ञानावरील सर्वमान्य ग्रंथ असून त्यांत दिग्दर्शित करण्यांत आलेले हे विचार तितक्याच स्पष्टपणें ज्या प्राचीन वाङमयांत उल्लेखिण्यांत आले असतील त्या वाङमयाच्या काळीं हे विचार सिद्ध झाले असले पाहिजेत हें मानणेंच भाग आहे. उपनिषद वाङमयाचें मंथन करून काढलेलें नवनीत म्हणजे श्रीमद्‌भगवद्‌गीता होय हें ध्यानांत घेतलें म्हणजे गीताकारांनीं हे विचार कोणतेहि स्वतःच्या पदरचे नवे सांगितलेले नसून ते उपनिषदांतीलच विचार संक्षेपानें एकत्र दिले आहेत हें स्पष्ट होतें. गीतेचा हा संपूर्ण क्षेत्रक्षेत्रज्ञविचार आधुनिक शास्त्रांच्या कसोटीस उतरणारा व मूलभूत स्वरूपाचा कसा आहे हें आपण येथें थोडक्यांत पाहिलें. व माझ्या श्रीकृष्ण चरित्रांतील शेवटच्या भागांत मी हेंच विस्तारानें मांडून दाखविलेलें आहे. उपनिषदें हें वेदवाङमय असून त्यांतहि क्षेत्र म्हणजे देहादि संघात व क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मा अथवा जीव यांच्या संबंधीचा हा संपूर्ण विचार केलेला आढळतो. जीवात्म्याच्या ज्या संकल्पशक्तीचें वूइल डयूरँड यांनीं माहात्म्य वर्णन केलें आहे त्याचें छांदोग्योपनिषदांत अतिशय मनोरम व काव्यमय वर्णन केलें आहे. छांदोग्योपनिषदांत म्हटलें आहे कीं, "तानि ह वा एतानि संकल्पैकायनानि, संकल्पात्मकानि, संकल्पे प्रतिष्ठितानि । समकल्पेतां द्यावापृथिवी, समकल्पेतां वायुश्चाकाशं च। समकल्पन्तामापश्च....स एष संकल्पः संकल्पमुपास्स्वेति । (छा. ७. ४. २) (संकल्प सर्वांचें केंद्रस्थान असून माहेरघर आहे. जगां-

तील सर्व वस्तु संकल्पमय असून त्या संकल्पांतच प्रतिष्ठित झाल्या आहेत. द्यावापृथ्वी, आकाश, वायु सर्व कांहीं संकल्पमय आहेत. म्हणून संकल्पाची उपासना कर.) या वाक्यानें आत्म्याची इच्छाशक्ति व विश्वात्म्याची इच्छाशक्ति यांच्यांतील वास्तविक एकात्मता फारच उत्कृष्ट रीतीनें विशद केलेली आहे. देहादि संघातांतील मानसिक शक्तीची व चित्ताची श्रेष्ठता उपनिषत्कारांनीं अशीच उत्कृष्टपणें दाखविलेली आहे. इतकेंच नव्हे तर संकल्पाचें उगमस्थान असलेल्या मनाच्या निरनिराळ्या वृत्तींचा त्यांनीं केलेला निर्देश सूक्ष्म निरीक्षणशक्तीची साक्ष देणाराच आहे. या दृष्टीनें छांदोग्य, मैत्रायणी व ऐतरेय उपनिषदांतील पुढील वाक्यें पहा:—

चित्तं वाव संकल्पाद् भूयो यदा वै चेतयतेऽथ संकल्पयते ..... तस्माद्यद्यपि बहुविदचित्तो भवति नायमस्तीत्येवैनमाहुः .....अथ यद्यल्पविच्चित्तवान् भवति तस्मा एवोत शुश्रूषन्ते । चित्तं ह्येवैषामेकायनं, चित्तमात्मा, चित्तं प्रतिष्ठा, चित्तमुपास्स्वेति ।

(छा. ७, ५, १)

मनसा ह्येव पश्यति मनसा शृणोति, कामः संकल्पो विचिकित्सा श्रद्धाऽश्रद्धा, धृतिरधृतिर्ह्रीर्धीर्भीरित्येतत्सर्वं मन एव । (मै.६.३०)

संज्ञानं अज्ञानं विज्ञानं प्रज्ञानं मेधा दृष्टिः धृतिः मतिः मनीषा जूतिः स्मृतिः संकल्पः क्रतुः असुः कामः वशः इति सर्वाण्येवैतानि प्रज्ञानस्य नामधेयानि भवन्ति । (ऐ. ३. २)

(चित्त संकल्पापेक्षां श्रेष्ठ आहे. कारण, चित्तांत अगोदर विचार आल्यावर मग मनुष्यास संकल्प करतां येतो. तेव्हां चित्त या सर्वांचें केन्द्रस्थान आहे. सर्व वस्तू चित्तमय असून चित्तामुळेंच त्या जिवंत राहतात. एखादा मनुष्य बहुविद असूनहि जर विचार करीत नसेल तर त्यास कांहींच येत नाहीं असें लोक म्हणतात. जर एकादा मनुष्य विचार करणारा असेल तर त्याचें ऐकावें अशी सर्वांस इच्छा होते. चित्त सर्वांचें केंद्रस्थान, सर्वांचा आत्मा व सर्वांचा आधार आहे. म्हणून या चित्ताची उपासना करावी. चित्त

ब्रह्म आहे असें जो ध्यान करतो तो चित्ताच्या ताब्यांतील सर्व प्रदेशाचा अधिपति होतो.

मनुष्य मनानेंच पाहतो व ऐकतो. काम,संकल्प, विचार, श्रद्धा, अश्रद्धा, धृति,अधृति,संकोच,बुद्धि व भीति हीं सर्व मनाचींच रूपें होत.

संज्ञान, अज्ञान, विज्ञान, प्रज्ञान, मेधा, दृष्टि, धृति, मति, मनीषा, संकल्प, क्रतु, प्राण, जीवनाशा, काम व आत्मसंयम हीं सर्व चित्ताचीं निरनिराळीं नांवें होत. मानसिक अनुभवाच्या वेगवेगळ्या पायऱ्या व भिन्नभिन्न वृत्ति यांचें स्वरूप या ठिकाणीं अगदीं स्पष्टपणें सांगितलेलें आहे. क्षेत्रांतील या विविध स्वरूपाच्या शक्तींच्या विचाराबरोबरच या वेदांतर्गत उपनिषद भागांतून आत्म्याचें अथवा क्षेत्रज्ञाचें जें वर्णन केलेलें आहे तें म्हणजे भारतीय तत्त्वज्ञानाचा गाभाच होय.

आजच्या मानसशास्त्रासही आपल्या स्वतःच्या ठिकाणीं आपणांस प्रत्ययास येणारा जो अहंभाव तो देहावसानानंतरहि जिवंत राहतो व एखाद्या मनुष्याची उत्कट वासना जर या जन्मीं तृप्त न झाली तर ती केन्द्रीभूत अहंभावरूपानें शरीर नष्ट झाल्यावरहि जिवंत राहते असें प्रतिपादावें लागलें. ही आजच्या मानसशास्त्राची आडवळणाची परिभाषा लक्षांत घेतली म्हणजे आडवळण टाकून सरळच आत्म्यास हात घालणाऱ्या उपनिषदांच्या द्रष्टयांच्या प्रतिभेची धाव किती बरोबर होती हें ध्यानांत येतें. वर सांगितलेला क्षेत्रज्ञविषयक प्रश्न व त्याचें उत्तर याचें अगदीं यथातथ्य चित्र उपनिषद् वाङ्मयांत रेखाटलें आहे. मैत्रायणी व कौशीतकी ह्या उपनिषदांत आत्म्याचें वर्णन करतांना म्हटलें आहे:–

"अथ अपहतपाप्मानस्तिग्मतेजस ऊर्ध्वरेतसो वालाखिल्या इति श्रूयन्ते । अथ एते प्रजापतिमब्रुवन् । भगवन् शकटमिवाचेतनमिदं शरीरं.... प्रचोदयिता वा अस्य यद् भगवन् वेत्सि तदस्माकं ब्रूहीति। तान् होवाचेति । यो ह खलु एव शुद्धः.....शान्तः...शाश्वतोऽजः स्वतंत्रः स्वे महिम्नि तिष्ठति अनेनेदं शरीरं चेतनवत् प्रतिष्ठापितम्। प्रचोदयिता चैषोऽस्येति ।" ( मै. २–३–४ )

तद्यथा क्षुरः क्षुरध्याने हितः, विश्वंभरो वा विश्वंभरकुलाय एवमेवैष प्राज्ञ आत्मेदं शरीरमनुप्रविष्ट आ लोमभ्य आ नखेभ्यः। तमेतमात्मानं एतं आत्मनोऽन्ववस्यति यथा श्रेष्ठिनं स्वास्तद्यथा श्रेष्ठैः स्वैर्भुङ्क्ते यथा वा श्रेष्ठिनं स्वा भुंजन्त, एवमेवैष प्राज्ञ आत्मा एतैरात्मभिर्भुङ्क्ते एवमेवैतं आत्मानं भुंजंति।

(कौ. ४-२०)

(प्राचीन काळीं वालखिल्य नांवाचे ऋषि होते. ते एकदां प्रजापति ऋतूकडे गेले. व त्यांनीं त्यांस असा प्रश्न केला कीं, हे भगवन्, हें शरीर एखाद्या गाडीप्रमाणें अगदीं अचेतन आहे. याचा प्रचोदक कोण हें आपणांस माहीत असल्यास कृपा करून सांगावें. त्यावर त्यांनीं सांगितलें, ह्या देहरथाचा सारथी आत्मा असून तो शुद्ध, शांत, शाश्वत, अज व स्वतंत्र आहे. त्याचा महिमा अगाध आहे. त्याच्यामुळें हें शरीर चेतन असल्यासारखें वाटतें तोच या रथाचा प्रेरक होय.

एकदा वस्तरा वस्तऱ्याच्या पेटींत ठेवला असतां तो जसा ती पेटी भरून राहतो अथवा चुलींत ठेवलेला अग्नि जसा चूल भरून राहतो तद्वतच आत्मा या शरीरांत शिरून नखशिखांत भरून राहिला आहे. एखाद्या श्रीमंताचे नातेवाईक जसे त्याजवर अवलंबून असतात, त्याप्रमाणें सर्व इंद्रियें आत्म्यावर अवलंबून असतात. श्रीमंत मनुष्य ज्याप्रमाणें आपल्या आप्तेष्टाबरोबर जेवतो व त्याचे आप्तेष्ट जसे त्याचे अन्नावर राहतात, त्याप्रमाणेंच आत्मा सर्व इंद्रियांसह उपभोग घेतो व हीं इंद्रियें त्याच्या आश्रयावर जिवंत राहतात.)

वरील उपमेवरून आत्मा सर्व शरीराला व्यापून राहणारा आहे असें सिद्ध होतें. हा अणूपेक्षांहि अणू असलेला जो आत्मा तोच महतापेक्षांहि महान् असून आपल्या हृदयाच्या ठिकाणीं तो राहतो असें उपनिषदांनीं वर्णन केलें आहे. व तोच सर्व इंद्रियांचा स्वामी आहे असें उपनिषदांत ठिकठिकाणीं मांडलेलें आहे. उदाहरणार्थ, उपनिषदांतील पुढील कांहीं वाक्येंच पहा—

अंगुष्ठमात्रः पुरुषो मध्य आत्मनि तिष्ठति । ईशानो भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते ॥ (क. २·२·१२)

अणोरणीयान् महतो महीयानात्मास्य जंतोर्निहितो गुहायाम् ।
(क. ९·२·२०)

एष म आत्माऽन्तर्हृदयेऽणीयान् व्रीहेर्वा यवाद्वा सर्षपाद्वा श्यामाकाद्वा श्यामाकतण्डुलाद्वा, एष म आत्माऽन्तर्हृदये ज्यायान् पृथिव्या ज्यायानन्तरिक्षाज्ज्यायान् दिवो ज्यायानेभ्यो लोकेभ्यः ।
(छा. ३·१४·३)

ग्रीक तत्त्वज्ञांपैकीं ॲरिस्टॉटलनें आमच्या प्राचीन उपनिषद्कारांप्रमाणेंच आत्मा हा हृदयांत राहतो असें म्हटलें आहे. व त्याचीं कारणें तो अशीं देतो कीं, (१) हृदयास रोग झाला असतां मनुष्य निश्चितपणें तावडतोब मरतो. (२) भय, शोक, आनंद इत्यादि विकारांनीं हृदयांत तत्क्षणीं खळबळ माजते. व (३) शरीराच्या इतर कोणत्याहि भागापेक्षां गर्भाशयांत आधीं हृदय तयार होतें. यावरून ॲरिस्टॉटल व उपनिषदें यांच्यांतील साम्य दाखविण्याचा पुष्कळांनीं प्रयत्न केलेला आहे. परंतु तो बरोबर नाहीं. ॲरिस्टॉटलनें आत्मा हृदयांत राहतो हें सिद्ध करण्यासाठीं जीं कारणें दिलेलीं आहेत त्यावरून त्याचें हृदय म्हणजे काळीज होय हें स्पष्ट दिसतें. उपनिषत्कार हृदय शब्द मेंदूजवळची जागा याअर्थीं वापरतात. तैत्तिरीय उपनिषदांत हृदयांतील आत्म्याला मनोमय पुरुष असें म्हटलेलें असून मेंदूच्या ठिकाणीं राहणाऱ्या ब्रह्मास मनस्पति असें नांव दिलेलें आहे. यावरून ॲरिस्टॉटल व व उपनिषत्कार यांच्या मतांत दाखविण्यांत येणारें साम्य बरोबर नाहीं हें उघड दिसेल. अर्वाचीन विचाराप्रमाणें पाहिलें तरी सर्व ज्ञानशक्तीचें केंद्रस्थान मेंदु हेंच असून त्यामुळें उपनिषदांचा विचार किती सूक्ष्म होता व त्या मानानें ॲरिस्टॉटलचा किती स्थूल आहे हें स्पष्ट होतें. हा जो क्षेत्रज्ञ त्याला पुनर्जन्म आहे हें उपनिषदांनीं वारंवार सांगितलेलें आहे. हा पुनर्जन्म प्रत्येक. जीवात्म्याला त्याच्या कर्मानुरूप येत असतो. कर्मानुरूपच आत्म्याला हा स्थूल-

देह प्राप्त झालेला असतो. व कर्मानुरूपच हा देह पडून कांहीं वेळ परलोकवास व पुन्हा दुसरा चांगला वा वाईट देह मिळणें हें नित्याचें चालू आहे व यालाच संसार म्हणतात. ही कल्पना उपनिषदांनीं फारच चांगली मांडलेली आहे.

"बहूनामेमि प्रथमो बहूनामेमि मध्यमः ।
किं स्विद्यमस्य कर्तव्यं यन्मयाद्य करिष्यति ।।
अनुपश्य यथा पूर्वे प्रतिपश्य तथापरे ।
सस्यमिव मर्त्यः पच्यते सस्यमिवाजायते पुनः ।। क. १. १. ५-६

"तद्यथा राजानमायांतमुग्राः प्रत्येनसः सूतग्रामण्योऽन्नैः पानैरावसथैः प्रतिकल्पंतेऽयमायात्ययमागच्छतीत्येवं हैवंविदं सर्वाणि भूतानि प्रतिकल्प्यंत इदं ब्रह्मायातीदमागच्छतीति । तद्यथा राजानं प्रयियासंतमुग्राः प्रत्येनसः सूतग्रामण्योऽभिसमायन्त्येवमेवेममात्मानमंतकाले सर्वे प्राणा अभिसमायन्ति । (बृ. ४-३-३७-३८)

स यत्रायमात्माऽऽबल्यं न्येत्यसंमोहमिव न्येत्यथैनमेते प्राणा अभिसमायंति, स एतास्तेजोमात्राः समभ्याददानो हृदयमेवान्ववक्रामति, स यत्रैष चाक्षुषः पुरुषः पराङ पर्यावर्ततेऽथारूपज्ञो भवति । एकीभवति न पश्यतीत्याहुः . . . एकीभवति न विजानातीत्याहुस्तस्य हैतस्य हृदयस्याग्रं प्रद्योतते तेन प्रद्योतेनैष आत्मा निष्क्रामति चक्षुष्टो वा मूर्ध्नो वान्येभ्यो वा शरीरदेशेभ्यः, तमुत्क्रामन्तं प्राणोऽनूत्क्रामति प्राणमनूत्क्रामन्तं सर्वे प्राणा अनूत्क्रामन्ति तं विद्याकर्मणी समन्वारभेते पूर्वप्रज्ञा च । (बृ. ४.४. १–२)

तद्यथा तृणजलायुका तृणस्यांतं गत्वाऽन्यमाक्रममाक्रम्यात्मानमुपसंहरत्येवमेवायमात्मा इदं शरीरं निहत्य ..... अन्यमाक्रममाक्रम्यात्मानमुपसंहरति । तद्यथा पेशस्कारी पेशसो मात्रामुपादायान्यन्नवतरं कल्याणतरं रूपं तनुत एवमेवायमात्मा इदं शरीरं निहत्य अविद्यां गमयित्वान्यन्नवतरं रूपं कुरुते, पित्र्यं वा गांधर्वं वा दैवं वा ब्राह्मं वान्येषां वा भूतानाम् । स वा अयमात्मा...यथाकारी यथाचारी तथा भवति साधुकारी साधुर्भवति पापकारी पापो भवति

पुण्यः पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन । अथो खल्वाहुः काममय एवायं पुरुष इति स यथाकामो भवति तत्क्रतुर्भवति तत्कर्म कुरुते, यत्कर्म कुरुते तदभिसंपद्यते । (बृ. ४.४. ३–५)

हें जें माझ्या नशीबीं आलें आहे तें कांहीं असामान्य नाहीं. मी जरी अनेक लोकांपेक्षां आधीं परलोकांत जात असलों तरी मी अनेक लोकांबरोबरहि जात आहे. यम मला काय करणार ? आधींच परलोकांत गेलेल्या आपल्या पूर्वजांकडे व त्यांच्या मागून जन्मलेल्या त्यांच्या प्रजेकडे पाहिलें असतां असें दिसून येतें कीं मनुष्य हा गवताप्रमाणें म्हातारा होऊन मृत्युमुखीं पडतो व गवताप्रमाणेंच पुन्हां जन्मास येतो.

एखाद्या राजाच्या आगमनाच्या वेळीं निरनिराळ्या खात्यांतील त्याचे सेवक व नगराधिकारी ज्याप्रमाणें राजा आला, राजा आला असें म्हणून त्याची बडदास्त राखतात व अन्नपाणी इत्यादि त्यास पोचवितात त्याप्रमाणें आत्मा जन्मास येतो त्यावेळीं हीं सर्व भूतें " ब्रह्म आलें, ब्रह्म आलें " म्हणून त्याची सर्व प्रकारें उत्तम व्यवस्था ठेवतात. व राजा जातो त्यावेळीं पुन्हां सारे अधिकारी जसे त्याच्या भोंवतीं जमतात त्याचप्रमाणें मृत्युसमयीं सर्व प्राण आत्म्याभोंवतीं जमतात.

जेव्हां मरणसमयीं सर्व प्राण आत्म्याभोंवतीं जमतात तेव्हां आत्मा सर्व शरीरांतील तेज एकवटून हृदयांत जाऊन बसतो. डोळ्यांतील पुरुष निघून जातो. तेव्हां त्यास कोणतीच वस्तू दिसेनाशी होते. तो स्वकेन्द्रस्थ होतो व त्याचें सर्व लक्ष आपल्या स्वतःकडे वेधतें म्हणून त्यास कांहीं दिसत नाहीं असें लोक म्हणतात. तो आपल्या स्वतःशीं एकरूप होतो म्हणून त्यास बोलतां येत नाहीं, ऐकतां येत नाहीं व कशाचाहि विचार करतां येत नाहीं. नंतर त्या हृदयाचें टोक तेजानें प्रदीप्त होतें व त्या प्रकाशाच्या साह्यानें नेत्र, मस्तक किंवा दुसऱ्या एकाद्या अवयवाच्या द्वारें आत्मा बाहेर निघून जातो. आत्मा गेला म्हणजे त्यामागोमाग प्राण निघून जातो. व प्राण निघून गेला म्हणजे त्या मागोमाग सर्व प्राणहि निघून

जातात. त्याचें ज्ञान, त्याचीं कर्मे व त्याची पूर्वस्मृति हे सर्व त्याच्या बरोबरच जातात.

आणि जसा एखादा सुरवंट एका गवती पात्याच्या टोकास आला म्हणजे दुसरी आश्रयाची जागा प्रथम पाहून नंतर त्यावर चढतो तद्वतच हा आत्मा या देहाचा अंत झाल्यावर प्रथम दुसरा देह पाहून नंतर तेथें जातो. अथवा एखादा सुवर्णकार ज्याप्रमाणें एक सोन्याचा तुकडा घेऊन त्यास जास्त अभिनव व सुंदर रूप देतो त्याप्रमाणेंच हा देह टाकून अज्ञानाचा नाश केल्यावर आत्मा दुसरें जास्त नवीन व अधिक मनोहर रूप धारण करतो. मग तें पितराचें गंधर्वाचें, देवाचें, प्रजापतीचें, ब्रह्माचें किंवा इतर कोणत्याहि भूतमात्राचें असो. हा आत्मा आपल्या कर्मानुसार व आचारानुरूप जन्म घेतो. चांगलें कर्म करणारा साधु होतो. पापकर्म करणारा पापी होतो. याप्रमाणें आपल्या कर्माप्रमाणेंच तो पुण्यवान् अथवा पापी होतो. म्हणून हा पुरुष कायमच आहे असें म्हणतात. ज्याची जशी इच्छा असते तसा त्याचा निश्चय होतो. निश्चयानुरूप कर्म व कर्मानुरूप फळ मिळतें.

उपनिषदांत या कर्मानुसार मिळणाऱ्या गतींचेंहि स्पष्ट स्वरूपांत विवेचन आहे. स्वर्ग व नरक अथवा दिव्यलोक व अधोलोक अशा दोन्ही लोकांचें त्या ठिकाणीं वर्णन आहे. उदाहरणार्थ, उपनिषदांतील पुढील कांहीं वाक्यें पहा.

अनंदा नाम ते लोका अन्धेन तमसाऽवृताः ।
तांस्ते प्रेत्याभिगच्छंत्यविद्वांसोऽबुधो जनाः ।। बृ. ४.४.११
असुर्या नाम ते लोका अन्धेन तमसावृताः ।
तांस्ते प्रेत्याभिगच्छंति ये के चात्महनो जनाः ।। ई. ३
अंधं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते ।। ई.९ आणि बृ.४.४.१०
पीतोदका जग्धतृणा दुग्धदोहा निरिंद्रियाः ।
अनन्दा नाम ते लोकास्तान्स गच्छति ता ददत् । क. १.१.३.

यदा वै पुरुषोऽस्माल्लोकात्प्रेति स वायुमागच्छति तस्मै स तत्र विजिहीते यथा रथचक्रस्य खं स तेन स उर्ध्वं आक्रमते स आदि-

त्यमागच्छति तस्मै स तत्र विजिहीते यथा लम्बरस्य खं तेन स ऊर्ध्वं आक्रमते स चन्द्रमसमागच्छति तस्मै स तत्र विजिहीते यथा दुन्दुभेः खं तेन ऊर्ध्वं आक्रमते स लोकमागच्छत्यशोकमहिमं तस्मिन्वसति शाश्वतीः समाः ।।

अथ यदु चैवास्मिञ्छव्यं कुर्वन्ति यदि च न अर्चिषमेवाभिसंभवन्ति, अर्चिषोरहः, अन्ह आपूर्यमाणपक्षं, आपूर्यमाणपक्षाद्यान् षडुदङङ्ति मासांस्तान्, मासेभ्यः संवत्सरं संवत्सरादादित्यं, आदित्याच्चन्द्रमसं, चन्द्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः । स एनान् ब्रह्म गमयत्येष देवपथो ब्रह्मपथ एतेन प्रतिपद्यमाना इमं मानवमावर्तं नावर्तन्ते नावर्तन्ते । ( छां. ४. १५. ५–६)

ये वै के चास्माल्लोकात् प्रयन्ति चन्द्रमसमेव ते सर्वे गच्छन्ति . . . . . . एतद्वै स्वर्गस्य द्वारं यच्चंद्रमाः तं यत्प्रत्याह तमतिसृजते य एनं प्रत्याह तमिह वृष्टिर्भूत्वा वर्षति, स इह कीटो वा पतंगो वा मत्स्यो वा शकुनिर्वा शार्दूलो वा सिंहो वा परश्वान् वा पुरुषो वाऽन्यो वैतेषु स्थानेषु प्रत्याजायते यथाकर्म यथाविद्यम्। (कौ. १-२)

मूर्ख व अज्ञानी लोक मरणानंतर ज्या लोकीं जातात ते लोक आनंदहीन व अंधतमसानें भरलेले असतात.

आत्मघातकी लोकांस मरणानंतर आसुरी व अंधतमसानें भरलेल्या लोकीं जावें लागतें.

जे लोक चारा खाऊन पाणी प्यालेल्या व दूध दिलेल्या गाई किंवा वांझ गाई दान देतात ते स्वतः आनंदरहित अशा लोकांस जातात.

मनुष्य इहलोक सोडून जातो तेव्हां तो प्रथम वायु लोकास जातो. तेथें वायु आकाशास रथचक्राएवढें छिद्र पाडून त्याच्यासाठीं मार्ग करून देतो. त्यांतून घुसून पुढें तो सूर्यलोकास जातो. या लोकीं सूर्य आकाशास लंबकाएवढें भोंक पाडून वाट करून देतो. त्यांतून पुढें तो चंद्रलोकास जातो. तेथें चंद्र त्याच्यासाठीं आकाशास दुंदुभीएवढें खिडार पाडतो. त्यांतून तो पुढें वर जाऊन शोकरहित व हिमरहित अशा लोकीं पोहोंचतो व तेथें तो कायमचा राहतो.

अरण्यांत राहून जे श्रद्धायुक्त अंतःकरणानें तपश्चर्या करतात ते मृत झाल्यावर लोक त्यांचीं और्ध्वदेहिक कर्में करोत वा न करोत, त्यांचा आत्मा ज्योतिर्मार्गानें सारखा वरवर जातो. तो प्रथम ज्योतीपासून दिवसाकडे, दिवसांपासून शुक्लपक्षाकडे, शुक्लपक्षाकडून उत्तरायणांतील षण्मासाकडे, या षण्मासांपासून अयनाकडे, अयनाहून सूर्याकडे, सूर्याकडून चंद्राकडे, व चंद्रापासून विद्युत्‌कडे जातो. तेथून एक दैवी पुरुष त्यास ब्रह्माकडे घेऊन जातो. या मार्गास देवयान किंवा ब्रह्ममार्ग म्हणतात. या मार्गानें जाणारे जन्ममरणांच्या फेऱ्यांत कधींच सांपडत नाहींत.

जे कोणी या लोकांतून जातात ते चंद्राकडेच जातात. कारण चंद्रमा हेंच स्वर्गाचें द्वार होय. नंतर परतण्याच्या वेळीं वृष्टीच्या द्वारें ते खालीं येतात व आपल्या विद्येप्रमाणें आणि कर्माप्रमाणें कीट, पतंग, मत्स्य, वाघ, सिंह, पुरुष इत्यादि योनींत जन्माला येतात.

शरीरी अथवा शरीरांत प्रत्ययास येणारा हा आत्मा अमर असून त्याच्या स्वरूपाचें ज्ञान झालें कीं मनुष्य मुक्त होतो व हेंच त्याच्या जीविताचें परमसाध्य अथवा हाच परम पुरुषार्थ होय असें उपनिषदांतून प्रतिपादन केलेलें आहे, उपनिषदांतील चार महावाक्यें प्रसिद्धच असून पुढील कांहीं हाच अर्थ व्यक्त करतात.

" आत्मा वा अरे द्रष्टव्यः" (बृ. २-४-५)

"य आत्माऽपहतपाप्मा सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः "

(छां. ८-७.१ )

न ह वै सशरीरस्य सतः प्रियाप्रिययोरपहतिरस्ति अशरीरं वाव सन्तं न प्रियाप्रिये स्पृशतः (छां. ८-१२-१)

अशरीरं शरीरेष्वनवस्थेषु अवस्थितं ।

महान्तं विभुमात्माज्ञं मत्वा धीरो न शोचति (का. १-२-२१).

अप्राणोऽह्यमनाः शुभ्राः (मुं. २-१-२.)

असंगो ह्ययं पुरुषः (बृ. ४-३-१५.)

आत्म्याचा साक्षात्कार घ्यावा. आत्मा सर्व प्रकारच्या कर्मदोषापासून (येथें पुण्य व पाप दोघांनाहि पाप म्हटलें आहे. म्हणून आम्ही कर्मदोष असा सामान्य शब्द घातला. ) अलिप्त आहे. तोच

शोधावा व त्याचा प्रत्यय घ्यावा. जोंपर्यंत मी शरीरी आहे अशी भावना असते तोंपर्यंत प्रिय व अप्रिय यांचा स्पर्शसुद्धां होत नाहीं. अशरीरत्व म्हणजे शरीर नसतांहि अस्तित्व असणें होय. आत्म्याचें अस्तित्व असेंच शरीरनिरपेक्ष असून तें शरीराबरोबर नष्ट होत नाहीं. याप्रमाणें आत्मा हा अमर असून तो महान् व्यापक अशा प्रकारचा आहे व तोच मी आहे अशी पक्की धारणा झाली म्हणजे पुरुष खरा धैर्यशाली होतो व तो कधींहि शोक करीत नाहीं. आत्मा हा प्राण व मनाच्या पलीकडे असून शुद्ध आहे. हा पुरुष असंग आहे."

याप्रमाणें उपनिषदांत क्षत्रज्ञाचें जें वर्णन आढळतें त्यावरून क्षेत्रक्षेत्रज्ञविचाराचें अथवा वेदान्तांतील परिभाषेप्रमाणें सांगावयाचें म्हणजे 'त्वंपदा' संबंधीचे विचार उपनिषद् काळींच पूर्णावस्थेस गेले होते हें स्पष्ट दिसतें. व तेथूनच ते विचार सर्वत्र पसरले. गीता, ब्रह्मसूत्रें व त्यानंतरचें वाङमय म्हणजे या उपनिषदांतील सिद्धांतांचा अनुवाद होय. या बाबतींत इतके वाक्यसमूह पहिल्यावर कोणाचा मतभेद होईल असें वाटत नाहीं. पण हे विचार अथवा तात्त्विक सिद्धांत उपनिषदांत आहेत असें दिसलें तरी अर्वाचीन संशोधक उपनिषदांना वेदापेक्षां अर्वाचीन मानून वेदकालांतील रानटी देवतावादाची व भोगनिष्ठेची उपनिषदकाळीं त्याग, निष्ठा व श्रेष्ठ आध्यात्मिक ज्ञान यांत परिणति झाली असें समजतात. व त्या दृष्टीनें त्यांच्या समाधानासाठीं प्रत्यक्ष वेदच पाहणें अवश्य आहे. त्या दृष्टीनें वेदवाङमयाची तपासणी केली तर प्राचीन गणण्यांत आलेल्या ऋग्वेदांतूनहि हा क्षेत्रक्षेत्रज्ञ विचार अथवा आत्मविचार पूर्णावस्थेस गेला असल्याचें आढळून येईल. आत्म्याला त्याच्या वास्तविक स्वरूपाचें ज्ञान नसल्यामुळें तो संसारसागरांत गटांगळ्या खात असतो. व जर तें ज्ञान झालें तर "आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः। किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत् ।" "अंधं तमः प्रविशन्ति ये अविद्यामुपासते ।" "तर मग कोण कशासाठीं दुःख करून

घेईल ? जें अज्ञानांत असतात तेच संसाराच्या अंधतमांत राहतात." या उपनिषदांतील कल्पनाहि ऋग्वेदांत स्पष्ट शब्दांत दिल्या आहेत. पण लक्षांत कोण घेतो ?

## हे घ्या वेदांतील पुरावे

ऋग्वेदांत एकंदर सोळा आध्यात्मिक सूक्तें आहेत. व इतर प्रार्थना सूक्तांतूनहि हे सिद्धांत सर्वत्र आढळतात. शरीर पांचभौतिक असून आत्मा त्याहून वेगळा आहे व त्याला आपल्या कर्मानुसार वेगवेगळी गति प्राप्त होत असून शरीर मात्र आपल्या मूळ भूततत्त्वांत विलीन होतें, आणि आत्मा हा न जन्मलेला म्हणजे अज असल्यामुळें त्याला मृत्यूहि नाहीं हें ऋग्वेदांतच प्रेतसूक्ताच्या मंत्रांत अग्नीला केलेल्या प्रार्थनेच्या द्वारें स्पष्ट केलें आहे. ऋग्वेदीय ऋषि म्हणतो.

मा एनं अग्ने वि दहः मा अभि शोचः मा अस्य त्वचं चिक्षिपः मा शरीरम् ।
यदा शृतम् कृणवः जातऽवेदः अथ ईं एनम् हिणुतात् पितृऽभ्यः ॥१
शृतं यदा करसि जातऽवेदः अथ ईं एनं परि दत्तात् पितृऽभ्यः ।
यदा गच्छति असुऽनीतिं एतां अथ देवानीः वशऽनीः भवाति ॥२
सूर्यं चक्षुः गच्छतु वातम् आत्मा द्यां च गच्छ पृथिवीं च धर्मणा ।
अपः वा गच्छ यदि तत्र ते हितं ओषधीषु प्रति तिष्ठ शरीरैः ॥३
अजः भागः तपसा तं तपस्व तं ते शोचिः तपतु तं ते अर्चिः ।
याः ते शिवाः तन्वः जातऽवेदः ताभिः वह एनम् सुऽकृतां ऊं (इति) लोकम् ॥४
अव सृज पुनः अग्ने पितृऽभ्यः यः ते आऽहुतः चरति स्वधाभिः ।
आयुः वसानः उप वेतु शेषः सं गच्छतां तन्वा जातऽवेदः ॥५

(ऋ. मं. १० सू. १६)

(हे अग्निदेवा, ह्या मृत झालेल्या आमच्या आप्ताला कसा तरी होरपळून टाकूं नकोस. याला शोक होईल असेंहि करूं नकोस. याची कातडी फाडून इकडे तिकडे फेकून देऊं नकोस. याचें

शरीरहि भलतीकडेच टाकूं नकोस. तर याला तूं व्यवस्थित रीतीनें दग्ध केलेंस म्हणजे हे सर्वज्ञा, पितरांमध्यें नेऊन ठेव ॥१

सर्वज्ञ अग्ने, याला तूं व्यवस्थित रीतीनें दग्ध केलेंस म्हणजे मग त्याला पितरांकडे नेऊन सोड, कारण जेव्हां त्याला आत्मबलाची योग्यता प्राप्त होईल तेव्हांच तो दिव्य विबुधांना वश करूं शकेल. ॥२

हे मृतजीवा, तुझें नेत्रतेज सूर्यामध्यें जाऊन मिळो. तुझा प्राण वायूंत जाऊन मिसळो. तुझ्या धर्मकर्मानुरूप तूं आकाशांत जा. पृथिवींत जा. उदकांत जा. किंवा तुला आवडत असेल तर नूतन शरीरासह वनस्पतींतहि वास्तव्य कर. ॥३

हे जातवेदा, याचा जो भाग अज (जननरहित) आहे त्याला तूं तपोज्वालांनीं तप्त कर. तसेंच तुझ्या शोचिज्वाला व अर्चिज्वाला याला तप्त करोत. तुझ्या ज्या सुखद तनु त्यांनीं तूं याला सुकृति जनांच्या लोकांप्रत घेऊन जा ॥४

हे अग्निदेवा, हा मृतमनुष्य कीं ज्याची तुझ्यामध्यें आम्ही आहुति दिली आहे आणि जो तुझ्या स्वाभाविक सामर्थ्यानें आतां संचार करूं लागला आहे त्याला तूं येथून पुन्हा हलवून पितरांच्याकडे पाठवून दे. तो आतां नूतन आयुष्याचें वस्त्र परिधान करो. त्याचें जें कांहीं इच्छित राहिलें असेल तेंहि त्याला प्राप्त होवो. सकलवस्तुज्ञा देवा, त्याला दिव्य शरीराची जोड मिळो.)

या सूक्तांतील "अजो भागः" या स्पष्ट निर्देशावरून जीव जन्मलेला नाहीं व म्हणूनच तो अमर आहे ही ऋषींना पूर्णपणें कल्पना असल्याचें दर्शवीत नाहीं काय? तसेंच "सूर्यं चक्षुर्गच्छतु" इ. उल्लेखांवरून पांचभौतिक शरीराचे ते ते भाग त्या त्या पंचमहाभूतांत विलीन होतात याचीहि त्यांना जाणीव स्पष्ट दिसते. तसेंच "गच्छ धर्मणा" या स्पष्ट उल्लेखावरून जीवाचें संसरण कर्माच्या अनुसार होतें हा कर्मतत्त्वाचा सिद्धांत त्यांना संपूर्ण अवगत आहे हेंहि स्पष्टच होत नाहीं काय? अमर जीवात्मा जड देहाच्या आश्रयानें राहतो. तो अमर असूनहि मर्त्य देहामुळें त्याचे

गुणधर्म त्याचे अंगीं चिकटविले जातात. हें पुढील ऋचांवरून अधिकच स्पष्ट होईल. (ऋ. १–१६४)

" अनत् शये तुरगातु जीवम् एजत् ध्रुवं मध्ये आ पस्त्यानाम् ।
जीवो मृतस्य चरति स्वधाभिरमर्त्यो मर्त्येना सयोनिः ।। ३०
अपाङ् प्राङ् एति स्वधया गृभीतः अमर्त्यो मर्त्येन सयोनिः ।
ता शश्वंता विषूचीना वियंता नि अन्यं चिक्युर्न नि चिक्युरन्यम् ।।३८

" श्वासोच्छ्वास करणारी, चंचल सचेतन आणि हालचाल करणारी अशी जी वस्तु आहे ती या देहरूपी डोलाऱ्यांत पक्की राहिली आहे. हा जीवात्मा मृत म्हणजे जड, पदार्थांच्या नियमानुरोधानेंच चालतो. मृत देह आणि अमर आत्मा हे एका ठिकाणींच असतात. ह्या आत्म्याचें अस्तित्व त्याच्या व्यापारांमुळेंच कळतें. तो कधीं मागें राहतो आणि कधीं पुढेंहि सरसावतो, तो अमर असूनहि या मर्त्य देहाबरोबरच जन्मास येतो. ते दोन्ही नित्य संलग्न असून सर्व ठिकाणीं नाना प्रकारांनीं जात असतात. परंतु लोकांना शरीरमात्र दिसतें, आत्मा दिसत नाहीं.

ऋग्वेदांमध्यें याप्रमाणें कर्मतत्त्व, जडाजडसंयोग, आत्म्याचें अमरत्व व परलोक यांचें वर्णन असलें तरी पुनर्जन्माची कल्पना मात्र मुळींच नाहीं अशी डॉ. केतकरांसारख्यांनींहि आपली भ्रामक समजूत करून घेतली आहे. डॉ. केतकर म्हणतात " आत्म्याला पुनर्जन्म असून या पुनर्जन्म परंपरेला अंतपार नाहीं. या कल्पनेचा पुढच्या पुढच्या शतकांतील लोकांवर अत्यंत पगडा बसला आहे व त्यांच्या सर्व तत्त्वज्ञानांत ती कल्पना रूढ होऊन बसली आहे. परंतु या कल्पनेचा मागमूस सुद्धां ऋग्वेदांत नाहीं. तेव्हां यावरूनही आपणांस असें स्पष्ट दिसतें कीं विचारांची व कल्पनांची ऋग्वेद सूक्तांतील दिशा आणि तदुत्तरकालीन वाङमयांतील दिशा या परस्परांपासून अगदीं भिन्न आहेत." (ज्ञानकोश. भाग २ रा) डॉ. केतकरांचें हें विधान पूर्णपणें चुकीचें आहे असें ऋग्वेदांतीलच उताऱ्यांवरून दाखवून देतां येतील. ऋग्वेदाच्या प्रथम मंडळांतील १६४ व्या सूक्ताकडे जर बारकाईनें पाहिलें तर केतकरांच्या या

विधानांत तथ्य नाहीं हें स्पष्टच दिसेल. या १६४ व्या सूक्तांत संपूर्णच आत्मविषयक विचार स्पष्टपणें मांडलेला आहे. पण त्या उल्लेखापूर्वी केवळ पुनर्जन्माच्या मुद्यापुरता ऊहापोह करून विख्यात तत्त्वज्ञ प्रा. रानडे यांनीं आपल्या " ए कन्स्ट्रक्टिव्ह सर्व्हे ऑफ उपनिषदिक फिलॉसफी " या विख्यात ग्रंथांत या पद्धतीच्या सर्व प्रकारच्या आक्षेपकांना जें उत्तर दिलें आहे तेंच समर्पक असल्यानें त्याचा येथें उल्लेख करतों. प्रा. रानडे म्हणतात; " ऋग्वेदांतील ऋषि जगतास चिन्मयच मानून थांबले नाहींत. ऋग्वेदांत एक अत्यंत महत्त्वाचें स्तोत्र असून त्याकडे तज्ज्ञांचें लक्ष्य अद्याप जावें तितकें गेलें नाहीं. या स्तोत्रांतील निदान दोन श्लोकांचा रॉथ, भूटलिंक, व गेल्डनर यांनीं जो अर्थ केला आहे त्याकडेहि दुर्लक्ष करून ऋग्वेदांत पुनर्जन्माची कल्पना नाहीं असें म्हणत राहावें हें मोठें आश्चर्य होय. हें स्तोत्र म्हणजे ऋग्वेदांतील प्रथम मंडलांतील १६४ वें गूढार्थक स्तोत्र होय. हें सर्व स्तोत्र हिरॅक्लायटस्‌प्रमाणें परस्परविरोधी भाषेंत लिहिलें असलें तरी त्यांत सर्व प्रश्नांचा विचार मानसशास्त्रदृष्टया केला आहे ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. या मंत्रदृष्टया ऋषीनें म्हटलें आहे कीं पृथ्वीचें जीवितसार असलेला व तिला चैतन्य देणारा असा अस्थिविहीन आत्मा अस्थिमय शरीर कसें धारण करतो ? याचें निश्चित व पूर्ण ज्ञान कुणास तरी आहे काय ? आत्मा हा सचेतन व वेगवान् जीविततत्त्व असून तो जन्मास येतो व नाहींसा होतो, मागेंपुढें फिरत राहतो. त्याचा शरीराशीं निकट संबंध आला तरी त्याची गति या शरीराविरुद्ध असते. असें जें आत्म्याबद्दल या शेवटच्या दोन श्लोकांत सांगितलें आहे त्यावरून ऋग्वेदांत पुनर्जन्माची कल्पना होती हें सिद्ध करण्यास भरपूर पुरावा या श्लोकांत सांपडतो असें रॉथ, भूटलिंक व गेल्डनर यांनीं जें प्रतिपादिलें आहे तें अगदीं बरोबर आहे. ३८ व्या श्लोकांत पूर्व व परा या मार्गांनीं बिनचूक जाणाऱ्या एकीकृत व विकीर्ण तेजानें तळपणाऱ्या व इहलोकीं पुनःपुन्हां

जन्मास येणाऱ्या शरीरपालकास आपण प्रत्यक्ष ( कदाचित मनश्चक्षूनें पाहिलें असें जेव्हां कवि स्वतः सांगतो तेव्हां या पुनर्जन्म वादांतील मुख्य मुद्द्यांचा कायमचा निकाल लागला असें म्हटलें पाहिजे. तिसाव्या श्लोकांत प्राणयुक्त, वेगवान्, सचेतन जीविततत्त्वाचा निर्देश केला आहे. व त्यापुढें लगेच ३१ वा श्लोक येतो. तेव्हां या श्लोकांतील "शरीर गोपा" याचा अर्थ आत्मा असाच होतो हें उघड आहे. शिवाय "वरीवर्ति" या पौनःपुन्यदर्शक शब्दाचा अर्थ हा आत्मा वारंवार इहलोकीं जन्मास येतो असा होतो. "

ऋग्वेदांतील पुनर्जन्माच्या उल्लेखासंबंधीं ज्यांना ज्यांना संशय असेल त्यांनीं प्रा. रानडे यांचें हें विवेचन मनन करण्यासारखें आहे. ज्या १६४ व्या (ऋ. प्रथम मंडल) सूक्तासंबंधीं मी नुकताच उल्लेख केला त्यांतील पुढील उतारे ऋग्वेदांतील क्षेत्रज्ञविषयक सर्व धारणांवर प्रकाश पाडण्यास समर्थ आहेत ते असे :—

अपश्यं गोपां अनिपद्यमानं आ च पराच पथिभिश्चरन्तम् ।
स सध्रीचीः स विषूचीर्वसानः आवरीवर्ति भुवनेषु अन्तः ॥३१
य ईं चकार न सो अस्य वेद य ईं ददर्श हिरुक् इत् नु तस्मात् ।
स मातुर्योना परिवीतो अंतर्बहु प्रजा : निर्ऋतिम् आविवेशा॥ ३२
न विजानामि यत् इव इदं अस्मि निण्यः संनद्धो मनसा चरामि
यदा मा आ अगन् प्रथमजाः ऋतस्य आत इत् वाचो अश्नुवे भागम् अस्याः ॥३७

देहधारक आत्मा कधींहि न थकतां आपल्या नेहमीच्या पद्धतीनें येथें येतो व परत जातो हें मीं पाहिलें आहे. संयोगाच्या आणि वियोगाच्या अशा दोन्ही सामर्थ्यांनीं युक्त होऊन तो पुन्हां पुन्हां जगामध्यें परत येत असतो ॥ ३१ ज्यानें ह्याला निर्माण केलें त्याला हा जाणत नाहीं, कारण जो ह्याला एकसारखा पहात असतो तो ह्याच्यापासून गुप्त राहिला आहे; आणि म्हणूनच हा मनुष्यप्राणी मातेच्या उदरांत गुंडाळला जाऊन आणि अनेक जन्म घेऊन दुःखसागरांत बुडून गेलेला आहे. ॥ ३२ हें सर्व मीच आहे

असें मी जाणत नाहीं, म्हणून मनानें बांधला जाऊन माझी विलक्षण तऱ्हा होऊन मी भ्रमण करीत आहे. परंतु परमतत्त्वांपासून पहिल्यानें उत्पन्न झालेलें चैतन्य जेव्हां माझ्यामध्यें आलें तेव्हांपासून ह्या इश्वरी वाचेचा अंश मला प्राप्त झाला. ॥३७

तात्पर्य; आत्मा हा देह, इंद्रियें, मन, प्राण, बुद्धि इत्यादि संघाताहून वेगळा असून वस्तुतः तोच सर्वव्यापक व जगद्रूपानें नटलेलें परब्रह्म होय; पण हें सर्व तो जाणत नाहीं. या स्वस्वरूपाच्या अज्ञानामुळेंच केवळ तो संसारचक्रांत परिभ्रमण करीत असतो. अज्ञानामुळें आलेल्या या जीवदशेंत कर्मतत्त्वाचें बंधन, परलोकगति, कर्मानुसार मिळणारा व वारंवार येणारा पुनर्जन्माचा फेरा व त्यांतहि उच्चनीचता इतकेंच नव्हे तर पाप व पुण्यात्मक कर्मामुळें मिळणारे वेगवेगळे लोक हे सर्व भारतीय अध्यात्मशास्त्रांतील परिणतावस्थेंतले व आजपर्यंत अविचल असलेले क्षेत्रविषयक अथवा पिण्डाच्या विचारांसंबंधींचे सिद्धांत ऋग्वेदकाळींच पूर्णावस्थेस पोहोंचलेले होते हें प्रत्यक्ष ऋग्वेदांतीलच उल्लेखांवरून सिद्ध होतें. या विचारांत यानंतर उपनिषद् काळांत कोणतीहि भर पडलेली नाहीं. या पिण्डविचाराइतकाच ब्रह्माण्डविषयक अथवा विश्वविषयक विचार वेदकाळीं परिणतावस्थेस पोहोंचलेला होता काय? वेदामध्यें अनेक देवतांचा उल्लेख असून ऋग्वेदांतील सूक्तें म्हणजे तर या अनेकानेक देवतांचींच गायनें होत. अशा अवस्थेंत अनेकांत अनुस्यूत असणाऱ्या एकत्वाची परमात्मा, परब्रह्म या नांवानीं पुढें दृढमूल झालेल्या सत्यत्वाची वैदिक लोकांना कशी ओळख असेल? वस्तुतः ज्यांना आत्म्याची पूर्ण ओळख होती त्यांना परमात्म्याची मात्र ओळख नव्हती असें मानणें हास्यास्पदच आहे. तरी पण न्यूनगंडामुळें ज्यांचें प्रत्यक्ष पुराव्यावांचून अडतेंच त्यांच्या दृष्टीनें वैदिक राष्ट्राच्या आत्मविषयक धारणेचें दिग्दर्शन केल्यानंतर आतां त्यांच्या परमात्मविषयक धारणेकडे वळणें क्रमप्राप्तच ठरतें. पुढच्या व्याख्यानांत तिचें समालोचन करूं.

### व्याख्यान तेरावें

# वैदिक राष्ट्राची परमात्मविषयक धारणा

मागच्या व्याख्यानांत वैदिक राष्ट्राच्या ऋग्वेदकाळींच सिद्ध असलेल्या आत्मविषयक धारणेचा उल्लेख व ऊहापोह केला आहे. वैदिक राष्ट्राच्या परमात्मविषयक धारणेसंबंधीं आत्मविषयक धारणेपेक्षांहि अधिकच अपसमज पसरलेले अथवा पसरविलेले आहेत. वाङमयावरून वाङमयाची तपासणी करून जें सरळ दिसतें तें ग्रहण करण्याऐवजीं गृहीत कृत्यांनुसार वाङमयीन पुराव्याला विकृत करण्याची जी खोड पाश्चात्यांच्या वैचारिक संस्कारांनीं 'तथाकथित' भारतीय संशोधकांना लागलेली आहे त्याचेच हे आविष्कार होत. नासदीय सूक्तासारख्या स्पष्ट अद्वैतवादी सूक्तांत केतकरांच्या सारख्या संशोधकालाहि संशयवाद दिसतो! यावरून या भ्रांत कल्पनेचा पगडा केवढा विलक्षण आहे याची कल्पना येईल. आपण प्रथम भारतीय तत्त्वज्ञान व उपनिषदें यांची परमेश्वरविषयक विकसित समजली जाणारी धारणा काय आहे तें पाहूं व त्याहून वेगळी अथवा प्राथमिक अवस्थेंतली धारणा वेदांत आहे. किंवा तीच धारणा वेदांत आहे हें प्रत्यक्ष वैदिक ऋचांच्याच आधारें ठरवूं.

हें संपूर्ण विश्व व्यक्तमध्य आहे असें श्रीमद् भगवद्‌गीतेनें सांगितलें आहे. याचा अर्थ असा कीं सृष्टीचें मूळ तत्त्व अव्यक्त असून ती अव्यक्त दशेंतच शेवटीं विलीनहि होते. आणि मध्यंतरींच काय ती ती सृष्टि व्यक्त दशेंत येते. या सृष्टींतहि जड व चेतन अथवा उपभोग्य व उपभोक्ता व जाणण्याची वस्तू आणि जाणणारा असें द्वंद्व दृष्टोत्पत्तीस येतें. या द्वंद्वालाच भारतीय तत्त्वज्ञांनीं सृष्टीचें

मूळ मानलें असून जड-चैतन्याचा हा द्वंद्वात्मक प्रवाह अनादिसिद्ध आहे असें त्यांचें म्हणणें आहे. या द्वंद्वाचें स्वरूप व त्याचें कार्य सांगतांना गीताकार (अ. १३) म्हणतात :–

पुरुषं प्रकृतिं चैव विद्धयनादी उभावपि ।
विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ।। १९
कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।
पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ।।२०

( प्रकृति व पुरुष हीं दोन्हीहि अनादि आहेत असें समज. विकार व गुण हे सर्व प्रकृतीपासून उद्भवतात असें समज. कार्य म्हणजे देह व कारण म्हणजे इंद्रियें यांच्या कर्तृत्वास प्रकृति कारण आहे. आणि कर्ता नसूनहि सुखदुःखांचा उपभोग घेण्यास पुरुष कारण आहे.) जगाच्या अपेक्षेनें हें द्वंद्व अनादिसिद्ध म्हटलें तरी ज्याच्या गर्जनेसमोर इतर शास्त्रांची कोल्हेकुई बंद पडते हें यथार्थ आहे असें लोकमान्य टिळकांनींहि म्हटलें त्या वेदान्तकेसरीनें अशी गर्जना केलेली आहे कीं " जर नानात्वाचें मूळ प्रकृतिद्रव्याच्या एकत्वांत पाहण्याची सांख्य वगैरे द्वंद्ववाद्यांची पद्धति युक्तिसिद्ध व शास्त्रीय आहे तर या द्वंद्वापर्यंत येऊन थांबणें अर्थातच अशास्त्रीय ठरते. ती शेवटपर्यंत चालवावयाची म्हणजे या प्रकृतिपुरुषरूप द्वंद्वाचाहि अंतर्भाव कोठेंतरी एकत्वांतच होणें आवश्यक आहे. म्हणून प्रकृति-पुरुषापलीकडे एक तिसरें सर्वव्यापक अमृत व अव्यक्त तत्त्व असून सर्व सृष्टीच्या मुळाशीं तेंच आहे. त्याच्या इच्छाशक्तीनें जडशक्ति कार्यप्रवण होते व व्यवहार करते. प्रकृति सगुण असल्यामुळें व जें जें सगुण असतें तें तें नाशवंत असतें असा जगाचा अनुभव असल्यामुळें हें एकमात्र अद्वितीय तत्त्व निर्गुण आहे व म्हणूनच प्रकृतीचा नाश झाल्यावरहि तें टिकून राहातें. व तेंच सृष्टीचें खरें व नित्य तत्त्व होय. गीताकार म्हणतात :–

" परस्तस्मात्तु भावोऽन्यो व्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।
यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ।। गीता ८-२०

द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६
उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।
यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७
यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।
अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८
—( गीता अध्याय १५ )
अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।
विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ गीता २-१७
मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।
मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ गीता ७-७
मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।
मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ गीता ९-४

( या अव्यक्तापलीकडचा दुसरा सनातन अव्यक्त पदार्थ सर्व भूतें नष्ट झालीं तरी नष्ट होत नाहीं. या लोकांत क्षर आणि अक्षर हे दोन पुरुष आहेत. क्षर म्हणजे नाशिवंत भूतें आणि अक्षर म्हणजे या सर्व भूतांच्या मुळाशीं असलेलें प्रकृतिरूप अव्यक्त तत्त्व. परंतु जो पुरुषोत्तम तो या दोहोंहून भिन्न आहे. त्याला परमात्मा असें म्हणतात. तोच अव्यक्त ईश्वर सर्व त्रैलोक्यांत भरलेला असून सर्वांचें पोषण करतो. ज्याअर्थी मी क्षराच्या पलीकडचा व अक्षराहूनहि उत्तम पुरुष आहे त्याअर्थी लोकव्यवहारांत आणि वेदामध्यें पुरुषोत्तम या नांवानें प्रसिद्ध आहे. हें सर्व जग ज्यानें विस्तारलें किंवा व्यापलें आहे, तें मूळ आत्मस्वरूप ब्रह्म अविनाशी आहे हें लक्षांत ठेव. या अव्यक्त तत्त्वाचा नाश करण्यास कोणीहि समर्थ नाहीं. माझ्याहून पलीकडचें, हे धनंजया, दुसरें कांहीं नाहीं. दोऱ्यांत अनेक मणी ओवावे त्याप्रमाणें माझ्या ठायीं हें सर्व ओवलेलें आहे. मी आपल्या अव्यक्त स्वरूपानें हें सर्व जग विस्तारिलें किंवा व्यापिलें आहे. माझ्या ठायीं सर्व भूतें आहेत. मी त्यांच्या ठायीं नाहीं. )

पुढें आणखी स्पष्टीकरण करतांना गीताकार म्हणतातः—

अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाऽहमहमौषधम् ।
मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ।। १६
पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः ।
वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेवच ।। १७
गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।
प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ।। १८

—( गीता अध्याय ९ )

(क्रतु म्हणजे श्रौतयज्ञ मी; यज्ञ म्हणजे स्मार्तयज्ञ मी; स्वधा म्हणजे श्राद्धांत पितरांस अर्पण केलेलें अन्न मी; औषध म्हणजे वनस्पतीपासून उत्पन्न झालेलें अन्न मी; यज्ञांत हवन करतांना म्हणतात ते मंत्र मी; तूप मी; अग्नि मी; आणि अग्नींत टाकलेल्या आहुतीहि मीच आहे. या जगताचा पिता, माता, आधार व पितामह मी; जें कांहीं पवित्र किंवा ज्ञेय आहे तें आणि ओंकार ऋग्वेद, सामवेद, व यजुर्वेदहि मीच आहे. सर्वांची गति, सर्वांचा पोषक प्रभु, साक्षी, निवास, शरण, सखा, उत्पत्ति, प्रलय, स्थिति, निधान आणि अव्ययबीजहि मीच आहे.) तात्पर्य, आत्यंतिक सत्य पदार्थ एका सत्तारूप परब्रह्माविना दुसरा कोणताच नसून नामरूपात्मक प्रपंचांतील नामें व रूपें बाजूला काढलीं तर ज्ञानदृष्टीनें दुसरें कांहींच उरत नाहीं. व तेंच सत्तारूप आत्यंतिक सत्यपदार्थ असलेलें परब्रह्म म्हणजे परमात्मा असून त्याच्याशिवाय या जगतांत दुसरें कांहींच सत्य नसल्यामुळें जगाला त्याच्या व्यतिरिक्त वेगळें असें खरें अस्तित्व नाहीं. तें परमेश्वरी तत्त्व किंवा ब्रह्म एकजिनसी असून तें अनन्यसदृश, स्वयंप्रतिष्ठित व स्वयंप्रज्ञ आहे. तें अद्वितीय असल्यामुळें त्याच्या बाहेर किंवा त्याहून भिन्न असें या जगांत कांहींच नाहीं. त्यामुळें तो एकच सत्पदार्थ असून इतर सर्व असत्पदार्थ होत. द्रष्टा, दृश्य व दर्शन इत्यादि सर्व भेद केवळ अज्ञानामुळें उत्पन्न झालेले असून परमसत्यांत या त्रिपुटीचा मागमूसहि नाहीं. निखिल चराचर सृष्टीचें उगमस्थान व त्यांतील सर्व

शक्तीचें आणि प्रकाशाचें मूळ कारण हें परब्रह्मच असून तेंच सर्व जगताचें सार होय. परमेश्वराचें हें स्वरूप पाहिल्यावर स्वाभाविकच अशी प्रश्नमाला डोळ्यासमोर उभी राहते कीं समर्थांच्या परिभाषेप्रमाणें "रिता ठाव या राघवावीण नाहीं" ही जर गोष्ट खरी आहे तर अविनाशी, निर्गुण, अमृत, दिक्कालांनीं अमर्यादित, स्वतंत्र व एकजिनसी अशा परब्रह्मरूपी कारणापासून सगुण, विनाशी, मरणधर्मी, मर्यादित व नानात्मक अशी सृष्टि कशी उत्पन्न झाली? सत्कार्यवादाचा असा सिद्धांत आहे कीं कारणाचे गुण कार्यांत अन्वित होत असतात. अत्यंत विभिन्न गुणधर्मांच्या कारणांपासून कार्य कधींच निष्पन्न होत नाहीं. हा आक्षेप बिनतोड असला तरी भारतीय तत्त्वज्ञानानें याचें उत्तर सुलभ रीतीनें दिलें आहे. सत्कार्यवादाचा किंवा सांख्यांच्या गुणपरिणामवादाचा सिद्धांत कार्य व कारण हीं दोन्ही एका वर्गांतील असतात तेव्हांच लागू पडतो. सत्य व निर्गुण परब्रह्मरूपी कारण व सगुण जगद्रूपी कार्य हीं दोन्ही एका कोटींतलीं नाहींत. जेथें एकच पदार्थ सत्य व दुसरा केवळ त्याचा देखावा आहे तेथें सत्कार्यवादाचा सिद्धांत कसा लागू पडणार? जगाला मायिक या शब्दानें अद्वैत तत्त्वज्ञान्यांनीं संबोधून या प्रश्नाचें चपखल उत्तर दिलें आहे. सूर्य एकच आहे हें निश्चित झाल्यावर त्याच्या पाण्यांत पडलेल्या प्रतिबिंबाला सत्कार्यवादाच्या सिद्धांताची उपपत्ति लावतां येईल काय? शास्त्रीय पद्धतीनें चंद्राचें स्वरूप निश्चित केल्यावर नुसतें डोळ्यांनीं दिसणारें व कविप्रतिभांचा आश्रय असलेलें त्याचें स्वरूप हें अतिदीर्घ अंतरामुळें आणि डोळ्यांच्या मर्यादित शक्तीच्या दोषामुळें अर्थातच मिथ्या दिसणारेंच ठरणार नाहीं काय? मग निर्गुण परब्रह्मच तेवढें सत्य व ज्ञानशून्य इंद्रियादिकांना भासणारा नामरूपात्मक प्रपंच त्यांच्या मर्यादित सामर्थ्याच्या दोषामुळें उत्पन्न होणारा भ्रम अथवा देखावा आहे असें म्हणावयास अडचण कोणची? एकाच अविकार्य वस्तूवर मनुष्याचीं निरनिराळीं इंद्रियें आपापल्या परी अनेक नामरूपात्मक गुणांचा आरोप करून नाना

प्रकारचा देखावा उत्पन्न करीत असतात. मूळच्या वस्तूंत त्या देखाव्याचीं बीजें असण्याचें कांहीं कारण नाहीं. आजचीं इंद्रियें बदलून त्या जागीं नवीं दुसरीं इंद्रियें निर्माण झालीं तर आज आपणांस जें सृष्टीचें स्वरूप दिसतें तसें न दिसतां तें वेगळेंच दिसूं व भासूं लागेल. समजा कीं, कांहीं कारणानें आपली आजची नेत्र-शक्ति जाऊन त्या जागीं क्ष किरणांची शक्ति एकाएकी नेत्रांत उत्पन्न झाली, तर आज आपणांस जें जग दिसतें त्याहून अजिबात वेगळाच देखावा दिसूं लागेल. इतकेंच नव्हे तर, ती क्ष किरणांची शक्ति जर सतत टिकून राहिली तर मानवी शरीराच्या व जगाच्याहि साऱ्या सौंदर्याच्या व्याख्याच पार बदलून जाऊन त्या जागीं नव्या व्याख्या, नवीं काव्यें, नवीं उपमानें व नवीं सौंदर्यमूल्यें यांची निर्मिति होईल. जगामध्यें नेहमीच दोन दृष्टिकोन असतात. एक व्यावहारिक अथवा कामचलाऊ (Common sense view) व दुसरा शास्त्रीय व सत्य शोधून काढणारा दृष्टिकोन (Scientific view) होय. आजचे शास्त्रज्ञ मनुष्याच्या बुद्धीस अगम्य अशा कल्पनातीत वेगानें फिरणाऱ्या गतिस्वरूप विद्युत्परमाणूंचे संघ (Electrons) म्हणजेच पदार्थमात्रांचे वास्तविक स्वरूप होय असें सांगतात. एका मूलद्रव्यांत ठराविक वेळांत घडलेल्या आंदोलनांच्या निरनिराळ्या संख्या म्हणजेच प्रकाश व ध्वनि होत. ध्वनि म्हणजेच प्रकाश व प्रकाश म्हणजेच ध्वनि. व्यक्त सृष्टींत जड व स्थिर अशी कांहींहि वस्तू नसून सर्वत्र अनंत, अपरिमित असलेली ही जी गति तिचेच मनुष्यशरीर, मानवी इंद्रियें, मेंदू वगैरे अभिन्न भाग आहेत. कालक्रम आणि गति यांच्या परस्पर-प्रमाणावरून सृष्टींतील पदार्थांचा वेगवेगळेपणा भासत असतो. हें आजचें वैज्ञानिक सत्य आहे. पण ही गोष्ट आजच्या स्थूल दृष्टीनें प्रत्ययास येणारी आहे काय ? व व्यवहार आधारावयाचा तो या शास्त्रीय दृष्टिकोनावर आधारतां येईल काय? व्यवहार (Common sense view) हा स्थूल दृष्टि व स्थूल प्रत्यय यांच्या अनुसारच व्हावयाचा असतो. पण सत्य काय आहे म्हणून

जर विचारावयास गेलें तर या गतिस्वरूपतेकडेच यावें लागतें. शास्त्रीय ज्ञान अमर्याद वाढून श्रेष्ठ शास्त्रीय सत्यें रोज परिचित होत जाणाऱ्या आजच्या काळांत तरी मूळस्वरूप वेगळें व देखावा वेगळा; आणि देखाव्यानें मूळस्वरूपांत कांहींहि बदल घडून येत नाहीं, कारण कीं देखाव्याचीं कारणें वेगळीं असतात हें विवर्तवादाचें सत्य शंकास्पद वाटण्याचें कांहींहि कारण उरलेलें नाहीं. जगाला उत्पन्न करणारी त्रिगुणात्मक माया अथवा प्रकृति (Matter) ही याप्रमाणें एकादी स्वतंत्र वस्तु नसून एका निर्गुण ब्रह्मावरच मनुष्याचीं इंद्रियें नेहमीं अज्ञानानें सगुण देखाव्याचा अध्यारोप करीत असतात. एकदां निर्गुण परब्रह्मांतच त्रिगुणात्मक प्रकृतीचा देखावा दिसू लागल्यावर तिचा पुढील विस्तार सत्कार्यवादाच्या सिद्धान्तानुरूपच भारतीय तत्त्वज्ञांनीं स्वीकारलेला आहे. व त्यामुळेंच हा देखाव्याचा विस्तार नियमबद्ध असतो असें भारतीय तत्त्वज्ञांचें म्हणणें आहे. विश्वाचा विचार करीत असतांना तात्त्विक दृष्टीनें नामरूपें व त्यांच्या पांघरुणाखालचें नित्य तत्त्व असे विश्वाचे दोन वर्ग होतात. यांपैकीं नामरूपांनाच सगुण माया किंवा प्रकृति असें म्हणतात. पण नामरूपें बाजूला काढलीं म्हणजे जें नित्यद्रव्य शिल्लक राहतें तेंच नित्य व अव्यक्त तत्त्व म्हणजे परब्रह्म होय. हें परब्रह्म अथवा हा परमात्मा हेंच एकजिनसी, त्रिकालाबाधित सत्य मानल्यावर भारतीय तत्त्वज्ञान पुढें असें सांगतें कीं क्षेत्रक्षेत्रज्ञविचारांतील संपूर्ण क्षेत्र मायिक असून जो क्षेत्रज्ञ अथवा आत्मा म्हणून सांगितला तो नित्यस्वरूपी परब्रह्माच्या कोटींतला आहे. त्यामुळें ब्रह्म आणि आत्मा हे एकच होत. किंबहुना आपल्या स्वतःशिवाय या जगांत दुसरें कांहींहि नाहीं. भगवान् गीतेंत सांगतात :—

ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।
मनःषष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ।। गीता १५–७
अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्माऽयमव्ययः ।
शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ।। गीता १३-३१

यथा प्रकाशयत्येक: कृत्स्नं लोकमिमं रवि: ।
क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ।। गीता १३-३३

( माझाच सनातन अंश जीवलोकीं जीव होऊन प्रकृतींत असणारीं मनासह सहा इंद्रियें आपल्याकडे ओढून घेतो. अनादि व निर्गुण असल्यामुळें हा परम आत्मा कांहीं करीत नाहीं व त्याला कोणत्याहि कर्माचा लेप म्हणजे बंध लागत नाहीं. ज्याप्रमाणें एकटा सूर्य सगळें जग प्रकाशित करतो त्याप्रमाणें हा क्षेत्रज्ञ सर्व क्षेत्राला म्हणजे शरीराला प्रकाशित करीत असतो. )

तात्पर्य, व्यक्त व अव्यक्त अथवा क्षर व अक्षर सृष्टीचें मूलतत्त्व असलेलें परब्रह्म व मानवी देहपिंडांत क्षेत्रज्ञ रूपानें वास करून राहणारी अस्मिता ही मुळांत एकच असून पिंडीं व ब्रह्मांडीं सर्वत्र एकच पुरुषोत्तम भरलेला आहे. असें भारतीय संस्कृतीचें विकसित व शाश्वत स्वरूपाचें तत्त्वज्ञान आहे. व्हाईटहेड सारखे आधुनिक तत्त्वज्ञहि आतां "प्रत्येक वस्तू भौतिक अंतरंग व आत्मिक अंतरंग अशा दोन अंगांनीं युक्त असते आणि मानवी देह जसा एका आत्म्याच्या धाग्यांत गोवला गेला आहे त्याचप्रमाणें अखिल विश्व हें चैतन्यरूपी सूत्रामध्यें गुंफिलें गेलें असून सर्वत्र एकाच तत्त्वाचा अनुस्यूतपणा प्रत्ययास येतो" असें म्हणूं लागले आहेत. त्यावरून या भारतीय तत्त्वसिद्धांतांचा त्रिकालाबाधित श्रेष्ठपणा व्यक्त झाल्याविना राहात नाहीं. सर्व पसारा सच्चिदानंद परब्रह्माचेंच स्फुरण असल्यामुळें नामरूपासहच परब्रह्मस्वरूप आहे. लहरी व पाणी यांत काय फरक असणार ? त्यामुळें जगत् व परमेश्वर या दोहोंना वेगवेगळे न मानतां भारतीय तत्त्वज्ञ सर्व कांहीं परमेश्वर व त्याचा चिद्विलास असेंच समजतो.

हें जे भारतीय तत्त्वज्ञानाचें स्वरूप आपण पाहिलें तें अत्याधुनिक काळापासून तर ऋग्वेदापर्यंत एकसारखें आहे हें पाहिलें म्हणजे वैदिक काळांतील तात्त्विक विकसनाची पूर्ण कल्पना येईल. वस्तुत: एकच तत्त्व प्रकृतिरूपानें भासतें तें कां ? हें स्पष्ट करतांना भारताचे अत्याधुनिक तत्त्वज्ञ श्री. अरविंद घोष यांच्या तत्त्व-

ज्ञानाचा थोडक्यांत सारांश त्यांच्या अंतेवासीयांनीं पुढीलप्रमाणें सांगितला आहे. "Spirit has become matter by crystalisation, self-limitation and exclusive consentration. A movement of Involution has made spirit terminate into matter. A return journey-Evolution-world make matter culminate in spirit." (चैतन्यच संघातामुळें, मर्यादिततेमुळें व आत्यंतिक केंद्रिततेमुळें जड बनलें, हा एक प्रकारें चैतन्यानें खालच्या अवस्थेंत येण्याचा प्रकार झाला. विकसनाच्या पद्धतीनें जडाचें चैतन्यांत पुनश्च रूपांतर होईल.) या ऋषि अरविंदांच्या दृष्टिकोनाच्या मागें आतां पर्यंत विशद केलेलेंच तत्त्वज्ञान आहे. ऋषि अरविंदांनीं हें सत्य प्रतीत होण्यासाठींच सारा जन्म तपस्येंत घालविला होता. आधुनिक भारतांतील सर्वश्रेष्ठ आत्मज्ञानी व "अवतारवरिष्ठ" श्री रामकृष्ण परमहंस यांच्या संवादांच्या ग्रंथांतून तर या तत्त्वज्ञानाचा आविष्कार करणारीं वाक्येंचीं वाक्यें व परिच्छेदचे परिच्छेद दाखवून देतां येतील. हा अत्याधुनिक कालखंड असल्यामुळें त्यांत एवढें विकसन शक्य आहे असें मानलें तर तीनशें वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत झालेले श्रेष्ठ तत्त्वज्ञ श्रीतुकाराममहाराज व श्रीसमर्थरामदास यांच्यांहि वाङमयांतून हेंच परमेश्वरी स्वरूपाचें तत्त्वज्ञान अणुमात्रहि फरक न होतां आविष्कृत झालें आहे असें दिसून येईल. श्रीसमर्थ म्हणतात. "रिता ठाव या राघवावीण नाहीं" "जिकडे पहावें तिकडे अपार। कुणीकडे नाहीं पार। एकजिनसी स्वतंत्र। दुसरें नाहीं." समर्थांचेच समकालीन श्रीतुकाराम महाराज यांनीं तर स्पष्टच असें म्हटलें आहे कीं :—

" सत्य तूं सत्य तूं सत्य तूं विठ्ठला। कांगा हा दाविला जगदाभास
रूप नाहीं त्यासी ठेवियेलें नाम। लटकाचि श्रम वाढविला ॥ "

" जग अवघे देव। मुख्य उद्देशाची ठेव ॥ "

एका ठिकाणीं तर ते म्हणत आहेत :—

" कासयानें पूजा करूं केशिराजा। हाचि संदेह माझा फेडी आतां ॥
उदकें न्हाणूं तरी स्वरूपचीं तुझें। तेथें देवा माझें काय वेचें ॥
गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमळ। तेथें मी दुर्बळ काय वाहूं ॥

वाहू दक्षिणा परी धातू नारायण । अन्न परब्रह्म दुजे नाहीं ।।
गातां तो ओंकार टाळी नादेश्वर । नाचावया भार नाहीं कोठें ।।
फळ दाता तूंच तांबूल अक्षता । तेथें मी अनंता काय वाहूं ? ।।
तुका म्हणे हरी अवघे तुझें नाम । धूप दीप रामकृष्ण हरी ।। ”

यांच्या कांहीं शतकें आधीं झालेले श्रीएकनाथमहाराज म्हणतात :—

“ द्वैत तितुकें केवळ दुःख । परम सुख अद्वैती ।। ”
“ मी सर्वात्मा आत्ममूर्ती । क्रिया शक्ती तेहि मीचि ।। ”

वारकरी संप्रदायाची गंगोत्री श्रीज्ञानेश्वरमहाराज यांच्या अद्वैत वादासंबंधीं कांहीं उल्लेखिण्याचें वस्तुतः कारण नाहीं. प्रातिनिधिक म्हणून त्यांचे उद्‌गारच उल्लेखावयाचे तर ते असे :—

अनुभवामृताच्या मंगलाचरणांत श्रीज्ञानदेव म्हणतात :—

“ सार्धं केन च कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः ।
ज्ञातुं न शक्यते लग्नमिति द्वैतच्छलान्मुहुः ।।
अद्वैतमात्मनस्तत्त्वं दर्शयन्तौ मिथस्तराम् ।
तौ वन्दे जगतामाद्यौ तयोस्तत्त्वाभिपत्तये ।।

द्वैताच्या देखाव्यामुळें शिव शक्ति हीं एकमेकाशीं संलग्न झालेलीं आहेत असें जरी वारंवार दिसतें तरी पण समानरूप असें जें शिवतत्त्व त्यांत कोणतें अर्ध कोणाचें व कोण कोणाच्या अर्धासहित आहे हें कांहीं समजणें शक्य नाहीं. आपलें अद्वितीयत्वच एकमेकांच्या साहचर्यानें ते प्रत्ययास आणून देत असतात. म्हणून त्या जगताच्या आद्यांना त्यांच्या यथार्थ स्वरूपाची प्राप्ति व्हावी एतदर्थ मी ज्ञानेश्वर नमस्कार करतों. अनुभवामृतांत महाराज पुढें म्हणतात, ‘गोडी आणि गुळू । कापुर आणि परमळू । निवडू जाता पांगुळू । निवाडू होये ।। समग्र दीप्ती घेता । जेवि दीपुचियें हाता । तेवि जियेच्चिया तत्वता । शिवूचि लाभे ।। जैसी सूर्य मिरवे प्रभा । प्रभे सूर्यत्वचि गाभा । तैसी भेद गिळीत शोभा । येकचि असे ।। कां बिंब प्रतिबिंबा द्योतक । प्रतिबिंब बिंबा अनुमापक । तैसे द्वैतामिसे एक । बरवतसे ।। ”

(अनुभवामृत प्रक. १ लें ओवी ६३ ६४ ६५ व ६६)

श्री ज्ञानराजांचें स्फूर्तिकेन्द्र असलेली भगवद्‌गीता कशी अद्वैतवादी आहे हें आपण पाहिलेंच आहे. वारकरी सांप्रदायाचें दुसरें स्फूर्तिकेन्द्र जें श्रीमद्‌भागवत पुराण त्यांतील मंगलाचरणावरूनच त्याचें तत्त्वज्ञानाच्या बाबतींतील अद्वैतवादित्व स्पष्टपणें सिद्ध होतें. तें मंगलाचरण पुढीलप्रमाणें :–

जन्माद्यस्य यतोऽन्वयादितरतश्चार्थेष्वभिज्ञः स्वराट् ।
तेने ब्रह्म हृदा य आदिकवये मुह्यन्ति यत्सूरयः ।
तेजोवारिमृदां यथा विनिमयो यत्र त्रिसर्गोऽमृषा ।
धाम्ना स्वेन सदा निरस्तकुहकं सत्यं परं धीमहि ।।

या जगाची उत्पत्ति, स्थिति व लय ज्यापासून होतात, अन्वय व व्यतिरेकानें जें या जगांतील अणुरेणूंतहि व्याप्त आहे, जें सर्वज्ञ व सर्वशक्तिसमन्वित आहे, ज्याच्यामुळें ब्रह्मदेवाच्या हृदयांत वेद स्फुरले, मोठेमोठे श्रेष्ठ पुरुषहि ज्याच्या स्वरूपज्ञानाच्या बाबतींत मुग्ध होतात, जगत् ज्याच्यावर मृगजलाप्रमाणें भासतें, स्वतःच्या तेजानें जें सर्व मायेचा अंधार नाहींसा करतें, त्या परमार्थ सत्याचें आम्ही ध्यान करतों."

भगवान् श्रीशंकराचार्य पूर्ण अद्वैतवादी असल्यामुळें त्यांच्या मताविषयीं प्रश्नच नाहीं. त्यांच्या भाष्यापासून तर स्तोत्रांपर्यंत सर्वत्र एक ब्रह्म तेवढेंच सत्य या मताचा डिंडिम अखंड गाजत आहे. हा जो भारतीयांच्या विकसनावस्थेंतील परमात्मवाद तोच उपनिषदांतहि जसाचा तसा आहे. सर्व जगांत एकच परमात्मा भरलेला असून तद्‌व्यतिरिक्त दुसरें कांहींहि नाहीं व भासणाऱ्या नामरूपात्मक प्रपंचाला व्यावहारिक सत्यत्व असलें तरी पारमार्थिक सत्यत्व मुळींच नाहीं व जग केवळ अनिर्वचनीय असून परमेश्वरी एकत्वाच्या जाणिवेनें तें बाधित होतें हाच उपनिषदांचा सिद्धांत आहे. उपनिषदांत मायावाद नाहीं या गोष्टीचें आग्रहानें प्रतिपादन करणाऱ्या लोकांस महाराष्ट्रांतील विख्यात तत्त्वज्ञ प्रा. रा. द. रानडे यांनीं फार चपखल उत्तर दिलें आहे. श्री. रानडे आपल्या A Constructive survey of Upanishadic philosophy

या ग्रंथांत म्हणतात :– " उपनिषदांत मायावादास आधार सांपडतो किंवा नाहीं याबद्दल जे प्रयत्न झाले त्यांतील मुख्य पुढील स्वरूपाचे आहेत. उपनिषदांची शब्दसूचि किंवा अनुक्रमणिका घ्यावयाची व त्यांत माया अगर तदर्थक शब्दाचा उल्लेख कोठें सांपडतो किंवा काय तें पहावयाचें व त्यावरून उपनिषदांत मायावाद प्रतिपादिला आहे किंवा कसें तें ठरवावयाचें. पण असा प्रयत्न करणें फार हास्यास्पद आहे. कारण त्यानें मायावादाची कल्पना उपनिषदांत सांपडते कीं नाहीं याचा विचार न होतां मायावाद अथवा तद्वाचक शब्द सांपडतो किंवा नाहीं याचा विचार होतो व त्यामुळें कल्पनेपेक्षां शब्दासच जास्त महत्त्व दिल्यासारखें होतें. म्हणून मायावाद उपनिषदांत सांपडतो किंवा नाहीं हें ठरवावयाचें झाल्यास उपनिषत्कालीन सर्व विचारांचें समीक्षण केलें पाहिजे व मायावादाची कल्पना त्यांत सांपडते काय हें पाहिलें पाहिजे. उपनिषद् वाङमयांत मायावादाचे स्पष्ट उल्लेख सांपडतात व म्हणून मायावाद म्हणजे शंकराचार्यांनीं काढलेली एक नवी कल्पना अथवा शून्यवादाचा त्यांच्या मनावर झालेला परिणाम नसून उपनिषदांत ग्रथित केलेले मायावादविषयक विचारच शंकराचार्यांनीं मोठ्या परिश्रमानें विस्तृतपणें मांडून ते अद्वैत तत्त्वज्ञानांत गोवून टाकले असें या बाबतींत आमचें स्पष्ट मत आहे."

उपनिषदांतील कांहीं भाग मी येथें उद्धृत करतों. म्हणजे त्यावरून भारतीय तत्त्वज्ञान जगत् व जगदीश्वर यांच्या विचारासंबंधींहि उपनिषद्काळीं पूर्णता पावलेलें होतें हें स्पष्ट होईल.

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥१

यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति ।
सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ॥६

यस्मिन्त्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः ।
तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ॥७

स पर्यगाच्छुक्रमकायमव्रणमस्नाविरं शुद्धमपापविद्धम् ।
कविर्मनीषी परिभूः स्वयम्भूर्याथातथ्यतोऽर्थान्व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥८

हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ।
तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥१५

(ईशावास्योपनिषद्)

"तें परब्रह्म पूर्ण आहे. हें सोपाधिक ब्रह्महि स्वरूपानें पूर्ण आहे. तें हें कार्यात्मक ब्रह्म पूर्ण म्हणजे कारणात्मक ब्रह्मापासून उद्‌भवतें. पण तें त्याच्यापासून जरी निराळें होत असलें तरी आपलें पूर्णत्व सोडीत नाहीं तर तें पूर्णच उद्‌भवतें. कार्यरूप ब्रह्माचें पूर्णत्व घेऊन पूर्णच केवलब्रह्म अवशिष्ट राहतें. जो सर्व भूतें आत्म्यामध्येंच पाहतो व सर्व भूतांमध्यें आत्म्याला पाहतो, तो त्या पाहण्यामुळेंच कोणाची घृणा म्हणजे निंदा करीत नाहीं. ज्या वेळीं ज्ञानी पुरुषाला सर्व भूतें आत्मस्वरूप होतात तेव्हां त्या एकत्व पाहणाऱ्या विद्वानाला, शोक कशाचा व मोह कशाचा? तो आत्मा सभोवार पसरलेला आहे, तो शुद्ध लिंगशरीररहित, अक्षत, स्थूलशरीरशून्य, अविद्यामलरहित, धर्माधर्मादि पापरहित, सर्वद्रष्टा, सर्वज्ञ, सर्वांहून श्रेष्ठ असणारा व स्वयंभू आहे. तो नित्यमुक्त ईश्वर अगदीं जसें पाहिजे तसें म्हणजे कर्मफल व साधन यांच्या अनुसार नित्य प्रजापतींना कर्तव्याचा विभाग करून देता झाला. ज्योतिर्मय तेजस्वी पात्राच्या योगानें आदित्यमंडलस्थ ब्रह्माचें मुखद्वार झाकलेलें आहे. हे पूषन् सत्यधर्मा जो मी त्या मला तुझ्या सत्य आत्म्याची उपलब्धि व्हावी म्हणून तूं तें उघड. (सत्यास झांकणारें आवरण सोन्याचें असल्यामुळें तें इतकें उज्ज्वल, बहुमोल व देदीप्यमान आहे कीं त्यामुळें प्रेक्षकांची दृष्टि त्यामागें असलेल्या सत्याकडे न जातां त्या आवरणावरच खिळून राहते. चकाकतें तें सर्व सोनें नसतें म्हणून या चकाकणाऱ्या सुवर्णपात्राच्या योगानें आपले डोळे दिपूं देऊं नका असा याचा अर्थ आहे. इति रानडे.)"

"अणोरणीयान्महतो महीयानात्माऽस्य जन्तोर्निहितो गुहायाम् ।
तमक्रतुः पश्यति वीतशोको धातुप्रसादान्महिमानमात्मनः ॥२०
(काठकोपनिषद, व. २)

"सूक्ष्मतम अणूहूनहि अधिक सूक्ष्म व महत् परिमाणवान् पदार्थाहूनहि अधिक मोठा आत्मा आहे. तो आत्मा सर्व प्राण्यांच्या हृदयांत बसलेला आहे. संकल्पहीन श्रेष्ठ पुरुषच त्याला पाहूं शकतात व त्यामुळें शोकरहित होतात."

मनसैवेदमाप्तव्यं नेह नानाऽस्ति किंचन ।
मृत्योः स मृत्युं गच्छति य इह नानेव पश्यति ॥ ११
( का. अ. २, व १ )

"एकत्वविज्ञानापूर्वी आचार्योपदेश व आगम यांच्या योगानें सुसंस्कृत मनानेंच हें तत्त्व व्यापण्यास-जाणण्यास योग्य आहे. ब्रह्मामध्यें अणूमात्रहि नानात्व नाहीं. जो या ब्रह्माभध्यें नानात्व पाहतो, तो मरणापासून मरणास प्राप्त होतो. म्हणजे जन्ममरण परंपरेस सदाचा अडकून बसतो."

वायुर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ।
एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ॥१०
एको वशी सर्वभूतान्तरात्मा एकं रूपं बहुधा यः करोति ।
तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरास्तेषां सुखं शाश्वतं नेतरेषाम्॥१२
नित्यो नित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान् ।
तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरास्तेषां शान्तिः शाश्वती नेतरेषाम्॥१३
(का. अ. २, व. २)

जसा एक वायु भुवनांत-या लोकीं-प्राणरूपानें देहांत प्रविष्ट होऊन, तसाच प्रत्येक पदार्थाच्या प्रतिरूप होतो, तसाच एक सर्व भूतान्तरात्मा प्रत्येक रूपाप्रमाणें प्रतिरूप झाला, व बाहेरहि आहे. जो एक सर्वांना वश ठेवणारा सर्व भूतान्तरात्मा व एकच रूप अनेक प्रकारें करणारा आहे त्याला आपल्या बुद्धीच्या ठिकाणीं जे धीर पाहतात त्यांना शाश्वत सुख प्राप्त होतें. इतर अविवेकी

लोकांना तें प्राप्त होत नाहीं. जो विनाश पावणाऱ्या पदार्थांतील अविनाशी रूप आहे, जो ब्रह्मादि चेतनांतील चेतन आहे, जो एक अनेकांना कर्मफलरूप काम देतो, त्या बुद्धिस्थ आत्म्याला जे बुद्धिमान पाहतात त्यांना नित्य शांति प्राप्त होते. इतरांना ती प्राप्त होत नाहीं.

यदोर्णनाभिः सृजते गृह्णते च यथा पृथिव्यामोषधयः संभवन्ति।
यथा सतः पुरुषात्केशलोमानि तथाऽक्षरात्संभवतीह विश्वम् ।।७
(मुंडक १-१)

( ज्या प्रमाणें कोळी तंतूंना उत्पन्न करतो, व पुन्हा त्यांना आपल्या शरीरांत ओढून घेतो, किंवा ज्याप्रमाणें पृथ्वीमध्यें ओषधी वनस्पती उत्पन्न होतात, अथवा ज्याप्रमाणें जिवंत पुरुषापासून केस व लोम उत्पन्न होतात त्याप्रमाणें अक्षरापासून या संसारमंडळांत विश्व संभवतें. )

पुरुष एवेदं विश्वं कर्म तपो ब्रह्म परामृतम् ।
एतद्यो वेद निहितं गुहायां सोऽविद्याग्रन्थिं विकिरतीह सोम्य ।।१०
(मु. २–१)

पुरुषच हें सर्व विश्व आहे. विश्व म्हणून पुरुषाहून पृथक कांहीं नाहीं. कर्म, तप व त्याचें फळ हें सर्व विश्व ब्रह्मच होय. सर्व प्राण्यांच्या हृदयरूप गुहेमध्यें स्थित असलेल्या या ब्रह्माला जो जाणतो तो या लोकीं जिवंत असतांनाच अविद्याग्रंथीला नष्ट करतो.

ब्रह्मैवेदममृतं पुरस्ताद्ब्रह्म पश्चाद्ब्रह्म दक्षिणतश्चोत्तरेण ।
अधश्चोर्ध्वं च प्रसृतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम् ।। ११

(हें अमृत ब्रह्मच पुढें, मागें, उजवीकडे, खालीं व वर पसरलेलें आहे. हें सर्व जगत् हें वरिष्ठ ब्रह्मच होय.)

सर्वं ह्येतद्ब्रह्मायमात्मा ब्रह्म (मां. अध्याय १. मं. २) (हें सर्व ब्रह्म आहे व हा आत्माहि ब्रह्मच आहे.) "सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म" (तै. ब्रह्मवल्ली १ ) (ब्रह्म सत्य, ज्ञान व अनंत आहे.) सर्वं खल्विदं ब्रह्म" (छांदो. अ. ३, खंड १४) (हें सर्वकांहीं ब्रह्म आहे)

सदेव सौम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् । (हे सौम्या, उत्पत्तीच्य पूर्वी एकच अद्वितीय असें सत्तत्व होतें.)

यत्र हि द्वैतमिव भवति तदितर इतरं जिघ्रति तदितर इतरं पश्यति तदितर इतरं शृणोत्ति तदितर इतरमभिवदति तदितर इतरं मनुते तदितर इतरं विजानाति यत्र वा अस्य सर्वमात्मैवा-भूत्तत्केन कं जिघ्रेत्तत्केन कं पश्येत्तत्केन कं शृणुयात्तत्केन कमभि-वदेत्तत्केन कं मन्वीत तत्केन कं विजानीयात् । येनेदं सर्वं विजानाति तं केन विजानीयद्विज्ञातारमरे केन विजानीयादिति ॥ (बृहदार-ण्यक २-४-१४)

"ज्या अविद्यावस्थेंत जणू कांहीं द्वैत आहे (म्हणजेच मिथ्या) असें होतें त्या ठिकाणीं वास घेणारा व ज्याचा वास घ्यावयाचा तें, पाहणारा व पहावयाचे पदार्थ, ऐकणारा व ऐकण्याचे विषय, बोल-णारा व ज्याच्याशीं बोलावयाचें तो, विचार करणारा व ज्याचा विचार करावयाचा तें, जाणणारा व जें जाणावयाचें तें असा भेद असतो; पण ज्या ठिकाणीं सर्वकांहीं आत्ममय झालें तेथें कोण कशानें व कशाचा वास घेणार? कोण कोणत्या साधनानें व कोणाला पाहणार ? कोण काय ऐकणार? कोण काय बोलणार? कोण कशाचें मनन करणार? व कोण कशाला जाणणार? ज्याच्या योगानें हें सर्व कळतें त्याला कशानें जाणावें? हे मैत्रेयी, विज्ञात्याला कोणत्या साधनानें जाणावें ?" सारांश जो पदार्थ, काल ( time) दिशा व कार्यकारणसंबंध (cause)'यांनीं मर्यादित असतो तो मिथ्या होय. व दिक्कालातीत व एकमेवाद्वितीय परब्रह्म हेंच खरें असून तो परमात्मा व आपल्या देहांतील आत्मा एकच आहे हेंच उपनि-षदांचें प्रतिपादन आहे. 'अयमात्मा ब्रह्म,' 'तत्त्वमसि,' 'सर्वं खल्विदं ब्रह्म' व 'अहं ब्रह्मास्मि' या चार महावाक्यांवरच भारतीय तत्त्व-ज्ञानाचें मंदिर उभारलेलें आहे.

याप्रमाणें रामकृष्ण, अरविन्द घोषांच्या काळांत जें आविष्कृत झालेलें आहे व श्री शंकराचार्यांच्या काळांत ज्याला शास्त्रीय परिभाषेचें स्थिरस्वरूप प्राप्त झालें तें तत्त्वज्ञान उपनिषद काळांतच

सिद्ध झालेलें होतें, हें प्रत्यक्ष उपनिषदावरूनच आपण पाहिलें. वैदिक ऋचांतूनहि जर याच तत्त्वज्ञानाचा स्पष्ट आविष्कार दिसत असेल तर वैदिक ऋषींनाच या तत्त्वज्ञानाचा पूर्ण साक्षात्कार झालेला असून वैदिक राष्ट्राच्या भावजीवनाला तत्त्वज्ञानाचा स्थिर पाया तेव्हांच प्राप्त झालेला होता असें पूर्वग्रहरहित विचारवंताला मान्य करणें भागच आहे. आपण क्षेत्रक्षेत्रज्ञ विचारांतील क्षेत्रज्ञासंबंधींचे अथवा आत्मतत्त्वासंबंधीचे ऋग्वेदवाङमयांतील उल्लेख तपासून पाहिले व त्यावरून निघणारा निष्कर्षहि पाहिला. आतां जगत् व जगदीश्वरविषयक अथवा परमात्मविषयक उल्लेख प्रत्यक्षच पाहूं म्हणजे त्यावरून काय निष्कर्ष निघतो तें स्पष्ट होईल.

ऋग्वेदामध्यें अनेक देवतांचें विलक्षण महत्त्व वर्णन केलेलें आहे. या देवता म्हणजे कोण होत या प्रश्नाची आपण पुढें चर्चा करणारच आहोंत. देवता म्हणजे न उलगडलेले निसर्ग चमत्कार ही कल्पनाहि कशी हास्यास्पद आहे, हेंहि आपण पाहणारच आहोंत पण ऋग्वेद म्हटला कीं, तेथील देवतांचें मूळस्वरूप कांहींहि असलें तरी तेथें अनेक देवता आहेत ही गोष्ट स्पष्ट दिसते. व त्यामुळें ऋग्वेदीय लोक हे अनेकदेवतावादी असून पुढें मग हळूहळू त्यांच्यांत एकदेवतेकडे वळण्याची प्रवृत्ति झाली असें मानण्याची प्रवृत्ति आहे ही अर्थातच चुकीची आहे हें ऋग्वेद पाहिल्यावर ध्यानांत येतें. वस्तुतः एकच तत्त्व सर्वत्र भरलेलें असून वेगवेगळ्या नांवांनीं तेंच व्यक्त झालेलें आहे व हें भासमान होणारें नानात्व खरें नसून मूळ एकजिनसी एकत्व हेंच खरें आहे असें ऋग्वेदांतच म्हटलें आहे. व तें हिवेगवेगळ्या देवतांचीं नांवें घेऊन.

इद्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान्
एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ।।

(त्याला इन्द्र, वरुण, मित्र, अग्नि म्हणतात. आणि हाच (सुपक्ष)सुपतन असा दिव्य गरुत्मान् (पक्षी) आहे असें म्हणतात. हा एकच असून याला विप्र (ज्ञाते)अग्नि, यम, मातरिश्वा अशीं नाना प्रकारचीं नांवें देतात.) (ऋ.१,१६४,४६)

परमेश्वराच्या व जगतासंबंधीच्या ऋग्वेदांतील धारणेवर स्पष्ट प्रकाश टाकणारीं पुढील कांहीं सूक्तें व मंत्र जर ध्यानांत घेतले तर ऋग्वेदांतील जगत् व जगदीश्वरविषयक धारणा पूर्णपणें स्पष्ट होते.

अचिकित्वात्र चिकितुषः चित् अत्र कवीन् पृच्छामि विद्मने न विद्वान् । वि यः तस्तंभ षळ् इमा रजांसि अजस्य रूपे किं अपि स्वित् एकम् ॥ ( ऋ. १-१६४-६ ) ( ह्या संबंधांत आपल्याला कांहींच कळत नाहीं; मी अज्ञानी पडलों. तेव्हां हें सर्व ज्यांना कळत आहे अशा ज्ञानी जनांपासून सर्व समजून घ्यावें म्हणून त्यांनाच विचारतों कीं, ज्यानें हे सहाहि लोक धारण केले आहेत त्या जन्मरहित ईश्वराच्या स्वरूपांत कांहीं एकात्मक आहे हें खरें ना? )

"अहम् इन्द्रः वरुणः ते (इति) महिऽत्वा उर्वी (इति) गभीरे (इति) रजसी (इति) सुमेके (इति) सुऽमेके । त्वष्टाऽइव विश्वा भुवनानि विद्वान् सम् ऐरयन् रोदसी (इति) धारयम् च (ऋ. ४,४२,३) (इन्द्र मी, वरुणहि मीच. आपल्या महिम्याच्या जोरावर जे अति विस्तीर्ण, सखोल आणि रम्याकृति बनले आहेत ते (दोन रजोलोकहि) पण मीच आहे. आणि मी सर्वज्ञ देवानें 'त्वष्टयाप्रमाणें यच्चयावत् भुवनांना एकदम चालना देऊन सावरून धरलें आहे.'

सहस्रऽशीर्षा पुरुषः सहस्रऽअक्षः सहस्रऽपात् ।
स भूमिं विश्वतोः वृत्वा अति अतिष्ठत् दश अङ्गुलम् ॥१॥
पुरुषः एव इदम् सर्वम् यत् भूतम् यत् च भव्यम् ।
उत अमृतऽत्वस्य ईशानः यत् अन्नेन अतिऽरोहति ॥२॥
एतावान् अस्य महिमा अतः ज्यायान् च पूरुषः ।
पादः अस्य विश्वा भूतानि त्रिपात् अस्य •अमृतम् दिवि ॥३॥
त्रिपात् ऊर्ध्वः उत् ऐत् पुरुषः पादः अस्य इह अभवत् पुनः ।
ततः विष्वङ वि अक्रामत् साशनानशने (इति) अभि ॥४॥

( परमात्मारूप ) पुरुषाला सहस्रावधि मस्तकें ( आहेत)

सहस्रावधि नेत्र (आहेत), सहस्रावधि चरणहि आहेत. तो पृथिवीला सर्व बाजूंनीं वेढून टाकून पुन्हा दहा बोटें शिल्लक उरलाच. –१

हें जें सर्व (विश्व) विद्यमान आहे तें सर्व तो पुरुष (परमात्मा) च (बनला) आहे, जें पूर्वी (आतांपर्यंत) होऊन गेलें किंवा जें अजून पुढें व्हावयाचें आहे तेंहि हाच होय; तसेंच अमृतत्वाचा (म्हणजे जरामृत्युरहित स्थितीचा) अधिपति तोच आहे, आणि अन्न भक्षण करून जें वृद्धि पावतें ( जें प्राणिरूप आहे ) त्याचाहि स्वामी तोच आहे. –२

इतका (अपार जरी) त्याचा महिमा आहे, तरी तो स्वतः मात्र त्या महिम्यापेक्षांहि मोठा आहे. कारण हें जें सर्व भूतजात (म्हणजे विश्व) आहे, तें त्याचा केवळ चवथा भाग आहे आणि बाकीचें जें अमृतरूप तीन भाग ते दिव्यलोकीं असतात. –३

याप्रमाणें हा त्रिभाग द्योतित (विश्वातीत) पुरुष अशा प्रकारानें उपस्थित झाला, तेव्हां त्याचा चवथा अंश पुनः ह्या लोकीं प्रकट झाला आणि (प्रकट होतांच) हें एकंदर जें (दृश्यादृश्य) विश्व, जें अन्न खाऊन जगतें आणि ज्याला अन्नाची आवश्यकता नाहीं (म्हणजे सचेतन आणि अचेतन) असे दोन्ही प्रकारचे पदार्थ त्यानें व्यापून टाकले. –४) (ऋ. मं. १०, सू. ९०)

को ददर्श प्रथमं जायमानम् अस्थनवंतं यत् अस्थना बिभर्ति ।
भूम्याः असुर् असृक् आत्मा क्व खित् को विद्वासं उप गात्
प्रष्टुम् एतत्'' ।। ४

द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परि षस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वादु अत्ति अनश्नन् अन्यो अभि चाकशीति।२०
यत्रा सुपर्णा अमृतस्य भागम् अनिमेषं विदथाभिस्वरन्ति ।
इनो विश्वस्य भुवनस्य गोपाः स मा धीरः पाकमत्रा विवेश।।२१
(ऋ. मं. १, सू. १६४)

(स्वतः अस्थिरहित (म्हणजे अजड) असून अस्थियुक्त, प्राण्यांचा म्हणजे जड विश्वाचा जो सांभाळ करीत असतो, त्या ईश्वराला उत्पन्न होतांना कोणीतरी पाहिलें आहे काय? ह्या पृथ्वीचें जीव-

तत्त्व आणि तिचें रक्त (म्हणजे घटक द्रव्य) आणि आत्मतत्त्व हीं त्यावेळीं कोठें होतीं? आणि ज्या(देवा)ला ह्या सर्व गोष्टी माहीत आहेत त्याला त्या विचारण्याकरितां तरी कोण गेला होता? –४

सुंदर पंखांचे, एकत्र वास करणारे, आणि परस्परजिवलग मित्र असे दोन पक्षी एकाच वृक्षावर बसलेले आहेत, त्यांतला एक त्या झाडाच्या मधुर फळाचा उपभोग घेतो, परंतु दुसरा मात्र स्वत: कांहींएक न खातां नुसता पहात असतो. –२०

सुंदर पंखांचे पक्षी ज्ञानसामर्थ्यानें अमरत्वाचा अंश जेथें निरंतर पोहोचवीत असतात, तेथें (म्हणजे) मज मूढाच्या अंगीं, खुद्द विश्वाचा पालक जो ज्ञानस्वरूप परमात्मा, त्यानें वास केलेला आहे. –२१

ऋग्वेदांतील या धारणा जगत् व जगदीश्वरविषयक वैदिक लोकांचे सिद्धान्त किती पूर्णावस्थेस पोहोचले होते हें स्पष्टपणें दर्शवितात. इतकेंच नव्हे तर त्यानंतरच्या काळांत तत्त्वसिद्धांताच्या दृष्टीनें कोणताहि फार मोठा फरक पडल्याचें कोणासहि दाखवून देतां येत नाहीं. ऋग्वेदाकडे पाहण्याचीच दृष्टि दूषित असली तर मात्र नसेल तेथेंहि संशयवाद दिसूं लागतो. ऋग्वेदांतील तत्त्वज्ञान-विषयक सिद्धांतांचें असें प्रकटीकरण वेगवेगळ्या सूक्तांतून तर झालेलेंच आहे पण विख्यात नासदीय सूक्तांत या सर्व सिद्धांतांची एकत्रित व सुव्यवस्थित मांडणी आहे ती इतकी कीं, त्यानंतर उपनिषदादि ग्रंथांतून या मांडणीचाहि जसाचा तसा आविष्कार आढळतो. मी येथें तें संपूर्ण सूक्त, स्वत: लोकमान्य: टिळकांनीं त्याचें केलेलें भाषांतर व त्यावर प्रकट केलेला आपला अभिप्राय येथें उद्धृत करतो. तें सूक्त असें :–

नासदासीन्नो सदासीत्तदानीं नासीद्रजो नो व्योमा परो यत् ।
किमावरीव: कुह कस्य शर्मन्नम्भ: किमासीद्गहनं गभीरम् ॥१

तेव्हां म्हणजे मूळारंभीं असत् नव्हतें! आणि सत्हि नव्हतें. आणि त्यापलीकडचें जें आकाश तेंहि नव्हतें! (अशा स्थितींत) कोणी (कोणाला) आवरण घातलें (म्हणावें)? कोठें? कोणाच्या सुखासाठीं? अगाध व गहन पाणी (तरी) होतें काय?

न मृत्युरासीदमृतं न तर्हि न रात्र्या अह्न आसीत्प्रकेतः ।
अनीदवातं स्वधया तदेकं तस्माद्धान्यन्न परः किंचनाऽऽस ।।

तेव्हां मृत्यु म्हणजे मृत्युग्रस्त नाशवंत दृश्य सृष्टि नव्हती, व म्हणून (दुसरा) अमृत म्हणजे अविनाशी नित्य पदार्थ (हा भेद) हि नव्हता. (तसेंच) रात्र आणि दिवस यांचा भेद कळण्यास कांहीं साधन (प्रकेत्) नव्हतें. (जें काय होतें) तें एकलें, एकच स्वधेनें म्हणजे आपल्या शक्तीनें वायूशिवाय श्वासोच्छ्वास करीत म्हणजे स्फुरत होतें. त्याखेरीज किंवा त्यापलीकडे दुसरें असें कांहींच नव्हतें.

तम आसीत्तमसा गूढमग्रेऽप्रकेतं सलिलं सर्वमा इदम् ।
तुच्छेनाभ्वपिहितं यदासीत् तपसस्तन्महिनाऽजायतैकम् ।।३

अंधकार होता, आरंभीं हें सर्व अंधकारानें व्याप्त (आणि) भेदाभेदविरहित पाणी होतें, (किंवा) आभु म्हणजे सर्वव्यापी ब्रह्म (आरंभींच) तुच्छानें म्हणजे फोल मायेनें आच्छादिलेलें होतें असें (यत्) जें (म्हणतात), तें (तत्) मूळ एक (ब्रह्मच) तपाच्या महिम्यानें (रूपांतरानें पुढें) प्रकट झालेलें होतें.

**टीप**—यांतील पहिले तीन चरण स्वतंत्र कल्पून सृष्टयारंभीं "अंधकारानें व्यापलेलें पाणी, किंवा तुच्छानें आच्छादिलेलें आभु (पोकळी) होते." असा यांचा विधानात्मक अर्थ कित्येक करितात. पण आमच्या मतें तो चुकीचा आहे. कारण, पहिल्या दोन ऋचांत मुळारंभीं कांहींच नव्हतें असें जर स्पष्ट विधान आहे, तर त्याच्या अगदीं विरुद्ध अंधकार किंवा पाणी मुळारंभीं होतें असें याच सूक्तांत सांगितलें जाणें शक्य नाहीं. शिवाय या पक्षीं तिसऱ्या चरणांतील यत् शब्द निष्कारण मानावा लागतो. म्हणून तिसऱ्या चरणांतील यत् याचा चवथ्या चरणांतील तत् या पदाशीं संबंध लावून आम्ही वर दिल्याप्रमाणें अर्थ लावणें जरूर पडतें. मुळारंभीं पाणी वगैरे पदार्थ होते असें म्हणणाऱ्या लोकांस उत्तर म्हणून ही ऋचा या सूक्तांत आली आहे. आणि तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें तम, पाणी, वगैरे पदार्थ मूळ नसून एका ब्रह्माचाच तो

पुढला विस्तार आहे असें सांगण्याचा ऋषींचा हेतु आहे. तुच्छ व आभु हे दोन शब्द एकमेकांचे प्रतियोगी असल्यामुळें तुच्छाच्या उलट म्हणजे मोठा किंवा समर्थ असा आभु शब्दाचा अर्थ होतो; आणि ऋग्वेदांत ज्या दुसऱ्या दोन ठिकाणीं हा शब्द आला आहे (ऋ. १०.२७.१,४) तेथें सायणांनीं हाच अर्थ घेतला आहे. पंचदशींत (चित्र. १२९, १३०) तुच्छ हा शब्द मायेला लाविला आहे, (नृ. उत्त. ९, पहा) अर्थात् आभु म्हणजे पोकळी नसून 'परब्रह्म' असाच अर्थ होतो. 'सर्वं आः इदम्' या ठिकाणीं आः (अ+अस) हें अस् धातूचें भूतकाळाचें रूप असून त्याचा अर्थ आसीत् असा आहे.

कामस्तदग्रे समवर्तताधि मनसो रेतः प्रथमं यदासीत् ।
सतो बन्धुमसति निरविन्दन् हृदि प्रतीष्या कवयो मनीषा ।।४

(याच्या) मनाचें जें रेत म्हणजे बीज प्रथमतः निघालें तोच आरंभीं काम (म्हणजे सृष्टि निर्माण करण्याची प्रवृत्ति किंवा शक्ति) झाला. (हाच) असतामध्यें म्हणजे मूळ परब्रह्मांत सताचा म्हणजे विनाशी दृश्य सृष्टीचा (पहिला) संबंध होय असें ज्ञात्यांनीं अंतःकरणांत विचार करून बुद्धीनें निश्चित केले आहे.

तिरश्चीनो विततो रश्मिरेषाम् अधःस्विदासीदुपरि स्विदासीत्।
रेतोधा आसन् महिमान आसन् स्वधा अवस्तात् प्रयतिः परस्तात्।।

(हा) रश्मि म्हणजे धागा किंवा किरण यांच्या (मध्यें) आडवा पडला; आणि खालीं होता म्हटलें तर वरहि होता. (यांच्यांतले कांहीं) रेतोधा म्हणजे बीजप्रद झाले, व (वाढून) मोठेहि झाले. त्यांचीच स्वशक्ति अलीकडे व प्रयति म्हणजे प्रभाव पलीकडे (व्यापून) राहिला.

को अद्धा वेद क इह प्रवोचत् कुत आजाता कुत इयं विसृष्टिः।
अर्वाग् देवा अस्य विसर्जनेनाथ को वेद यत आबभूव ।।६

सताचा विसर्ग म्हणजे पसारा कशापासून किंवा कोठून आला हें (यापेक्षां) प्र म्हणजे विस्तारानें येथें कोण सांगणार ? कोण

निश्चयात्मक जाणतो? देवहि या (सत् सृष्टीच्या) विसर्गानंतरचे, मग ती जेथून निघाली तें कोण जाणणार ?

इयं विसृष्टिर्यत आबभूव यदि वा दधे यदि वा न दधे ।
यो अस्याध्यक्षः परमे व्योमन् सो अंग वेद यदि वा न वेद ॥७

(सताचा) हा विसर्ग म्हणजे पसारा जेथून झाला, किंवा तो निर्मिला गेला अगर न गेला, तें परम आकाशांत असणारा या जगाचा जो अध्यक्ष (हिरण्यगर्भ) तो जाणीत असेल किंवा नसेलहि ! ( कोणी सांगावें ? )

डोळ्यांना किंवा सामान्यतः सर्व इंद्रियांस गोचर होणाऱ्या विकारी व विनाशी नामरूपात्मक नाना देखाव्यांच्या जाळ्यांत गुंतून न राहतां त्या पलीकडे कांहीं तरी एक व अमृत तत्त्व आहे हें ज्ञानदृष्टचा ओळखणें हेंच सर्व वेदान्तशास्त्राचें रहस्य होय; आणि या लोण्याच्या गोळ्यावर वरील सूक्ताच्या ऋषीच्या बुद्धीची पहिल्या झपाटचास जी अचूक उडी पडली आहे, त्यावरून त्याचें अंतर्ज्ञान किती तीव्र होतें तें स्पष्ट दिसून येतें! मूळारंभीं म्हणजे सृष्टींतील नाना पदार्थ अस्तित्वांत येण्यापूर्वीं जें कांहीं होतें तें सत् होतें का असत् होतें, मृत होतें कां अमर होतें, आकाश होतें का पाणी होतें, उजेड होतें का अंधार होतें, इत्यादि अनेक प्रश्न करणाऱ्याशीं वाद करीत न बसतां, एकदम या सर्वांच्या पुढें धांव घेऊन हा ऋषि असें विचारतो कीं, सत् आणि असत्, मर्त्य आणि अमर, अंधकार व उजेड, आच्छादन करणारे व त्यानें आच्छादिलेलें, सुख देणारा व सुख अनुभवणारा, ही द्वैताची परस्परसापेक्ष भाषा दृश्य सृष्टि निर्माण झाल्यानंतरची असून सृष्टींतील ही द्वंद्वें उत्पन्न होण्यापूर्वीं म्हणजे एक व दुसरा हा भेदच जेव्हां नव्हता तेव्हां कोण कोणाला आच्छादन करणार ? म्हणून मुळारंभींच्या एकजिनसी द्रव्यास सत् किंवा असत्, आकाश किंवा पाणी, उजेड किंवा अंधकार, अमृत वा मृत्यु इत्यादि परस्परसापेक्ष कोणतेंच नांव देणें योग्य नाहीं; जें काय होतें तें या सर्व पदार्थांहून विलक्षण असून तें एकलें एकच आरंभीं चोहोकडे आपल्या अपरंपार

शक्तीनें स्फुरत होतें. त्याच्या जोडीला किंवा त्याला आच्छादन करणारें दुसरें कांहींच नव्हतें असें या सूक्ताचा ऋषि आरंभींच निर्भयपणें सांगत आहे. दुसऱ्या ऋचेंत 'आनीत्' या क्रियापदांतील 'अन्' धातूचा अर्थ, श्वासोच्छ्वास करणें किंवा स्फुरण पावणें असा असून 'प्राण' हा शब्द त्याच धातूपासून निघाला आहे; परंतु जे सत् ना असत् तें सजीव प्राण्यांप्रमाणें श्वासोच्छ्वास करीत होतें असें तरी कोण सांगणार? आणि श्वासोच्छ्वास चालण्यास वायु तरी कोठला? म्हणून 'आनीत्' या पदालाच 'अवातं म्हणजे वायूशिवाय आणि 'स्वधया' म्हणजे आपल्या स्वतःच्याच महिम्यानें, हीं पदें जोडून जगाचें मूलतत्त्व जड नव्हतें हा अद्वैतावस्थेंतील अर्थ "तें एक वायूशिवाय म्हणजे वायूची अपेक्षा न ठेवतां आपल्या शक्तीनेंच श्वासोच्छ्वास करीत किंवा स्फुरत होतें," असा द्वैताच्या भाषेनें मोठ्या युक्तीनें वर्णिला आहे! व त्यांत सकृद्दर्शनी जो विरोध दिसतो तो द्वैती भाषेच्या अपुरेपणामुळें उत्पन्न झालेला आहे. "नेति नेति" "एकमेवाद्वितीयम्" किंवा "स्वे महिम्नि प्रतिष्ठितः" ( छा. ७.२४.१ ) आपल्याच महिम्यानें म्हणजे दुसऱ्या कोणाची अपेक्षा न ठेवतां एकलाच राहणारा, इत्यादि परब्रह्माचीं जीं वर्णनें उपनिषदांतून आहेत तीं याच अर्थाचीं अनुवादात्मक होत. सर्व सृष्टीच्या मूळारंभी जें हें अनिर्वाच्य तत्त्व चोहोकडे स्फुरत होतें म्हणून या सूक्तांत म्हटलें आहे, तेंच सर्व दृश्य सृष्टीचा प्रलय झाल्यावरहि शिल्लक राहणार हें उघडच आहे. म्हणून गीतेंत, "सर्व पदार्थांचा नाश झाला तरी ज्याचा नाश होत नाहीं" (गी. ८. २०) असें याच परब्रह्माचें थोड्या पर्यायानें वर्णन केलें असून "तें सत् नाहीं आणि असत्हि नाहीं" (गी. १३. १२) असें या सूक्ताला धरून पुढें स्पष्ट म्हटलें आहे. पण निर्गुण ब्रह्माखेरीज मुळारंभीं जर दुसरें कांहींच नव्हतें तर "आरंभीं पाणी, अंधकार किंवा आभु व तुच्छ यांची जोडी होती," इत्यादि जीं वर्णनें वेदांतूनहि आहेत त्यांची व्यवस्था कशी लावावयाची अशी शंका येत्ये. म्हणून तिसऱ्या ऋचेंत हा कवि

असें सांगतो कीं, जगाच्या आरंभीं अंधकार होता किंवा अंधकारानें झाकलेलें पाणी होतें किंवा आभु (ब्रह्म) व त्याला आच्छादणारी माया (तुच्छ) हीं दोन्ही पहिल्यापासूनच आहेत, इत्यादि जीं वर्णनें आहेत तीं सर्व एकल्या एक मूळ परब्रह्माची त्याच्या तपोमहिम्यानें पुढें विविध पसारा झाल्यानंतरचीं वर्णनें होत, अगदीं मूळारंभीचीं नव्हेत. या ऋचेंत 'तप' या शब्दानें मूळ ब्रह्माची ज्ञानमय विलक्षण शक्ति विवक्षित असून तिचेंच वर्णन चवथ्या ऋचेंत केलेलें आहे. (मुं. १. १. ९ पहा)

"एतावान् अस्य महिमाऽतो ज्यायांश्च पुरुषः" (ऋ. १०. ९०. ३). या न्यायानें म्हणजे सर्व सृष्टि हा ज्याचा महिमा झाला तें मूलद्रव्य, या सर्वापलीकडचें व सर्वांहून श्रेष्ठ आणि भिन्न आहे, हें मग सांगावयास नको. परंतु पहावयाची वस्तु व पाहणारा, भोक्ता व भोग्य, आच्छादणारा व आच्छाद्य, काळोख व उजेड, मर्त्य आणि अमर इत्यादि सर्व द्वैत याप्रमाणें एकदम झुगारून देऊन एक निर्भेळ चिद्रूपी विलक्षण परब्रह्मच काय तें मूळारंभीं होतें असा जरी निश्चय केला, तरी या अनिर्वाच्य व निर्गुण एकल्या एक तत्त्वापासून आकाश, पाणी वगैरे द्वंद्वात्मक विनाशी सगुण नामरूपात्मक विविध सृष्टि, किंवा या सृष्टीची मूलभूत जी त्रिगुणात्मक प्रकृति ती कशी उत्पन्न झाली हें सांगण्याची वेळ आल्याबरोबर मन, काम, असत् व सत् अशी द्वैताची भाषाच या ऋषीसहि योजावी लागली असून, अखेर हा प्रश्न मनुष्याच्या बुद्धीच्या आटोक्याबाहेरचा आहे असें हा ऋषि स्वच्छ सांगत आहे. चवथ्या ऋचेंत मूळ ब्रह्मासच 'असत्' असें म्हटलें आहे. पण त्याचा अर्थ 'काहीं नाहीं' असा घेतां येत नाहीं; कारण, दुसऱ्याच ऋचेंत 'तें आहे' असें स्पष्ट विधान आहे. या सूक्तांतच नव्हे, तर इतरत्रहि दृश्यसृष्टीस यज्ञाची उपमा देऊन हा यज्ञ करण्यास लागणारी तूप, समिधा वगैरे सामग्री प्रथम कोठून आणिली? (ऋ. १०-१०३-३) किंवा घराचा दृष्टान्त घेऊन मूळ एका निर्गुणापासून डोळ्यास प्रत्यक्ष दिसणारी आकाश

पृथ्वीची ही भव्य इमारत घडण्यास लाकूड (मूल प्रकृति) कोठून आणिलें? –किं स्विद्वनं क उ स वृक्ष आस यतो द्यावापृथिवी निष्टतक्षु: – असें व्यावहारिक भाषा स्वीकारूनच ऋग्वेद व वाजसनेय संहितेंत गूढ प्रश्न केले आहेत. (ऋ. १०-३१-७; १०-८१-४; वाज. सं. १७-२०) त्या एकल्या एक अनिर्वाच्य ब्रह्माच्या मनांत सृष्टि निर्माण करण्याचें 'काम'रूपी तत्त्व कसें तरी उद्‌भवलें, आणि वस्त्रांतील धाग्याप्रमाणें किंवा सूर्यप्रकाशाप्रमाणें त्याच्याच शाखा झटकन खालीं, वर व चोहोंकडे पसरून सताचा सर्व पसारा म्हणजे आकाश–पृथ्वीची भव्य इमारत निर्माण झाली, असें जें या सूक्ताच्या ४ थ्या व ५ व्या ऋचेंत (वाज. सं. ३३-७४ पहा). म्हटलें आहे, त्यापेक्षां ह्या प्रश्नास जास्त उत्तर देणें शक्य नाहीं. म्हणून ह्या सूक्तांतील अर्थाचाच उपनिषदांतून "सोऽकामयत।" "बहु स्यां प्रजायेयेति।". (तै. २-६; छां. ६-२-३)--त्या परब्रह्मासच बहुजिनसी होण्याची इच्छा झाली–असा अनुवाद केलेला असून (बृ. १-४ पहा), अथर्ववेदांतहि या सर्व सृष्टीच्या मूलभूत द्रव्यापासून प्रथम 'काम' झाला असें वर्णन आहे (अथर्व ९-२-१९) परंतु या सूक्ताची मौज अशी आहे कीं, निर्गुणापासून सगुणाच्या, असतापासून सताच्या, निर्द्वंद्वापासून द्वंद्वाच्या किंवा असंगापासून संगाच्या उत्पत्तीचा हा प्रश्न मनुष्याच्या बुद्धीस अगम्य आहे, म्हणून सांख्याप्रमाणें निव्वळ तर्कवश होऊन मूलप्रकृतीसारखें दुसरें स्वयंभू व स्वतंत्र तत्त्व न मानितां "जें कळत नाहीं तें कळत नाहीं म्हणा, पण त्यासाठीं शुद्ध बुद्धीनें व आत्मप्रतीतीनें निश्चित केलेल्या अनिर्वाच्य ब्रह्माची योग्यता दृश्य सृष्टिरूप मायेस देऊन परब्रह्माबद्दलची अद्वैतबुद्धि सोडून देणें न्याय्य नाहीं" असें हा ऋषि प्रतिपादन करीत आहे! शिवाय असेंहि पाहिलें पाहिजे कीं, प्रकृति हा एक त्रिगुणात्मक स्वतंत्र दुसरा पदार्थ मानला तरी त्यापासून सृष्टि निर्माण होण्यास त्यांत प्रथमत: बुद्धि ( महान् ) किंवा अहंकार कसा उत्पन्न झाला या प्रश्नास उत्तर देतां येत नाहीं तें नाहींच; आणि हा दोष जर केव्हांहि टळत नाहीं तर प्रकृति स्वतंत्र मानण्यांत तरी काय

हंशील? मूळ ब्रह्मापासून प्रकृति म्हणजे सत् कसें निर्माण झालें तें कळत नाहीं एवढें म्हणा म्हणजे झालें. त्यासाठीं प्रकृति स्वतंत्र मानण्याची जरूर नाहीं. मनुष्याच्या बुद्धीसच काय, पण देवांना देखील सताची उत्पत्ति कशी झाली तें कळणें शक्य नाहीं. कारण, देवहि दृश्य सृष्टीला सुरुवात झाल्यावर पुढें उत्पन्न झालेले असल्या-मुळें त्यांना मागलें काय ठाऊक असणार? (गी.१०-२ पहा). पण देवापेक्षांहि हिरण्यगर्भ पुरातन आणि श्रेष्ठ असून तो एकटाच आरंभीं "भूतस्य जातः पतिरेक आसीत्" (१०-१२१-१)– सर्व सृष्टीचा 'पति' म्हणजे 'राजा' किंवा अध्यक्ष होता, असें ऋग्वेदांतच म्हटलें आहे मग त्याला ही गोष्ट माहीत नसेल कशावरून? आणि त्याला जर माहीत असेल तर ती दुर्बोध कशी म्हणता असें कोणी विचारील. म्हणून या प्रश्नास 'होय; तो ही गोष्ट जाणील असेल' असें प्रथम औपचारिक उत्तर देऊन लागलीच 'अथवा नसेलहि! कोणी सांगावें?' कारण, तोहि 'सता'च्याच कोटींत पडत असल्या-मुळें, सत्, असत्, आकाश व पाणी यांच्याहि पूर्वींच्या गोष्टीबद्दल 'परम' म्हटलें तरी 'आकाशांत'च राहणाऱ्या जगाच्या या अध्यक्षास निश्चित ज्ञान कोठून असणार? असें आपल्या बुद्धीनें ब्रह्मदेवा-च्याहि ज्ञानाचा ठाव घेऊं पाहणारा हा ऋषि आश्चर्यानें अखेर साशंक सांगत आहे! पण एका असत् म्हणजे अव्यक्त व निर्गुण द्रव्यासच विविध नामरूपात्मक सताचा म्हणजे मूलप्रकृतीचा संबंध कसा जडला हें कळत नसलें, तरी मूळ ब्रह्म एकच आहे ही आपली अद्वैतबुद्धि तो ढळूं देत नाहीं! अचिंत्य वस्तूच्या गहन रानांत मनुष्याची बुद्धि सात्त्विक श्रद्धेच्या व निर्मल प्रतिभेच्या जोरावर सिंहाप्रमाणें निर्भयपणें संचार करून त्यांतील अतर्क्य गोष्टी यथाशक्ति कशा निश्चित करीत असते 'याचें हें उत्कृष्ट उदाहरण असून, ऋग्वेदांत हें सूक्त आढळून येतें हें खरोखरच आश्चर्यकारक होय! या सूक्तांतील विषयांचें पुढें ब्राह्मण (तैत्ति. ब्रा. २-८-९) उपनिषदें व त्यानंतरचे वेदान्तशास्त्रावरील ग्रंथ यांत आमच्याकडे आणि अर्वाचीन काळीं पाश्चिमात्य देशांत कांट

वगैरे तत्त्वज्ञान्यांनीं पुष्कळ सूक्ष्म परीक्षण केलें आहे. परंतु ऋषींच्या शुद्ध बुद्धीस या सूक्तांत ज्या परम सिद्धांतांचें स्फुरण झालेलें आहे तेच सिद्धांत प्रतिपक्ष्यास विवर्तवादासारखीं योग्य उत्तरें देऊन अधिक दृढ, स्पष्ट किंवा तर्कदृष्टया निःसंदेह करण्यापलीकडे अद्याप कोणाचीच मजल गेलेली नाहीं; व जाण्याची फारशी आशाहि नको."

लोकमान्यांच्या या विवेचनाला अधिक कोणतीहि पुस्ती जोडण्याचें कारणच नाहीं. आतां सहजच लक्षांत येईल कीं जें "नासदासीन्नोसदासीत् तदानीं" "तुच्छेनाभ्वपिहितम्" "आनीदवातं स्वधया तदेकं" या शब्दांनीं ऋग्वेदांत सांगितलें आहे तेंच "सदेव सौम्येदमग्र आसीत् असद्वा इदमग्र आसीत्" "हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्" "अप्राणोह्यमनाः शुभ्रः" "सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जलान्" या शब्दांनीं उपनिषदांतून प्रतिपादन केलेलें आहे. व त्यावरून हें संशयातीतपणेंच म्हणतां येतें कीं, वैदिक राष्ट्राचें तत्त्वज्ञान ऋग्वेदकाळींच सिद्ध झालेलें होतें. व तें तत्त्वज्ञान "ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः" हेंच होतें.

हें तत्त्वज्ञान प्रत्यक्ष जीवन घडविण्याचा विषय होतें कीं केवळ विचाराचांच विषय होतें हा प्रश्न स्वाभाविकपणेंच उत्पन्न होईल. तसेंच या एकत्वाच्या तत्त्वज्ञानांतून वेदांमध्यें आढळणाऱ्या अनेक देवतात्मकतेची कांहीं उपपत्ति लागते काय तेंहि पाहणें अवश्य आहे. जगन्मिथ्यात्व म्हटलें कीं, पुष्कळांच्या अंगावर अलीकडे कांटा उभा राहतो. व त्या अर्थाचा माया हा शब्द वेदांत दाखविण्याविषयींचा त्यांचा दावा असतो. पण श्री. रानडे यांच्याच शब्दांत असें म्हणतां येईल कीं, वाद शब्दाचा नसून कल्पनेचा आहे. व नानात्वाचा पसारा मिथ्या म्हणजे अनिर्वचनीय असून व्यावहारिक सत्ता (Common sense view) व पारमार्थिक सत्ता (Scientific view) या दोन सत्तांत परस्परविरोधाचें कांहीं कारण नाहीं. ही गोष्ट ध्यानांत घेतली म्हणजे जगन्मिथ्यात्ववाद वस्तुतः

वादाचा विषय होऊं शकत नाहीं. भारतवर्षांत तत्त्वज्ञान हा नेहमीच केवळ विचाराचा विषय राहिलेला नसून प्रत्यक्ष जीवन घडविण्याचाच विषय आहे. अनुभूतिवाद व तत्त्वज्ञान हे भारतांत एकात्मविषय समजण्यांत येतात. व वैदिक वाङ्मय नीट तपासलें तर तेथेंहि हेंच वैशिष्टय तळपतांना आढळेल. पुढच्या व्याख्यानांत या विषयाकडे वळून आपण आर्य राष्ट्राच्या अंतरंग धारणेचें स्वरूप पाहूं.

## व्याख्यान चौदावें

# वैदिक राष्ट्राचा अनुभूतिवाद व भावजीवन

मागच्या दोन प्रकरणांतून विकसनावस्थेंतील भारतीय तत्त्वज्ञान सिद्धांतांच्या दृष्टीनें ऋग्वेदकाळींच सिद्ध झालेलें होतें हें आपण पाहिलें. लोकमान्य टिळकांसारख्या विचक्षण पुरुषापासून तर महर्षि अरविन्द, आण्णासाहेब पटवर्धन प्रभृतीपर्यंतच्या तपस्वी द्रष्टया पुरुषांची या बाबतींत एकवाक्यता आहे असें आपणांस आढळून येतें. नासदीय सूक्ताच्या संबंधीं विवेचन करतांना लोकमान्यांनीं काय उद्गार काढले ते आपण मागच्या व्याख्यानांत पाहिलेच आहेत. ऋषि अरविन्दांनीं या बाबतींत असें म्हटलें आहे कीं " संहितांतील कित्येक मंत्रांत श्रेष्ठ श्रेणीचें तत्त्वज्ञान आहे हें जर अमान्य करतांच येत नाहीं तर अगदीं वैचारिक बाल्यावस्थेंत असणाऱ्यांना या उच्चतम तात्त्विक सिद्धांतांचें स्फुरण झालेंच कसें असा प्रश्न उत्पन्न झाल्याविना रहात नाहीं. व ज्या अर्थीं असे श्रेष्ठ विचार त्यांना सहज स्फुरले त्या अर्थीं त्यांची तात्त्विक धारणा निर्विवादपणें श्रेष्ठ प्रतीची असली पाहिजे." परंतु भारतवर्षांत केवळ मस्तिष्कप्रधान लोकांच्या बौद्धिक करमणुकीसाठीं तत्त्वज्ञान या विषयाची निर्मिति झालेली नाहीं. भारतांतील तत्त्वज्ञानाचा विचार हा पुरुषार्थमीमांसेचा एक भाग म्हणून महत्त्वास चढलेला आहे. जीवनांत कांहींतरी घडवावयाचें आहे व त्यासंबंधाचें दिग्दर्शन तत्त्वज्ञानशास्त्रच करूं शकेल म्हणूनच येथें तत्त्वज्ञान उत्पन्न झालें. सृष्टिकर्त्यानें मानवी जीवन, आपली एक विशेष स्वरूपाची देणगी म्हणून जीवाला दिलेलें आहे व त्याचा उपयोग विशेष पद्धतीनेंच केला पाहिजे अशी भारतीय तत्त्वज्ञांची दृढ धारणा आहे. शेकडो प्रकारचे देह असतांना साऱ्या विश्वाला

गवसणी घालूं शकणाऱ्या महान् प्रतिभेचें व बुद्धिशक्तीचें विलास-मंदिर असणारा मनुष्यदेह म्हणजे सृष्टिकर्त्याचें सर्वश्रेष्ठ कर्तृत्व होय. वस्तुतः दुबळ्या शरीरामुळें इतर सर्व प्राण्यांपेक्षां मनुष्य अशक्त व असंरक्षित आहे. पण आज अजिबात नष्ट होऊं नये म्हणून पारध न करतां हिंस्र पशूंना जीवदान द्यावें अशी योजना मनुष्य आखीत आहे यावरून बुद्धीची शक्ति इतर साऱ्या सामर्थ्यां-पेक्षां किती श्रेष्ठ आहे, व तिच्यामुळें मनुष्याला सर्व सृष्टींत केवढें श्रेष्ठ स्थान लाभलें आहे याची कल्पना येते. या श्रेष्ठ शक्तीचा उपयोग कांहीं विशिष्ट ध्येयासाठींच व्हावा अशी इच्छा ज्यानें ती शक्ति दिली त्याची असणें स्वाभाविक आहे. ही देणगी निरर्थक नाहीं व म्हणूनच मानवी जीवन हें निरर्थक आणि हेतुशून्य असूं शकत नाहीं. तसें मानणें ही मूर्खपणाची परिसीमाच म्हटली पाहिजे. केवळ आपल्या पशुवासना परिपूर्ण करणें हा या जीवनाचा कधींहि हेतु असूं शकत नाहीं. भारतीय तत्त्वज्ञांच्या अंतकरणांत ही धारणा इतकी पक्की बसली आहे कीं, श्री समर्थ रामदास म्हणतात :—

मोले अनर्घ्य रत्नें येतीं । परी चिंतामणी न ये हाती ।
तेवि बहुत योनियें जन्म होती । परी मनुष्यदेह प्राप्ती दुर्लभ ॥
म्हणून नरदेह श्रेष्ठ । नाना देहामध्यें वरिष्ठ
जयाचेनि चुके अरिष्ट । जन्म मरणाचें ॥
म्हणून नरदेह निधान । जेणें ब्रह्मसायुज्यी घडे गमन ।
देव वांछिती मनुष्यपण । देवाचें स्तवन नरदेहा ॥

श्री समर्थांना ज्यांच्यापासून कवित्वाची स्फूर्ति झाली ते श्री एकनाथ महाराज तर याहीपेक्षां ठसठशीतपणें सांगतात :—

भरतखंडी नरदेह प्राप्ती । हे तो परमभाग्याची संपत्ती ।
तेथहि विवेकू परमार्थी । त्याच्या वशवर्ती मी परमात्मा ।
नरदेह परम पावन । जो भक्तिज्ञानाचें आयतन ।
जेणे साधे ब्रह्मज्ञान । तो धन्य धन्य नरदेह ।

श्रीमद् भागवत पुराणांत प्रत्यक्ष परमेश्वराच्या तोंडींच असे शब्द घातले आहेत कीं :—

एक द्वि त्रि चतुष्पादो बहुपादस्तथा पदः ।
बह्व्यः सन्ति पुरः सृष्टाः तासां मे पौरुषी प्रिया ।।
–(भागवत ११-७-१०)

सृष्ट्वा पुराणि विविधान्यजयात्मशक्त्या
वृक्षान्सरीसृपपशून्खगदंशमत्स्यान् ।।
तैस्तैरदुष्टहृदयः पुरुषं विधाय
ब्रह्मावलोकधिषणं मुदमाप देवः ।। १०
लब्ध्वा सुदुर्लभमिदं बहुसंभवान्ते
मानुष्यमर्थदमनित्यमपीह धीरः ।
पूर्णं यतेत न पतेदनुमृत्यु यावत्
निःश्रेयसाय विषयः खलु सर्वतः स्यात् ।। ११
(भागवत स्कं. ११)

(मी एक पायाची, दोन पायांची, तीन पायांची, चार पायांची अनेक पाय असलेली व मुळीं पायच नसलेली अशा अनेक नगरी निर्माण केल्या, पण त्या सर्वांत मला ही मनुष्य देहाची नगरीच प्रिय आहे. आपल्या श्रेष्ठ अशा अनादि आत्मशक्तीनें वृक्ष, सरपटणारे प्राणी, पक्षी, मत्स्य इत्यादि अनेक शरीररूपी नगरें निर्माण करून परमेश्वराला प्रसन्नता वाटली नाहीं. पण नरदेह निर्माण केल्यावर मात्र देवाला अतिशय आनंद झाला. कारण कीं प्रत्यक्ष परब्रह्माचा साक्षात्कार करून घेणारी बुद्धिमत्तेची देणगी केवळ याच शरीराला लाभलेली आहे. अनेक प्रकारच्या योनींतून भ्रमण केल्यानंतर अतिशय दुर्लभ असा मनुष्यदेह कसा बसा प्राप्त होतो. तो अनित्य असून मृत्यु या देहाच्या सारखा मागें फिरत आहे. परंतु परमपुरुषार्थ केवळ याच शरीरांत शक्य असतो. म्हणून धैर्यशील मनुष्यानें सतत प्रयत्न करून परम पुरुषार्थाची प्राप्ति करून घ्यावी व आपला जन्म सफळ करावा.)

याप्रमाणें मनुष्यशरीर ही परमेश्वराची एक विशेष प्रकारची देणगी असल्यामुळें तिचा अधिकांत अधिक उपयोग मनुष्यानें करून घेतला पाहिजे. कारण तेवढ्यासाठींच ही श्रेष्ठ देणगी मनुष्याला

मिळालेली आहे असा भारतीयांचा दृढ विश्वास आहे. अर्थातच ज्या कारणासाठीं ही देणगी देण्यांत आली आहे तें कारण शोधून काढणें हें मनुष्याचें पहिलें कर्तव्य होय; व तें शोधून काढावयाचें म्हणजे जीवन म्हणजे काय? आपण स्वत: कोण आहोंत? हें जग म्हणजे काय? याचा आपला संबंध कोणत्या प्रकारचा आहे? या जगाचा कोणी नियंता आहे काय? तो नियंता बुद्धिशक्तिशाली अथवा ज्ञानशक्तिशाली आहे काय ? त्याचें स्वरूप काय असावें? त्याचा व आपला संबंध काय? इत्यादि विविध प्रश्न या विचाराच्या अनुषंगानें उत्पन्न झाले व त्यांचीं उत्तरें देण्यांतच तत्त्वज्ञानाचा जन्म झाला. अर्थातच भारतीय तत्त्वज्ञानाची निर्मिति जीवनाचा हेतु अथवा ध्येयवाद ठरविण्याच्या तळमळींतून निर्माण झाल्यामुळें तें तात्त्विक ध्येय प्रत्यक्ष जीवनांत उमटविणें व जीवन तसें प्रत्यक्ष घडवून कृतकृत्य होणें हेंच तत्त्वज्ञानाचें खरें फलित व प्रयोजन आणि मानवी जीविताचें खरें साध्य ठरलें. अर्थातच तत्त्वज्ञान परम पुरुषार्थ म्हणजे काय हें ठरवितें व तो प्रत्यक्ष जीवनांत उतरविणें हें मनुष्याचें परमकर्तव्य आहे, असें निश्चित ठरल्यावर तत्त्वज्ञान हा भारतांत केवळ बौद्धिक चर्चेचा विषय न राहतां तो प्रत्यक्ष अनुभूतीचा व प्रयोगाचा विषय ठरला. पाश्चात्य तत्त्वज्ञान आणि भारतीय तत्त्वज्ञान यांतील महत्त्वाचा फरक हाच होय. विश्लेषणात्मक पद्धतीनें भारतीयांनीं केलेल्या तत्त्वमीमांसेप्रमाणेंच पाश्चात्यांनींहि तत्त्वज्ञानाचा विचार मांडला असला तरी व त्यांतील स्पिनोझा, ब्रॅडले, कॉन्ट, व्हाईटहेड प्रभृति तत्त्वज्ञांचे विचार भारतीय तात्त्विक विचारांशीं जुळते असले तरी एक बौद्धिक मीमांसा यापलीकडे प्रत्यक्ष जीवन घडविणें या गोष्टीला त्यांच्या तत्त्वविचारांत स्थान नाहीं. म्हणूनच पाश्चात्य तत्त्वविचारकांचा अग्रणी प्लेटो याला आपल्या आदर्श तत्त्वज्ञसम्राटाचें चित्र रेखाटतांना वासनागंधहीनतेची कल्पना करतां आली आहीं; व त्यामुळेंच अशा तत्त्वज्ञांच्या वसाहतीहि स्वार्थाच्या आहारीं जातील या भयानें

त्यानें समानभोजनाची व समानप्रजोत्पादनाची विचित्र कल्पना पुरस्कारिली. भारतवर्षांत सॉक्रेटिस अथवा प्लेटोप्रमाणें अथवा अलीकडच्याहि पाश्चात्य तत्त्वज्ञांप्रमाणें केवळ ज्ञानानें मनुष्यजीवन आदर्श होऊं शकतें यावर कधींच विश्वास नव्हता. ज्ञानानें फक्त आदर्श कळतो. तो वळून प्रत्यक्ष जीवनांत आणण्यासाठीं वेगळ्या तपस्येची व साधनेचीच आवश्यकता असते. रावणहि महान् ज्ञान-संपन्न होता. प्रत्यक्ष श्रीरामाच्या तोंडीं महर्षि वाल्मीकींनीं 'एषोऽहिताग्निश्च महातपाश्च वेदांतविद्' असे शब्द त्याच्यासंबंधीं घातले आहेत. पण म्हणून लोकांची संपत्ति गडप करण्याचा त्याचा क्रम कधीं सुटला नाहीं, स्त्रीलावण्याची पारध करण्याची त्याची प्रवृत्ति कधीं थांबली नाहीं, व एवढ्या मोठ्या ज्ञानानेंहि त्याचा पशुभाव दुरावला नाहीं. नुसत्या ज्ञानानें काय होतें याचें मूर्तिमंत चित्र दुर्योधनाच्या पुढील उद्गारांत प्रतिबिंबित झालें आहे. "जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः । जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः ।।" मला धर्म काय आहे हें कळतें पण तिकडे माझी प्रवृत्ति नाहीं, व अधर्म काय आहे हेंहि कळतें पण त्यापासून मी निवृत्त होऊं शकत नाहीं. असल्या ज्ञानसंपन्नांची भारतीय तत्त्वज्ञ नेहमींच थट्टा करीत आले आहेत. शुकाचार्यांनीं भागवतांत म्हटलें आहे कीं, "कलौ वेदान्तिनो भान्ति फाल्गुने बालका इव । पंडितास्तु कलत्रेण रमन्ते महिषा इव ।। पुत्रस्योत्पादने दक्षा अदक्षा मुक्तिसाधने ।।" (कलियुगांत बडे बडे वेदांती पुष्कळच असतात. प्रत्यक्ष मुक्तिसाधनाच्या बाबतींत मुळींच सावधपणा न बाळगतां लोकसंख्येंत भर टाकणाऱ्या आपल्या सांसारिक कार्यक्रमांच्या बाबतींत ते सदैव दक्ष असतात. त्यामुळें त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या वटवटीला हुताशनी पौर्णिमेच्या दिवशींच्या मुलांच्या गोंधळापलीकडे कांहीं अर्थ नाहीं.) विशुद्ध तत्त्वज्ञान सांगून तोंडानें विश्वबंधुत्वाच्या गप्पा मारीत मानवतेचा खाटिकखाना उघडणारा एखादा स्टॅलिन अथवा जिह्वालौल्याला बळी पडणारा कान्ट म्हणूनच भारताचा आदर्श होऊं शकत नाहीं. तत्त्वज्ञानाचे सिद्धान्त बुद्धींत उतरल्यावर मनांत बिंबून, हृदयांत

ठसून व हाडामांसांस खिळले जाऊन शरीराच्या कणाकणांतून एकच परब्रह्म सर्वच प्राणिमात्रांत भरलें आहे अशा प्रकारचा परमेश्वरी स्वरूपाचा साक्षात् आविष्कार होण्यास व त्याच भावनेनें दुःखाचे आणि विपत्तीचे डोंगर डोक्यावर सतत कोसळत असतां सर्वांशीं समतेनें वागण्याचा अचल देहस्वभाव बनण्यास अनेक पिढ्यांच्या संस्कारांची, इंद्रियनिग्रहाची, दीर्घोद्योगाची व ध्यान उपासना इत्यादि प्रत्यक्ष साधनांची आवश्यकता असते. भारतीय तत्त्वज्ञान हा असा प्रत्यक्ष साक्षात्काराचा अथवा जीवन घडविण्याचा विषय आहे. याची सर्वांत मोठी खूण ही आहे कीं अनुबंधचतुष्टयावांचून येथें तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत केवळ बुद्धि आहे म्हणून कोणालाहि प्रवेश नाहीं. अनुबंधचतुष्टय म्हणजे त्या त्या शास्त्रांतील अधिकारी व साधनें यांचा निर्देश होय ब्रह्मसूत्रावरील भाष्यांत भगवत्पूज्यपाद श्रीमदाद्य शंकराचार्यांनीं पहिल्याच सूत्रावर भाष्य करतांना असें म्हटलें आहे कीं ' साधनचतुष्टयसंपत्यनन्तरं ब्रह्मजिज्ञासा कर्तव्या नित्यानित्यवस्तुविवेकः, इहामुत्रार्थफलभोगविरागः शमादिसाधनसंपत्मुमुक्षुत्वं च एषु हि सत्स्वेव ब्रह्मजिज्ञासाया अधिकारी भवति नान्यथा ।" (नित्य व अनित्य वस्तूंचा विवेक, ह्या लोकींच्या व परलोकींच्या फलोपभोगाविषयीं वैराग्य, शम, दम उपरति, तितिक्षा, समाधान व श्रद्धा या सहा गोष्टींचें प्रत्यक्ष संपादन व मुक्तीची आत्यंतिक इच्छा या चार गोष्टी म्हणजेच साधनचतुष्टयी होय. व ही अंगीं बाणल्यावरच ब्रह्मविचारास प्रारंभ करावा. )

पुरुषार्थविचार व तत्त्वज्ञान यांचा असा संबंध असल्यामुळें भारतांतील तत्त्वज्ञानाचें पर्यवसान नेहमी अनुभूतींत झालेलें आहे. अत्याधुनिक काळापासून तर उपनिषद्काळापर्यंत या अनुभूतिवादाचा आविष्कार झालेला सुसूत्रपणें आढळून येतो. भारतीयांनीं नुसतें तत्त्वाचें चिंतन केलें नाहीं. तर कांहीं तरी प्रत्यक्ष पाहिलें, स्वतः अनुभविलें इतकेंच नव्हे तर ते स्वतः कांहीं तरी होऊन राहिले. विख्यात रमण महर्षि हे असे प्रत्यक्षदर्शी द्रष्टे पुरुष होते. ऋषि

अरविंद घोष हे असेच सिद्ध पुरुष होते. अरविंदांच्या आश्रमांत त्यांचा सिद्धिदिन पाळण्याची प्रथा आहे. त्या दिवशीं त्यांना प्रत्यक्ष साक्षात्कार झाला असें म्हणतात. त्रिखंडकीर्ति स्वामी विवेकानंद हे असे साक्षात्कारी पुरुष होते. विवेकानंदांच्या जीवनांत श्रीरामकृष्ण परमहंसांनीं त्यांना प्रत्यक्ष समाधीचा साक्षात्कार घडवून दिला व पुढें या विशिष्ट अनुभूतीला आपल्या स्वाधीन करून त्यांनीं त्यांच्या हातून कार्य घडविलें असें त्यांचे चरित्रकार श्री. सत्येन्द्रनाथ मुजुमदार यांनीं आपल्या ग्रंथांत प्रतिपादन केलें असून स्वतः श्री विवेकानंदहि " मी हिंदू धर्माचें परम सत्य अनुभविलेलें आहे " असें म्हणत असत हें प्रसिद्धच आहे. त्यांचे सद्गुरु युगावतार श्री रामकृष्ण परमहंस देव हे तर अशा अनुभूतीची मूसच होते. सर्व धर्मांच्या चरम सत्याचा त्यांना साक्षात्कार झालेला होता. भारतांतील सर्व साधनमार्गांचें अंतिम त्यांनीं प्रत्यक्ष अनुभविलें होतें असें त्यांच्या चरित्रांत वर्णन आहे. स्वतः श्री. रामकृष्ण आपल्या चरमसत्याच्या अनुभूतीसंबंधीं महिमाचरण नांवाच्या आपल्या एका भक्ताशीं बोलतांना म्हणतात: " लीलासे नित्य में लीन होना, स्थूल, सूक्ष्म, और कारणसे महाकारणमें लीन होना, जाग्रत, स्वप्न, और सुषुप्तिसे तुरीयमें लीन होना। यह भी जैसे घण्टा बजा, मानो महासमुद्रमें एक वजनदार चीज गिरी, और तरंगोंका उठना शुरू हुआ, नित्य से लीला का आरंभ हुआ, महाकारणसे स्थूल सूक्ष्म, कारण शरीरका उद्भव हुआ। उसी तुरीयसे जाग्रत, स्वप्न, और सुषुप्ति सब अवस्थाएँ आ गईं। फिर महासमुद्रकी तरंग महासमुद्रमेंही लीन हो गई। नित्य को लेकर उतरते हुए लीला मिलती है और लीला को लेकर चढते हुए नित्य मैं टंकारकी उपमा दिया करता हूँ। **मैने यह सब यथार्थ रूप में देखा है। मुझे उसने दिखाया है। चित् समुद्र है, उसका ओरछोर नहीं है। उसीसे ये सब लीलाएं उठीं है और फिर उसीमें लीन हो गईं है।** चिदाकाशमें करोडों ब्रह्माण्ड की उत्पत्ति होकर वे फिर उसीमें लीन हो गये हैं। तुम्हारी पुस्तकमें क्या लिखा है,

यह सब मैं नहीं जानता। ( श्री रामकृष्ण वचनामृत द्वितीय-भाग–अनुवादक पंडित सूर्यकांत त्रिपाठी 'निराला' पृष्ठ ५६५ )

या अत्याधुनिक तत्त्वज्ञांनीं आपल्या अनुभूतीचें जें वर्णन केलें आहे तेंच संतश्रेष्ठ श्री तुकाराम महाराजांनीं आपल्या अभंगवाणीनें सांगितलें आहे. महाराज म्हणतात :–

आपुलें मरण पाहिलें म्या डोळा। जो जाला सोहळा अनुपम्य ।। १
आनंदे दाटली तिन्ही त्रिभुवनें। सर्वात्मकपणें भोग झाला ।।२
एकदेशी होतों अहंकारें आथिला। त्याच्या त्यागें झाला सुकाळ हा।
फिटलें सुतक जन्ममरणाचें। मी माझ्या संकोचें दूरी जालों ।। ४
नारायणें दिला वसतीस ठाव। ठेवूनियां भाव ठेलों पायीं ।। ५
तुका म्हणे दिलें उमटूनि जगी। घेतलें तें अंगीं लावूनियां ।। ६
आनंदाचे डोही आनंदतरंग। आनंदचि जग आनंदाचें ।। ७
काय सांगों झालें कांहींचिया बाही। पुढें चाली नाहीं आवडीनें ।। ८
गर्भाचे आवडी मातेचा डोहळा। तेथींचा जिव्हाळा तेथें बिंबे ।। ९
तुका म्हणे तैसा ओतलासे ठसा। अनुभव सरिसा मुखा आला ।। १०

त्यांचेच समकालीन श्री समर्थरामदास यांनींहि आपल्या आत्मानुभूतीचें आपल्या ग्रंथांतून वर्णन केलें असून त्यांचा ग्रंथराज दासबोध असा अनुभव देऊं शकतो असें त्यांचें म्हणणें आहे. ते म्हणतात :– " येथें प्रत्ययासी कारण। प्रत्ययो पहावा। "

श्री समर्थांना ज्यांच्यापासून कवित्वाची स्फूर्ति मिळाली, ते श्रीएकनाथमहाराजहि आपला स्वतःचा आत्मानुभव आपल्या वाङमयांतून जागजागीं वर्णन करतात. ते म्हणतात :–

तो म्या देखिला जनार्दन। देखितांच गेला भवभ्रम ।।
सुख झाले अनुपम्य घन। पावलों सदन मोक्षाचें ।।
मस्तकीं लागतां तयाचा करू। न मोडतां सृष्टीचा वेव्हारू ।।
सर्व झालें शून्याकारू। तेजें अंबर दाटलें ।।
तया तेजाचा पारू। नेणती ब्रह्मा हरिहरू। वेद राहिले मौन्याकारू। श्रुतीसी विचारू पडिलासे ।।

तयानें काय वाणावे । कवणा उपमेनें आणावे ।
त्याविण दुजे देखावे । तरी सांगावे साक्षित्वे ॥

श्रीएकनाथमहाराज ज्यांना आपलें स्फूर्तिकेन्द्र समजतात ते भागवत धर्माची महाराष्ट्रांत प्रतिष्ठापना करणारे व माउली या अभिधानानें सर्वांच्या हृदयांत अधिष्ठित झालेले श्रीज्ञानेश्वर महाराज आपला अनुभव सांगतांना म्हणतात :–

योगिया दुर्लभ तो म्यां देखिला गे साजणी ।
पाहतां पाहतां मना न पुरे धणी ॥ धृ
देखिला गे माये देवांचाहि देव ।
फिटला संदेह निमालें दुजेपण ॥ १
अनंतवेषें अनंत रूपे देखिले म्यां त्यासी ।
बापरखुमादेवीवरू खूण बाणली कैसी ॥ २

श्रीज्ञानदेवासारख्या शब्दप्रभूला जर त्यानें केवळ ईश्वरासंबंधीं विचारच केला असता तर तसें म्हणावयास कोणतीहि अडचण गेली नसती. पण विचार केला असें म्हणण्याऐवजीं देखिलें असेच शब्द त्यांनीं वापरले आहेत व ते साभिप्राय आहेत हें अनुभूतिवादाच्या प्रकाशांत स्पष्ट दिसतें. “ चिदानंदरूपः शिवोऽहम् शिवोऽहम् ” असें म्हणणारे श्रीमदाद्यशंकराचार्य, प्रत्यक्ष वल्लभांचेंहि स्फूर्तिस्थान असणारे बंगालचे साक्षात्कारी महापुरुष भगवान् श्री चैतन्य, संत श्री तुळसीदास महाराज, सर्व संप्रदायांचे विविध आचार्य इ. आस्तिक दर्शनकारांत तर अनुभूतिवादाच्या या खुणा सांपडतातच. पण बौद्ध, जैन, महानुभाव इ. अवैदिक संप्रदाय व तंत्राच्या उपासनेचे सारे मार्ग यांच्यांतहि अनुभूतिवाद भरून राहिलेला आहे. बुद्धाचे हीनयान व महायान असे दोन पंथ प्रसिद्ध आहेत. पण हे दोन्ही प्रकट मार्ग होत. बुद्धधर्मांतील झेंद बुद्धिझम नांवाचा एक गूढ संप्रदाय असून त्या संप्रदायांत आपल्याकडील “नैषा मतिस्तर्केण आपनीया ” अथवा reason is the bar या सिद्धान्ताप्रमाणेंच केवळ बुद्धीनें परमतत्त्वाचें आकलन होऊं शकत नाहीं; म्हणून बुद्धीला थकवून अंतःप्रेरणा जागृत करण्याचा खास

साधनमार्ग असून तेथें फक्त खास निवडलेल्या लोकांनाच प्रवेश मिळतो. या "झेंद" शब्दाचें मूळ आपल्याकडील 'ध्यान' शब्दांत आहे. तात्पर्य, भारतवर्षांत उत्पन्न झालेला असा एकहि तत्त्वज्ञानाचा संप्रयदाय दाखवितां येणार नाहीं कीं ज्याच्यांत अनुभूतिवादाचा आविष्कार नाहीं व प्रत्यक्ष जीवन घडविलेले साक्षात्कारी पुरुष नाहींत. शिवाय या सर्व संप्रदायांचें एक मोठें वैशिष्टय हें आहे कीं त्या त्या संप्रदायांत शिरणाऱ्या कोणत्याहि साधकानें योग्य मार्गदर्शनाखालीं विशिष्ट साधन केल्यास त्याला हा साक्षात्कार होऊं शकतो. साक्षात्कार फक्त प्रेषिताला व्हावयाचा व तो सांगेल त्यावर आपण फक्त विश्वास ठेवावयाचा ही पद्धति भारतवर्षांत नाहीं. हे जे आपण ऐतिहासिक कालखंडांतील उल्लेख पाहिले तेच प्रागैतिहासिक काळांतील तत्त्वज्ञानाच्या ग्रंथांतून आढळतात. गीतेची पूर्णता अकराव्या अध्यायांतील विश्वरूपदर्शनावांचून होऊं शकत नाहीं व बुद्धिवादाला दाद न देणारा पार्थ प्रत्यक्ष विश्वरूपदर्शनाच्या अनुभूतीनंतरच 'करिष्ये वचनं तव' म्हणतो यांतील रहस्य गंभीरपणें विचार करण्यासारखें आहे. लोकमान्यांचें गीतारहस्य प्रसिद्ध झाल्यावर त्याची पहिली प्रत त्यांनीं महर्षि आण्णासाहेब पटवर्धन यांच्याकडे पाठविली. त्याबरोबर त्यांनीं आपल्या एका अंतेवासीयाला म्हटलें 'अरे, यानें अकराव्या अध्यायावर काय लिहिलें आहे पहा बरें! कारण त्यावर नीट लिहिलें असलें तर बाकी सगळें ठीकच आहे.' आण्णासाहेब पटवर्धनांच्या या उद्‌गारांचें मर्म हेंच आहे कीं तत्त्वज्ञान हा केवळ मस्तिष्कप्रधान चर्चेचा विषय नसून तो अनुभूतीचा विषय आहे ही गोष्ट गीतेवरील लेखकाच्या ध्यानांत आली कीं नाहीं तें पहावें. ही जी गीतेपासून तर रामकृष्ण, रमण, अरविंदापर्यंत आपण परंपरा पाहिली तिनें वेदांचें शिर म्हणून विख्यात असलेल्या उपनिषदांचे सांदीकोपरे धवलित झालेले आढळतील. उपनिषदांत तत्त्वज्ञानाचें तात्पर्य प्रत्यक्ष जीवनांत उमटतें असें ठाम विधान केलेलें आहे. ऋषि म्हणतात :—

आत्मानं चेत् विजानीयात् अयमस्मीति पूरुषः ।
किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत् ॥
तत्र को मोहः कः शोकः एकत्वमनुपश्यतः ।

मीच परब्रह्म आहे असें आत्मज्ञान मनुष्याला झालें तर तो कोणासाठीं, कोणत्या इच्छेनें सांसारिक तापानें तप्त होईल! एकत्वाचें ज्ञान झाल्यावर त्या ठिकाणीं कशाचा शोक व कशाचा मोह राहणार! बृहदारण्यकोपनिषदांत याज्ञवल्क्य व मैत्रेयी यांच्या संवादांत याज्ञवल्क्यांनीं मैत्रेयीला आत्मज्ञानाचा उपदेश करतांना "आत्मा वा अरे द्रष्टव्यः" प्रत्यक्ष आत्मा पहावा असें सांगितलें आहे व आत्मदर्शन हें श्रवण अथवा ऐकणें, मनन अथवा विचार करणें व निदिध्यासन अथवा अखंड अनुसंधान ठेवणें यांपेक्षां वेगळें आहे हें स्पष्ट करण्यासाठीं हेतुतः या सर्वच क्रिया आत्मदर्शनासाठीं आहेत असें उपनिषदांनीं दर्शविलें आहे. ऋषि म्हणतात, "आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यः मन्तव्यः निदिध्यासितव्यश्च" हे मैत्रेयी, आत्मा हा प्रत्यक्ष अनुभवावा व या आत्मदर्शनासाठींच तो ऐकावा, त्याचें मनन करावें व त्याचें नित्य अनुसंधान ठेवावें." या तऱ्हेच्या प्रत्यक्ष आत्मदर्शनांतूनच उत्पन्न झालेल्या साम्यस्थितीनें कशी कर्मातीत स्थिति होते याचें विवेचन करतांना इंद्र म्हणतो. " न तस्य लोमाऽपि मीयते अपि मातृवधेन पितृवधेन ब्रह्मवधेन आचार्यवधेन " मातृवधानें, पितृवधानें, ब्रह्मवधानें इतकेंच काय पण प्रत्यक्ष गुरुवधानें ही याचें कूस देखील वाकडें होऊं शकत नाहीं. उपनिषदांनीं असें अनुभवात्मक आत्मज्ञान न मिळविणाऱ्या गृहस्थास स्वच्छ शब्दांत आत्महन् म्हणजे आत्महत्यारी असें म्हटलें आहे. या अनुभूतिवादालाच पाश्चात्य शास्त्रज्ञांनीं Mysticism अथवा गूढवाद असा शब्द योजला आहे. पण वस्तुतः याला गूढवाद असें म्हणण्याचें कांहीं कारण नाहीं. त्यांच्या तत्त्वज्ञानांत अनुभूतिशास्त्राशीं कांहीं संबंध नसल्यामुळें व त्यांची तत्त्वमीमांसा भारतीयांप्रमाणें पुरुषार्थ मीमांसेचें अंग नसल्यामुळें त्यांना तो गूढवाद वाटणें अगदीं स्वाभाविक आहे यांत कांहीं शंका नाहीं. ब्रह्माच्या प्रत्यक्ष प्राप्तीनंतर

ज्या परमसुखाची प्राप्ति होते तें सर्वश्रेष्ठ, कधींहि न संपल्यामुळें व बाह्य गोष्टीची अपेक्षा नसलेलें असें स्वयंपूर्ण सुख होय. उपनिषदांत म्हटलें आहे, " कुलीन, सुशिक्षित, विचक्षण, बलिष्ठ व स्थिर बुद्धीच्या तरुणास ही सर्व सुवर्णमय पृथ्वी मिळाली असतां जो आनंद होईल तो मानुष आनंद होय. असे शंभर मानुष आनंद मिळून एक मनुष्यगंधर्वांचा आनंद होतो. असे शंभर मनुष्यगंधर्वांचें आनंद मिळून देवगंधर्वांचा एक आनंद होतो. या प्रकारचे शंभर देवगंधर्वांचें आनंद मिळून एक पितृआनंद होतो. असे शंभर पितृ-आनंद म्हणजे स्वयंसिद्ध देवांचा एक आनंद होय. अशा प्रकारचे स्वयंसिद्ध देवांचे शंभर आनंद म्हणजे कर्मसिद्ध देवांचा एक आनंद होय. अशा कर्मसिद्ध देवांचे शंभर आनंद म्हणजे सर्वांत श्रेष्ठ देवांचा एक आनंद होय. अशा देवांचे शंभर आनंद म्हणजे इंद्राचा एक आनंद, इंद्राचे शंभर आनंद म्हणजे बृहस्पतीचा एक आनंद, अशा बृह-स्पतीचे शंभर आनंद म्हणजे प्रजापतीचा एक आनंद होय व अशा प्रजापतीचे शंभर आनंद म्हणजे एक ब्रह्मानंद होय. सर्व वासना नष्ट झालेल्या ऋषीस यापैकीं प्रत्येक आनंद क्रमशः व उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणांत मिळतो. "

भौतिक सुखाच्या मानानें आत्मानुभवाचा आनंद कधींहि मोजतां येणार नाहीं हें येथें उत्कृष्टपणें दाखविलेलें आहे व या तऱ्हेच्या श्रेष्ठ स्थितीसाठीं आवश्यक तीं साधनेंहि उपनिषदानें दिग्दर्शित केलीं आहेत. उपनिषदांतील कांहीं उतारेच आम्ही या ठिकाणीं उद्धृत करतों म्हणजे त्यावरून उपनिषदांतील अनुभूतिवादाची कल्पना येईल.

भिद्यते हृदयग्रंथिः छिद्यन्ते सर्वसंशयाः ।
क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥ मुं. २,२,८
आनंदं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कुतश्चन ॥ तै. २,९

यदा ह्येवैष एतस्मिन्नदृश्ये अनात्मे अनिरुक्ते अनिलयने अभयं प्रतिष्ठां विन्दते अथ सो अभयं गतो भवति ॥ (तै. २.७)

य आत्मा अपहतपाप्मा विजरो विमृत्युः विशोको विजिघत्सो

अपिपासः सत्यसंकल्पः सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः स सर्वांश्च लोकानाप्नोति सर्वांश्च कामान् यस्तमात्मानमनुविद्य विजानातीति (छांदोग्य ८.७.१) ब्रह्म ह वा इदमग्र आसीत् तदात्मानमवेत् अहं ब्रह्मास्मीति तस्मात्तत्सर्वमभवत् तद्यो यो देवानाम् प्रत्यबुध्यत स एव तदभवत् तथा ऋषीणां तथा मनुष्याणाम् । तद्धैतत्पश्यन् ऋषिर्वामदेवः प्रतिवेदे अहं मनुरभवम् सूर्यश्चेति (बृ. १,४,१०)

अश्व इव रोमाणि विधूय पापं चंद्र इव राहोर्मुखात्प्रमुच्य धूत्वा शरीरं अकृतं कृतात्मा ब्रह्मलोकमभिसंभवामीति (छां. ८. १३. १)

स होवाच ऋग्वेदं भगवोऽध्येमि यजुर्वेदं....राशिं दैवं निधिं वाकोवाक्यमेकायनं, वेदविद्यां, ब्रह्मविद्यां, भूतविद्यां, क्षत्रविद्यां, नक्षत्रविद्यां, सर्पजनदेवविद्यां एतद्भगवोऽध्येमि सोऽहं भगवो मंत्रविदेवास्मि नात्मवित् श्रुतं ह्येव मे भगवद्दृशेभ्यः तरति शोकमात्मविदिति सोऽहं भगवः शोचामि तं मा भगवान् शोकस्य पारं तारयत्विति (छां. ७-१-२-३) पराञ्चि खानि व्यतृणत्स्वयंभूस्तस्मात् पराङ पश्यति नान्तरात्मन् । कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षदावृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन् ।। (क. २. ४. १) सत्येन लभ्यः तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् । अंतःशरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः ।। (मु. ३. १. ५) नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ।। (क. १. २. २२) इह आचार्यवान्पुरुषो वेद तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्य इति ।। (छां. ६-१४-२) क्रियावंतः श्रोत्रिया ब्रह्मनिष्ठाः स्वयं जुह्वत एकर्षिं श्रद्धयंतः । तेषामेवैतां ब्रह्मविद्यां वदेत शिरोव्रतं विधिवत् यैस्तु चीर्णम् ।। ( मुं. ३-२-१० ) इदं वाव तत् ज्येष्ठाय पुत्राय पिता ब्रह्म प्रब्रूयात्प्रणाय्याय वान्तेवासिने । नान्यस्मै कस्मैचन यद्यप्यस्मा इमामद्भिः परिगृहीतां धनस्य पूर्णां दद्यादेतदेव ततो भूय इत्येतदेव ततो भूय इति ।। (छां.३-११-५-६) वेदान्ते परमं गुह्यं पुराकल्पे प्रचोदितम् । नाप्रशान्ताय दातव्यं नापुत्रायाशिष्याय वा पुनः ।। यस्य देवे परा भक्तिः यथा देवे तथा गुरौ । तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः प्रकाशन्ते महात्मनः ।। (श्वे. ६-२२-२३)

त्रिरुन्नतं स्थाप्य समं शरीरं हृदींद्रियाणि मनसा संनिरुध्य। ब्रह्मोडुपेन प्रतरेत विद्वान् स्रोतांसि सर्वाणि भयावहानि ॥ ८ ॥ प्राणान्प्रपीड्येह स युक्तचेष्टः क्षीणे प्राणे नासिकयोच्छ्वसीत। दुष्टाश्वयुक्तमिव वाहमेनं विद्वान्मनो धारयेताप्रमत्तः ॥ ९ ॥ समे शुचौ शर्करावह्निवालुकाविवर्जिते शब्दजलाश्रयादिभिः। मनोनुकुले न तु चक्षुपीडने गुहानिवाताश्रयणे प्रयोजयेत् ॥ १० ॥ (श्वे. २-८-१०) पृथिव्यप्तेजोनिलखे समुत्थिते पंचात्मके योगगुणे प्रवृत्ते। न तस्य रोगो न जरा न मृत्युः प्राप्तस्य योगाग्निमयं शरीरम् ॥ १२ ॥ लघुत्वमारोग्यमलोलुपत्वं वर्णप्रसादः स्वरसौष्ठवं च। गन्धः शुभो मूत्रपुरीषमल्पं योगप्रवृत्ति प्रथमां वदन्ति ॥ १३ (श्वे. २. १२-१३) एष सर्वेषु भूतेषु गूढोत्मा न प्रकाशते। **दृश्यते** त्वग्र्यया बुद्धया सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ॥ (क.१ ३. १२) तमक्रतुः **पश्यति** वीतशोको धातुप्रसादान्महिमानमात्मनः ॥ (क. १. २. २०) न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवैस्तपसा कर्मणा वा। ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वः ततस्तु तं **पश्यते** निष्कलं ध्यायमानः ॥ (मुं. ३. १. ८) अहं वृक्षस्य रेरिव। कीर्तिः पृष्ठं गिरेरिव। उर्ध्वं पवित्रो वाजिनी वस्वमृतमस्मि। द्रविणं सवर्चसम्। सुमेधा अमृतोऽक्षितः ॥ (तै. १. १०.) स य एवंवित्। अस्माल्लोकात्प्रेत्य। एतमन्नमयमात्मानमुपसंक्रम्य। एतं प्राणमयमात्मानमुपसंक्रम्य। एतं मनोमयमात्मानमुपसंक्रम्य। एतं विज्ञानमयमात्मानमुपसंक्रम्य। एतमानंदमयमात्मानमुपसंक्रम्य। इमाँल्लोकान्कामान्नीकामरूप्यनुसंचरन्। एतत्साम गायन्नास्ते। हा३वु हा३वु हा३वु। अहमन्नमहमन्नमहमन्नम्। अहमन्नादो२ऽहमन्नादो२ऽहमन्नादः। अहं श्लोककृदहं श्लोककृत् अहं श्लोककृत्। अहमस्मि प्रथमजा ऋता३स्य। पूर्वं देवेभ्योऽमृतस्य ना३भायि। यो मा ददाति स इदमेव मा३वाः। अहमन्नमन्नमदन्तमा३स्मि। अहं विश्वंभुवनमभ्यभवा३म्। सुवर्ण ज्योतीः ॥ (तै. ३. १०. ५-६)

(परम श्रेष्ठ वस्तूहूनहि श्रेष्ठ अशा ब्रह्मास प्रत्यक्ष पाहिल्यामुळें त्याच्या सर्व हृदयग्रंथी तुटून जातात. त्याचे सर्व संशय नाहींसे

होतात; व त्याच्या कर्मांचा क्षय होतो. 'ब्रह्माचा आनंद ज्याला कळला तो कशामुळेंहि भीत नाहीं.' 'तो विदेही, अलक्ष्य, निर्भय व निरालंब असला तरी सर्वांचें आश्रयस्थान अशा ब्रह्मांत प्रतिष्ठित झाल्यामुळें तो निर्भय होतो.' 'आत्मा हा निष्पाप, अजर, अमर, शोक व क्षुत्पिपासारहित, व सत्यसंकल्प आहे. अशा आत्म्यास शोधावें व त्याचें ज्ञान मिळवावें. याप्रमाणें आत्म्यास शोधून त्याचें जो प्रत्यक्ष ज्ञान संपादितो त्याच्या सर्व वासना तृप्त होतात व त्यास सर्व लोक लाभतात.' "सृष्टीच्या आरंभीं ज्याप्रमाणें ब्रह्माला प्रथम आपल्या स्वतःची जाणीव उत्पन्न झाल्यामुळें त्यास खरोखर 'हें सर्व मी आहे' असें कळलें, त्याप्रमाणेंच देव, मनुष्य व ऋषी यांपैकीं ज्या कोणास आपल्या स्वतःची जाणीव उत्पन्न होते तो खरोखरच ब्रह्मरूप होतो." "हें सर्व प्रत्यक्ष पाहिलेल्या ऋषि वामदेवाच्या (भूतकालचीं अनंत वर्षें वर्तमान कालाच्या अखंड टिकणाऱ्या एका क्षणाप्रमाणें वाटून) तोंडून असे उद्‍गार बाहेर पडले कीं 'मीच मनूमध्यें होतों व मीच सूर्यास प्रकाश दिला.'' "घोडा ज्याप्रमाणें आपली आयाळ झाडतो त्याप्रमाणें मी आपलें सर्व पाप झाडून टाकिलें आहे. ग्रहण लागलेला चंद्र जसा विकृत न होतां राहूच्या मुखांतून पूर्णपणें बाहेर पडतो, त्याप्रमाणें मी देहबंधनांतून मुक्त होऊन आत्मज्ञानाचें जीवन संपादिलें आहे."

"आत्मज्ञानास्तव नारद आपले सद्‍गुरु सनत्कुमार यांच्याकडे गेले असतां सांगतात :– 'मी सर्व वेद, इतिहास व पुराणें यांचा अभ्यास केला आहे. पितृविद्या, गणितशास्त्र, शकुनशास्त्र, तर्कशास्त्र, वेदविद्या, भूतविद्या, ब्रह्मविद्या, शस्त्रविद्या, मंत्रविद्या, नक्षत्रविद्या व कला या सर्वांचा अभ्यास केला आहे. परंतु या सर्व विद्या मला दुःखसागराच्या पैलतीरीं नेण्यास असमर्थ असल्यामुळें माझें अंतःकरण शोकाविष्ट झालें आहे. मी केवळ मंत्रविद् म्हणजे शब्दपंडितच आहे. मला आत्मज्ञान झालेलें नाहीं व आत्मज्ञानाच्या साहाय्यानेंच हा दुःखमय संसार तरून जातां येतो असें आपणांसारख्या श्रेष्ठांच्या तोंडून मी ऐकलें

आहे. मी शोकसागरांत बुडत आहे तरी आपण मला या शोकसागराच्या पार न्यावें." "परमेश्वरानें इंद्रियें उत्पन्न करते वेळींच त्यांना पराङमुख उत्पन्न केलें. म्हणून मनुष्याची दृष्टि अंतर्मुख नसून बहिर्मुख असते. अमरत्व मिळविण्याची इच्छा असलेला एखादा विरळाच धैर्यशाली ज्ञानी मात्र आपली दृष्टि अंतर्मुख करून प्रत्यगात्म्याला पाहतो." "शरीराच्या आंत राहणारा हा ज्योतिर्मय शुभ्र आत्मा सत्य, तपश्चर्या व नित्य ब्रह्मचर्य या साधनांनीं आपले सर्व दोष व अशुद्धता नाहींशी करून यती पाहतात." "आत्मा केवळ प्रवचनानें, कुशाग्र बुद्धीच्या साहाय्यानें किंवा बहुश्रुतपणानें प्राप्त होत नाहीं." "ज्यानें सद्गुरु केला आहे त्यालाच ब्रह्मज्ञान होतें. जोंपर्यंत मुक्त होत नाहीं तोंपर्यंतच हा संसार आहे. नंतर तो पूर्णकाम होतो." "ज्यानें आपल्या डोक्यावरून अग्नि नेण्याचें अत्यंत कठिण व्रत केलें आहे अशा शिष्यालाच सद्गुरूनें आत्मज्ञानाचा मार्ग दाखवावा. क्रियावंत, श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ, हवन करणारे व श्रद्धावान् अशांनाच ही ब्रह्मविद्या सांगावी." "ब्रह्मज्ञान श्रेष्ठ पुत्रास किंवा गुरूच्या सहवासांत बरेच दिवस राहिलेल्या सत्पात्र, योग्य व गुणवान् शिष्यास सांगावें. कारण, समुद्रवलयांकित पृथ्वी भरून उरणाऱ्या धनसंचयापेक्षांहि ब्रह्मज्ञानाचा उपदेश कितीतरी पटीनें श्रेष्ठ आहे." "वेदांतामध्यें पूर्वींच अतिशय गूढ असें तत्त्व सांगितलें आहे. जो कमालीचा शांत नाहीं अशाला, व जो आपला पुत्र अथवा शिष्य नाहीं अशाला हें देऊं नये. ज्याची ईश्वरावर व त्याचप्रमाणें गुरूवर पराकाष्ठेची भक्ति असेल त्यालाच, केवळ त्यालाच हें परमार्थाचें रहस्य कळतें." "आपल्या शरीराचे तीन उन्नत भाग अगदीं सरळ एका रेषेंत येतील अशा रीतीनें बसून मनासह सर्व इंद्रियें हृदयांत कोंडून ठेवावीं व एकाग्र चित्तानें ब्रह्माचें ध्यान करावें. (गीतेंतील 'समं कायशिरोग्रीवं' ह्याचाच अनुवाद होय.) ह्या ब्रह्मरूपी बोटीच्या साहाय्यानें आत्मविकासप्रतिरोधक असे सर्व प्रवाह तरून जावे. प्राणाचा निरोध करावा व नियमित कर्मेंच तेवढीं करावीं. श्वास पूर्णपणें

आंत घेतल्यावर तो जेव्हां क्षीण होतो तेव्हां तो नाकावाटे बाहेर सोडावा. हें आपलें मन म्हणजे खट्याळ घोडे जोडिलेल्या रथाप्रमाणें आहे. ते सावधपणें आपल्या ताब्यांत ठेवावे. खडे, अग्नि व वाळू नसलेल्या, आवाज व जलाशय जेथें नाहीं अशा सपाट व स्वच्छ जागीं योगाभ्यासास बसावें. योगाभ्यासाची जागा मनास आनंद देणारी असावी, व डोळ्यास त्रासदायक नसावी. योगाभ्यासासाठीं गुहेंतील निवांत जागा पसंत करावी." "पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश या पंच महाभूतांपासून उत्पन्न होणारे योगाचे पांच प्रकारचे गुण साधकाच्या अंगीं बाणले व त्याचें शरीर योगतेजानें भरून गेलें म्हणजे त्यास रोग, जरा व मृत्यु यांची भीति राहात नाहीं. त्याचें शरीर हलकें होतें व त्यास पूर्ण आरोग्य प्राप्त होतें. त्याचें शरीर निरोगी होतें, लोलुपता नष्ट होते, चेहरा प्रफुल्ल व कांतिमान् होतो व आवाज मधुर होतो. त्याचा शरीरगंध शुभ असतो, व मूत्रपुरीष अल्प होतें. नवशिक्या साधकांस योगाभ्यासांत दृढता आली किंवा नाहीं हें या पदचिन्हांवरून ठरवितां येतें." "सर्वभूतांमध्यें गुप्तरूपानें राहणारा हा आत्मा सर्वांच्याच दृष्टीस पडतो असें नाहीं, फक्त सूक्ष्मदर्शी ऋषीस आपल्या कुशाग्र बुद्धीच्या साहाय्यानें ईश्वरास पाहतां येतें." "शरीरांतील सर्व किल्मिष निखालस धुवून काढल्यावरच आत्मा किती श्रेष्ठ आहे याचा अनुभव येतो." "चक्षूनें, वाचेनें किंवा इतर कोणत्याहि इंद्रियाच्या साहाय्यानें ईश्वराचें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं, तर ज्ञानप्रसादानें सर्व शरीर पूर्णपणें शुद्ध व पवित्र करून ध्यान केल्यानेंच तो निष्कलंक ईश्वर दृष्टीस पडतो." 'अहं वृक्षस्य रेरिव' व 'स य एवंवित्' या येथें उद्धृत केलेल्या दोन उताऱ्यांवरील प्रा. रानडे यांचें विवेचन अत्यंत मूलगामी असून त्यावरून उपनिषदांतील अनुभूतिवादाची नीट कल्पना येऊं शकेल. म्हणून ते येथें उद्धृत करतों. "तैत्तिरीयोपनिषदांतील त्रिशंकु ऋषींचे हे उद्गार अत्यंत उत्तम व मननीय आहेत. आत्मज्ञान झाल्यावर 'अहं वृक्षस्य रेरिवा' म्हणजे 'मी वृक्ष हलविणारा आहे' असा अनुभव आपल्याला आल्याचें त्रिशंकु ऋषींनीं

सांगितलें आहे. येथें वृक्ष याचा अर्थ देहवृक्ष किंवा ब्रह्मांडवृक्ष असाही होऊं शकेल. उपनिषत्कालीन व तदनंतरचे ग्रंथकार देहास व विश्वास वृक्षाची उपमा देत हें सर्वांस माहीतच आहे. पुढें त्रिशंकु ऋषि म्हणतात, 'मी वस्तुतः आत्मरूपच असल्यामुळें मला या देहवृक्षास अथवा विश्ववृक्षास हलवितां आलें. माझी कांति पर्वतशिखराप्रमाणें आहे.' याचा अर्थ असा कीं, त्यांस आत्मप्रतीति आली तेव्हां या आत्मानुभवाच्या उच्च भूमिकेवरून सर्व वस्तूंकडे पाहिलें असतां या सर्व त्यांस इतक्या क्षुद्र व निरर्थक वाटूं लागल्या कीं आपण या सर्वांच्या शिखरावर आहों म्हणजे शिखराप्रमाणें या सर्वांपासून अलिप्त व उन्नत आहों असें त्यांस वाटूं लागलें. पुढें त्रिशंकुऋषि म्हणतात, 'मी ज्या वंशांत जन्मलों तो वंश म्हणजे मूर्तिमंत पावित्र्यच होय.' ज्यापासून हें सर्व जग निर्माण होतें त्या आत्म्याच्या पावित्र्याचा येथें उल्लेख असावा असें दिसतें. पुढें मी सूर्यावर प्रतीत होणारें आत्मतत्त्व आहे' असें म्हटलें आहे. येथें ईशोपनिषदाप्रमाणें जीवात्मा व परमात्मा यांमधील ऐक्य दाखविलें आहे. त्रिशंकुऋषि पुढें म्हणतात, 'मी अमूल्य द्रव्यनिधि आहे असें मला वाटलें' येथें त्यांनीं आपण प्राप्त करून घेतलेल्या आत्मानुभवाच्या अपरिमित धनाचा उल्लेख केला असावा. शेवटीं 'मी ज्ञानी, अमर व अक्षय पुरुष आहे' असें त्रिशंकु ऋषींनीं सांगितलें आहे. यावरून आपण व ब्रह्म एक व अभिन्नरूप आहों असें त्यांनीं दर्शविलें आहे. तैत्तिरीयोपनिषदांत एके ठिकाणीं एका परमश्रेष्ठ ऋषीनें उन्मनी अवस्थेंत नंतर काढलेले उद्‌गार ग्रथित केले आहेत. त्यांच्या इतके उदात्त व गंभीर विचार तदनंतरच्याहि वाङ्मयांत कोठेंच सांपडणार नाहींत. "अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय कोश अनुक्रमें ओलांडून गेल्यावर 'या जगांत माझ्याशिवाय दुसरा कोणीही नाहीं.' या भावनेच्या एकांतांत बसून तो अगदीं शांतपणें पुढील विश्वैक्याचें गाणें गात राहतो. "किती आश्चर्याची गोष्ट! मीच अन्न आहे व मीच अन्न खाणारा आहे!' या उद्‌गाराचा तत्त्वज्ञानदृष्ट्या असा अर्थ होतो कीं, स्वतः

आत्मज्ञच जड पदार्थ व चैतन्य असून या दोहोंना निगडित करणारी साखळीहि तोच आहे व विज्ञानदृष्टया ज्ञाता, ज्ञेय व या दोहोंस एकत्र करणारें ज्ञानही सर्व तोच आहे. आध्यात्मिक अनुभवाची ही एक अवस्था असून या अवस्थेंत योद्धा, युद्धभूमि व युद्ध यांत कांहींहि भेद रहात नाहीं व ही त्रिपुटी नाहींशी होते असें एका आधुनिक तत्त्ववेत्त्यानें या अवस्थेचें वर्णन केलें आहे. 'मी धर्माचा प्रथम पुत्र आहे. देवापेक्षां मी वयानें मोठा आहे. मी अमरत्वाचें केंद्रस्थान आहे. मला जो देतो तो मला सदैव आपल्या स्वाधीन ठेवतो. जो सर्व अन्न खातो त्यास मी अन्न म्हणून खातो. मी सूर्यप्रकाशानें हें सर्व विश्व धवलित करतों."

देहाच्या देहलींत प्रकाशणाऱ्या आत्मज्योतीची विश्वात्म भावनेंत परिणति होण्याचें वरील विश्वैक्याचें गाणें हें केवढें निदर्शन आहे! उपनिषदांतील वरील उताऱ्यांचें नीट मनन केलें तर रमणांपासून तर उपनिषत्काळापर्यंत अनुभूतिवादांत पर्यवसित होणारी भारतीय तत्त्वज्ञानाची परंपरा कशी एकात्म आहे हें आतां सहजच उलगडेल. नुसतें अनुभूतीचें दिग्दर्शनच नव्हें तर 'त्रिरुन्नतं स्थाप्य समं शरीरम्' यासारखे हटयोगादि साधनांचे, मांडूक्योपनिषदांतील प्रणवादि साधनांचें, व ओंकाराच्या अक्षरसाधनांचे व राजयोग ज्ञानयोग (श्रोतव्यः. मंतव्यः इत्यादि) लययोग व मंत्रयोग यासारखे अनुभूतीच्या प्रत्यक्ष प्रयोगात्मक साधनांचेहि स्पष्ट उल्लेख आढळतात. पातंजल सूत्रादि ग्रंथांतून याच साधनमार्गाचें अधिक शास्त्रीय पद्धतीनें, प्रक्रिया म्हणून, प्रतिपादन केलेलें आहे. यावरून भारतीय भावजीवनाचा, अनुभूतींत पर्यवसित होणारा तत्त्वज्ञानात्मक पाया उपनिषत्काळींच पूर्ण सिद्ध झाला होता असें म्हणतां येतें. पण उपनिषदें हीं अर्वाचीन असून सर्वांत प्राचीन समजण्यांत येणाऱ्या ऋग्वेद संस्कृतीच्या वेळीं हा पाया सिद्ध झाला होता किंवा नाहीं असा प्रश्न वैदिक राष्ट्राच्या धारणांचें समालोचन करतांना उद्भवल्याविना रहात नाहीं. तत्त्वज्ञानाच्यासंबंधीं मागच्या व्याख्यानांत तें ऋग्वेदकाळींच सिद्ध

झालेलें होतें हें नासदीयसूक्तादि उल्लेखांचें परीक्षण करून दाखविलेलेंच आहे. अनुभूतिवादासंबंधीं ऋग्वेदांत काय उल्लेख अथवा पदचिन्हें आढळतात तीं आतां पाहूं.

## ऋग्वेदांतील अनुभूतिवाद

आश्चर्याची गोष्ट अशी आहे कीं उपनिषदांप्रमाणेंच ऋग्वेदांतूनहि अनुभूतिवाद व साधनमार्ग यांचीं स्पष्ट पदचिन्हें आढळतात. उदाहरणार्थ विश्वात्मैक्याच्या अनुभूतीचीं ऋग्वेदांतील मंत्रद्रष्टया ऋषींची हीं दिव्य गीतेंच पहा :–

अहं रुद्रेभिः वसुऽभिः चरामि अहं आदित्यैः उत विश्वऽदेवैः ।
अहं मित्रावरुणा उभा बिभर्मि अहं इन्द्राग्नी (इति) अहं अश्विना उभा ।।१

अहं सोमं आहनसं बिभर्मि अहं त्वष्टारं उत पूषणं भगम् ।
अहं ददामि द्रविणं हविष्मते सुप्रऽअव्ये यजमानाय सुन्वते ।।२
अहं राष्ट्री संऽगमनी वसूनां चिकितुषी प्रथमा यज्ञियानाम् ।
तां मा देवाः विअदधुः पुरुऽत्रा भूरिऽस्थात्रां भूरि आवेशयन्तीम्।।३
मया सः अन्नं अत्ति यः विऽपश्यति यः प्राणिति यः ईं शृणोति उक्तम्
अमन्तवःमां ते उपक्षियन्ति श्रुधि श्रुत श्रद्धिऽवं ते वदामि।।४
अहं एव स्वयं इदं वदामि जुष्टं देवेभिः उत मानुषेभिः। यं कामये तम्ऽ तं उग्रं कृणोमि तं ब्रह्माणं तं ऋषिं तं सुमेधाम् ।।५
अहं रुद्राय धनुः आऽतनोमि ब्रह्मऽद्विषे शरवे हन्त वै ऊं(इति) अहं जनाय सऽमदं कृणोमि अहं द्यावापृथिवी (इति) आविवेश ।।६
अहं सुवे पितरं अस्य मूर्धन् मम योनिः अप्ऽसु अन्त (रिति) समुद्रे । ततः वि तिष्ठे भुवना अनुविश्वा उत अमुं द्यां वर्ष्मणा उप स्पृशामि ।।७

अहं एव वातःऽइव प्रवामि आऽरभमाणा भुवनानि विश्वा ।
परः दिवा परः एना पृथिव्या एतावती महिना सबबूव ।।८

(ऋग्वेद १०-१२५)

मी (आदिशक्ति) रुद्रांबरोबर, दिव्य वसूंच्या बरोबर नित्य वसत असतें. तशीच आदित्य आणि विश्वेदेव ह्यांच्याबरोबरहि मी वसत असतें. मी मित्र आणि वरुण अशा दोघांच्याहि स्वरूपांत धारण करतें, त्याचप्रमाणें इन्द्राग्नी आणि उभयतां अश्वीदेव हे सर्व मीच बनलें आहे. आवेशाचा दणदणाट उडवून देणारा जो सोम त्याला मीच धारण करतें; तसेंच त्वष्टा, पूषा आणि (भाग्याधिपति) भग ह्यांनाहि धारण करतें. हविर्भाग अर्पण करणारा, भक्तीनें उत्सुक आणि सोमरस पिळून समर्पण करणारा जो यज्ञकर्ता यजमान त्याला इच्छित असेल तें धन मी अर्पण करतें. जगाची जी स्वामिनी ती मी, दिव्य निधींचें जें भांडार तें मी. मी ज्ञानरूप आहेच; पण यज्ञयोग्य जे दिव्य विबुध, त्यांच्यामध्यें आद्य म्हणजे अगदीं पहिली मीच आहे. म्हणूनच त्या देवांनीं मला निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या ठिकाणीं ठेविलें (निरनिराळ्या नांवांनीं वर्णन केलें.) कारण मी असंख्य ठिकाणीं वास करणारी, आणि असंख्य म्हणजे सर्व वस्तुमात्रामध्यें भरून राहिलेली आहे. जो (प्राणी) अन्न खातो, जो पाहतो, जो श्वासोच्छ्वास करतो किंवा बोललेलें ऐकतो, तो ह्या सर्व क्रिया माझ्या शक्तीनेंच करतो; पण हें त्यांना कळत नाहीं कीं ते सर्व माझ्याच ठिकाणीं राहतात. तर बुद्धिमान् मनुष्या, हें ऐकून ठेव. तुझा विश्वास बसेल असेंच मी तुला सांगतें. जें देवांना आणि मनुष्यांनाहि मान्य झालें पाहिजे, तेंच आतां मी स्वतः सांगतें. तें हें कीं (सत्कर्माचरणामुळें) ज्याच्याकडे माझें मन ओढवतें त्याला मी ब्रह्मवेत्ताहि करते, त्याला प्रज्ञावान् ऋषि देखील करून सोडते. वेदाचा (ज्ञानाचा) द्वेष करणारा जो दुष्ट शत्रू त्याला ठार मारण्यासाठीं रुद्राचें धनुष्य मीच सज्ज करतें. जनतेच्या हितासाठीं मीच युद्धाची धुमाळी उडवून देतें; याप्रमाणें द्यावापृथिवीमध्यें मी सर्वत्र भरून राहिलेली आहे. ह्या (रजोलोकाच्या आणि मृत्युलोका) च्या डोक्यावर मी (द्यौ) पित्याला उत्पन्न केलें. पण माझें स्वतःचें मूलस्थान (आदिकारणरूप) समुद्राच्या आंत आहे. तेथून

मी सर्व भुवनांना व्यापून राहिलेली असून माझ्या विस्तारानें मी द्युलोकाच्या सीमेलाहि सहज स्पर्श केला आहे. वायूप्रमाणें सर्वत्र संचार करणारी फक्त मीच आहे; कारण मीच ह्या सर्व भुवनांना उत्पन्न केलें. म्हणूनच ह्या द्युलोकाच्याहि पलीकडे मग ह्या पृथ्वीच्या पलीकडेसुद्धां (–पण हें सांगावयास नकोच कीं) मीं आपल्या अशा प्रकारच्या म्हणजे अमर्याद विस्तारानें सर्व कांहीं व्यापून राहिलेली आहे.

अहं मनुः अभवम् सूर्यः च अहं कक्षीवान् ऋषिः अस्मि विप्रः ।
अहं कुत्सं आर्जुनेयं नि ऋञ्जे अहं कविः उशना पश्यत मा ॥ १
अहं भूमिं अददां आर्याय अहं वृष्टिं दाशुषे मर्त्याय ।
अहं अपः अनयं वावशानाः मम देवासः अनु केतं आयन् ॥ २
अहं पुरः मन्दसानः वि ऐरं नव साकं नवतीः शम्बरस्य ।
शतऽतमं वेश्यं सर्वऽताता दिवःऽदासं अतिथिऽग्वं यत् आवम् ॥ ३
प्र सु सः विऽभ्यः मरुतः विः अस्तु प्र श्येनः श्येनेभ्यः आशुऽपत्वा ।
अचक्रया यत् स्वधया सुऽपर्णः हव्यं भरत् मनवे देवऽजुष्टं ॥ ४
भरत् यदि विः अतः वेविजानः पथा उरूणा मनःऽजवाः असर्जि ।
तूयं ययौ मधुना सोम्येन उत श्रवः विविदे श्येनः अत्र ॥ ५
ऋजीपी श्येनः ददमानः अंशुं पराऽवतः शकुनः मन्द्रं मदम् । सोमं
भरत् दादृहाणः देवऽवान् दिवः अमुष्मात् उत्ऽतरात् आऽदाय ॥६
आऽदाय श्येनः अभरत् सोमं सहस्रं सवान् अयुतं च साकम् ।
अत्र पुरम्ऽधिः अजहात् अरातीः मदे सोमस्य मूराः अमूरः ॥ ७

( ऋग्वेद ४–२६ )

मीच (पूर्वी) मनू झालों होतों. सूर्य मीच आणि महाबुद्धिवान् असा कक्षीवान् ऋषि तोहि मीच. अर्जुनीचा पुत्र कुत्स तोहि मीच, उशना कवीहि मीच; माझ्याकडे पहा. सर्व भूमि आर्यांना मीं दिली आहे. दानशूर भाविक जनांकरितां पर्जन्यवृष्टि मीं केली. धो धो शब्द करून वाहणाऱ्या उदकांना वाट मींच करून दिली आणि माझ्याच ( ईश्वरी ) संकेताप्रमाणें देव वागत आले आहेत. हर्षनिर्भर होऊन शंभर दानवांचीं नव्याण्णवचीं नव्याण्णव तटबंदी

नगरें मीं कोसळून दिलीं.; परंतु शततमाचें स्थळ मात्र पूर्ण सुखाच्या धामीं प्रविष्ट करून दिलें. आणि दिवोदास आणि अतिथिग्व ह्यांचें रक्षण ज्यावेळीं केलें, त्यावेळीं (शततमावरहि कृपा केली). मरुतांनो, सर्व पक्षिगणांमध्यें तोच पक्षी श्रेष्ठ असो. सर्व श्येन पक्ष्यांमध्यें सुद्धां तो अति त्वरेनें उड्डाण करणारा श्येनच श्रेष्ठ असो. पहा (रथाप्रमाणें ज्याला चाकांची मुळीं आवश्यकताच नाहीं, अशा आपल्या अंगच्या जोमानें त्या पक्षिराजानें, देवांनींहि ज्याच्यावर भुलून पडावें असें (सोमरूपी) हव्य मानवाकरतां खालीं पृथ्वीवर आणलें. (सर्वांना) भयानें कंपित करणाऱ्या त्या पक्ष्यानें जेव्हां तेथून सोम हरण केला, तेव्हां तो मनोवेगानें उडणारा पक्षी विस्तीर्ण अशा आकाशमार्गानें तडक निघाला; आणि मधुर रसयुक्त सोमरस घेऊन फारच त्वरेनें उडत चालला आणि येथें (मृत्युलोकीं) सोमरस आणल्याचें महद्यश त्या श्येन पक्ष्यास मिळालें. नीट सरळ उड्डाण करणाऱ्या त्या श्येनानें अत्यंत दूरच्या अशा (स्वर्ग) लोकांतून ती हर्षकारक, उल्हासकारक सोमवल्ली घेऊन आणि ती गवीत घट्ट धरून त्या देवप्रिय पक्ष्यानें अत्युच्च द्युलोकांतून उचलून येथें आणली. श्येन पक्ष्यानें सोमवल्ली उचलली आणि हजारों किंबहुना लक्षावधि सोमसवनांचें श्रेय घेऊन ती येथें (भूलोकीं) आणली, तेव्हां सोमाच्या हर्षभरांत त्या प्रज्ञाशाली आणि अजड (दिव्य) श्येनानें अधार्मिकांना जडमूढ करून बाजूस फेकून दिलें.

यत्र जोतिर् अजस्रं यस्मिन् लोके स्वर्हितम्। तस्मिन् मां धेहि पवमान। अमृते लोके अक्षिते इन्द्रायेन्दो परि स्रव ॥७
यत्र राजा वैवस्वतो यत्रावरोधनं दिवः। यत्रामूर्यव्हतीर् आपस तत्र माम् अमृतं कृधि इन्द्रायेन्दो परि स्रव ॥८
यत्रानुकामं चरणं त्रिनाके त्रिदिवे दिवः। लोकाः यत्र ज्योतिष्मंतस् तत्र मां अमृतं कृधि इन्द्रायेन्दो परि स्रव ॥९

यत्र कामाः निकामाश्च यत्र ब्रध्नस्य विष्टपम् । स्वधा च यत्र तृप्तिश्च तत्र मां अमृतं कृधि इन्द्रायेन्दो परि स्रव । यत्रा नन्दाश्च मोदाश्च मुदः प्रमुद आसते । कामस्य यत्राप्ताःकामास् तत्र मां अमृतं कृधि इन्द्रायेन्दो परि स्रव ॥ ११

(ऋग्वेद ९-११३)

ज्या ठिकाणीं प्रकाश अखंड आहे, ज्या ठिकाणीं दिव्यतेज सांठवलेलें आहे, त्या ठिकाणीं हे पावना प्रवाहा, त्या अक्षय अमर लोकीं, मला स्थापन कर आणि हे आल्हादप्रदा सोमा, तूं इंद्राप्रीत्यर्थ आपल्या पावन प्रवाहानें वाहत रहा. ज्या ठिकाणीं विवस्वनाचा पुत्र यमराज वास्तव्य करतो, त्या ठिकाणीं द्युलोकाचें – दृष्टीच्या टप्प्यांत नसलेलें–गुप्तस्थान आहे. ज्या ठिकाणीं भर वेगानें धावणाऱ्या आपोदेवी राहतात, त्या ठिकाणीं मला (ठेवून) अमर कर, आणि हे आल्हादप्रदा तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वाहात रहा. द्युलोकाच्या ज्या तिसऱ्या उच्चलोकांत, ज्या तिसऱ्या दिव्य लोकांत, वाटेल तिकडे संचार करतां येतो; ज्या ठिकाणीं सर्व स्थळें तेजोमय आहेत, तेथें मला ठेवून मला अमर कर आणि हे आल्हादप्रदा, तूं इंद्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा. ज्या ठिकाणीं काम्यकर्म करणारे, आणि तसेंच निष्कामकर्म आचरणारे लोक राहतात, जें सृष्टीच्या मूलस्तंबाचें स्थान आहे, ज्याठिकाणीं स्वधा (म्हणजे स्वयंसिद्ध अमृत) आहे, ज्या ठिकाणीं तृप्ति आहे, अशा ठिकाणीं मला ठेवून अमर कर, आणि हे आल्हादरूपा तूं इन्द्राप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा. ज्या ठिकाणीं आनंद आहे; ज्या ठिकाणीं प्रमोद आहे, उल्हासवृत्ति आहे, हर्ष आहे, अत्यंत हर्षहि आहे, ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष वासनेच्याहि वासना सफल होतात त्या ठिकाणीं मला ( ठेवून ) अमर कर आणि हे आल्हादप्रदा तूं इन्द्रप्रीत्यर्थ आपल्या पावनप्रवाहानें वहात रहा.

अपाम सोमं अमृता अभूम अगन्म ज्योतिर् अविदाम देवान । किं नूनं अस्मान् कृणवत् अरातिः किमु धूर्तिर् अमृत मर्त्यस्य ॥ ३

इमे मा पीता यशसः उरुष्यवो रथं न गावः सं अनाह पर्वसु ।
ते मा रक्षन्तु विस्रसश्चरित्रात् उन मा स्त्रावात् यवयन्तु इन्दवः ॥५
अग्निं न मा मथितं सं दिदीपः प्र चक्षय कृणुहि वस्यसो नः ।
अथा हि ते मद आ सोम मन्ये रे वान् इव प्रचरा पुष्टिं अच्छ ॥६
(ऋग्वेद ८-४८)

आम्ही दिव्य रसाचें प्राशन केलें; आम्ही अमर झालों. दिव्य प्रकाशाला पावलों आणि देवांना ओळखलें. आंता धर्मविमुख दुष्ट आमचें काय करणार ? हे अमरदेवा, मनुष्याची कावेबाजी तरी आमचें काय वाकडें करणार ? हें मी प्राशन केलेलें यशस्कर आणि पापनिर्मुक्त करणारे सोमरस, रथ आणि वृषभ जसे एकत्र जोडलेले असतात तसे माझ्या गात्रांत अगदीं भिनून गेले आहेत; ते माझें रक्षण करोत, ते मला चरित्र्यापासून भ्रष्ट होऊं न देवोत मला रोगापासूनहि दूर ठेवोत, घासून प्रदीप्त झालेल्या अग्नीप्रमाणें मला उज्ज्वल कर. आम्हांला उत्तम दृष्टि दे, नेहमी ऐन उमेदींत ठेव. हे सोमा, तुझ्या हर्षांत असतांना मी वैभवशाली आहेच असें वाटतें तर तशीच समृद्धि तूं निरंतर चालीव.

वेदमंत्रांच्या द्रष्टयांनीं तुर्यावस्थेंत आरूढ होऊन दिक्कालाच्या अतीत असणाऱ्या परमतत्त्वाशीं एकरूप झाल्यावर ही जी अमरत्वाची, विश्वात्मकतेची व आनंदात्मकतेची उत्स्फूर्त गाणीं गायिलेलीं आहेत त्यांचेच आलाप उपनिषदें, गीता इत्यादि त्यानंतरच्या व आजच्या मानानें प्राचीन अशा वाङमयांतून अधिक स्पष्टपणे उमटले आहेत असें आतां सहजच ध्यानांत येईल. नासदीय सूक्ताविषयीं 'हेंच तत्त्व नंतरच्या लोकांनीं अधिक ठाकठीकपणाने मांडण्यापेक्षां अधिक कांहीं केलें नाहीं' हें जें लोकमान्य टिळकांनीं म्हटलें आहे तेंच अनुभूतिवादासंबंधीं जसेंचें तसें म्हणतां येईल

वस्तुतः जेथें शब्दज्ञानापलीकडील अनुभूतिवाद आहे तेथे अनुभूतीच्या योगादि विविध साधनांची समाजाला कल्पना असली पाहिजे हें स्पष्टच आहे. पण 'उल्लेख' 'उल्लेख' म्हणून गर्जना करणाऱ्या लोकांना वैदिक वाङमयांतील त्याचाहि स्पष्ट निर्देश

दाखविणेंच अगत्याचें होऊन बसतें. वेदसंहिता हे संग्रहग्रंथ आहेत या गोष्टीची पुनश्च एकदां जाणीव देऊन ऋग्वेदांतीलच कांहीं उल्लेख येथें उद्धृत करतों. अथर्ववेद व ऋग्वेद यांतील कूट काव्यें म्हणून हल्लींच्या संशोधकांनीं दुर्लक्षित केलेल्या भागांत अशा साधनांनीं येणाऱ्या सूक्ष्म अनुभूतीचें वर्णन आहे असें आढळून येईल. बाराव्या व्याख्यानांत क्षेत्रक्षेत्रज्ञविचारांसंबंधीं विवेचन करतांना ऋग्वेद संस्कृतीच्या लोकांना देह, मन, इंद्रियें, बुद्धि व आत्मा यांची कशी स्पष्ट कल्पना होती व 'इंद्रियाणि पराण्याहुः' हें गीतेंतील वर्णन त्यांच्या वाङ्मयांतूनच कसें आढळतें हें 'सूर्यं चक्षुर्गच्छति वातमात्मा' या ऋचेचें विवेचन करतांना दाखवून दिलेंच आहे. साधनांचा मानसशास्त्राशीं संबंध येतो. कारण साक्षात्कार मनालाच व्हावयाचा असतो. पातंजल योगशास्त्रासारख्या ग्रंथांतून भारतीयांच्या मानस शास्त्राचें जें अतिविकसित स्वरूप दृष्टोत्पत्तीस येतें तशी पद्धतशीर मांडणी वेदांसारख्या संग्रहग्रंथांतून आढळणें शक्यच नाहीं. पण साक्षात्काराचीं जीं वर्णनें ऋग्वेदांतून आढळतात तीं प्रक्रियाबद्ध असून पद्धतशीर योगादि साधनशास्त्र असल्याचा पुरावाच देतात यांत मात्र शंका नाहीं. पुढील कांहीं उल्लेख या दृष्टीनें पाहण्यासारखे आहेत–

> यत् ह त्यत् मित्रावरुणौ ऋतात् अधि आ ददाथे अनृतं स्वेन मन्युना । दक्षस्य स्वेन मन्युना । युवोर् इत्थाधि सद्मसु अपश्याम हिरण्यम् । धीभिश्चन मनसा स्वेभिरक्षभिः सोमस्य स्वेभिरक्षभिः ॥ (ऋग्वेद. मं. १ सू. १३९ ऋ. २.)

(हे मित्रावरुणांनो, जेव्हां तुम्ही स्वेच्छेनें आपल्या चातुर्याच्या धोरणास अनुसरून सत्यस्वरूप आत्म्यापासून हें असत्य शरीर वेगळें आहे असें दाखविलेंत तेव्हांच तुमचें हिरण्मय स्वरूप तुमच्या निवासस्थानांत आमच्या दृष्टोत्पत्तीस आलें. तें प्रथम आमच्या बुद्धीस मात्र गोचर झालें, नंतर मनाला झालें, नंतर सूक्ष्म इंद्रिनांना व त्यानंतर स्थूल इंद्रियांनाहि (सगुण साक्षात्कार) तें स्वरूप

प्रतीत झालें.) या एकाच ऋचेचा विचार केला तरी गीता व उपनिषदें यांतून दिलेलें 'इंद्रियाणि पराण्याहुः इंद्रियेभ्यः परं मनः। मनसस्तु परा बुद्धिः यो बुद्धेः परतस्तु सः' हें सशास्त्र वर्गीकरण ऋग्वेदकाळींच सिद्ध झालें होतें हें स्पष्ट दिसून येतें.

सरस्वती साधयंती धियं नः इळा देवी भारती विश्वतूर्तिः। तिस्रो देवीः स्वधया बर्हिरा इदं अच्छिद्रं पांतु शरणं निषद्य (ऋग्वेद २-३-८)

आमचें ध्यान सफल करणारी सरस्वती, देदीप्यमान इळा व सर्व जगताला हातांत ठेवणारी भारती या तिन्ही देवी आपल्या परिपाठाप्रमाणें या कुशासनावर आरोहण करून हा आमचा आसरा पूर्णपणें निर्दोष राहील अशा तऱ्हेनें त्याचें रक्षण करोत.

इमा अभि प्र णोनुमो विपाम् अग्रेषु धीतयः। अग्नेः शोचिर्न दिद्युतः ॥७॥ गुहा सतीरुपत्मना प्रयत् शोचन्त धीतयः। कण्वा ऋतस्य धारया ॥८ (ऋ. ८-६-८) (आमच्या ह्या **ध्यानस्तुति** इतर स्तुतींच्या अगोदर आम्ही मोठ्यानें गातों. त्या स्तुति अशा कीं जणूं काय अग्नीच्या तेजस्वी ज्वालाच. ध्यानस्तुति अंतःकरणांत गूढ होत्या; त्या जेव्हां आपण होऊन चमकल्या तेव्हां कण्वदेखील सद्धर्माच्या धाराप्रवाहानें चमकूं लागले.)

तदित् रुद्रस्य चेतति यह्वम् प्रत्नेषु धामसु।
**मनो** यत्रा वि तत् दधुर्विचेतसः ॥ २०
इन्द्र त्वं अवितेत् असि इत्था स्तुवतो अद्रिवः।
ऋतात् इयर्मि ते धियं **मनोयुजम्** ॥२६ (ऋग्वेद. ८-१३)

(तेंच हें रुद्राचें प्रभावशाली रूप पुरातन तेजोमय स्थानांत स्पष्टपणें दृग्गोचर होत आहे; आणि त्याच ठिकाणीं स्वानुभवी भक्तांनीं आपलें तें मन निश्चल ठेविलें आहे.) अशा प्रकारानें स्तवन करणाऱ्या भक्ताचा, हे इंद्रा, तूं रक्षण करणाराच होतोस. म्हणून हे वज्रधरा माझ्या अंतःकरणाशीं तन्मय होणारी जी **ध्यानस्तुति** तिला सत्यधर्माच्या जोरावरच मी तुझ्याकडे लावतो.)

वृषाऽयम् इन्द्र ते रथः उतो ते वृषणा हरी
वृषा त्वम् शतक्रतो **वृषा हवः** ।। ३१
वृषा त्वा वृषणं हुवे वज्रिन् चित्राभिरूतिभिः ।
ववन्थ हि प्रतिष्टुतिं **वृषाहवः** ।।३३।। (ऋग्वेद. मं. ८-सू. १३)

इंद्रा, हा तुझा रथ वीर्यशाली, त्याचप्रमाणें तुझे अश्वही वीर्यशाली, आणि हे अपारकर्तृत्वा देवा, तूं स्वतः तर वीर्यशालीच आहेस; परंतु तुझें **नामसंकीर्तनहि** तसेंच वीर्यशाली आहे. वीर्यभरानें प्रबळ झालेला मी तुझा भक्त, हे वज्रधरा, तुज वीर्यशाली वीराला नाना प्रकारच्या साहाय्यक शक्तींसह पाचारण करीत आहे. तूं उत्कृष्ट स्तुतींचा भोक्ता आहेत. व तुझें **संकीर्तनहि** सामर्थ्यसंपन्न करतें.

ध्यान स्तुतीपासून नामसंकीर्तनापर्यंतचे हे उल्लेख अनुभूतीचे साधनमार्ग स्पष्टपणें दाखवितात. योगासारख्या साधनांनीं अंगीं येणाऱ्या सामर्थ्याचेहि उल्लेख ऋग्वेदांतून आढळतात. ते जमेस धरून गुरुवर्य श्री. अप्रबुद्ध पातंजल योगसूत्रांवरील आपल्या इंग्रजी ग्रंथाच्या प्रस्तावनेंत लिहितात :–

" Yoga is a genuine Arya science discovered by the Aryas, experienced by the Aryas and evolved by the Aryas. It has got an amazingly long continuity and that continuity shall remain unbroken even by the rise and fall of the people, or social revolutions. Those who care to have a look at the Upanishads and the Vedas will at once know that the science is there. Of course the word Yoga is not found there, in the very sense of Patanjali, but powers are distinctly mentioned. Not infrequently, it is noted in the Rigved that particular knowledge is gained by means of concentrated thought or that a particular remote thing is said to be visualised by means of meditation. In the Ribhu (ऋभु)suktas it is often noted with all the ardour of devotion engendered by miracles, that the Ribhus turned the hide

of a cow into an actual living cow and that they created four cups ( चमस् ) out of one on the spot. Not only this, but it is again described, that by his sheer mental force, a Ribhu actually created a living horse.

( योग हें आर्यांचें स्वतंत्र प्रतिभेंतून निघालेलें श्रेष्ठ शास्त्र असून तें त्यांनींच संशोधिलें, अनुभविलें व वाढविलें आहे. आर्यांइतकेंच तें प्राचीन आहे. त्याची परंपरा अत्यंत प्राचीन काळापासून अक्षुण्ण असून राष्ट्राच्या उत्कर्षाच्या व अधःपाताच्या, समाजाच्या पतनाच्या व पुनरुत्थानाच्या आणि सामाजिक क्रांत्यांच्या वावटळींतहि ती अजून अभंगच राहिली आहे. जे कोणी उपनिषदें व वेद काळजीपूर्वक वाचतील त्यांना हें शास्त्र तेथेंहि असल्याचें आढळून येईल. अर्थातच पतंजलीच्या अर्थानें योग शब्द तेथें नाहीं. पण योगाच्या सिद्धींचें तेथें वर्णन आहे. ऋग्वेदामध्यें विशिष्ट प्रकारचें ज्ञान एकाग्रस्थितींतून प्राप्त होतें व ध्यानाच्या योगानें विशिष्ट गोष्टींचीं निर्मिति होऊं शकते हें अनेक ठिकाणीं उल्लेखिलें आहे. ऋग्वेदांतील ऋभुसूक्तामध्यें मोठ्या भक्तिभावपूर्वक व आदरानें ऋभूंनीं केलेल्या चमत्कारांचें वर्णन केलें आहे. त्यांनीं एक गाय निर्माण केली व एका चमसाचे चार चमस तयार केले. इतकेंच नव्हे तर ऋभूंनीं केवळ आपल्या ध्यानशक्तीच्या बळावर एक जिवंत अश्व निर्माण केला. )

असो. याप्रमाणें साधनयोगासह अनुभववाद ऋग्वेदांत आढळतो. आर्यांची कोशकल्पनाहि ऋग्वेदामध्यें स्पष्ट स्वरूपांत आढळते. एकाच परब्रह्मापासून ही संपूर्ण सृष्टि उत्पन्न झालेली असली तरी सृष्टीला कांहीं एक क्रम आहे, व विशिष्ट क्रमानें ती जशी उत्पन्न होते तशीच विशिष्ट क्रमानें विलयहि पावते असें वैदिक धर्माचें मत आहे. ऋग्वेदांतहि सृष्टीचें वर्णन करतांना ती तीन प्रकारची आहे, पांच प्रकारची आहे व सात प्रकारची आहे असे निर्देश आढळतात. भू, रज आणि अंतरिक्ष असे तीन प्रकार असून ते

ुढच्या पंचीकरण प्रक्रियेप्रमाणेंच एकमेकांत मिसळून राहात अस-
ल्यामुळें त्रिभु, त्रिरज असे प्रत्येक पदार्थाचें स्वरूप असतें असें
वर्णन आढळतें. व्यक्त सृष्टीच्या घनविरल भावाप्रमाणें आधि-
भौतिक आधिदैविक व आध्यात्मिक अशी त्रिविधता प्रत्येक पदार्थांत
असल्याचें ऋग्वेदानें सांगितलें आहे. व म्हणून प्रत्येक पदार्थाला
त्रिविधता असल्याचें दाखविणारा त्रिधातु असाहि शब्द ऋग्वेदांत
येतो. ऋग्वेदांतील देवता म्हणजे आधिदैविक क्षेत्रांतील तेहेतीस
शक्ति असून देव हे ज्योतिर्मय आहेत त्यांच्यांत व मनुष्यांत अथवा
आधिभौतिक सृष्टींत व आधिदैविक सृष्टींत परस्पराश्रयत्व आहे
ही गीतेंतील कल्पना ऋग्वेदांतहि आहे. देव म्हणजे अमर्त्य, ज्ञानरूप
सर्वशक्तिमान् आणि निग्रहानुग्रहापलीकडे दुसरा कोणताहि हेतु
नसलेले आहेत असें ऋग्वेदांत त्यांचें वर्णन आढळतें. इंद्र हा त्यांचा
देवाधिदेव होय. पंढरीच्या पांडुरंगाची निष्ठावंत वारकऱ्यांच्या
नेत्रांतून जी थोरवी आहे तीच ऋग्वेदीय ऋषींच्या नेत्रांतून इंद्रा-
विषयीं व्यक्त झाली आहे. परमेश्वराचें सगुण साक्षात्कार रूप जसें
वारकरी पांडुरंगांत पाहात तसेंच ऋग्वेदीय ऋषि इन्द्रामध्यें पाहात
असत. इंद्र आपल्या घरीं येऊन बसल्याचें व देवांविषयींच्या सगुण
साक्षात्काराचें वर्णन व ऋषींच्या अंतःकरणांतील देवाविषयींच्या
भक्तीचा जिव्हाळा ऋग्वेदांत इतक्या उत्कटतेनें व्यक्त झाला आहे
कीं वेदांतील भक्तिमार्ग हा एक स्वतंत्र विवेचनाचा विषय होऊं
शकेल. येथें थोडक्यांत एवढेंच सांगतां येईल कीं श्रीज्ञानेश्वर-
महाराज व श्रीतुकाराम यांचा सगुण परमेश्वराविषयींचा जिव्हाळा
तोच वेदमंत्रांच्या द्रष्टयांच्या उद्गारांतून व्यक्त झालेला आहे.
ऋग्वेदांतील देव देवता म्हटलें कीं ज्यांना वैदिक धर्माच्या ऋग्वेदांत
त्रिधातु या शब्दानें व्यक्त केलेल्या कोशकल्पनेची जाणीव नाहीं
त्यांना एकतर अडाणी निसर्गपूजेंत किंवा सृष्टचमत्कारांच्या रूप-
कांत त्यांचें मूळ उलगडावेसें वाटतें. पण केवळ सृष्टपूजा ही रानटी
लोकांत देखील नसते तर ती ऋग्वेदासारख्या पिंडब्रह्मांडाचे प्रश्न
केव्हांच सोडवून मोकळे झालेल्या श्रेष्ठ संस्कृतिसंपन्न लोकांत कशी

असेल हा साधा विचारहि या तथाकथित महापंडितांच्या मनांत येत नाहीं हें दुर्दैव होय. जस्टिस वुड्रॉफनें असें लिहिलें आहे कीं :–

Even Negroes of the Gold Coast are always conscious that their offerings and worship are not paid to the inanimate object itself but to the indwelling God and every native with whom I have conversed on the subject has laughed at the possibility of its being supposed that he would worship or offer sacrifice to some object of stone. (Shakti and Shakta P. 279)

(गोल्डकोस्टमधील निग्रोसुद्धां त्यांची पूजा व समर्पणें हीं केवळ पदार्थांना नसून त्यांच्यांतून डोकावणाऱ्या देवाधिदेवाला असतात हें चांगलेंच जाणून असतात. ज्या ज्या निग्रोशीं मी बोललों तो तो त्याची पूजा व समर्पण हें केवळ दगडासारख्या पदार्थांना आहे अशा समजुतीला हसत होता.) ऋग्वेदीय ऋषींच्या इंद्रानें, रामानें शबरीच्या घरीं बोरें खाल्लीं तसेंच आपल्या भक्तिणीच्या घरीं तिच्या दांतांनीं चावून काढलेला सोमरस ग्रहण केलेला आहे व आवडीनें वारंवार भक्तांना दर्शन दिलें आहे. इंद्राविषयींच्या रूढ कल्पनांचें खंडन करून श्री. अप्रबुद्ध लिहितात :–"वृत्रवध बहुतकरून जरी इंद्राचेंच कृत्य असलें तरी अग्नि सोम इत्यादींच्या बाबतींतहि वृत्रवधाचा उल्लेख क्वचित् आहे. त्यावरून ती नैसर्गिक घटना नसून आध्यात्मिक कल्पना होती असें दिसतें. या सर्व उपपत्ति बाजूस ठेवून अगदीं कोऱ्या मनानें ऋग्वेद वाचूं लागलें तर एक गोष्ट मुख्यत्वें करून लक्षांत येते. ऋग्वेदांत इंद्राचीं अनेक स्वरूपें वर्णिलीं असलीं व कित्येक ठिकाणीं मनुष्यकृतिही वर्णिल्या असल्या तरी तें सर्व वाचूनहि मनावर हाच परिणाम होतो कीं स्वतः सूक्तकार ऋषि, इंद्र म्हणजे एक अपार्थिव व दिव्य अशी व्यक्ति समजत असत. मी मागें अनेक वेळां म्हटलें आहे तेंच पुन्हां येथें म्हणतों कीं इंद्राचें मूळ स्वरूप सृष्ट चमत्कारांत असो अथवा कोण्या मनुष्यामध्यें असो, सूक्तकार ऋषींना त्या मूळ

स्वरूपाची यत्किंचितहि कल्पना नाहीं. इंद्राचें मूळ स्वरूप जर एखाद्या मनुष्यांत असलेलें माहीत असतें तर त्यांनीं स्पष्ट तसा उल्लेख केला असता. कारण तसे उल्लेख ऋग्वेदांत आहेत. प्रयत्नानें मनुष्याला ऋषि किंवा देव बनतां येतें. ही गोष्ट ऋग्वेदाला पूर्ण संमत आहे. "तेन देवत्वं ऋभवः समानश" असें ते पुनः पुन्हां म्हणतात. गृत्समदांचा मूळ पुरुष हाहि मूळचा मनुष्य असतां इंद्राचा सहचर होऊन इंद्रासारखींच कृत्यें करणारा झाला ही ऋभूंच्यापेक्षां जुनी असलेली गोष्ट ऋग्वेदाच्या लक्षांत आहे, तशीच गोष्ट इंद्राची आहे असें त्यांना माहीत असतें तर तसें स्वच्छ म्हणण्यांत त्यांना कांहीं वाटलें नसतें. नंतरच्या वाङ्मयांतहि दाशरथि राम हा पूर्वकल्पांत वसु होता असें रामायणांत स्पष्ट म्हटलें आहे व पूर्णावतार श्रीकृष्णांना पूर्वींचा नारायण ऋषि म्हणून महाभारत ओळखतें. सारांश ज्या अर्थी अशा प्रकारची कोणतीच कल्पना ऋग्वेदांत नाहीं त्या अर्थीं सूक्तकार ऋषि तरी इंद्राला जिवाभावानें अपार्थिव समजत होते हें उघड आहे. अध्यात्माच्या साहचानें इंद्रवृत्राचें रूपक जास्त चांगलें उलगडतें. वृत्र म्हणजे मनुष्याच्या अंतःकरणांतील मोहरूप अंधकार व कल्याणकारक अशा पूर्व संचिताला फलोन्मुख होण्याच्या कामीं अडथळा करणारें दुष्ट कर्म हेंहि बीजरूपानें मूळ स्वरूपांत असतेंच. म्हणून वृत्राला पाण्यांत पडलेला असें म्हटलें आहे. अहीचा दृष्टांतहि समर्पक आहे. एकदम प्राणांशींच गांठ घालणारा हवा तेथें संचार करणारा, वाटेल तसें सूक्ष्म रूप घेणारा यत्किंचितहि आवाज न होतां सरपटणारा, बिळांत राहणारा, अतिशय चपल आणि वक्र असा सर्प कोणत्याहि काळच्या लोकांचा दुष्ट शत्रूच आहे. पापकर्माचीहि गति तशीच आहे. म्हणून पापकर्मास सर्पाची दिलेली उपमा अत्यंत समर्पक आहे. अशा वृत्राचा वध हा इंद्राचा नित्य पराक्रम म्हणून वर्णिला आहे. सारांश, वृत्राचा आणि अंधाराचा संबंध ऋग्वेदांत असा आहे. सहा महिन्यांच्या रात्रीशीं त्याचा प्रत्यक्ष संबंध कोठेंहि वर्णिलेला नाहीं. ऋग्वेदकालीन ऋषि आधि-

भौतिकालाच आधिदैविक समजण्याइतके अडाणी अथवा आधिदैविकाची कल्पना असून आधिभौतिकाला आधिदैविकाच्या जिव्हाळ्यानें वर्णिण्याइतके विक्षिप्त होते असें मानण्यास ऋग्वेदांत तिळाइतकीहि जागा नाहीं."

जसें इंद्राचें तसेंच त्या त्या देवतेचे भक्त आपल्या सूक्तांतून त्या त्या देवतेचें वर्णन उत्कट जिव्हाळ्यानें करतांना दिसतात. "तुका म्हणे जे जे बोला। ते ते साजे या विठ्ठला" यांतील भावच यांतून व्यक्त झालेला आहे.

तात्पर्य, सगुणोपासना व सगुण साक्षात्कार येथपासून घेऊन तर सर्व जगांत एकात्मतेनें भरून राहिलेल्या निर्गुण निराकाराच्या अद्वय साक्षात्कारापर्यंत व धीमहि सारख्या शब्दांतून व्यक्त होणाऱ्या त्याच्या ध्यानयोगादि साधनमार्गापर्यंतचें वेदवाङ्मयांतील हे स्पष्ट उल्लेख ही गोष्ट स्पष्टपणेंच सिद्ध करतात कीं भारतीय भावजीवनाचा तत्त्वज्ञानरूपी पाया ऋग्वेदकाळींच सिद्ध झालेला होता, व तोच पाया आजहि भारतीय भावजीवनाला आधारभूत होऊन राहिलेला आहे. अनुभूतीचे हे उल्लेख अथवा साधनमार्गांचेहि उल्लेख पुसट आढळतात हें खरें आहे. पण या बाबतींत विख्यात तत्त्वज्ञ प्रा. रा. द. रानडे यांनीं उपनिषदासंबंधीं विवेचन करतांना जे उद्गार काढले आहेत त्याकडे मी आपलें लक्ष वेधूं इच्छितों. श्री. रानडे लिहितात : "आपण स्वतः मिळविलेल्या प्रत्यक्ष सानुभव अंतर्ज्ञानापुढें अप्रत्यक्ष बौद्धिक शब्दज्ञान जसें पंगु व हिणकस ठरतें तद्वतच प्रत्यक्ष आत्मानुभूतीचें वर्णन शब्दांनीं करणें अपुरें व हीन ठरतें ही गोष्ट उपनिषत्कालीन ऋषींस पूर्णपणें माहीत होती. म्हणूनच त्यांनीं आत्मज्ञानाचें विस्तृत वर्णन कोठेंहि न देतां सहज जातां जातां त्याविषयीं कांहीं उल्लेख केला असून तें मिळविण्याचा मार्ग नुसता दिग्दर्शित केला आहे. खऱ्या परमार्थान्वेषी साधकांना बहुतेक अंधारमय अशा प्रवासांत परमार्थमार्गावर मार्गदर्शक दिवे कोठें आहेत हें समजावें म्हणून प्रत्यक्ष अनुभवाविषयीं सुद्धां कांहीं

सांगावयाचें झाल्यास तें प्रच्छन्नपणें व जपूनच सांगावें लागतें. म्हणून उपनिषदांत आत्मानुभवाविषयीं जें लिहिलें आहे तें वस्त्रांत गुंडाळलेल्या रत्नाप्रमाणें बौद्धिक वस्त्राखालीं झांकलेलें असून तें पारखण्याची ज्यास दृष्टि आहे त्यांनाच तें दिसतें व त्यांनाच तें किती अमूल्य आहे हें कळतें."

याप्रमाणें वैदिक राष्ट्राचें आपण अंतरंगदर्शन घेतलें. एकदां सिंहावलोकन म्हणून त्याचा आढावा घेऊन व त्यावरून निघणाऱ्या सिद्धांतांचें दिग्दर्शन करून पुढील व्याख्यानांत या विषयाचा उपसंहार करूं.

## व्याख्यान पंधरावें

# उपसंहार

कोणत्याहि राष्ट्राला त्याच्या "अस्मितेची" प्रखर जाणीव असणें अत्यंत आवश्यक असतें. त्यांतून भारतासारख्या पुनर्घटनेच्या सीमारेषेवर उभ्या ठाकलेल्या राष्ट्राला तर पुनर्घटनेच्या गोंडस नांवाखालीं आपल्या राष्ट्रीय आत्म्याचीच हत्या होऊं नये म्हणून ही जाणीव अत्यंतच प्रखरतेनें असण्याची आवश्यकता आहे. व्याख्यानमालेसाठीं हा विषय निवडतांना मुख्यत: भारतीय राष्ट्राची अस्मिता, तिच्या विशेषांसह, दिग्दर्शित करणें हाच आमचा हेतु होता. आज भारतवर्ष स्वतंत्र झालेलें आहे, व स्वतंत्र भारतासमोर पुनर्घटनेचे विविध प्रश्न चर्चिले जात असून भारतीय हिंदू समाजाच्या आमूलाग्र पुनर्घटनेचे विचारहि व्यवहारांत येऊं पाहात आहेत. त्यामुळें आम्ही कसें असावें हें ठरविण्याच्या वेळींच आम्ही कोण आहोंत याची स्पष्ट जाणीव असणें अत्यंत आवश्यक आहे असें कोणाहि विचारवंताला वाटल्याविना राहात नाहीं. भारतीय राष्ट्रपुरुषासंबंधीं आम्ही कोण आहोंत असें म्हटलें कीं जगांतील सर्व राष्ट्रांहून वेगळें असलेलें भारतीय राष्ट्रपुरुषाचें स्वरूप दृष्टीपुढें उभें राहिल्याविना राहात नाहीं. प्रागैतिहासिक कालापासून ज्याचें भावजीवन टिकून राहिलें आहे असें जगताच्या रंगपटावरील भारत हें एकच राष्ट्र आहे. इतर सर्व राष्ट्रांनीं जन्ममृत्यूच्या अनेक परंपरेंतून प्रवास अनुभविला. पण ज्याचा जन्म केव्हां झाला हें कोणासहि सांगतां येत नाहीं व मृत्यूनें ज्याला आजवर तरी स्पर्शसुद्धां केला नाहीं असें भारत हें एकच एक अद्वितीय राष्ट्र आहे हें आपण प्रस्तुत व्याख्यानमालेच्या प्रारंभींच्या भाषणांत विस्तारपूर्वक पाहिलें आहे. अशा या मृत्युंजय राष्ट्राचा

प्रादेशिक राष्ट्रवादीहि ज्या वेळीं विचार करूं लागतात, त्या वेळीं त्याच्या अजेय व धगधगीत जीवनदीप्तीनें तेहि भारल्याविना राहात नाहींत हें अनेकवार सिद्ध झालेलें आहे. अशा या भारतीय राष्ट्राची अस्मिता शोधावयाची तर आपण वेदांइतकें मागें गेलें पाहिजे. भारतराष्ट्रास पुढच्यास मागचें कळावयाचें म्हणजे वेदांचाच अभ्यास करण्याची आवश्यकता आहे हें डॉ. केतकर यांच्यासारख्या लेखकानेंहि आपल्या ज्ञानकोशांतून मांडून दाखविलें आहे. पण वेदांतून आपल्या राष्ट्राचा आदि शोधावयाचा म्हटलें कीं वेद म्हणजे काय व त्यांचें भारतीय राष्ट्रजीवनांत स्थान तरी काय आहे हें पाहणें अत्यंत आवश्यक होतें.

यास्तव दुसऱ्या व्याख्यानापासून गेल्या सहस्रावधि वर्षांत भारतीय राष्ट्राच्या जीवनांत वेदांनीं केवढें महत्त्वपूर्ण स्थान मिळविलें आहे व तें आजहि कसें टिकून आहे हें आपण पाहिलें. आजहि भारतांतील धार्मिक हिंदू आपलें संस्कार करतांना जो संकल्प करतो तो "श्रुतिस्मृतिपुराणोक्तफलप्राप्त्यर्थं" करतो. जीवनाची ही घडण अतिशय प्राचीन आहे. मनूपासूनचे सर्व स्मृतिकार, रामायण, महाभारत इत्यादि इतिहासग्रंथ, सर्व पुराणें, सर्व धर्मशास्त्रकार व आस्तिक दर्शनांचे प्रणेते यांनीं तर शेंकडो वर्षें ही वेदनिष्ठा पोसलीच, पण 'खरे वेद आम्हांसच माहीत आहेत' या शब्दांनीं जैनांसारख्या अवैदिक सांप्रदायिकांत सुद्धां वेदांविषयींचें आकर्षण कसें आहे हें सिद्ध होतें. मनूपासून ज्ञानेश्वर, तुकाराम, बहिणाबाईपर्यंत सहस्रावधि वर्षांच्या परंपरेंत वेदांनीं हें जें विलक्षण श्रद्धेचें स्थान मिळविलें त्यावरूनच भारतीय भावजीवनांत, तें जीवन समजावून घेण्याच्या दृष्टीनें, वेदांचा विचार किती महत्त्वाचा व जिव्हाळ्याचा ठरतो हें स्पष्टच होतें. ही वेदांची निष्ठा येथें कुराण अथवा बायबलप्रमाणें तरवारीच्या जोरावर टिकविण्याचा मुळींच प्रयत्न झालेला नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. भारतवर्षांत धार्मिक सहिष्णुता व मतस्वातंत्र्य पराकोटीला पोंचलेलें होतें. इतकें कीं ज्यांनीं या देशावर अंगावर

शहारे आणणारे अत्याचार केले ते भारतीय खड्‌गधारेनें पुढें पराभूत होऊन जित म्हणून समोर उभे राहिल्यावरहि भारतीयांनीं कधीं त्यांचा सूड घेतला नाहीं. चार्वाकासारखे वेदासारख्या पूज्य राष्ट्रीय ग्रंथाला भंड, धूर्त व निशाचराची कृति म्हणून नांवें ठेवीत असतांनाहि भारतीयांनीं त्यांचें मतस्वातंत्र्य कधीं हिरावून घेतलें नाहीं व त्यांना कधीं यातना दिल्या नाहींत. इतकेंच नव्हे तर माधवाचार्यांनीं चार्वाकासारख्याला आपल्या सर्वदर्शनसंग्रहांत स्थान दिलें आहे. पृथ्वीच्या पाठीवरील कोणत्याहि राष्ट्रांत या तऱ्हेचें औदार्याचें उदाहरण आढळावयाचें नाहीं. असें असूनहि महर्षि अण्णासाहेब पटवर्धन व लो. टिळक यांच्यापर्यंत वेदनिष्ठेची जी अक्षुण्ण परंपरा दृष्टोत्पत्तीस येते त्यावरूनच आमच्या राष्ट्रजीवनांत वेदांचें किती अनन्यसामान्य महत्त्व आहे हें स्पष्ट होतें. वेद आणि तसेच पूज्य मानले जाणारे रामायण, महाभारत, भागवतादि ग्रंथ यांच्यांत एक महत्त्वाचा फरक आहे. वेद सोडून हे इतर ग्रंथ तेवढेच पूज्य असले तरी खरें महत्त्व त्यांच्या शब्दांना नसून अर्थाला आहे; तर वेदांचें महत्त्व त्यांच्या अर्थापेक्षांहि शब्दांखरें मानलें जात असून स्वरप्रक्रियेसारखी त्यांच्या उच्चारणाची एक विशेष पद्धति आहे. आणि त्या स्वरप्रक्रियेवर मंत्रांचे अर्थहि विशेष पद्धतीनें अवलंबून आहेत. वेद ही मंत्रमय वाणी असून ती प्रत्यक्ष ईश्वरी वाणी होय अशी भारतीयांची श्रद्धा आहे. त्यांतील कांहीं शास्त्रकारांचें मत तर वेद हे प्रत्यक्ष ईश्वरच आहेत, किंबहुना ईश्वराचें नादस्वरूप म्हणजेच वेद होत असें स्पष्ट आहे. अशीं मतें प्रतिपादन करणारे शास्त्रकार हे कोणी भोळसर लोक नसून प्रत्यक्ष लो. टिळकांनींहि त्यांच्या पारदर्शी व कुशाग्र बुद्धिमत्तेबद्दल आपल्या "Arctic Home in the Vedas" मध्यें त्यांची मुक्तकंठानें प्रशंसा केलेली आहे. भारतीय भावजीवनाच्या दृष्टीनें वेदांचें हें महत्त्व पाहिल्यावर वेदांत ज्या लोकांचें जीवन आढळतें ते लोक कोण आहेत याचा विचार करणें अत्यावश्यक ठरलें. कारण कीं पूर्वीं जरी वेदांतील

जीवन म्हणजे आमच्या पूर्वजांचें जीवन असा विश्वास दृढ होता व त्याबद्दल कोणाच्याहि मनांत यत्किंचितहि संशय नव्हता तरी गेल्या दीडशें वर्षांतील इंग्रजी मशागतींतून तयार झालेल्या "यद्वै किंचन साहेब अब्रवीत्तद् भेषजम्" या धारणेच्या आमच्या मनोवृत्तीनें या बाबतींत आमच्या हृदयांत आतां संभ्रम उत्पन्न केलेला आहे. या देशाच्या बाहेर आशिया मायनर ते उत्तर ध्रुवापर्यंत कोणी एक आर्यन वंश राहत होता, कदाचित् सुमेरी व ते लोक एकच असावेत, ग्रीक, केल्टिक इत्यादि विविध वंशशाखा या आर्यन वंशाच्या होत व त्यांपैकीं जी शाखा हिंदुस्थानकडे वळली तिच्या जीवनाचें प्रतिबिंब वेदवाङ्मयांत पडलेलें आहे ही समजूत आतां इतकी दृढ झालेली आहे कीं उच्च विद्यालयीन अभ्यासक्रमांतूनहि आकसानें या गोष्टी सिद्धांत म्हणून भारतीय विद्यार्थ्यांच्या मनांत ठसविण्याचा प्रयत्न होत असतो. जणू काय हे सिद्ध झालेले सिद्धांतच आहेत. वैदिक भाषा व जगांतील इतर भाषा यांच्यांत आढळणाऱ्या साम्यावरून हे सर्व लोक एक व मुळांत कोठल्या तरी एकाच वंशाचे असले पाहिजेत असाहि एक सिद्धांत प्रतिपादन करण्यांत येत असतो. वेदांच्या आधारें या गोष्टीचें परीक्षण करणें आवश्यक होतें व त्या आधीं आणखी एका गोष्टीकडे लक्ष पुरविणें आवश्यक होतें. ती गोष्ट म्हणजे वेदांचा कालनिर्णय ही होय. म्हणून तिसऱ्या व्याख्यानांत आम्ही प्रथम कालनिर्णयाच्या प्रश्नाकडे वळलों.

वेदांचा कालनिर्णय करण्यासाठीं भाषा, भौगोलिक उल्लेख, भूस्तरशास्त्र व ज्योतिष या चार साधनांचा मुख्यतः उपयोग केला जातो. त्यांपैकीं भाषा हें साधन किती फसवें आहे व त्यावरून मॅक्समुल्लरनें म्हणून ठरविलेला जो सिद्धांत अलीकडे रूढ झालेला आहे तो मुळांतच कसा आधारहीन आहे हें आम्ही विस्तारपूर्वक दाखविलें आहे. स्वतः मॅक्समुल्लर जी गोष्ट अनुमान धबक्याची म्हणून सांगतो ती सिद्धांत म्हणून लोक डोळे मिटून सांगत असतात, हा संशोधक जगतांतील लोकभ्रमाचा एक विलक्षण प्रकार आहे

यांत कांहीं शंका नाहीं. भाषाशास्त्रज्ञांनीं ज्योतिषशास्त्रज्ञांचे, ज्योतिषशास्त्रज्ञांनीं भाषाशास्त्रज्ञांचें, दोघांनींही भूस्तरशास्त्रज्ञांचें व भूस्तरशास्त्रज्ञांनीं बाकी सगळ्यांचे भरपूर प्रमाणांत दोष दाखविले असले तरी वेदकालनिर्णयाच्या दृष्टीनें हीं सारींच प्रमाणें सारखींच अंशत: उपयुक्त तर अंशत: भ्रमोत्पादक कशीं ठरतात हें आम्ही या विविध क्षेत्रांतील विविध मतांचें विस्तारपूर्वक समालोचन करून दाखविलें आहे. पुराणांतील वंशावळींचे आधारहि या संबंधांत वापरणें किती धोक्याचें आहे हेंहि तेथेंच डॉ. केतकरांच्या ऋग्वेदांतील दाशराज्ञ युद्धावरील संशोधनाचा आढावा घेतांना दाखविण्यांत आलेलें आहे. सामान्यत: लो. टिळकांनीं दर्शविलेला काळ हा बहुतेक मान्यता पावलेला आहे. पण येथें वेदकाळ म्हणजे काय हें मात्र नीट ध्यानांत ठेवलें पाहिजे. येथें वेदकाळ याचा अर्थ अमक्या इतक्या वर्षांच्या अलीकडे वेदांना ओढतां येत नाहीं, एवढाच वस्तुत: आहे. परंतु पलीकडे किती काळ प्राचीन जावें हें यांपैकीं कोणीहि सांगू शकत नाहीं. लोकमान्यांनीं आपल्या 'आर्क्टिक होम इन दि वेदाज' मध्यें वेदांच्या अनादित्वासंबंधीं असलेलें ब्रह्मवाद्यांचें मत प्राचीन आधुनिक संशोधकांनाहि अज्ञेयत्वाच्या परिभाषेनें कसें मान्य करावें लागतें हें उत्कृष्ट रीतीनें मांडलें आहे. टिळकांनीं वैदिकसंहिता ही जरी कालनिर्णयाच्या कक्षेंतली म्हणून उल्लेखिली असली तरी वैदिक संस्कृति मात्र त्याच्या पूर्वीं कितीतरी वर्षें अस्तित्वांत असून तिचें मूळ भूस्तरशास्त्रांत गडप झालेलें असल्यामुळें तें कोणालाहि सांगतां व शोधतां येणें शक्य नाहीं असें प्रतिपादन केलें आहे. पण त्यावर गुरुवर्य श्री. अप्रबुद्धांचा असा प्रश्न आहे कीं विकसित संस्कृतीचें अनादित्व मान्य केल्यावर फक्त संहिता किंवा मंत्रत्व त्या काळीं मुळींच नव्हतें असा आग्रह तात्पर्यहीन ठरत नाहीं काय ? लोकमान्यांसारखें मतच प्रो. मॅक्समुल्लरनेंहि प्रकट केलें असून त्यानेंहि आपल्या " धर्म " या विषयावरील व्याख्यानमालेंत वेदांचा अंत किती वर्षें अलीकडे ओढतां येत नाहीं एवढेंच फार तर सांगतां येईल, पण त्याचा आदि मात्र

कोणालाहि सांगतां येणें शक्य नाहीं असें सांगितलें आहे. वेद-कालनिर्णयाचें हें स्वरूप पाहिल्यावर वेदांच्या स्थलनिर्णयाकडे वळणेंहि क्रमप्राप्तच होय. पण त्या आधीं आपण ज्यांचा स्थलनिर्णय करणार हे लोक कोण होते याविषयींच्या समजुतींचें समालोचन आवश्यक असल्यामुळें आम्ही प्रथम त्याकडे वळलों.

वेदांमध्यें आर्य व दस्यु असे शब्द वारंवार येतात. पण वेदांतील आर्य शब्दाचा पाश्चात्य संशोधकांनीं ज्याचें स्तोम माजविलें आहे त्या आर्यन् वंशाशीं काडीइतकाहि संबंध असल्याचें निदान वेदावरून तरी दिसून येत नाहीं. पाश्चात्यांनीं प्रतिपादिलेल्या व कांहीं भारतीय संशोधकांनींहि पुरस्कारिलेल्या आर्यन् वंशाचे पृथ्वीच्या पाठीवर कधीं अस्तित्व असेल अथवा नसेल. तें असेलच असें आम्ही म्हणत नाहीं व नसेलच असाहि आमचा आग्रह नाहीं. पण या तथाकथित आर्यनचा वैदिक आर्यांशीं कांहींहि संबंध नाहीं. गुलामी मनोवृत्तीमुळें भारतीयांनीं या आर्यनचा पुरस्कार कसा केला याचें डॉ.श्री. व्यं. केतकर यांनीं ज्ञानकोशांत रेखाटलेलें चित्र आम्हीं त्यांच्याच शब्दांत मांडून दाखविलें आहे. वाङमयावरून वाङमयाचा अभ्यास करून त्यांतील जीवनाविषयीं जाणीव करून घ्यावयाची असेल तर ऋग्वेदामध्यें आर्य शब्द अनेकवार येतो पण एकाहि ठिकाणीं तो वंशवाचक नाहीं. ऋग्वेदांतील सर्व ठिकाणीं आर्य शब्द सभ्य, शिष्ट, संस्कृतिसंपन्न व मनानें विकसित झालेला, श्रेष्ठ योग्यतेचा अथवा आचरणाचा पुरुष याच केवळ अर्थानें आलेला आहे. असा पुरुष विशिष्ट वंशाचा असला म्हणजे असतो हें एक केवळ खूळ आहे. कारण या बाबतींत "दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम् ।" हाच नेहमीं ठरलेला नियम आहे. एकदां मूळ आर्यन वंशाचे लोक युरोप खंडांत होतें व ते तेथून हिंदुस्थानांत आले हें अनुमान पत्करलें कीं मग त्यावर त्यांचीं नाकें सरळ होतीं, डोळे घारे होते व ते आजच्या युरोपियन लोकांप्रमाणें श्वेत-वर्णीय असून मूळच्या कृष्णवर्णीय भारतीयांवर त्यांनीं आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें ही सांखळी तयारच होते. व त्यांत

जेत्यांशीं आपला संबंध आणला जातो याचें समाधान अनुभविण्या-साठींच तथाकथित भारतीय संशोधकांनीं ही कल्पना उच-लून धरली असें मत डॉ. केतकर यांनीं ठामपणें मांडलें आहे. अर्थातच ऋग्वेदांत आधीं हा वंशवाचक शब्दच नसल्यामुळें घारे डोळे व श्वेतवर्ण आणि कृष्णवर्णीयांवरील आक्रमण ही केवळ कल्पित कादं-बरी ठरते. ऋग्वेदांतील एका सूक्ताचा ऋषि कण्व हा आर्य होता हें निर्विवाद आहे व तो काळचा रंगाचा होता असा स्पष्ट उल्लेख आहे. इतकेंच नव्हे तर, ऋग्वेदामध्यें आर्य शब्द वंशवाचक कसा नव्हता हें दाखविणारा एक पुरावा दाखवितां येतो व तो म्हणजे आर्याला दस्यु होतां येत असे व उलट दस्यूहि विशिष्ट पद्धतीनें वागल्यास त्याला आर्य होतां येत असे असा स्पष्ट उल्लेख आहे. जर आर्य शब्द हा वंशवाचक असेल अथवा रक्तबीजदर्शक असेल तर रक्तबीजांत व वंशांत असें तडकाफडकी परिवर्तन कसें काय घडून येतें हा प्रश्न संशो-धकांनीं विचार करण्यासारखा आहे. आज एकाद्या मनुष्यानें ख्रिश्चन धर्माची दीक्षा घेतली तर तो ख्रिस्त मतानुयायी होईल पण म्हणून तो नार्डिक अथवा अँग्लोसॅक्सन वंशाचा होईल काय ? जी गोष्ट आर्य शब्दाची, तीच दस्यु शब्दाचीहि आहे. ऋग्वेदांत कोठेंहि दस्यु शब्द वंशवाचक नाहीं. व त्यामुळेंच अनार्य अथवा द्रविड वंशाचें अस्तित्व सिद्ध होऊं शकत नाहीं. द्रविड वंश असेलहि. पण शुद्ध द्रविड संस्कृति अशी मुळींच सिद्ध होत नाहीं अशी मान्यता द्रविडांचा दुर्दान्त अभिमान बाळगणारे संशोधकच आतां देऊं लागले आहेत. ज्याप्रमाणें आर्य शब्द हा ऋग्वेदांत गुणवाचक आहे त्याचप्रमाणें दस्यु शब्दहि ऋग्वेदांत गुणवाचकच आहे. " अयज्वे, अव्रती, मुरदेव, शिश्नदेव ही ऋग्वेदांतील दस्यूंचीं विशेषणें आहेत. यज्ञधर्म न मानणारे, कसलाहि निर्बन्ध न पाळणारे, स्वैराचारी, उच्छृंखल प्रवृत्तीचे, मूर्खपणानें हव्या त्या देवांची उपासना करणारे आणि वासनामय व कामलंपट असें या दस्यूचें ऋग्वेदांत वर्णन येतें. ते मुळांत आर्यांपैकींच असून त्यांच्या उच्छृंखलतेमुळें त्यांना आर्य क्षुद्र समजत. व पणि नांवाचा लोकसंघहि कोणी वेगळा नसून हें

उच्छृंखल प्रवृत्तीचे व्यापारी होते हें डॉ. अविनाशचन्द्र दास यांनीं उत्कृष्ट रीतानें दाखविलें आहे. दस्यूंच्या या विशेषणांतील अनास, शिश्नदेव या दोन विशेषणांवर आधुनिक संशोधकांनीं द्रविड संस्कृतीचा कुतुबमिनार उभारलेला आहे व अनास शब्दाचा चपट्या नाकाचे असा सोईस्कर अर्थ करून ज्या अर्थी द्रविड चपट्या नाकाचे त्या अर्थी आर्य सरळ नाकाचे असले पाहिजेत असें अनुमान उभारलें आहे. पण तेथील अनास शब्दाचा अर्थ चपट्या नाकाचे असा नसून ज्यांना भाषेंतील अनुनासिकांचा उच्चार करतां येत नाहीं अशा अशुद्ध वाणीचे लोक असा आहे. ऋग्वेदीय आर्यांना सगळ्यांत अभिमान जर कशाचा असेल तर तो आपल्या भाषेचा होता. असुरांना र चा उच्चार करतां येत नव्हता म्हणून त्यांचा पराभव झाला. (ते असुराऽहेलयो हेलय इति ब्रुवन्तो पराबभूवुः) असा स्पष्ट उल्लेख आहे. शिश्नदेव या शब्दावरून द्रविड लिङ्गपूजक होते हेंहि अनुमान चुकीचें असून तेथील शिश्नदेव या शब्दाचा अर्थ मातृदेव पितृदेव इत्यादि शब्दांप्रमाणें शिश्नपरायण अथवा कामलंपट असाच घेणें कसें योग्य आहे हें ऋचेच्या संदर्भावरून आम्हीं सविस्तरपणें दाखविलें आहे. तसेंच भाषासाम्य इत्यादि साम्यवादाची तलवार दुधारी असून पराक्रमी व संस्कृतिसंपन्न वैदिक लोकांचें अनुकरण करण्याच्या प्रवृत्तीमुळेंहि अशीं साम्यें निर्माण होणें कसें शक्य आहे हेंहि तेथेंच दाखविण्यांत आलें आहे. यानंतर याच्याशीं संबंध असलेला व अलीकडे मोठ्या वादाचा विषय झालेला जो वैदिक लोकांच्या स्थळाचा प्रश्न, त्याकडे आम्ही वळलों.

मुळांत आर्य लोक हे हिंदुस्थानाबाहेरचे असले पाहिजेत हा सिद्धांत मनाशीं पक्का धरून हिंदुस्थानाबाहेर त्यांचें स्थळ शोधण्याचा पहिला प्रयत्न युरोपियन संशोधकांनीं केला. एशियामायनरपासून तर कॉकेशस् पर्वताच्या पायथ्यापर्यंत आर्यांच्या मूलगृहासंबंधीं विविध तर्क करण्यांत आले. पण कै. लोकमान्य टिळक यांनीं आपल्या 'आर्क्टिक होम इन् दि वेदाज' या सुविख्यात ग्रंथांत

प्रतिपादन केलेल्या ध्रुवसिद्धांतानें इतर सर्व सिद्धांतांना मागें टाकलें आहे. ओरायन् या ग्रंथाच्या निर्मितीनंतर पुनः पुन्हां केलेल्या ऋग्वेदाच्या वाचनांत कै. लोकमान्यांना दीर्घ उषा, नक्षत्रमंडळाचें डोक्यावरच चक्राकार फिरणें, दीर्घ रात्र व त्याबद्दल ब्राह्मणांना वाटत असलेली भीति, इत्यादि ऋग्वेदांतील उल्लेखांवरून या गोष्टी वैदिक लोकांनीं अथवा त्यांच्या पूर्वजांनीं प्रत्यक्ष कोठें तरी पाहिल्या असल्या पाहिजेत असें त्यांस वाटूं लागलें. हिंदुस्थानांतील हवामान, दिनमान, ऋतु, भौगोलिक स्थिति इत्यादि गोष्टींशीं वैदिक आर्य परिचित होते यांत शंकाच नाहीं. पण अगदीं तुरळक कां होईना पण ज्या गोष्टी केवळ ध्रुवमंडळांत, थोड्याफार फरकानें उत्तर ध्रुवालगतच्याच प्रदेशांत आढळतात त्यांचे इतके सलगीचे उल्लेख त्या प्रदेशाच्या प्रत्यक्ष जिव्हाळ्याच्या परिचया-वांचून ऋग्वेदांत येणें शक्य नाहीं असें त्यांच्या मनानें घेतलें. पण त्यासाठीं केव्हां तरी वैदिक आर्य उत्तरध्रुवप्रदेशांत रहात होते असें मानावें तर मनुष्य राहण्यास अत्यंत अयोग्य अशा त्या थंड व बर्फमय प्रदेशांत हे लोक रहाणें शक्य आहे असें मानणें अशक्य वाटूं लागलें. पण भूस्तरशास्त्राच्या संशोधनाकडे लोकमान्यांचें लक्ष जाऊन त्यामुळें त्यांचा तो प्रश्न सुटला. भूस्तरशास्त्रानें लोक-मान्यांना असा पुरावा उपलब्ध करून दिला कीं ध्रुवप्रदेशाची हल्लींची मनुष्य राहण्यास अयोग्य अशी अवस्था हिमप्रलयानें केलेली असून हिमप्रलयपूर्व कालीं या प्रदेशांत समशीतोष्ण म्हणजे मनुष्यवसतिक्षम हवामान होतें. अर्थातच या वेळीं आर्य तेथें रहात असले पाहिजेत व त्यांच्या वाणींतून त्यामुळेंच आपल्या या मूल-गृहांतील भौगोलिक स्थितीचें वर्णन उमटलें आहे. असें त्यांनीं दाखवून दिलें. संशोधकांच्या जगतांत या सिद्धांतानें भूस्तरशास्त्राचा बेसुमार उपयोग करून वेदांचा स्थलनिर्णय करण्याची प्रवृत्ति बळावली. डॉ. अविनाशचंद्र दास यांनीं ऋग्वेदांतील सरस्वती नदीचें समुद्राला मिळण्याचें वर्णन हें प्रत्यक्ष भौगोलिक वर्णन आहे अशी कल्पना मांडून भूस्तरशास्त्राच्या आधारें राजपुतन्यांत

ज्या काळीं समुद्र होता त्याकाळीं ही प्रत्यक्ष वस्तुस्थिति असली पाहिजे व तो काळ २७००० वर्षांपूर्वीचा असल्यामुळें ऋग्वेदकाळ त्यापूर्वीचा होय असें मांडलें. भूस्तरशास्त्राचा आधार घेण्यासंबंधांत डॉ. दास यांना दूषण देणें चुकीचें आहे असें आम्हीं त्यांच्या प्रतिपादनाचें इतर दृष्टींनीं परीक्षण करीत असतां दाखवून दिलें आहे. डॉ. दास यांनीं लोकमान्यांच्याहि सिद्धांताचें कसून परीक्षण केलें आहे. लोकमान्यांच्या ध्रुवसिद्धांताला पोषक असा पुरावा प्रत्यक्ष ऋग्वेदांत आढळत नाहीं असें त्यांचें म्हणणें असून त्यांचे इतर आक्षेप फारसे टिकण्यासारखे नसले तरी एक आक्षेप फार महत्त्वाचा आहे. व तो हा कीं जर ऋग्वेदीय आर्य उत्तरध्रुवावरचे असतील तर आपल्या मूलस्थानाचा व तें सोडण्याचा दुर्दैवी प्रसंग आपल्यावर आला या गोष्टीचा त्यांच्या वाङ्मयांत एकहि स्पष्टार्थदर्शक शब्द कां येऊं नये? पृथ्वीच्या पाठीवर एकहि सुधारलेली जात अशी नाहीं कीं जी आपल्या मातृभूमीच्या बाबतींत अथवा मूलगृहाच्या बाबतींत इतकी विस्मरणशील असूं शकते. मग सुधारलेल्या ऋग्वेदीय लोकांच्या संबंधांतच असा विलक्षण प्रकार कां व्हावा? लोकमान्य ऋग्वेदांतून जे पुरावे देतात ते रूपकात्मक व संदिग्ध असून तदुत्तरकालीन वाङ्मयांतील त्यांचे आधार ऋग्वेदकालीन घटना सिद्ध करावयास असमर्थ आहेत असें त्यांचें म्हणणें आहे. दासांची सरस्वती कशी टिकणारी नाहीं हें आपण त्यांवरील आक्षेपांची तपासणी करून जसें पाहिलें आहे तसेंच लोकमान्यांचा ध्रुवसिद्धांत उडवून देतां येण्यासारखा नाहीं हेंहि पाहिलें आहे. भूस्तरशास्त्राच्या आधारावर उत्तरध्रुवच आजच्या भारतवर्षांतील बिहार प्रांतांत होता असेंहि कांहीं लोकांचें प्रतिपादन आहे. कांहीं लोक राजकीय कारणांसाठीं टिळकांच्या ध्रुवसिद्धांताचा दुरुपयोगहि करतात. एकदां जिनांनीं मुस्लीमलीगच्या एका अधिवेशनांतील अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणांत "आमची संस्कृति भारतवर्षांत बाहेरून आली असली तर तुम्हीहि बाहेरूनच येथें आलेले आहांत. आधीं आलेल्या चोरानें

मागाहून आलेल्या चोराला 'तूं मात्र खरा चोर' असें म्हणून कांगावा करण्यांत कांहीं अर्थ नाहीं" असे स्पष्टच उद्‌गार काढले होते. आम्ही या प्रकरणांत सर्व प्रतिपादनांविषयीं चर्चा करून असें दाखवून दिलें आहे कीं लोकमान्यांचा ध्रुवसिद्धांत मान्य करूनहि उत्तरध्रुव हें आर्यांचें मूलस्थान होतें असें मानण्याचें व ते बाहेरून आल्याचें ठरविण्याचें कारण नाहीं. मूलस्थानाचा मूलस्थान म्हणून निर्देश ही घटना इतकी महत्त्वाची आहे कीं तिचा ऋग्वेदांत उल्लेख असणें अत्यावश्यक आहे. ज्या अर्थी तो नाहीं त्या अर्थी उत्तरध्रुव हें आर्यांचें मूलस्थान नसून ती त्यांची वसाहत असली पाहिजे. पराक्रमी आर्यांना हिंदुस्थानांतल्या आपल्या मूलस्थानांतून ध्रुवासारख्या वसतिक्षम प्रदेशांत जातां येणें व तेथें एखादी वसाहत स्थापन करणें सहज शक्य होतें. मॅसिडोनचा राजा अलेक्झांडर हा जर सुदूर ग्रीसमधून पंचनदापर्यंत देश जिंकूं शकतो व चेंगीझखानासारखा मंगोलियांतील पुरुष स्पेनपर्यंतचे देश धुळीस मिळवूं शकतो तर शंभर शंभर किल्ल्यांचीं शत्रूंचीं नगरें भुईसपाट करणारे आर्य ध्रुवप्रदेशापर्यंत जाऊंच शकत नाहींत असें समजण्यास त्यांच्या विजिगीषु प्रवृत्ती-संबंधींच्या आपल्या कोत्या कल्पनेविना दुसरा कोणताहि आधार नाहीं. लोकमान्यांच्या सिद्धांतानें ध्रुवप्रदेश आर्यांना माहीत होता येवढेंच केवळ सिद्ध होतें. ऋग्वेदांतील भारताच्या भौगोलिक स्थितीच्या व तिच्याविषयीं वैदिकांनीं प्रकट केलेल्या विलक्षण जिव्हाळ्याच्या वर्णनावरून भारत हीच त्यांची मूलभूमि होय असें मानलें पाहिजे. हिमप्रलयाच्या आपत्तीमुळें जर मूलस्थान सोडून आर्य भारतांत परतले असते तर आयरिश, स्वीडिश, इंग्लिश, ट्यूटॉनिक, सुमेरियन इत्यादि लोकांप्रमाणें त्यांनाहि आपल्या मूलस्थानाची स्मृति असती. म्हणूनच श्री. जयनाथपति यांनीं या संबंधांत विचारलेला पुढील प्रश्न अतिशय मार्मिक आहे. ते डॉ. चॅटर्जींना विचारतात, Have you ever found cultured foreigners forgetting their old homes and becoming

enamoured of their newly made conquest? (Indian historical quarterly vol. 4, No. 4 Dec. 1928, P. 679.) अर्थातच हिमप्रलय व मूलगृह नष्ट होणें यांचा ऋग्वेदाशीं संबंध नसून त्यानंतरच्या वाङ्मयांत त्या गोष्टी आढळतात. पांच पांच लाख सैन्यें कापलीं जातील असे ज्यांचे संगर व भुवनाधिपत्याच्या ज्यांच्या आकांक्षा ऋग्वेदावरून सिद्ध होतात त्यांचें साम्राज्य व त्यामुळेंच वसाहती उत्तरध्रुवापर्यंत, जर तो प्रदेश वसतिक्षम असेल तर, पोहोचण्याची सहज शक्यता आहे. टिळकांचा ध्रुवसिद्धांत मान्य करूनहि भारत हेंच आर्यांचें मूलगृह असलें पाहिजे या सिद्धांताला कांहींहि विरोध उत्पन्न होत नाहीं. किंबहुना या पद्धतीनें लोकमान्यांच्या ध्रुवसिद्धांतावरील आक्षेपहि नष्ट होऊन तो उलटा अधिक सुसंगत ठरतो. ध्रुवावर वसति असावी येवढाच लोकमान्यांचा कटाक्ष आहे. ध्रुवप्रदेश त्यांना माहीत होता येवढेंच त्यानें सिद्ध होतें. तें मूलगृह होतें असें मुळींच सिद्ध होत नाहीं.

इतक्या विषयांच्या चर्चेनंतर आपण वैदिक राष्ट्रासंबंधींचा बहिरंग विचार संपवून अंतरंगाकडे वळणें स्वाभाविकच होतें. पण प्रत्यक्ष अंतरंगविचाराला हात घालण्यापूर्वीं आणखी एक. वेदासंबंधींच्याच संकेताचें शास्त्रीय स्पष्टीकरण पाहणें आवश्यक होतें; व तो संकेत म्हणजे वेदांच्या अपौरुषेयत्वाबद्दलचा होय. भारतवर्षांत फार प्राचीन काळापासून तो आजपर्यंत वैदिक वाणी ही नुसती अर्थवती नसून ती सामर्थ्यवती आहे असा दृढ विश्वास असून वेद हे साक्षात् परमेश्वराचे लीलानिःश्वसित आहेत अशी धारणा आहे. भारतीय प्राचीन वाङ्मयांत यासंबंधीं दोन मतें आढळून येतात. पहिलें मत असें आहे कीं, वेद हे प्रत्यक्ष परमेश्वरानें निर्माण केलेले आहेत. व याच अर्थानें त्यांना पौरुषेय म्हटलें जातें. पुरुष म्हणजे ईश्वर व त्यानें जें केलेलें तें पौरुषेय. दुसरें मत असें आहे कीं, वेद म्हणजे परमेश्वराचाच नादमय

आविष्कार असल्यामुळें ईश्वरानें ईश्वराला निर्माण केलें हें म्हणणें जितकें हास्यास्पद तितकेंच ईश्वरानें वेद निर्माण केले हें म्हणणेंहि हास्यास्पदच होईल. म्हणून वेदांचें फक्त प्रकटीकरण झालें, ते कोणीहि निर्माण केलेले नसल्यामुळें अपौरुषेय आहेत. आजच्या पौरुषेय व अपौरुषेय या शब्दांसंबंधींच्या कल्पना व या प्राचीन कल्पना एक नाहींत हें यावरून स्पष्ट होईल. आजची पौरुषेयत्वाची कल्पना म्हणजे वेद हे इतर अनेक ग्रंथांप्रमाणें कोण्यातरी पुरुषानें म्हणजे मनुष्यानें निर्माण केलेले आहेत ही आहे. परमेश्वराची आदि सृष्टि म्हणजे नादमय वेदस्वरूप; त्याच्यापासूनच म्हणजे वेदांच्या शब्दापासूनच सर्व सृष्टि निर्माण झाली असें मनु, याज्ञवल्क्य, महाभारतकारापासून तर श्रीमदाद्यशंकराचार्य, श्रीज्ञानेश्वर यांच्यापर्यंत सर्वांचेंच प्रतिपादन आहे त्यामुळें हा विषय चर्चेचा ठरतो. असा विश्वास बाळगणाऱ्या ह्या सर्व व्यक्ती महाप्रतिभासंपन्न असून असत्य शब्दोच्चाराऐवजीं जिव्हा कापणें पत्करण्याइतक्या सत्यनिष्ठ होत्या यांत वाद नाहीं. वेदांपासून म्हणजे शब्दापासून सृष्टि उत्पन्न होते काय? असा प्रश्न निर्माण करून स्वतःच्या ग्रंथाचा तो विषय नसल्यामुळें लोकमान्यांनीं आपल्या 'आर्क्टिक होम'मध्यें हा विषय तसाच सोडून दिलेला आहे. वेद पौरुषेय आहेत कीं अपौरुषेय आहेत यासंबंधांत माझा कांहींच आग्रह नसून जे अपौरुषेयवादी आहेत त्यांच्यांत महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांच्यासारख्या तपस्वी व पाश्चात्य आणि पौरस्त्य अशा दोन्ही विद्यांत निष्णात असणारी व्यक्तीहि असल्यामुळें ही धारणा व तिचें शास्त्रीय स्वरूप समजावून घ्यावें येवढाच माझा आग्रह आहे. या प्रश्नाची चर्चा करतांना आपण प्रथम वेदांचें स्वरूप, त्यांची स्वरमयता व या स्वरांचे विशिष्ट संकेत, व्यूह व अष्टविकृति हे त्यांच्या संरक्षणाचे उपाय व उच्चाराचें कडकडीत शास्त्र यांचें समालोचन करून खास वेदांतच त्यांच्याविषयीं केवढी गूढ व सामर्थ्यवान् धारणा आहे हें प्रत्यक्ष वेदवचनांवरूनच पाहिलें. त्यानंतर वेद

अपौरुषेय ठरविणाऱ्या जुन्या मीमांसकी युक्त्या त्यांच्या काळीं समाधानकारक वाटल्या तरी आज त्या कशा निष्फळ व निरुपयुक्त आहेत हेंहि पाहिलें. नंतर आजच्या प्रगत नादशास्त्राच्या (Sound theory) आधारें या विषयावर कांहीं प्रकाश पडतो काय याचा विचार केला. आपणांस त्यांत (१) शब्दांत अथवा नादांत उत्पादनसामर्थ्य आहे, (२) प्रत्येक व्यक्त पदार्थाचें नादलहरी हें सूक्ष्म स्वरूप होय, व (३) प्रकाश आणि नाद हे एकाच पदार्थाचें पर्यायान्तर असून रूप व नाद यांत तत्त्वतः फरक नाहीं असें आधुनिक विज्ञानावरूनच आढळून आलें. हें सृष्टींतील व्यक्त पदार्थांचें जें मूळ नाद त्यांनाच आपल्या येथें वेद असें म्हटलें असून 'अनंता वै वेदाः' या वचनाची उपपत्ति त्यावरून चांगली लागू शकते. या नादांना वहन करणारे शब्द ऋषींनीं तयार केले असले तरी प्रत्येक शब्द म्हणजे एक नादलहरीचें केंद्र ठरल्यामुळें पर्यायवाचक शब्दानें सुद्धां दुसरा प्रतिशब्द त्या जागीं योजतां येत नाहीं व वेदांतील शब्द हे मुळांत अशा प्रकारचें नादकेंद्र असल्यामुळें त्यांच्यांत शक्तींचा निवास आहे (यस्मिन्देवा अधिविश्वे निषेदुः) अशी ऋषींची धारणा आहे. व्यक्त सृष्टीचें आदि द्रव्य याप्रमाणें नाद हेंच असल्यामुळें शब्दापासून अथवा नादापासून सृष्टि निर्माण झाली हें ऋषींचें म्हणणें सरळच आहे. महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांनीं या विषयासंबंधीं केलेलें विवेचन साहाय्यक म्हणून त्यांच्याच शब्दांत मांडून मी या विषयाचा समारोप केला. मंत्रांतील शब्द ऋषींनींच निश्चित केलेले असले तरी ज्या सामर्थ्याचें एकत्रीकरण त्याद्वारें त्यांनीं केलें तें अर्थातच अपौरुषेय ठरतें. म्हणूनच ऋषी हे मंत्रद्रष्टे होत. आइन्स्टीननें सापेक्षतावादाचा सिद्धांत शोधला म्हणून त्याला त्याचा आपण द्रष्टा समजतों; कर्ता समजत नाहीं, तीच गोष्ट येथेंहि आहे. यावर असा एक आक्षेप आहे कीं, वेदासारखी श्रेष्ठ गोष्ट आपल्या पूर्वजांनीं निर्माण केली असें म्हणण्यांत आपण त्यांच्या कर्तृत्वाचा जो गौरव करतो तो परमेश्वरानें ती त्यांना दिली असें म्हणण्यांत

होत नाहीं म्हणून वेदांना पौरुषेय मानावें. पण परमेश्वरानें वेद लोकांना दिले असें माझें म्हणणेंच नाहीं. आइन्स्टीननें सापेक्षतावादाचा जसा शोध लावला तसाच ऋषींनीं सृष्टीचें आदिद्रव्य असणाऱ्या नादलहरींचा शोध लावला व त्यांचे प्रस्तार वैदिक ऋचांच्या द्वारें उपनिबद्ध करून ठेवले येवढेंच म्हणणें आहे. आजच्या शास्त्रांनीं जी गोष्ट सिद्ध होते ती इतक्या प्राचीन काळीं त्यांनीं ओळखली यांत त्यांचा गौरव अधिक आहे. सापेक्षतावादाचा संशोधक म्हणून आइन्स्टीनचा गौरव जर कमी होत नाहीं तर ऋषींचाच कां व्हावा? अर्थातच अपौरुषेयत्वाचा संकेत समजावून घेण्याच्या दृष्टीनेंच ही चर्चा केलेली आहे, विशिष्ट शास्त्राला धरून असलेली ही शब्दरचना मनुष्यांनींच केलेली आहे हें लक्षांत घेऊनच पुढें वैदिक राष्ट्राच्या अंतरंगाचें विश्लेषण केलेलें आहे.

वैदिक राष्ट्राच्या अंतरंगाचें दर्शन म्हणजे मुख्यतः वैदिक भावजीवनाचें दर्शन होय. ते लोक रहात कसे असत, त्यांचें राज्य, त्यांचें सैन्य, त्यांचा आर्थिक व्यवहार या सर्व गोष्टी स्थूलमानानें राष्ट्रदर्शनांत समाविष्ट होत असल्या तरी मुख्यतः त्यांची राष्ट्रीय अस्मिता म्हणजेच त्यांच्या अंतर्जीवनाच्या धारणा, जीवनविषयक ध्येयवाद, नीतिमत्ता व त्याला अनुलक्षून असलेला सांस्कृतिक व्यवहार यांचें स्वरूप कसें होतें हें पाहणें म्हणजेच त्या राष्ट्राचें वास्तविक दर्शन घेणें होय. या दृष्टीनें अंतरंगदर्शन घेतांना सर्वांत प्रथम आपण वैदिक राष्ट्राचा जीवनवाद पाहिला. शोपेनहार असें म्हणत असे कीं "जगांत जन्माला येणें ही सर्वांत वाईट गोष्ट असून तरुणपणीं न मरणें ही त्याखालोखाल वाईट गोष्ट होय." वैदिक राष्ट्राच्या धारणेमध्यें अशा तऱ्हेचा खुरटा निराशावाद कधींच नव्हता. "जीवेम शरदः शतम्, अदीनाः स्याम शरदः शतम्, भूयश्च शरदः शतात्" आम्ही शंभर वर्षें जगूं, शंभरापेक्षांहि अधिक वर्षें आम्ही जगूं व दैन्याचें जीवन आम्हांला कधींच नको, अशा रीतीचा सामर्थ्यशाली वैदिक राष्ट्राचा हुंकार आहे. व तो चारहि वेदसंहितांत भरून राहिलेला आहे. आपण सर्वस्वीं कार्यक्षम असावें, आपले

भोग व सुख स्वकष्टार्जित असावे, पराक्रमशाली असावें, शत्रूंना ठार मारावें, संग्रामांत सदा विजयी असावें, जगांतील श्रेष्ठांतलें श्रेष्ठ ऐश्वर्य पराक्रमानें आपल्या पायाशीं लोळण घेणारें असावें, अशा त्यांच्या आकांक्षा आहेत. त्यांच्या समृद्धि व अन्नाच्या मागणींतून त्यांच्या रानटी अवस्थेचा व भटक्या स्थितीचा भाई डांगे यांनीं काढलेला अंदाज किती मूर्खपणाचा आहे हें आम्ही दाखविलेलेंच आहे. पण हा त्यांचा जीवनवाद पाहून त्यांच्यांत श्रेष्ठ नीतिमत्तेच्या कल्पना नव्हत्या हें जें डॉ. केतकर यांनीं अनुमान काढलें आहे तेंहि किती चुकीचें आहे हें पाहण्यासाठीं त्यांच्या जीवनवादाचें समीक्षण केल्यावर आपण त्यांच्या नैतिक धारणाकडे व नैतिक संकेतांकडे वळलों. भौतिक ऐश्वर्याबरोबरच चारित्र्य, व सत्यनिष्ठा, ईश्वरनिष्ठा, दानत, दुर्गुणाविषयीं अप्रीति, आत्माला अलंकृत करणाऱ्या श्रेष्ठ सद्गुणांचा पुरस्कार या गोष्टींकडे लक्ष दिलें तर त्यांची नीतिमत्ता किती श्रेष्ठ श्रेणीची होती याची कल्पना येते. "स्वप्नश्चेदनृतप्रयोता" "स्वप्नांनील पापापासूनहि परमेश्वरा तूं आम्हांस वांचव" "ते मा रक्षन्तु विस्रसश्चरित्रात्" "चारित्र्य भ्रष्ट करणाऱ्या प्रत्येक गोष्टीपासून तूं आम्हांला वांचव" अशी काकुळतीनें परमेश्वराची प्रार्थना करणाऱ्या लोकांचे शीलचारित्र्यासंबंधीचे विचार किती प्रखर व सूक्ष्म होते हें सांगावयास नकोच. सूक्तेंचीं सूक्तें देऊन डॉ. केतकर यांचें अनुमान कसें चुकीचें आहे हें मी दाखविलेंच आहे. अशा या श्रेष्ठ नीतिसंपन्न लोकांचें नैतिक अंतर्जीवन व भारतीय संस्कृतीच्या अत्युच्च समजण्यांत येणाऱ्या काळांतील नैतिक अंतर्जीवन यांच्यांत कोणताहि भेद नाहीं असें आढळून येईल. अशा या श्रेष्ठ लोकांत विवाहसंस्था नव्हती व अनिर्बंध स्वैराचार आणि संभोग चालत असे हें भाई डांगे यांनीं केलेलें प्रतिपादन किती धाष्ट्याचें, विडंबनात्मक, मूर्खपणाचें व खोटें आहे हें सूर्यासूक्त, यमयमीसूक्त व द्यूतसूक्त यांतील स्पष्ट उल्लेखांवरून मी दाखवून दिलेलें आहे. श्रेष्ठ नैतिक जीवन उत्पन्न व्हावयास पशुभावविशिष्ट मानवावर

लहानपणापासूनच जीवनाची सूत्रबद्ध आंखणी करून श्रेष्ठ संस्कार घडवावे लागतात. वैदिक राष्ट्रांतहि फार प्राचीन काळींच हा विचार होऊन चार आश्रमांची रचना याच अनुरोधानें करण्यांत आलेली होती. पुढें श्रेष्ठ जीवन प्रत्यक्ष जगावयाची शारीरिक व मानसिक अशी सर्व प्रकारची सिद्धता ज्या आश्रमांत करीत असत त्या आश्रमाचें नांव ब्रह्मचर्याश्रम असें असून त्याचा उल्लेख ऋग्वेदांत आढळतो व अथर्ववेदांत तर या आश्रमाचें व त्यांतील कर्मांचें संपूर्णच वर्णन आढळतें. ब्रह्मचर्याश्रमांत आश्रमवासी गुरु आपल्या राष्ट्राचा भावी नागरिक कसा तयार करीत, विद्येविषयींच्या व संस्काराविषयींच्या त्यांच्या कल्पना काय होत्या व प्रत्यक्ष जीवन घडविण्याचा त्यांचा कार्यक्रम कसा असे याचें तपशीलवार व विस्तृत वर्णन मी केलें आहे. हल्लीच्या शिक्षणपद्धतींत असलेले सर्व दोष टाळून वैदिकांनीं आपली शिक्षणपद्धति उभारलेली होती. व्यक्ति, व्यक्तीचा विकास म्हणजेच वस्तुत: सर्व समाजाचा व राष्ट्राचा विकास होय हें त्यांनीं अचूकपणें ओळखलें होतें. आजहि शिक्षणप्रणालि उभारतांना त्यांचीं पुढील तत्त्वें मार्गदर्शक होऊं शकतात : (१) शिक्षण स्वतंत्र असावें व राज्ययंत्रानें त्याचें साहाय्यक असावें. शारदेचें मंदिर राजदंडाचे कधींहि दास नसावें. व राज्ययंत्रणेचे प्रचारक तयार करण्याचे कारखाने म्हणजे शिक्षणयंत्र नसावें. (२) सामुदायिक शिक्षण पद्धतीऐवजीं मार्गदर्शकाला प्रत्येक व्यक्तीच्या जीवनांत प्रवेश करून तें घडवितां येईल अशी शिक्षणांत व्यवस्था असावी. (३) उत्तम नागरिक तयार करावयाचे तर पशुत्व वाढीला लावणाऱ्या नागर संस्कृतीच्या विलासापासून शिक्षणमंदिरें दूर असावीं. (४) अंतर्जीवन विकसन हा शिक्षणाचा मुख्य पाया असावा. पण त्याबरोबरच भौतिक जीवन दुर्लक्षिलें जाऊं नये. आजहि या गोष्टी शिक्षणतज्ज्ञांना मार्गदर्शक ठरतील. ऋग्वेदासारख्या अतिप्राचीनकाळीं या धारणेनें राष्ट्राच्या विकसनाचा मार्ग आखणाऱ्या आपल्या पूर्वजांच्या प्रतिभेसंबंधीं मन थक्क झाल्याशिवाय रहात नाहीं. या विवेचनानंतर

शिक्षणक्षेत्रांत स्त्रियांचें काय स्थान होतें व एकंदरच राष्ट्र जीवनांत स्त्रीचें काय स्थान होतें, या प्रश्नाकडे आपण वळलों, व असें पहिलें कीं प्राचीनकाळीं पुरुषांप्रमाणें स्त्रियांनाहि वेदविद्येचा व वैदिक कर्मांचा अधिकार असून त्यांना विकसनाची संपूर्ण संधि होती. विवाहसंस्था सर्वोच्च स्वरूपाची असून स्त्री पुरुष जवळ येण्यांत कामप्रवृत्ति हें मूळ असलें तरी शेवटीं कामगंधहीन वत्सलतेंत स्त्रीजीवनाची परिणति व्हावी हा मातृभावनेचा सर्वश्रेष्ठ आदर्श भारतीय स्त्रीसमोर असे. कांहीं स्त्रिया ब्रह्मवादिनी व म्हणूनच ब्रह्मचारिणीहि होत्या. वाचक्नवी, गार्गीसारख्या पंडिता, मैत्रेयीसारख्या जीवन्मुक्त, इंद्रसेना व विश्पलेसारख्या रणांगण गाजविणाऱ्या व परमभक्तिमती आणि परमेश्वराच्या कृपेस रामायणकालीन शबरीप्रमाणेंच पात्र ठरलेल्या अशा स्त्रियांच्या गौरवानें वेदांचे सांदीकोपरे निनादून गेले आहेत. तात्पर्य, वैदिक राष्ट्रांत स्त्रीची प्रकृति लक्षांत घेऊन तिच्या विकसनाची संपूर्ण सोय होती. आजहि आदर्श भारतीय स्त्रीजीवन म्हणून जी कल्पना डोळ्यासमोर उभी राहते तिची परिपूर्णावस्था त्या काळीं दृष्टोत्पत्तीस येते.

याप्रमाणें सहस्रावधि वर्षें ध्येयवाद म्हणून जें नैतिक व चारित्र्यसंपन्न जीवन भारतीय राष्ट्रासमोर राहिलें त्याची सिद्धता वेदकाळींच झालेली होती हें पाहिल्यावर स्वाभाविकपणेंच असा प्रश्न उत्पन्न होतो कीं या लोकांचें तत्त्वज्ञान व आध्यात्मिक जीवन स्थिर स्वरूपाचें असलें पाहिजे. कारण असा नियम आहे कीं, नैतिक जीवनाला तत्त्वज्ञानाचा व जीवनविषयक ध्येयवादाचा भक्कम पाया असल्याविना तें कधींहि स्थिर असूं शकत नाहीं. जर वेदांतून दृष्टोत्पत्तीला येणारे जीवनादर्श आजहि समाजांत स्थिरपद आहेत तर या जीवनादर्शाच्या पाठीमागें असलेला तत्त्वज्ञानाचा व जीवनविषयक ध्येयवादाचा भाग भक्कम स्वरूपाचा निर्विवादपणेंच असला पाहिजे. तो काय असेल हें पाहणें ओघानेंच आवश्यक होतें. म्हणून आपण तत्त्वज्ञानाकडे वळलों.

तत्त्वज्ञान म्हटलें कीं क्षेत्रक्षेत्रज्ञविचार हा सर्वांत महत्त्वाचा ठरतो. आपण गीता व तदुत्तरकालीन भारतीय तत्त्वज्ञानाच्या परिपूर्णावस्थेंतील क्षेत्रक्षेत्रज्ञविचाराचा आढावा घेतला व उपनिषदांतील उल्लेख तपासून असें पाहिलें आहे कीं उपनिषदांतील विचार व तदुत्तरकालीन वाङमयांतील क्षेत्रक्षेत्रज्ञ विचार यांत केवळ मांडणीचा फरक आहे. पण तत्त्वतः कांहींच फरक नाहीं. यानंतर वेदवाङमयांत सर्वांत प्राचीन ऋग्वेद समजण्यांत येत असल्यामुळें ऋग्वेदांतील 'गच्छ धर्मणा' 'अजो भागः' 'इदमस्मिन्निन्यः सन्नद्धो मनसा चरामि' 'सूर्यं चक्षुर्गच्छतु वातमात्मा' इत्यादि उल्लेखावरून आपण असें सविस्तर पाहिलें आहे कीं ऋग्वेदांतील क्षेत्रक्षेत्रज्ञविचार व तदुत्तरकालीन वाङमयांतील क्षेत्रक्षेत्रज्ञविचार यांत तत्त्वतः भेद नाहीं. क्षेत्रक्षेत्रज्ञविचारावरून 'पिंडीं तें ब्रह्मांडीं' या न्यायानें आपण विश्वाच्या मूलतत्त्वाचा अथवा क्षराक्षर व पुरुषोत्तम यांचा जो विचार त्याकडे वळलों. जीव, जगत् व जगदीश्वर यांच्या विषयींच्या विचारालाच तत्त्वज्ञानविचार असें म्हणतात. भारतीय संस्कृतीच्या श्रीगीतेपासून नंतर पुढच्या वाङमयांतील परिपूर्ण विकसनावस्थेंतील यासंबंधींच्या विचाराचा प्रथम आढावा घेऊन नंतर उपनिषद वाङमयाकडे वळलों, व उपनिषदांतील अनेकविध उताऱ्यांवरून हें सिद्ध करून दाखविलें कीं उपनिषदांतील ब्रह्मांडविषयक तात्त्विक विचार व त्यानंतरचे विचार यांत तत्त्वतः क्षेत्रक्षेत्रज्ञविचाराप्रमाणेंच कांहींहि भिन्नता नाहीं. त्यानंतर आपण ऋग्वेदाकडे वळलों व ऋग्वेदांतील सर्व मंडलांतील उल्लेख व संपूर्ण नासदीय सूक्त उद्धृत करून असें दाखविलें कीं ऋग्वेदकाळींच हाहि विचार परिपूर्णावस्थेस गेला होता. साहाय्यक म्हणून नासदीय सूक्ताचें विवेचन करीत असतां लो. टिळकांचे त्या सूक्ताविषयींचे उद्गार उल्लेखिले आहेत. लोकमान्यांनीं त्यांत अगदीं स्पष्टपणें असें म्हटलें आहे कीं नासदीय सूक्तांत ऋषींनीं जें सांगितलें तेच विचार व सिद्धांत विवर्तवादादि नव्या परिभाषेनें पुढच्या लोकांनीं ठाकठीकपणानें सांगितले. त्याहून वेगळें असें प्रतिपादन कोणी केलें नाहीं. व

याहून अधिक पलीकडे जाण्याची शक्यताहि नाहीं. यावरून हें ध्यानांत येईल कीं भारतीय राष्ट्राचा व भारतीय संस्कृतीचा तत्त्वज्ञानात्मक पाया ऋग्वेदकाळींच सिद्ध झाला होता.

नुसतें तत्त्वज्ञान हें भारतीय संस्कृतीचें वैशिष्टय नसून अनुभूतिवाद हें या संस्कृतीचें सर्वांत महत्त्वाचें अंग आहे. कोरड्या तत्त्वज्ञानाला भारतांत शून्य महत्त्व आहे. या अनुभूतिवादाचें स्वरूप पाहण्यासाठीं अर्वाचीन काळांतील योगीन्द्र श्री. अरविंद घोष व भगवान् श्री. रामकृष्ण परमहंस देव तसेंच मध्ययुगीन काळांतील श्रीतुकाराम, रामदास, ज्ञानेश्वर, त्यापूर्वींचे श्रीमच्छंकराचार्य व त्याहि पूर्वींचे द्रष्टे यांचें म्हणणें काय आहे हें सविस्तर मांडून दाखविलें व उपनिषदांतील परिच्छेदांचें निरीक्षण करून उपनिषदांपासून रामकृष्णांच्या काळापर्यंत अनुभूतीचा एकात्म वीणाझंकार कसा ऐकूं येतो याची आपण प्रतीति घेतली. त्यानंतर ऋग्वेदांतील "अहं मनुरभवम्" इत्यादि सूक्तांचें समालोचन करून आपण असें पाहिलें कीं ऋग्वेदाचे सांदीकोपरेहि या अनुभूतिवादानेंच झंकारलेले आहेत.

याप्रमाणें वैदिक राष्ट्राचें आपण संपूर्ण अंतरंग पाहिलें. त्यावरून वैदिक राष्ट्राची उभारणी पुढील मूलतत्त्वांवर झालेली आहे व तीं मूलतत्त्वेंच भारतीय राष्ट्राची अस्मिता सिद्ध करतात असें आढळून येईल. तीं मूल तत्त्वें अशीं:-

(१) सर्वत्र एकच चैतन्यमय तत्त्व भरलेलें आहे. (एकमेवाद्वितीयं ब्रह्म) (Only the unconditioned Absolute one and none else.)

(२) "सर्वं खल्विदं ब्रह्म" हें सर्व कांहीं परब्रह्म आहे. ( The unconditioned Absolute One manifests in many. )

(३) सर्व कांहीं गतिरूप आहे. ( The One is dynamic. )

(४) सर्व कांहीं ज्ञानमय आहे. ( The One is Conscient. )

(५) ही गति नियमबद्ध आहे. कर्मतत्त्वानें ती नियंत्रित आहे आणि पुनर्जन्म हें त्या कर्मतत्त्वाशीं संलग्न असें तत्त्व आहे. (Laws of Cosmic motion, The laws of Karma and rebirth.)

(६) सप्तलोकात्मक विश्व व त्याची घनविरल अवस्थेनुसार विभागणी (The cosmos and its seven planes.)

(७) विश्वाचें परस्पराश्रयत्व (Interdependence, interpenetration and reciprocity.)

(८) योग आणि यज्ञ (The Science of yoga and sacrifice.)

(९) अनुभूतिवाद (The Science of realisation.)

(१०) साधनानामनेकता

भारतीय संस्कृतीची उभारणी या दहा तत्त्वांवर झालेली आहे. आणि या संस्कृतीच्या कोणत्याहि प्रवाहांत या तत्त्वांची अनुस्यूतता दृष्टोत्पत्तीला आल्यावांचून राहात नाहीं. उपनिषद व गीतावाङ्मयांत हीं तत्त्वें विकसित स्वरूपांत आढळतात हें सर्वांनाच मान्य आहे. पण ऋग्वेदाचा विचार करतांना व वैदिक वाङ्मयाचा उलगडा करतांनाहि या मूलतत्त्वांच्या सूत्रानेंच तो करतां येतो. अन्यथा नाहीं. भारतीय संस्कृति अथवा भारतीय राष्ट्र म्हणून जें कांहीं आहे त्याचा आरंभ वेदापासून असून त्याच्या अस्मितेचे हे विशेष वेदकाळीं सिद्ध झालेले होते हें आपण पाहिलें. यावर भारतीय राष्ट्राचें भावजीवन निर्माण झालें असून तें आजपर्यंत कमी अधिक प्रमाणांत टिकून आहे. म्हणून हें राष्ट्र जगांतील सर्व राष्ट्रांच्या मालिकेंत अखंड, एकात्म व एकरस भावजीवनाच्या दृष्टीनें मृत्युंजय ठरलें आहे. ही त्याची मृत्युंजयता टिकून त्याचें अमरत्व राखावयाचें असलें तर नव्या उभारणीच्या वेळीं त्याची ही अस्मिता नीट ध्यानांत घेतली पाहिजे. या प्राचीनतम व मृत्युंजय वैदिक राष्ट्राचें आपल्या संतानांना इतकेंच सांगणें आहे कीं "परमेश्वर तुमच्या पाठीशीं आहे. तुम्ही स्वतःच मनांत आणलें तर मृत्युमुखीं पडाल. बाकी जगांतील कोणतीहि शक्ति तुम्हांला मारण्यास समर्थ

नाहीं. ज्या जीवनरसानें सळसळून आम्ही साऱ्या विश्वाला आर्य करण्याची उत्तुंग आकांक्षा बाळगली व प्रत्यक्षांत आणली त्याच जीवनरसानें तुमचेंहि शरीर पवित्र केलेलें आहे. जे लोक आम्ही व आजचे तुम्ही वेगळे आहोंत असें अट्टाहासानें सांगतात ते परकीय धूर्त व वंचक आहेत हें नीट ध्यानांत ठेवा. व गेल्या दीडशे वर्षांत आत्मविस्मृतिरूप अधर्माचा जो प्रादुर्भाव झाला त्याला नष्ट करण्यासाठीं कटिबद्ध व्हा. धैर्य, पावित्र्य, दिव्यता व तेज हीं जशीं आमच्या ठिकाणीं होतीं तशीच आत्मस्मृतीच्या जाणीवेनें तुमच्याहि ठिकाणीं सळसळून उठेल आणि तुम्हीहि आमच्या प्रमाणें गर्जून उठाल."

" अपाम सोमं अमृता अभूम अगन्म ज्योतिरविदाम देवान् ।
किं नूनं अस्मान् कृणवत् अरातिः किमु धूर्तिर् अमृत मर्त्यस्य ।।
(ऋग्वेद मंडल ८. ४८. ३.)

ते मा रक्षन्तु विस्रसश्चरित्रादुत मा स्रावाद्यवयन्तु इन्दवः ।।
अग्निं न मा मथितं सं दिदीपः प्रश्चक्षय कृणुहि वस्यसो नः ।
(ऋ. ८--४८, ५,६)

(आम्ही दिव्यरसाचें प्राशन केलें आहे. आम्ही अमर झालों आहोंत. आम्ही दिव्य प्रकाशाला पावलों आहोंत. आम्ही देवांना ओळखलें आहे. आतां धर्मविमुख दुष्ट आमचें काय करणार आहेत? हे अमर देवा, मनुष्याची कावेबाजी आमचें काय वाकडें करणार? परमेश्वर आमचें रक्षण करो, तो आम्हांला चारित्र्यापासून कधीं भ्रष्ट न करो व रोगापासूनहि दूर ठेवो. घासून प्रदीप्त केलेल्या अग्नीप्रमाणें मला उज्ज्वल कर. आम्हांला उत्तम दृष्टि दे व विजिगीषु उत्साहानें नेहमीं प्रज्वलित ठेव. "

झालें! माझी ही संकल्पित व्याख्यानमाला या व्याख्यानानें मी पूर्ण करीत आहे. माझा विषय अजून अर्धा राहिलेला आहे. वैदिक राष्ट्रदर्शनाचा पूर्वार्ध येथें संपला. त्यांत त्या राष्ट्राचें अंतरंग भावजीवन पाहिलें. पण या देदीप्यमान भावजीवनाचा हा

समाज प्रत्यक्ष कसें जीवन जगत होता, त्यांचीं राज्यें व राज्यघटना यांचें स्वरूप काय होतें? त्यांचा अर्थव्यवहार कोणत्या पद्धतीचा होता? व भौतिक जीवनाच्या समस्या सोडविण्यांतील त्यांचें कौशल्य कोणत्या प्रकारचें होतें? तसेंच त्यांचा व्यवहार, त्यांचा सभ्याचार, त्यांची वेषभूषा, त्यांचे अलंकार इ. विविध गोष्टीसंबंधीं आपलीही उत्कंठा स्वाभाविकपणेंच जागृत झाली असेल. या व्याख्यानमालेच्या उत्तरार्धांत या विषयांचें विश्लेषण करण्याची हमी देऊन मी ही व्याख्यानमाला संपवितों.

पुण्याच्या वाक्पीठावर मी देत असलेली ही चौथी व्याख्यान-माला होय. या वाक्पीठाचा अधिकार साऱ्या भारतांत अग्रगण्य आहे. त्यामुळें या वाक्पीठावर येणें हें जसें सन्मानाचें तसेंच दायि-त्वाचेंहि आहे. मागच्या तीन व्याख्यानमाला लोकांच्या हृदयाचें आकर्षण होऊन राहिल्या. रामायण, महाभारत व श्रीकृष्णचरित्रा-सारख्या विषयावर त्या होत्या. ही व्याख्यानमाला अपरिचित, कठिण व सामान्यतः रुक्ष वाटणाऱ्या विषयावर होती. पण नेहमीप्रमाणेंच या ज्ञानसत्रावर आपण प्रेम केलें व तें यशस्वी करण्यांत मनोभावें साह्य केलें याबद्दल मी आपला अतिशय कृतज्ञ आहे. वेदासारख्या कठिण विषयावरील या ज्ञानसत्राला प्रतिदिनीं सहस्त्रावधि लोकांचा समुदाय उपस्थित राहतो हें दृश्य इतरांना आश्चर्यांत टाकणारें व पुण्यपत्तनाची सांस्कृतिक श्रेष्ठता व्यक्त करणारेंच आहे. माझ्यावर पितृतुल्य प्रेम करणारे प. पू. तीर्थस्वरूप तात्या-साहेब करंदीकर यांनीं याही व्याख्यानमालेला मागच्याप्रमाणेंच उपस्थित राहून माझ्यावर केलेल्या अनुग्रहांतून मी उतराई होणें कठीण. ज्ञानसत्राचे संयोजक व माझे जिवलग मित्र श्री. शं. रा. उपाख्य मामासाहेब दाते यांचे मी आभार मानणें त्यांना राग आण-णारें होईल. म्हणून त्यांनीं जें कांहीं सौहार्द वारंवार दाखविलें तें "मदंगे जीर्णतां यातु" एवढेंच मी म्हणतों. दैनिक काळ व दैनिक भारत यांनीं या महत्त्वपूर्ण व्याख्यानमालेला भरपूर प्रसिद्धि देऊन तिचें लोण महाराष्ट्रांत सुदूर पोचविलें याविषयीं त्यांना

धन्यवाद द्यावे तितके थोडेच आहेत. पुनश्च एकदां माझ्या सहस्रावधि श्रोतृवृंदांना मी धन्यवाद देतों.

हें जें कांहीं मी माझ्या अध्ययनानुरूप वेदासारख्या सर्वश्रेष्ठ विषयावर विवेचन केलें तें सहृदयतेनेंच आपण ग्रहण करावयाचें आहे. माझा शब्द म्हणजे या विषयावरील अंतिम शब्द होय असें मी कोणत्याच विषयासंबंधानें मानीत नाहीं. 'नभः पतंत्यात्मसमं पतत्रिणः' ही म्हण प्रसिद्धच आहे. महर्षि पटवर्धन व लोकमान्य यांच्यासारख्या सुपर्णांचे सुवर्णपंखहि ज्याच्याकडे वळून थकतात त्या या विषयाच्या बाबतींत माझ्यासारख्यानें काय म्हणावें ? श्री ज्ञानदेवांच्या शब्दांत मी आपणांस एवढेंच विनवितों कीं, तरी न्यून ते पुरते । अधिक तें सरते । करोनि घ्यावे हें तुमते । विनवितु असे ।। जैसा स्वभावो मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा । तरी अधिक तयाचा । संतोषु आथी ।।"

शेवटीं श्रीज्ञानदेवांच्या तेजस्वी शब्दांत पुढील प्रार्थना करून मी आपला निरोप घेतों.

आता विश्वात्मकें देवे । येणे वाग्यज्ञे तोषावे ।
तोषोनियां मज द्यावे । पसायदान हें ।।
दुरितांचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्ये पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ।
चंद्रमे जें अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे हो तूं ।।
किंबहुना सर्व सुखी । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं
भजि जो आदि पुरुखी । अखंडित ।।

**समाप्त**